# माझें बारा वर्षांचें काम

उर्फ

# ज्ञानकोशमंडळाचा इतिहास


लेखक व प्रकाशक

डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर एम्. ए. पीएच्. डी.



१९२७

किंमत दीड रुपया.

मुद्रक-डॉ. श्री. व्य. केतकर, ज्ञानकोश प्रेस, ८४१ सदाशिव पुणे.

# अनुक्रमणिका

## मूलग्रंथ



## परिशिष्टें

# प्रस्तावना

माझें गेल्या बारा वर्षांतील काम उर्फ ज्ञानकोशमंडळाचा इतिहास हा देण्याचा प्रयत्न येथें करीत आहे. या इतिहासामध्यें वाचकांस उपयुक्त भाग कांहीं आहे काय हें वाचकच सांगू शकतील. हें पुस्तक लिहितांना मी आपल्या मनांत हें कोणासाठीं लिहीत आहे असे विचारल्यास असे सांगतां येईल कीं ज्ञानकोशासारखा मोठा ग्रंथ करूं इच्छिणारा जो कोणी असेल त्यास आपला अनुभव सांगावा अशी कल्पना मनांत ठेवून हें पुस्तक लिहिले आहे. हें केवळ आत्मचरित्रात्मक पुस्तक नव्हे. आत्मचरित्रात्मक पुस्तक लिहावयाचें असते तर ज्ञानकोशाच्या धंद्याशीं असंबद्ध अशा वैयक्तिक गोष्टी सविस्तर मांडल्या असत्या व त्या लोकांस व.रमणुकान्याहि झाल्या असत्या. मी त्यांत आपली संपूर्ण लेखनविषयक कामगिरीहि मांडली नाही. कारण ती मांडावयाची असती तर तींत माझ्या कादंबऱ्यांचा उल्लेख करावा लागला असता व त्यांचे स्वागत निरनिराळ्या लोकांकडून कसकसें झालें, त्यांची तरफदारी व निंदा करणारी मंडळी कोणकोणत्या प्रकारची म्हणजे कोणकोणत्या पूर्वग्रहाची होती इत्यादि गोष्टीविषयी चर्चा करावी लागली असती, माझ्या लग्नाच्या वेळच्या वर्तमानपत्रांतील टीका वगैरे गोष्टींस स्थल द्यावें लागले असतें. अर्थात हें पुस्तक लिहितांना दृष्टि अगदी नियमित ठेवली आहे. भावी ज्ञानकोशकारास जी जी माहिती उपयोगी पडेल असें वाटलें ती ती सर्व माहिती एकत्र करून यांत घातली आहे. ज्ञानकोशाच्या पुनर्मुद्रणाचा प्रसंग सुमारें २०।२५ वर्षांनीं येईल त्यावेळेस माझा अनुभव सांगण्यास मी असेनच अशी खात्री नाहीं व त्या वेळेस आजच्या आठवणी नाहींशा होतील व आजचीं साधनेंहि नाहीशी होतील. तर आपल्या आठवणी ताज्या आहेत तोपर्यंत जितक्या पद्धतशीर लिहून काढतां येतील तितक्या लिहून काढाव्या हें अवश्य आहे.

इतिहास सांगावयाचा म्हणजे विसरलेलीं भांडणें पुन्हां उकरून काढावयाचीं असेंहि होते आणि आज मी पाठीमागच्या भांडणांचा जो इतिहास दिला आहे त्याचा हेतु एका काळीं जो पक्ष माझ्या विरुद्ध होता त्या पक्षाविरुद्ध लोकमत बनवावे असा नाहीं आणि मी स्वत:

तर विरुद्धपक्षाने जे मला अपाय केले त्यांविषयींचा विषाद सोडून दिला आहे. तीं भांडणे देण्याचा हेतु एवढाच कीं एखाद्या सत्कार्यांत देखील द्वैत कसे उत्पन्न होते हें लोकांस कळावें व आज जे लोक आपले मित्र आहेत ते उद्यां शत्रु होऊ नयेत याबद्दल जी काय खबरदारी घ्यावयाची ती घ्यावी एवढाच आहे. विरुद्ध पक्षाच्या मंडळीच्या विरुद्ध मी कोणतेंहि असत्य लिहिले नाहीं. किंबहुना त्यांची बाजू त्यांच्या तर्फेने जितकी समजून घेतां येईल तितकी घ्यावी अशा तऱ्हेचा प्रयत्न मनाशी करून इतिहास दिला आहे. इतकें करूनहि त्यांस जर अन्याय झाला असेल तर तो माझ्या गैरसमजुतीमुळें झाला आहे, इच्छेमुळें झाला नाहीं असे समजावें.

परिशिष्टांत ज्ञानकोशाच्या अंतर्गत व्यवस्थेसंबंधानें माहिती देणारी अनेक पत्रकें छापली आहेत व त्याबरोबर अनेक टीकाहि प्रसिद्ध केल्या आहेत. खरोखर महत्त्वाच्या टीका आतां यापुढेंच व्हावयाच्या. जितक्या अधिक टीका होतील तितक्या त्या आमच्या हिताच्याच होतील असें मी समजतो. आमच्याविरुद्ध होणाऱ्या टीकांचें पुनर्मुद्रण आम्ही मुद्दाम केलें आहे, त्यावरून आम्ही विरुद्ध टीकाच किती प्रेमाने स्वागत करतो हेंहि वाचकांना दिसून येईल. व येथें मी टीकाकारास असें जाहीरपणे आव्हान करतो कीं टीकाकारांनी आपली टीका आमच्याकडे पाठविण्यास कधीं विसरूं नये. सर्व टीकांचा संग्रह करून त्या पुनरावृत्ति काढणाऱ्याच्या हातीं द्यावयाच्या आहेत.

श्रीधर व्यंकटेश केतकर

# माझें बारा वर्षांचें काम

उर्फ

# ज्ञानकोशमंडळाचा इतिहास

## प्रकरण १ लें.

### प्रास्ताविक

ज्ञानकोशमंडळाचा इतिहास लिहावा आणि त्यामध्ये ज्ञानकोश तयार करण्याच्या कामामध्ये जे मला अनुभव आले ते एके ठिकाणी ग्रथन करून ठेवावेत असे ज्ञानकोशमंडळाच्या अनेक हितचिंतकाकडून आणि अभिमानी मंडळीकडून लिहून आले. माझ्याहि मनांत हा इतिहास लिहावा अशी इच्छा होती, आणि त्यामुळे ही सूचना आली ती माझ्या मनांतील हद्दतच व्यक्त करणारी होती असे मला वाटले. ज्ञानकोशमंडळाचा इतिहास लिहावयाचा म्हटला म्हणजे आत्मप्रशंसा सपाटून बारावयाची एवढेच त्या पुस्तकाचे स्वरूप ठेवावे अशी मात्र इच्छा नाही. जेव्हा लेखक आपल्या कामाविषयी लिहिणार तेव्हा मी किती हुषार आहे हे दाखविण्याची तो संधी घेणारच व हा आत्मप्रशंसा करणारा लेखक आहे म्हणून इतर मंडळी त्याची टर उडविणार. या सर्व गोष्टी लक्षांत ठेऊन कथनास प्रारंभ केला पाहिजे. आत्मचरित्रात्मक लेख लिहिण्याचे दुसरे एक कारण असे असते कीं आत्मचरित्रकारास ज्या व्यक्तींनीं बोचकारले असेल त्याचे त्याबद्दल उट्टे काढणे किंवा त्या आत्मचरित्रकारावर जे दोषारोप झाले असतील त्यांपासून आपला बचाव करणे या गोष्टी करण्यासाठीं त्यास संधी मिळते.

आत्मप्रशंसेची ही अत्यंत स्वाभाविक संधी मी मुळीच गमावूं इच्छीत नाही. एवढे मात्र खरे की एखादें काम पुरे झाल्यानंतर आपण पाठीमागच्या इतिहासाकडे जेव्हा पाहूं लागतो, तेव्हां आपले व इतरांचे जे पूर्वी प्रसंग घडले असतील त्यांविषयी आपण अधिक निर्विकार बुद्धीने पाहूं लागतों, आणि यामुळें कार्य संपूर्ण झाल्यानंतरच्या इतिहास लेखास केवळ आपली स्तुति व इतरांस शिव्या यांच्या संग्रहाचे स्वरूप येत नाही.

ज्ञानकोश ही एक यशस्वी कामगिरी होय. अनेक योजना तयार होतात त्यांपैकी काही अनेक अडचणींमुळें कागदावरच राहतात. कांही योजनांस

प्रारंभ होतो व त्यासंबंधानें काम मध्येच पडून रहातें. यामुळें जे काम यशस्वी होतें त्या कामाकडे लोकांचे लक्ष सहज अधिक जातें. आणि ते काम यशस्वी तऱ्हेने कसे पार पडले याविषयीं जिज्ञासा होते. आणि त्या जिज्ञासेमुळेच काम फत्ते करणारास आत्मप्रशंसा करण्याचा अधिकार आहे असे समजून ती करण्याची संधी उत्सुक श्रोते आनंदाने देतात. मी या संधीचा पूर्ण उपयोग करून घेण्याचे येथे योजिले आहे. खरोखर पहातां ज्ञानकोशाचे काम फत्ते झाले ही गोष्ट महाराष्ट्रीय परंपरेशी विसंगत नाही. ज्या काळात महाराष्ट्रीयानीं अर्ध्याअधिक हिंदुस्थानावर राज्य केले, दोन तीन लाख फौज लढाईवर नेली तो काल गेल्यामुळें आतां अगदी सामान्य कृति करणाऱ्यास देखील महत्त्व आले आहे; त्यामुळे बऱ्याच लोकांस ही कामगिरी मोठी वाटत असेल. पण विचार करतां या काळांत देखील ही कामगिरी केवळ अपूर्व नाही.

ग्रंथस्वरूपाची मोठमोठाली काम करणाऱ्या मंडळींचीं उदाहरणे यापूर्वीच झाली आहेत. वामनराव आपटे यांचे कोश पहावे किंवा रघुनाथ शास्त्री गोडबोले यांचे प्राचीन व अर्वाचीन कोश पहावे. त्याचप्रमाणे गीर्वाणलघुकोशकार ओक व निळोपंत रानडे यांचे कोश पहावे, तर असे दिसून येईल की ही सर्व कामे त्या त्या मंडळींनीं तडीस नेलीं आहेत. चिपळूणकर मंडळीच्या रा. ठकारांनी महाभारताच्या भाषांतराच्या प्रसिद्धीचे कामहि तडीस नेले आहे. या अनेक गोष्टींवरून एखादा मोठा सुंदर ग्रंथ तयार करण्याचे काम करावयास महाराष्ट्र असमर्थ आहे अशांतला भाग नव्हे. ज्ञानकोशाचे काम इतर कामापेक्षां अधिक मोठे होते व त्यामुळे त्यांत अडचणीहि जास्त होत्या पण हा ग्रंथ तयार करण्यास अवश्य असणारे व्यवहाराचे पूर्वशिक्षण या कार्याच्या योजकापाशी अधिक होते. त्यामुळे जास्त मोठें काम हातीं घेऊन तें काम पार पाडतां आले. अनेक अडचणी आल्या असतां त्यांच्यांतून पार पडून आपले काम शेवटास नेण्यास लागणारी चिकाटी रा. वामनराव आपटे रानडे किंवा ज. वि. ओक यांच्यामध्ये माझ्यापेक्षां कमी होती असें मला मुळीच वाटत नाहीं. ती जर त्यांचेपाशी नसती तर त्यांच्याकडून झाली ती कामगिरी झालीच नसती. त्यांच्या व माझ्या कामांमध्ये मला मुख्य फरक दिसतो तो केवळ उद्दिष्ट हेतूस व्यावहारिक स्वरूप कसे द्यावयाचे या बाबतींतला आहे. "आरंभशूराः खलु दाक्षिणात्याः" हे वाक्य केव्हां

कोठें उत्पन्न झालें असेल तें असो. आजच्या महाराष्ट्रासंबधानें तें मुळींच लागू नाही. इतर प्रांतांपेक्षां महाराष्ट्रामध्यें आरंभ केलेलें दीर्घ काम पुरं करण्याची चिकाटी जास्तच आहे असे अनेक प्रांतांचे अवलोकन करतां म्हणतां येईल. जरी महाराष्ट्रांतली मंडळी कामें तडीस नेणारी आहेत तरी आपण कामें अर्धींच टाकणारे आहोत असा खुद्द महाराष्ट्रीयांचा समज होण्यास कारण काय बरें आहे? माझ्या मतें मुख्य कारण असें आहे कीं तो दृग्भ्रम दुसऱ्याच एका अवलोकनामुळें उत्पन्न झालेला आहे. माणसे जी कार्य करतात त्यापेक्षां योजना जास्त करतात. आणि कार्यकर्ती माणसे योजना करतात किंवा कामास आरंभ करतात त्यापैकीं कांहीं नियमित योजनांच यशस्वी होतात. जेव्हां आपण एखाद्या लोकांविषयीं विचार करूं लागतो तेव्हां त्या लोकांच्या फसलेल्या योजनांवरून किंमत न करतां त्यांच्या पार पडलेल्या योजनांवरूनच किंमत केली पाहिजे. चिकाटीच्या बाबतीमध्यें महाराष्ट्र हिंदुस्थानांतील इतर लोकांपेक्षां खात्रीनें कमी नाहीं. जनता भोंवताली विरुद्ध असतां नेटानें काम करणारी माणसे महाराष्ट्रांत आहेतच. प्रो. कर्वे यांनी आपलें उद्दिष्ट काम करण्याचा नेट जितकीं वर्षे दाखविला तितकीं वर्षे मला दाखवितां आला तर मला खरोखरच आनंद वाटेल. दाखवितां येईल किंवा नाहीं हें भवितव्याच्या ढगांत दडलेलें आहे.

ज्ञानकोशाचें कार्य यशस्वी झालें आहे असें अजूनहि म्हणतां येत नाहीं. सध्यां सुमारें ३६००० च्या कर्जाची जबाबदारी माझ्यावर आहे. आणि या जबाबदारींतून जेव्हां मी पूर्ण मुक्त होईन तेव्हां मी आपलें कार्य यशस्वी तऱ्हेनें संपविलें असें समजेन. सध्यां मला यशस्वितेवर हक्क सांगतां येणार नाहीं. हातीं घेतलेलें वाङ्मयात्मक कार्य पुरें झालें एवढें मात्र खरें.

ज्ञानकोशाच्या इतिहासाचीं अंगें अनेक आहेत. या इतिहासाचे साधारणपणें (१) कल्पनेची उत्पत्ति; (२) कार्यास प्रवृत्ती; (३) मंडळाची स्थापना; (४) संपादकीय कल्पना; (५) व्यावहारिक कल्पना; (६) नागपूर येथील इतिहास; (७) निरनिराळ्या लोकांचे साहाय्य; (८) कार्यांतील अडचणी; (९) संपादकांचा मुशाहिरा; (१०) ज्ञानकोश व जाती; (११) ज्ञानकोश व नवीन संशोधन; (१२) ज्ञानकोशकारांच्या दृष्टींची कांहीं अंगें; (१३) ज्ञानकोश आणि इतर वाङ्मय; (१४) ज्ञानकोशाची आर्थिक व्यवस्था; (१५) ज्ञानकोशांतील महत्त्वाचे कार्यकारी; (१६) ज्ञानकोशावरील

आक्षेपक; (१७) संपादकीय वैगुण्ये; (१८) मंडळाची पुनर्घटना या अनेक अंगांवर कांहीं टीपा लिहिल्यास त्यांत कांही उपयुक्त अनुभव साठवून ठेवितां येईल असें वाटते.

---

## प्रकरण २ रें.

## कल्पनेची उत्पत्ति

ज्ञानकोशाच्या कल्पनेचा प्रारंभ माझ्या मनांत केव्हां झाला याविषयी आत्मपरिक्षण करितां असे आठवतें की, उमरावतीच्या सिटी लायब्ररीस तेथील एका विद्वान वकिलांनी (रा. मोरोपंत मराठे?) एनसायक्लोपीडिया ब्रिटानिकाची एक प्रत नजर केली तेव्हांपासून झाला. यावेळेस म्हणजे १८९७ च्या सुमारास ही पुस्तकें मीं प्रथम पाहिलीं आणि त्यावेळेस त्या ग्रंथाचा उपयोग करून घेण्याइतकें जरी माझे शिक्षण वाढलें नव्हते तरी त्या ग्रंथाचे स्थूल स्वरूप माझ्या चांगलेच लक्षांत आले,आणि असा ग्रंथ मराठीत असावा असे वाटले. त्याच सुमारास एक मौजेची गोष्ट घडून आली ती अशी: मी हायस्कूलमध्ये असतां साधारण बहुश्रुत असा विद्यार्थी आहे अशी माझी प्रसिद्धि झाली होती आणि त्या प्रसिद्धीस कारण म्हटले म्हणजे आमच्या वर्गाचे मास्तर रा. नारायण वामन थत्ते बी. ए. (हे पुढे महाराष्ट्रीय ज्ञानकोशाचे ग्राहक झाले) यांनी मला कौतुकाने "एनसायक्लोपीडिया" हे नांव दिले. व त्यामुळे कांहीं स्नेहीमंडळी माझी थट्टा करण्याकरितां मला एनसायक्लोपीडिया म्हणूं लागली होती. या गोष्टीचा माझ्या मनावर प्रेरक परिणाम कितपत झाला असेल हे सांगतां येत नाही; तथापि आत्मपरीक्षणास सुरवात झाल्यामुळे जी गोष्ट आठवली तिचा येथे उल्लेख केला आहे एवढेच. एनसायक्लोपीडिया सारखा ग्रंथ मराठीत असावा असे त्यावेळेस मी कांहीजणापाशी बोललो होतो हेंहि आठवतें. त्यानंतर मी एनसायक्लोपीडिया अगदी विसरून गेलो होतो असे म्हणण्यास कांही हरकत नाही. तथापि १९०६ मध्यें म्हणजे प्रथम एनसायक्लोपीडिया पाहिल्यानंतर ९ वर्षांनी अमेरिकेतील कार्नेल युनिव्हर्सिटीमध्ये माझा प्रवेश झाला, आणि त्यावेळेस अनेक एनसायक्लोपीडिया वारंवार चाळण्याचे काम पडले आणि त्यावेळेस देखील असे ग्रंथ मराठींत नाहीत याचे मला दुःख होत असे. तथापि कार्नेल युनिव्हर्सिटीमध्ये असतां या प्रकारच्या ग्रंथाची घडवणूक आपणच घ्यावी ही कल्पना मनांत उद्भवली नाही.

इ.स. १९०८ मध्ये दुसरी टर्म हॉर्वर्ड युनिव्हर्सिटीमध्यें होती. तेथे असतां सायक्लोपीडियाविषयी विचार पुनः आला आणि त्यास कारणेंहि झाली. नेल्सन कंपनीने "लूज लीफ एनसायक्लोपीडिया" काढला होता आणि त्या एनसायक्लोपीडियाचा विक्रय करणारा एक गृहस्थ हार्वर्ड युनिव्हर्सिटीच्या विद्यार्थ्यांमध्यें गिऱ्हाइकें मिळविण्यासाठीं आला. त्यावेळेस मी एम्. ए. झालेला होतो, आणि जातिभेदाच्या इतिहासाचा पहिला भाग लिहीत होतों. आणि त्यामुळें संशोधनपद्धतीशीं माझा परिचय झाला होता. आणि माझ्यात एखादा लेख अगदी आजतागाईत आहे किंवा नाही हे वाङ्मयसूचीसारखे संदर्भ ग्रंथ पाहून तपासण्याइतके ज्ञान उत्पन्न झाले होतें. त्यावेळेस नेल्सन सायक्लोपीडियाच्या कंपनीने अशी जाहिरात दिली होती की आमचा एनसायक्लोपीडिया घेतला तर तो मागसलेला कधीच रहाणार नाही; कारण जसजसे शोध होतील तसतशी आम्ही नवीन पानें छापीत जाऊं, आणि जुन्या पानाच्या ऐवजी ती पाने घालण्याची संधी वाचकांस देऊ. या कंपनीच्या बाण्याचा उच्चार अर्थात् प्रचारकाकडून झाला आणि त्यामुळे मी त्याचे लेख कितपत आजतागाईत आहेत त्याची तपासणी त्याच्या देखतच केली. तेव्हां त्या सायक्लोपीडियांतील वैशिष्ट्य खरोखर मजकुराचा आजतागाईतपणा नसून बांधणीत होते हे माझ्या चांगलेच नजरेस आलें. त्या सायक्लोपीडियांतील प्रत्येक पान स्वतंत्र होतं; आणि पाठीला शिवण नव्हती तर प्रत्येक पानास बाजूला मोठालीं भोकें पाडली होती व ती भोके जाडी तार किंवा सळई जाईल अशा बेताची होतीं व तीं सर्व पानें सळईने ओवली होतीं, म्हणजे त्यांत वाटेल तेव्हा वाटेल ते पान काढून टाकून नवीन पान घालता यावे अशी सोय केली होती. केवळ ह्या सोयीमुळें ग्रंथ नेहमी आजतागाईत राहील व तो तसा टेवण्यास ग्रंथाचे संपादकमंडळ तयार आहे असा भास उत्पन्न होत होता. तथापि जर आपण मजकुराचे परीक्षण करू लागलो तर असे दिसून येई की बराचसा मजकूर काळजीपूर्वक लिहिला नव्हता. हिंदुस्थानविषयक अनेक लेखांमध्यें इतके दुर्लक्ष झाले होतें की, हे लेख कोणी तरी अगदीच अनधिकारी माणसानें लिहिले आहेत असें भासून आल्याशिवाय रहात नसे व त्याप्रमाणेंच मी अर्थशास्त्रावरील लेखहि पाहिले तेव्हां कित्येक निनांवी लेखकांनी कांही तरी कोठला तरी मजकूर घेऊन कसा तरी लेख तयार केला आहे असें वाटे.

मला गिऱ्हाइक बनविण्याच्या उद्देशानें जेव्हां तो कॅनव्हासर प्रयत्न करूं लागला तेव्हां मी अनेक दोष दाखवून दिले, आणि त्यामुळें आमच्या इमारतींत राहणाऱ्या पदवीधर विद्यार्थ्यांनी त्या ग्रंथाकडे अनुकूल दृष्टीनें पाहिलें नाहीं. याप्रमाणे त्या विक्रेत्याची निराशा झाल्यावर तो माझ्याकडे आला आणि "तुम्हाला जर लेखकमंडळांत घ्यावयाचा कंपनीनें विचार केला तर तुम्ही येण्याचा विचार कराल काय?" अशी पृच्छा केली. मीं त्यास आपली संमति दर्शविली; व पुढें त्या ग्रंथाच्या मुख्य संपादकाकडून तीच पृच्छा करण्यांत आली. त्यानंतर मी संमतीचें उत्तरहि लिहिलें. परंतु पत्रव्यवहार यापुढें मुळींच केला नाहीं; तथापि या ग्रंथाच्या संपादकमंडळांत आपण जाऊं आणि आपण दोन पैसे मिळवूं या अपेक्षेनें आपणांस परिचित असलेल्या विषयांपैकीं कोणकोणत्या विषयावर नवीन लेख पाहिजेत याचें टांचणहि केलें होतें. पण मुख्य संपादकाकडून माझ्या पत्रास जबाब न आल्यामुळें ते सर्व जागच्या जागींच राहिले. तथापि चालू मजकूर रद्द करून आणि नवीन मजकूर करण्याचें कंत्राट मिळवावें या अपेक्षेनें त्या ग्रंथांतील कांहीं भागाचें बारीक परीक्षण मात्र झालें यांत शंका नाहीं.

हार्वर्ड युनिव्हर्सिटीमध्यें असतां कोशरचनेच्या कृतीशीं मला परिचित करणारी याशिवाय दुसरी गोष्ट घडून झाली ती अशी:—वेबस्टरच्या मोठ्या शब्दकोशाचे त्यावेळचे संपादक डॉ. लॉंग यांनी ही डिक्शनरी कशी संपादीत आहों आणि जान्ससनच्या काळापासून कोश करणारांनीं काय काय खटपटी केल्या इत्यादि विषयावर हारवर्ड युनिव्हर्सिटीच्या विद्यार्थ्यांपुढें एक व्याख्यान दिलें.

तें व्याख्यान रात्रीं साडे आठ वाजतां सुरू झालें आणि प्रश्नोत्तरें होत होत कार्यक्रम १०॥ ला संपला, तेव्हां डॉ. लॉंग यांस मी आपल्याच खोलींत येऊन निजण्यास आमंत्रण केलें, आणि दूर जाण्याच्या ऐवजीं जवळच्याच ठिकाणीं निजायची सोय झाली तर बरी असें वाटून तें त्यांनीं पत्करलें. आम्ही दोघेजण माझ्या खोलींत आल्यानंतर आम्ही कॉफी केली; आणि रात्रीं दोन वाजेपर्यंत गप्पा मारीत बसलों. तेव्हां त्यांनीं डिक्शनरीच्या धंद्यांतील बऱ्याच मौजा सांगितल्या आणि आफीसच्या अंतर्व्यवस्थेची माहितीहि सांगितली. त्यावेळेस त्यांनीं मला विचारलें कीं तुम्ही इतकी खोदखोदून माहिती कां विचारतां; तुम्हांला शब्दकोश

करावयाचा आहे काय; तेव्हां मीं त्यांस असे सांगितलेले आठवते की हिंदुस्थानांतील कोणत्याहि भाषेस शब्दकोशापेक्षां एनसायक्लोपीडिआची जास्त आवश्यकता आहे. आणि नतर शब्दकोशाचा काल येईल. अगोदर भाषेंत सर्व प्रकारचें लिखाण तयार व्हावे आणि नंतर त्यांत आलेले शब्द निवडले जावे हा कार्यक्रम भाषेची प्रगती साधण्याच्या दृष्टीने योग्य होईल. हे गप्पाचें साल १९०९ होतें.

इ. स. १९०९ च्या सप्टेंबर महिन्यांत जातिभेदाच्या इतिहासाचा पहिला भाग छापला, आणि आक्टोबरमध्ये कार्नेल युनिव्हर्सिटीत परत गेलो. संशोधनपद्धतीशी परिचय जातिभेदाच्या इतिहासाचा पहिला भाग तयार केला त्यामुळे बराच झाला होता, आणि आपण समाजशास्त्रीय, शासनशास्त्रीय आणि अर्थशास्त्रीय संशोधन चांगल्या प्रकारे करू असा आत्मविश्वास आतांपर्यंत प्रोफेसरांच्या आदेशान जे अनेक निबंध लिहिले, त्यामुळे उत्पन्न झाला होता. तथापि याच सुमारास मीं एक जिआलॉजीवर पुस्तक वाचले तेव्हा भूस्तरशास्त्रास लागू पडणारे अनेक नियम सामाजिक घडामोडींचे स्पष्टीकरण करण्यासहि कसे लागू पडतात व ते समाजशास्त्रज्ञानी कसे दाखवून दिले नाहीत हे मनास पटलें आणि यानतर असे वाटले की सामाजिक शास्त्रांच्या अनेक शाखाविषयी आपण स्वतःच्या परिश्रमान अभ्यास करण्यास समर्थ आहो; तर आपणास जर खरे समाजशास्त्री बनावयाचें असेल तर केवळ समाजशास्त्रावरील पुस्तके वाचीत बसण्यांत काय अर्थ आहे ? त्या पुस्तकांचे लेखकहि मला अर्धवट लोक आहेत असे भासू लागलें. त्याची पुस्तके वाचण्यापेक्षां अनेक शास्त्रांचे प्राथमिक ज्ञान मिळविले तर ते अधिक उपयुक्त होईल. या प्रकारच्या कल्पना मनांत येऊन समाजशास्त्र व शासनशास्त्र यान्च्या प्रोफेसरांच्या कोणत्याहि व्याख्यानास न जातां भूस्तरशास्त्र, जीवशास्त्र (बायालजी), पुस्तकवर्णनशास्त्र (बिब्लिआग्रफी), इतिहाससंशोधनशास्त्र, पुराणवस्तुशास्त्र इत्यादि विषयांवरच्या पहिल्या वर्गांत जाऊन व्याख्यानें ऐकत बसलो. कार्नेल युनिव्हर्सिटींत एक नियम असा असे कीं पदवीधर विद्यार्थ्याला त्याने अमुक वर्गांना हजर राहिलें पाहिजे अशी त्यावर सक्ती नस, व वाटेल त्या वर्गात जाऊन बसावयास त्यास मोकळीक असे. त्याच्या अभ्यासांत त्याला मदत करण्यासाठी जी कमेटी असते आणि

जी पुढें त्याची परीक्षक होते त्या कमेटीच्या मडळीचें म्हणणें त्यानें ऐक-लेंच पाहिजे असें नाहीं. आणि या नियमाचा फायदा घेऊन मी आपणांस वाटतील त्या विषयांच्या (प्रोफेसरांस वाटतील त्या विषयांनां नव्हेत) व्याख्यानांस हजर रहात होतो. याबद्दल माझ्या राजकारणाचे प्रोफेसर डॉ. जे. डब्ल्यू. जेंक्स यांनीं माझी कानउघाडणी देखील केली, पण तुमच्या गेल्या वर्षीच्या व्याख्यानांस बसून माझा विशेष फायदा झाला नाहीं असें मी त्यांस सांगितलें, व त्यास असेंहि सांगितलें कीं तुम्ही जें सांगतां तें मला स्वतःच्या अभ्यासानें मिळवितां येईल, पण भूस्तरशास्त्र, प्राणिशास्त्र इत्यादि जीं प्रायोगिक शास्त्रें आहेत त्यांचा अभ्यास मला स्वतंत्र रीतीनें करतां येणार नाहीं. म्हणून मी त्या विषयांच्या व्याख्यानांस जातो. पुढें प्रो. जेंक्स यानीं हा प्रश्न माझ्या कमेटीपुढें काढला आणि त्यावेळेस मला माझ्या पद्धतीनें समाजशास्त्राचा अभ्यास करावयाचा आहे आणि त्या अभ्यासासाठीं या इतर शास्त्रांचें ज्ञान अवश्य आहे इत्यादि गोष्टी मीं सांगितल्या. माझ्या अभ्यासावर नजर ठेवणाऱ्या कमेटीचे (प्रत्येक विद्यार्थी आपापली कमेटी स्वतः निवडतो) अध्यक्ष प्रो. विल्काक्स हे होते. त्यांनीं माझें म्हणणें ऐकून घेऊन मला जसें वाटत असेल तसें मी करावें असा निकाल दिला. प्रो. विल्काक्स याचा निकाल महत्त्वाचा होता. कारण माझें मुख्य समाजशास्त्र होतें, राजकारण नव्हतें, त्यामुळें प्रो. जेंक्स यांना जास्त बोलतां येईना. प्रो. विल्काक्स यांची वृत्ति अशी होती कीं, प्रत्येक विद्यार्थ्यानें आपल्या इच्छेप्रमाणें अभ्यास करावा आणि ठेचा खातखात शिकावें; त्यामुळें त्यांनीं मला ठेचा खाण्याचें स्वातंत्र्य दिलें आणि मी वाटेल ते विषय अभ्यासूं लागलो. परिणाम असा झाला कीं, १९१० सालच्या जून महिन्यांत जी माझी पीएच्. डी. ची परीक्षा घेण्यांत आली त्या परीक्षेत मी नापास झालों. पण त्याबरोबर हेंहि कबूल केलें पाहिजे कीं, या वाटेल तिकडे भटकण्यामुळें मला अनेक विषयांची प्रास्ताविक ओळख होऊन ज्ञानकोश रचनेच्या कार्यास न कळत मी तयार झालो.

१९१० साली जून जुलै मध्यें मला इंटर न्याशनल सायक्लोपीडिआच्या अंतर्व्यवस्थेची माहिती बरीच कळली. त्या साली मी त्या ज्ञानकोशाचा मागणी उत्पन्न करणारा म्हणून थोडें काम केलें; इंटरनॅशनल सायक्लोपीडियाचे प्रकाशक डॉड मीड आणि कं. हे जेव्हां कॅनव्हासर म्हणून

मंडळीनां पाठवीत असत तेव्हां ते अमेरिकेतील निरनिराळे ज्ञानकोश दाखवीत. आणि त्याबरोबर आपल्या ग्रंथाशीं बाजारांत स्पर्धा करणाऱ्या दुसऱ्या ज्ञानकोशाच्या उणीवा दाखवीत; आणि आपला ज्ञानकोश इतरांपेक्षां उच्च कसा आहे याचें स्पष्टीकरण करीत. गिऱ्हाइके मिळविणाऱ्या चमूस या सर्व गोष्टींची चांगली माहिती असावी यासाठीं त्या कंपनीने एक पुस्तक तयार केले होते ते होतकरू प्रचारकास वाचावयास देत असत; आणि प्रत्येकाकडून गिऱ्हाईक भेटला म्हणजे बोलणे कसे करावे याविषयीचे ठराविक मंत्र म्हणवून घेत असत. त्या मंत्रांतील अर्थ साधारण येणेप्रमाणे होता:—या एनसायक्लोपीडियाची पाने इतकी झाली आहेत, भाग इतके, लेखक असे असे आहेत, लोकमत असे उत्तम आहे. यावर अमक्यांत लेखकांचे अभिप्राय पहा, तमक्याचे पहा, हा ग्रंथ तुम्हाला इतक्या इतक्या गुणांमुळे उपयोगी पडेल, वगैरे गोष्टी होत्या त्यांच्या विक्री करणाऱ्या मंडळीमध्ये अगदी बेताचे शिक्षण झालेल्या मंडळीपासून अनेक प्रोफेसरांपर्यंत लोक होते. या डॉड मीड कंपनीचे एनसायक्लोपीडियाचे गिऱ्हाईकमिळवे तयार करण्याचे वर्ग पाहिले, त्या वर्गात एक दोन दिवस जाऊन बसलो, त्यांचे वशीकरणाचे महामंत्र पाठ केले, आणि दोन आठवडे कॅनव्हासिंगचें कामहि केले.पहिल्या आठवड्यांत एकहि गिऱ्हाईक मिळाले नाही.रहाणीचे व वाहनाचे पैसे फुकट गेले. १२ दिवस सतत महनत केल्यानंतर एक गिऱ्हाईक मिळाले; व पुढे लागोपाठ तीन गिऱ्हाइकें मिळालीं. पुढे कॅनव्हासरचे काम सोडून दिले, पण उपयुक्त अनुभव मात्र मिळाला तो कायमचा झाला. जी चार गिऱ्हाइके मिळाली ती सर्व गरीबातील होतीं, आणि त्यावरून असे वाटू लागले की हप्त्याने पैसे भरावयाची सोय केल्यास अगदी गरीब सुशिक्षित मंडळीची ज्ञानकोश घेण्याकडे प्रवृत्ति होईल. इंटर नॅशनल सायक्लोपीडियाकडे काम करीत असताना जी अत्यंत महत्त्वाची गोष्ट समजली ती गोष्ट हीच होय, असे मी समजतो.

अमेरिकन एनसायक्लोपीडियाकडे काम करीत असल्यामुळें त्यांनीं एनसायक्लोपीडिया ब्रिटानिकाचे दोष दाखविणारें एक पत्रकहि तयार केले होतें. त्या पत्रकात त्या कंपनीने असे दाखविले होते की ब्रिटानिका हा इंग्रज लोकांसाठी इंग्रज दृष्टीने लिहिलेला ग्रंथ आहे,त्यांत अमेरिकेविषयी माहिती पूर्वग्रहदूषित आणि अपुरी आहे, इंग्लडांतील सामान्य व्यक्तीस

देखील स्थान मिळाले आहे आणि अमेरिकेतील प्रख्यात मंडळींकडे देखील संपादकांचे दुर्लक्ष झाले आहे, तर हा ग्रंथ अमेरिकन गरजा पुरविणारा नव्हे आणि त्यांतील पूर्वग्रहदूषित दृष्टीमुळे अमेरिकन तरुणांपुढे ठेवण्यास हा ग्रंथ निरुपयोगी आहे. ते सर्व मुद्दे खरेच होते, पण इंग्लंडांतील गिऱ्हाईकांकडे लक्ष देऊन जो ग्रंथ बनविण्यांत आला तो अमेरिकन लोकांस उपयुक्त कसा होणार? तथापि स्पर्धा करणाऱ्या ग्रंथास अमेरिकन बाजारांतून हुसकून लावण्यासाठी तयार केलेल्या वाङ्मयाच्या वाचनाचा असा उपयोग झाला की, प्रत्येक राष्ट्रास निरनिराळ्या तऱ्हेचा एनसायक्लोपीडिया लागतो हे तत्त्व मनास पटले.

## ब्रिटानिकाचे दोष

ब्रिटानिकाच्या ज्या आवृत्तीतील दोष दाखवून देऊन डॉड मीड आणि कंपनीने कॅनव्हासिंग सुरू केले ती आवृत्ति नववी होती. ही आवृत्ति छापणे १८७५ मध्ये सुरू झालें ते १८८९ मध्ये संपले म्हणजे छापावयासच चौदा वर्षे लागलीं. डॉड मीड कंपनीने असेंहि दाखवून दिले की, १८७५ मध्ये छापावयास घेतलेला बराचसा मजकूर १८६५ च्या सुमारास तयार झाला होता. म्हणजे हा ग्रंथ निघाला त्याच वेळेस अगदी मागसलेला झाला होता.

## जन्मतःच म्हातारा

ब्रिटानिका ग्रंथाची नवीन आवृत्ति १९११ च्या सुमारास निघाली. ती आवृत्ति देखील मला कांही कारणामुळे तपासून पहावी लागली. तथापि ही आवृत्ति इतकी एकाएकी कशी निघाली याचेंहि मला आश्चर्यच वाटले. कारण मला अशी माहिती होती की, ब्रिटानिकाची नवी आवृत्ति काढतांना अमेरिकन गिऱ्हाइकी पटकावण्यासाठी एक आफिस अमेरिकेत उघडण्यांत आलें होतें आणि त्या ऑफिसात बराच खर्च करून अनेक अमेरिकन लेखकांकडून लिहविलेले लेख जमा करण्यांत आले होते. हे लेख ज्या इमारतीत ठेवले होते ती इमारत जळून गेल्यानें या कंपनीचें बरेच नुकसान झाले आहे. याशिवाय १९१० मध्यें डॉड मीड आणि कंपनी यांच्या ऑफिसांतील सेल्समन तयार करणाऱ्या गृहस्थाकडून असेंहि कळले होते कीं, ब्रिटानिकाच्या मालकीसाठी पूर्वीच्या कंपनीच्या भागीदारांत भांडणे लागून दोघांहि पक्षांनीं कोर्टांतील कज्जांत हजारो पौंड खर्च केले आहेत. आणि या स्थितींत

हस्तलिखितहि जळून गेले यामुळें ब्रिटानिका इंटर न्याशनल सायक्लोपीडि- याशीं स्पर्धा करण्यास पुढे सरसावेल असे दिसत नाहीं. हीमाहिती मला होती. आणि त्यानंतर थोडक्याच दिवसांनी म्हणजे १९१० च्या जून, जुलैमध्यें ब्रिटानिकाच्या ११ व्या आवृत्तीची जाहिरात फडकलेली पाहिली तेव्हां ती जाहिरात पाहून मला खरोखरच आश्चर्य वाटले. डबघा- ईस आलेले प्रकरण एकदम सावरले कसे याचा अचंबा वाटूं लागला पण पुढें चौकशी करतां असे समजले कीं, या अकराव्या आवृत्तीच्या उत्पा- दनास अमेरिकन भांडवल आणि अमेरिकन तडफ उपयोगी पडली आहे.

हे कार्य इतक्या तडफेने झाले की, १ वर्षांत ब्रिटानिकाचे व्हाल्यूम खरोखरच बाहेर पडले नववी आवृत्ति पाहिली आणि अकरावी पाहिली तर तडफेमध्ये जमीन अस्मानाचे अंतर दिसून येते.

इंग्लंडमध्ये मीं मे १९११ ते सप्टेंबर १९१२ पर्यंत होतो. तेथे अथी- नियम पत्रामध्ये पुस्तकांचे रिव्ह्यू लिहिण्याचें काम पुष्कळ दिवस केले वे तेथील स्टाटिस्टिकल असोसिएशन, रायल एशिआटिक सोसायटी इत्यादि संस्थांच्या बैठकींत जात असे त्यामुळे ब्रिटानिकांतील अनेक लेखकांच्या गाठी पडल्या. मिसेस केतकर यांची ओळख प्रथम इंग्लंड- मध्येच झाली. इंग्लडहून स्वदेशी आल्यानंतर १ जुलै १९१३ पासून १।७।१४ पर्यंत कलकत्ता युनिव्हर्सिटीत पोस्ट ग्रयाज्युएट विद्यार्थ्यांनां राजकारण आणि अर्थशास्त्र शिकवीत होतो.

१९१४ च्या मे महिन्याच्या शेवटीं कलकत्ता युनिव्हर्सिटीची नोकरी सोडून मी मुंबईस आलो आणि तेथे काही दिवस सरदारगृहांत रहात होतो, आणि त्यावेळेस लेखनसंपादनाच्या व्यवसायांत आपण पडावे अशी इच्छा होती. यावेळेस देखील मुद्रणाच्या धंद्यांत पडावे ही इच्छा नव्हती तर आपले कार्यक्षेत्र लेखन आणि ग्रंथप्रकाशन एवढेच ठेवावे असे मनांत योजिले होते. प्रकाशनांत देखील पुस्तकप्रकाशनाचें व खप- विण्याचें काम करण्याचा इरादा नव्हता. यावेळेस ज्या मनांत अनेकयोजना आल्या त्यामध्ये एक इंग्रजी व एक मराठी अशी दोन मासिके काढावीत ही एक योजना होती. आणि त्यावेळेस तसे मासिक काढावे म्हणून डॉ. शिलोत्री यांचा आग्रह होता. डॉ. शिलोत्री यांनी हिंदुस्थानाकडे येतांना एक प्रगमनशील विचारांचे इंग्रजी मासिक काढण्यासाठीं माझे

मन वळवावें अशी मनांत योजना केली होती. व त्याचें त्यांनीं "पायलट" (Pilot) असे नाव मनांत योजून ठेवले होते. ही इंग्रजी मासिकाची कल्पना मला इतकी पसंत नव्हती आणि याचे कारण मासिकांमध्ये स्पर्धा काय आहे आणि त्याला काय खर्च लागतो याची माहिती मॉडर्न रिव्ह्यू वरच्या अनुभवावरून बरीच झाली होती. कलकत्त्याला पूर्वी जे एक वर्ष घालविले होते त्या वर्षांत मॉडर्न रिव्ह्यूचे संपादक रा. रामानंद चातर्जी यांची चांगलीच ओळख झाली, व त्यांनी मॉडर्न रेव्ह्यूची एकंदर कथा सांगितली होती, त्यावरून मासिक इंग्रजीत काढल्यास त्यांत किफायत होण्यास किती काळ लागेल याविषयी बरीच स्पष्ट कल्पना होती.

या महिन्यापासून सप्टेंबरपर्यंत जो काळ गेला त्या काळामध्ये मुंबई-हून पुण्यास जाणे येणे चालूच होते. व बेकार मनुष्य ज्याप्रमाणे मनांत अनेक योजना करितो त्याप्रमाणे माझ्या मनाची स्थिति होती. एवढे मात्र निश्चित होते कीं आपणास जे काय करावयाचे असेल म्हणजे जें आपल्या आवडीचे असेल तेच करावयाचे. आपल्या संशोधकशक्तीचा उपयोग पुढाल पिढीस करून द्यावा हे काम मी मनात योजिले होते पण तसल्या-प्रकारचे काम मिळण्याची सुधी नव्हती. तसले काम मिळावयाचे म्हणजे युनिव्हर्सिटी प्रोफेसरची जागा मिळणे पण हे युनिव्हर्सिटीने संशोधन विद्येचा प्रचार करावयाचे ठरविले तरच शक्य होते पण तसे कांही झाले नाही. मी स्वतःला जरी युनिव्हर्सिटीप्रोफेसरासारख्या मोठ्या जागेला लायक समजत होतो तरी अधिकारी लोक मला लायक समजत नव्हते. माझ्या योग्यतेसंबधाने माझे उच्च मत सकारण होते. १९१४ सालापर्यंत समाजशास्त्रीय, शासनशास्त्रीय, अर्थशास्त्रीय व संशोधनपद्धतीचें शिक्षण देण्याची पद्धत इंग्लंडांत सुरू झाली नव्हती आणि त्यामुळे इंग्लिश युनिव्हर्सिटयांतून बाहेर पडणारे पदवीधर किंवा तिकडून येणारे इंग्रज शिक्षक माझ्याइतके शिक्षणाचे नव्हते तथापि इकडील युनिव्ह-र्सिटयांमधून ते इंग्रज असल्यामुळे आणि संशोधनविद्येशी अपरिचित असल्यामुळे संशोधनाच्या आवश्यकतेचा काल इकडे अजून आला नाही असे ते म्हणत आणि त्यांच्या तंत्राने इतर लोक चालत.

सरकारची अनुदार बुद्धि मला फारशी भोंवली नाहीं. कारण सरकारकडे नोकरीसाठी मी अर्जच केलेला नव्हता. उलट मध्यप्रांतसरकारची वृत्ति

मला नोकरी द्यावी या तऱ्हेची होती आणि याचे कारण वऱ्हाडचे कमिशनर मि. स्टांडेन यांची माझ्याविषयीं स्नेहबुद्धि होती हे होय. सरकारची अनुदार वृत्ति भोवली नाही हें खरें. पण आपल्या लोकांची इंग्लंडपूजा मात्र भोवली. इंग्लंडच्या साध्या पदवीधराची मान्यता माझ्यापेक्षां जास्त आपल्या लोकांकडूनच होई, एवढेच नव्हे तर माझ्यानतर आलेल्या ब्रिटिश युनिव्हर्सिटीच्या पदवीधरापेक्षां किंबहुना लंडन युनिव्हर्सिटीच्या डी. एस. सी. पेक्षां माझा शिक्षणमूलक अधिकार अधिक आहे, अशी माझी भावना; तर अमेरिकन युनिव्हर्सिटीच्या अत्युच्च पदवीधरांनां देखील ब्रिटिश युनिव्हर्सिटयांच्या सामान्य किंवा अत्यंत कनिष्ट पदवीधरांपेक्षां कमी समजण्याची सरकारची वृत्ति व तीच बरोबर काहीच माहिती नसलेल्या आपल्या देशी गृहस्थांची वृत्ति असल्यामुळे सरकारी अगर निमसरकारीं शिक्षणसंस्थांत माझा सौदा न जुळणे स्वाभाविक होते. या प्रकारच्या कारणामुळें एका ठिकाणी माझा सौदा जुळला नाहीं.

माझी किंमत मी सभोवतालच्या हिंदु व इंग्रज शिक्षकापेक्षा अधिक समजत होतो आणि अंडर ग्रॅज्युएट विद्यार्थ्यांनां पढविण्याचे काम करण्याची माझी तयारी नव्हती, तर फक्त युनिव्हर्सिटीमध्ये पोस्टग्रॅज्युएट विद्यार्थ्यांनां शिकविण्याचे काम पतकरण्याचे योजिले होते पण ते काम मिळाले नाही. कलकत्त्याला काम केले, पण तेथे सर अशुतोष मुकर्जींनी माझ्याविषयी लबाडी केली असा माझा समज असल्यामुळे कलकत्त्याखेरीज इतर ठिकाणीं म्हणजे मुंबई, मद्रास व अलाहाबाद येथील युनिव्हर्सिटयांकडे मी अर्ज केले होते, व त्यावेळेस तिन्ही ठिकाणी अर्जाचा निकाल होण्यास बराच वेळ लागून शेवटी इंग्रज गृहस्थ नेमले गेले. युनिव्हर्सिटयांमध्यें माझ्यापेक्षां जास्त लायकीच्या मडळींचे अर्जच आले नव्हते तथापि मला त्यापैकी कोणतीहि जागा मिळण्याचा योगायोग नव्हता. युनिव्हर्सिटयाकडून तावडतोब निकाल न होता प्रकरण लांबणीवर टाकलें गेले. अर्थात मला आपल्या भवितव्याचा निकाल तावडतोब करावयाचा होता आणि त्यामुळे युनिव्हर्सिटयांकडून उत्तर काय येतें याची वाट न पाहातां मी आपले भवितव्य स्वतःच ठरविण्याच्या विचारास लागलों. माझी ज्ञानकोशाकडे प्रवृत्ति होण्यास माझी कांहीं अंशीं स्वतः पतकरलेली बेकारी कारण झाली असावी असे वाटते.

कांही दिवसांनीं लोकमान्यांची सुटका झाली. त्यादिवशी मी पुण्यामच होतो आणि त्यांची अनायासे भेट पहिल्याच दिवशी झाली. त्यावेळस मला पुढे काय करावयाचें आहे याविषयी कांही बोलणे झाले नाही मी विशेषकरून त्यांनीं तुरुंगवासांत जो अभ्यास केला त्यासबंधाने बोललो. त्यावेळस त्यांनी फ्रेंच, जर्मन आणि पाली या तीन भाषाचा अभ्यास केला होता.

लढाई सुरू झाली तेव्हां मी मुंबईस रहात होतो आणि त्यावेळेस माझे स्नेही डॉ. शिलोत्री आणि मी एकत्रच रहात होतो आणि मधून मधून पुण्यास येत होतो. त्यावेळस पुण्यांतील अनेक मंडळींच्या ओळखी झाल्या. कै. विश्वनाथ काशिनाथ राजवाडे यांची ओळख याच वेळेस दृढ झाली. भारतेतिहाससंशोधक मंडळांतील सरदार तात्यासाहेब मेहेदळे, प्रो. दत्तो वामन पोतदार इत्यादि अनेक आस्थेवाईक मंडळीशी ओळखी झाल्या. त्या वेळेस रा. राजवाडे बरेच दिवस पुण्यातच असत किंवा निदान मंडळाच्या पाक्षिक सभांस येत असत,त्यामुळे त्या संस्थेत कर्तव्यजागृति विशेष दिसत होती. आणि त्या खेपांत पुण्यांतील आणखी कांही मंडळींच्या ओळखी दृढ झाल्या. ज्या जुन्या ओळखी दृढ झाल्या त्यामध्ये रा. रा. अच्युतराव भट यांच्या ओळखीचा उल्लेख केला पाहिजे.

## रा. अच्युतराव भट यांचें धंदेवाईक तत्त्वज्ञान

रा. अच्युतराव भट यांची ज्ञानकोशाच्या हितासाठी झालेली कामगिरी मोठीच आहे आणि तिचे वर्णन यथाक्रम पुढे होईलच. तथापि त्यांनी दुसरी जी कामगिरी केली ती त्यांस नकळत अशीच केली. त्यानीं आपला अनुभव असा सांगितला की, ४ आण्याचे पुस्तक खपविण्यापेक्षां १० रु चे पुस्तक काढून खपवणे सोपे; कारण ४ आण्यांचे पुस्तक फारसें महत्त्वाचे नसणार; तेव्हां त्याचें महत्त्व गिऱ्हाईकास समजूनल कसे देणार? लहान लहान पुस्तकें जेव्हां एखादी चळवळ चालू असे तेव्हांच खपावयाचीं, एरवी खपावयाची नाहीत; लहान धार्मिक पुस्तके मात्र कांही खपतील. लहान शालोपयोगी पुस्तके, तीं घेण्याची विद्यार्थ्यांवर जवळ जवळ सक्ती असल्यामुळे स्वाभाविकच खपावयाची, तथापि त्यांव्यतिरिक्त पुस्तकें खपविणें झाल्यास लहान लहान पुस्तकांपेक्षां मोठीं पुस्तकें खपविणे सोपे जातें. अच्युतरावांच्या या विधानामुळे मला अंधुकपणे दिसणारें सत्य एकदम स्पष्ट दिसूं लागल्यासारखे झालें. जितकें पुस्तक

मोठें तितकें ते खपविण्यास सोपे हे प्रथम दर्शनीं आश्चर्याचें वाटेल पण तसे नाहीं. मोठी पुस्तके खपण्यास कारणेहि आहेत त्यांपैकीं एक मुख्य कारण म्हटलें म्हणजे मोठया पुस्तकांच्या विक्रयासाठी कराव्या लागणाऱ्या खर्चाकरितां जास्त रक्कम बाजूला काढिता येते. व त्यामुळें एखादा विक्रीसाठी मनुष्य पाठविणें शक्य होते हें होय.

ज्ञानकोश रचनेसारख्या कठिण कार्याकडे जी प्रवृत्ति झाली ती सुखासुखीं झाली नाही. ज्ञानकोश व्हावा असे वाटत होतें हे खरे पण तेवढ्याने कार्याकडे प्रेरणा होत नाही. मनुष्यप्राणी सुखाचा आणि अल्प परिश्रमाचा मार्ग शोधीत असतो; आणि कष्टतर मार्गाकडे एकाएकी प्रवृत्त होत नाही. माझी या कार्याकडे जी प्रवृत्ति झाली ती होण्यास केवळ भाषाप्रेम एवढेंच कारण होते, असे मला आज तरी वाटत नाहीं; ज्यावेळेस काम सुरू केले त्यावेळेस आपण केवळ भाषाप्रेमामुळे इकडे वळलो आहोंत असे वाटत होते एवढेंच नव्हे तर इंग्रजी राज्याचा हेतु इंग्रजी भाषेस संस्कृत भाषेचे स्थान देऊन मराठी भाषेला शूद्र भाषेचे स्थान द्यावयाचे आहे हाच आहे आणि हा हेतु आपण विध्वंसून टाकला पाहिजे असे वाटत होते.

१९१४ साली डिसेंबर महिन्यांत मी मद्रासच्या कांग्रेसला गेलो होतो आणि तेथे हिंदुस्थानचे देश व विभाग भाषेच्या तत्त्वावर पाडावे इत्यादि मतांचा प्रसार करण्यासाठी एक पत्रक छापून तेथील प्रतिनिधींमध्यें वाटलें; त्यामुळे तेथील आंध्र मंडळीपैकी बऱ्याच मंडळीची ओळख झाली. त्यामध्येंच रा. रा. डॉ. अच्यन्त लक्ष्मीपति याग्याशी ओळख झाली, व त्यानंतर मद्रासहून सिलोनला गेलो होतो, व सिलोनहून परत आल्यानंतर इंडियन सायन्स काँग्रेसला हजर राहाण्यासाठीं पुनः मद्रासला परत आलो, तेव्हां डॉ. लक्ष्मीपति यांच्याकडे उतरलो होतों व त्यांच्याकडे उतरल्यामुळे ज्ञानकोशाची जी कल्पना होती तिला चालना मिळाली. डॉ. लक्ष्मीपति यांनीं व दुसऱ्या कांहीं मित्रांनी मिळून तेलगू ज्ञानकोशाचें काम अगोदरच सुरू केलें होतें व त्यांतील कांहीं अंक माझ्या नजरेस पडले.

## तलगु ज्ञानकोश

तेलगू ज्ञानकोशाचे मुख्य संपादक कै. के. व्ही. लक्ष्मणराव हे होते. कै. के. व्ही. लक्ष्मणराव हे पूर्वी मराठी लेखक म्हणून प्रसिद्ध

होते. त्याचें लक्ष मराठीकडून तेलगूकडे वळविण्यास त्यांची वहीण कारण झाली असे म्हणतात. कै. क. व्ही. लक्ष्मणराव यांचा नागपूरशीं निकट संबंध आहे. ते प्रथम नागपुरासच शिक्षण घेऊन प्रसिद्ध झाले. आणि त्यांची जन्मभाषा तेलगू असल्यामुळे तेलगू वाङ्मयाची महाराष्ट्रांत प्रसिद्धि करण्याकडे त्यांनी कांही प्रयत्न केले. कै. के. व्ही. लक्ष्मणराव यांचे भाचे रा. रा. भवानीशंकर नियोगी हे तर अस्सल नागपुरी म्हणून मोडतात आणि नागपूर म्यु. पालिटीचे ते अध्यक्ष आहेत. एवंच मराठी व तेलगु या दोहीं ज्ञानकोशाच्या उत्पादकत्वाचा संबंध नागपूरशीं येतो हा योगायोग आहे. लक्ष्मिपर्वताच्याकडे १९१९ च्या जानेवारी १९ नंतर उतरलो होतों पण माझ्या मनांत जी एक विचारक्रांति झाली ती सिलोनमध्ये हिंडत असता झाली.

१९१९ च्या जानुआरी महिन्याच्या पहिल्या तारखेस सिंहलद्वीपांत गेलो तेव्हा तेथे ज्या कांही गोष्टी दृष्टीस पडल्या त्यावरून हिंदुस्थानांतील भावी संस्कृतीचे स्वरूप कसे होईल याविषयी निरनिराळ्या कल्पना मनात येऊ लागल्या. तेथें १९११ सालीच शिक्षण हिंदुस्थानापेक्षां जास्त होते. प्रौढ विवाह अगदी सामान्य झाले होते आणि त्यावेळेस मद्रास इलाख्यामध्ये ऋतुप्राप्तीनंतर होणारे हिंदु स्त्रियांचे विवाह कायदेशीर धरले जावेत म्हणून एक बिल ना. शास्त्री यांनी मद्रास कौन्सिलांत आणले होतें. सिंहलद्वीप हे शिक्षणदृष्टीने किंवा सामाजिक दृष्टीने हिंदुस्थानच्या बरेच पुढे गेलेले असल्यामुळे तेथें आज जी स्थिति दृष्टीस पडते ती उद्यां हिंदुस्थानात दृष्टीस पडेल अशी स्वप्ने मला दिसूं लागलीं. आणि एकंदर आर्थिक आणि शैक्षणिक दृष्ट्या सिंहलद्वीप जरी पुढे गेले तरी राष्ट्रीय भावनांच्या दृष्टीने त्या देशाचा अपकर्ष झाला आहे असे मला वाटू लागले आणि ती स्थिति बदलण्यासाठी देशांत जोराची चळवळ पाहिजे म्हणून प्रयत्न करावा असे मला वाटूं लागले.

सिंहलद्वीपामध्ये ख्रिस्ती आणि बौद्ध यांच्यामध्ये सामाजिक वियुक्तता नाही.

## राष्ट्रीय अरिस्टॉक्रसी आणि देशभाषासंवर्धन

गोइगम जातीची ख्रिस्ती मंडळी आणि बौद्ध मंडळी एकमेकांशीं लग्नें करतात आणि तेथील एक विद्वान पुढारी डा. हेवावितरण (याची व माझी लंडन येथेच ओळख झाली होती) असें म्हणत कीं ख्रिस्ती झालेला मनुष्य

पतित झाला अशी भावना ख्रिस्ती मंडळींत नाहीं, बौद्धांतहि नाहीं. उलट तो प्रगतीच्या मार्गालाच लागला असें सामान्य जनास वाटूं लागते, हा नैतिक अपकर्ष बौद्ध समाजांत झालेला दिसला. याशिवाय हेंहि दिसून आलें की, दोन सिहली जातीची मंडळी एकमेकाशीं लग्नें करीत नव्हती पण ती बर्घेर म्हणजे यूरेशिअन लोकांशीं लग्न करीत. याचा परिणाम असा व्हावयाचा कीं, इंग्रज हे सिहली समाजाचे केंद्र होणार आणि सामाजिक दृष्टया देखील इंग्रजाचा दर्जा सिहली लोकांपेक्षां उच्च ठरणार आणि जर इग्रजा भाषेस देशात प्रामुख्याचे स्थान राहिले तर समाजाचा नेता, व उच्च संस्कृतीचा वाहक या नात्याने इग्रजाचे अस्तित्व देशांत मान्य होणार, पाश्चात्य भाषेस प्राधान्य चालूच राहिले तर ती बोलणारा इंग्रज ब्राह्मण ठरणार आणि सुशिक्षित देशी मनुष्य केवळ इंग्रजाची खराब नक्कल असा तयार होऊन तो इग्रजांचा शूद्र होणार. तर देशी संस्कृतीची म्हणजे देशी वाङ्मय आणि देश्य ललित कला यांचे देशांत प्रामुख्य राहिलें तरच देशांतील लोकांची सामाजिक उच्चता कायम राहील. परक्या भाषेची उच्चता देशांत राहूं दिली तर ती भाषा ज्यांची जन्मभाषा आहे त्याचे उच्च जातित्व देशास मान्य करावे लागेल. तर या क्रियेस जोराने प्रतिबंध केला पाहिजे. हिंदूमध्ये जातिभेद आहे आणि राज्य जरी परक्यांचें आहे, तरी त्यामुळे क्षत्रियवर्ग कायतो स्थानभ्रष्ट झाला. पण ब्राह्मणवर्गाचें देशावर प्रामुख्य राहिले. परराष्ट्रीयास आपलें सामाजिक उच्चत्त्व देण्याची अधोगति देशांत अजून उत्पन्न झाली नाही तर आपल्या भाषेचें देशांत प्रामुख्य राखल्याने इग्रजांच्या सबंध जातीला समाजाचा उच्च वर्ग बनूं देण्यामुळ जी राष्ट्रीय अधोगति उत्पन्न होईल, तींतून तरी आपला समाज बचावेल.परकीय राष्ट्रास आपली सामाजिक उच्च जात म्हणून कबूल करण्याचें भवितव्य अनेक प्रकार करून टाळले पाहिजे असे मनाने घेतलें आणि त्याला माझ्या मनांत जी सुधारणात्रयी वागत होती तो एकच उपाय आहे, असें दिसूं लागलें. देशामध्ये देश्य भाषेचे स्वामित्व राहिले तरच त्या भाषा उत्तम तऱ्हेनें बोलणाऱ्या आणि लिहिणाऱ्या वर्गाचें स्वामित्व राहील ही कल्पना मनांत चांगली बिंबली आणि नवीन तऱ्हेचे विचार देशांत पसरविण्यास मन उद्युक्त झाले. आणि कांहीं दिवस सुधारणा त्रयीचा प्रचार करावा असा निश्चय झाला.

## अरिस्टॉक्रसीचें स्वरूप

सिलोनमध्ये प्रवास करीत असतां अशी एक गोष्ट दिसून आली कीं सिंहली समाजामध्यें प्रौढविवाह जरी पूर्णपणे स्थापित झाला आहे तरी प्रीतिविवाह स्थापित झालेला नाहीं. आणि स्त्रीपुरुषांची ओळख ज्या समाजांत होते असा समाज म्हटला म्हणजे तेथील यूरोपिअन आणि बर्घेरांचा समाज होय. यूरोपिअन लोकांचा समाज बराचसा स्वयपूर्ण आहे. त्यांत बर्घेर लोकांसहि मज्जाव आहे पण बर्घेर लोकांच्या समाजामध्ये यूरोपिअन लोकांच्या चालीरीतींचें बरेच अनुकरण झालें आहे व त्यांच्या सामाजिक फंकशन्समध्ये म्हणजे संस्थामध्ये श्रीमंत वर्गांतल्या सिंहली आणि तामिळ लोकांचाहि प्रवेश होतो. सिंहली लोकांमध्यें व तामिळ लोकांमध्ये जरी लग्नाचे वय आणि शिक्षण ही वाढलीं आहेत तरी स्त्रीपुरुषांचा सामाजिक परिचय करून देणाऱ्या संस्था न वाढल्यामुळे वेल्लाल, गोईगम किंवा करावा यांसारख्या सुशिक्षित जातींमध्ये देखील परस्पर लग्नव्यवहार तर नाहींच पण स्त्रीपुरुषांच्या ओळखी देखील होत नाहींत. त्यामुळे पुष्कळशा तरुण सिंहली किंवा तामिळ मंडळींची या बर्घेरांच्या म्हणजे युरेशिअनांच्या समाजांत आपला प्रवेश करून घेण्याची प्रवृत्ति होते. आणि त्यामुळें या समाजाचें उच्चत्व देशी लोकांच्या मनावर ठसतें. या सर्व गोष्टी मी पाहिल्या तेव्हां माझ्या मनांत जी गोष्ट आली ती ही, कीं प्रत्येक देशांत त्या देशाच्या उच्च संस्कृतीची वाहक अशी जी ॲरिस्टाक्रसी पाहिजे; तशी तयार होण्यास त्या समाजामध्यें स्त्रीपुरुषसंबंध देखील खुला पाहिजे. कारण ज्या समाजांत हा खुला संबंध असतो तो समाज अधिक आकर्षक होतो, आणि त्यामुळे त्या समाजांत शिरावे अशी इतरांस इच्छा उत्पन्न होते. "अरिस्टाक्रसी"होऊं इच्छिणाऱ्या समाजाने केवळ लखोटबंद राहून उपयोगी नाही तर इतरांनां आपणात समाविष्ट होण्याची संधि दिली पाहिजे आणि आपल्या वर्गात समाविष्ट होण्याची इतरांची इच्छा जिवंत ठेवली पाहिजे. ब्राह्मणांत शिरावे अशी ब्राह्मणेतरांची इच्छा असल्याम त्यांस संधि द्यावी. ब्राह्मण समाज अधिकाधिक आकर्षक करावा व त्या समाजामध्ये इतर जातींतील चांगल्या व्यक्तींनां येण्यास संधि मिळावी. असे केल्यानें ब्राह्मण जात ही केवळ जात न रहातां समाजाचा उच्च वर्ग होईल; म्हणजे देशामध्ये इंग्रजांस हिंदु समाजाची उच्च जात बनूं द्यावयाचें नाही; तो मान

राखण्याचा ब्राह्मणांनी प्रयत्न करावयाचा व देशामध्यें इंग्रजांनां सामाजिक प्रामुख्य मिळू नेय म्हणून देशी भाषेचेंच प्रामुख्य देशांत राखावयाचें आणि तें देखील इतकें की प्रत्येक भागांत जे परके लोक येतील त्यानां देखील देश्य लोकांशीं सादृश्य उत्पन्न व्हावें ही आवश्यकता वाटावी.

यासाठीं उपाय म्हटला म्हणजे देशाचे विभाग भाषेच्या तत्त्वानुसार व्हावे, प्रांतिक राज्यकारभार देशी भाषेत व्हावा, तो देखील इतका कीं गव्हरनरनें इंग्रजीत सही केली तर ती बेकायदेशीर ठरावी, देशभाषेत हायकोर्टाचे निवाडे व्हावे म्हणजे देशी सामान्य भाषांनां कायदेशीर भाषेचा संस्कार होईल, आणि इंग्रज कायदेपंडितांचे देशांत प्रामुख्य रहाणार नाहीं आणि त्याबरोबर त्यांचें नैतिक प्रामुख्यहि रहाणार नाहीं.

सायन्स कांग्रेसच्या वेळेस मी मद्रामला होतों. पण त्यावेळेस माझा मुक्काम कायतो ५।६ दिवस होता. त्यावेळेस मी डॉ. लक्ष्मीपति यांच्याकडे उतरलों होतों पण त्यावेळेस त्यांची "आंध्रविज्ञानसर्वस्वमू"ची योजना मी पाहिली नाहीं. मद्रासला सायन्स कांग्रेसला गेलों त्यावेळेस हिंदु आयकोनोग्राफीचे कर्ते टी. गोपीनाथराव यांची ओळख झाली, आणि त्यांनीं मला त्रावणकोर पहाण्यास बोलावले. तेव्हां मी ते आमंत्रण स्वीकारलें आणि त्यांच्या नंतर २।३ दिवसानीं त्रिवेंद्रम् येथें पोहोचलों. तेथे देखील आणखी एका गोष्टीचें अवलोकन झाले आणि ते म्हटलें म्हणजे तेथे स्त्रियांनां जरी स्वातंत्र्य बरेच आहे तरी तेथे अनुनयपद्धति उत्पन्न झाली नाही. त्रावणकोरहून कोचीनला गेलों.तेथे एर्नाकुलम, त्रिचुर इत्यादि मुक्कामीं होतों. त्रिचुर येथें तेथील एथ्नालाजिस्ट ए. के. अनंत कृष्ण एय्यर यांच्याकडे पाहुणा होतों. त्रावणकोर येथील गोपीनाथ रावांमुळें आणि त्रिचुर येथील रा. ऐय्यरांमुळें तेथील मल्याळी लोकांच्या समाजाची माहिती चांगल्या प्रकारें झाली. तेथें असे दिसून आले कीं, जरी त्यांच्यामध्ये प्रौढविवाह आहे आणि प्रीतिविवाह होतो तरी प्रीतिविवाह ही गोष्ट जनसंमत धरली जात नाही. त्रावणकोरचे दिवाण रा. कृष्णन् नायर यांनीं तर प्रीतिविवाहाचें अस्तित्व नायर समाजांत नाहीं व नायर आणि ब्राह्मण यांच्या विवाहपद्धतीत जणु काय फरकच नाहीं असे दाखविण्याची त्यांची इच्छा होती. म्हणजे जेथे स्त्रीस्वातंत्र्य आहे व

नैतिक विचार अगदीं स्वतंत्र आहेत. तेथील हिंदु समाजांत देखील अनुनयपद्धतीची कल्पना रुजत नाहीं. याचें कारण समाजाच्या ब्राह्मण अरिस्टॉक्रसीनें ती मान्य केली नाहीं हें होय असें वाटूं लागलें.

## ना. गोखल्यांचा मृत्यु

त्रिचुर येथें असतां नामदार गोखल्यांच्या मृत्यूचें वर्तमान ऐकलें. व तेव्हां एक तऱ्हेची मनाला जागृति झाल्यासारखें झालें. महाराष्ट्रांतील एक महत्त्वाचा मनुष्य दिवंगत होतो आणि आपण केवळ अनिश्चयी मनुष्यासारखे भ्रमण करीत आहों, जग हे पुढे दररोज चाललें आहे, हिंदुस्थान मात्र मागें आहे आणि आपण त्याच्या प्रगतीसाठी काय करीत आहोंत इत्यादि विचार मनांत जागृत झाले आणि गोखल्यांच्या मृत्यूची बातमी आल्यानंतर एकदोन दिवसांनीं त्रिचुर सोडले आणि मद्रासला गेलो. यावेळेसहि डॉ.लक्ष्मीपतींच्याकडे उतरलों होतों आणि आंध्रांच्या ज्ञानकोशाची माहिती मला याच वेळेस झाली.

## डॉ. लक्ष्मीपति आणि त्यांच्या सुशील पत्नी

डॉ. लक्ष्मीपति हे पुण्यास वैद्यक संमेलनाच्या वेळी आले होते त्यामुळे त्याची ओळख कांही महाराष्ट्रीयांस असेलच. डॉ. लक्ष्मीपति हे तेलुगुज्ञानकोशाचे मुख्य संपादक नव्हते, मुख्य संपादक रा. रा. के. व्हा. लक्ष्मणराव एम्. ए. हे होते. तथापि या ग्रंथाची सर्व व्यवस्था पहाण्याचें काम डॉक्टर लक्ष्मीपति हेच करीत होते. हें काम करण्यासाठीं जो प्रास्ताविक खर्च लागावयाचा तो चार मंडळींनी कांही महिने शंभर रुपये दरमहाप्रमाणें पैसे घालून केला. या कामाची योजना साधारणतः येणेंप्रमाणें होती: एका रुपयास १०० पानें ज्ञानकोशाचीं द्यावयाचीं आणि शंभर पृष्ठांचा एक असे साठ अंक काढून पुस्तक साठ रुपयांत द्यावयाचें. त्याच्या ग्रंथाला या योजनेनें सातशे वर्गणीदार मिळाले. आणि त्यामुळे त्यांचे काम चालेल असा त्यांस विश्वासहि वाटूं लागला, त्यांनीं अनेक पुस्तकांचें पद्धतशीर पृथक्करण करावयाचे आणि त्यांत विषय पडतील तसे पडूं द्यावयाचे अशी योजना न करतां अगोदरच अजमासानें विषय ठरवून त्या त्या विषयांवर लेख लिहिण्याची योजना केली. ही कल्पना आणि आम्ही ज्ञानकोश तयार करतांना योजलेली कल्पना यांची तुलना ज्ञानकोशाच्या

प्रथमच्या योजनेतच केली आहे (ही योजना परिशिष्ट म्हणून पुढें छापली आहेच). डॉ. लक्ष्मीपतींच्याकडे यावेळेस बरेच दिवस म्हणजे निदान दोन आठवडे राहिलो, आणि ते दिवस मोठ्या आनंदाचे गेले. डॉ. लक्ष्मीपती म्हणजे आपली प्रगति अनेक दिशांनी व्हावी म्हणून उत्साह बाळगणारे, आणि वाङ्मय, राजकारण, वैद्यकशास्त्र, सामाजिक सुधारणा यांसारख्या सर्व प्रकारच्या गोष्टींत आस्था बाळगणारे गृहस्थ असल्यामुळे त्यांच्याशी संभाषण मनास उल्लसित करीत असे आणि त्यांच्या सुशील पत्नी या सुशिक्षित आणि सुस्वभावी आंध्र कुलवधूचा उत्तम नमुना होता असे म्हणण्यास हरकत नाही. आणि या दोहोंच्या संबंधाने माझ्या मनांत एक तऱ्हेचा आदर उत्पन्न झाला. त्यावेळेस आंध्रमंडळीमध्ये मुलींचें रजोदर्शनोत्तर विवाह क्वचितच होत आणि मिसेस लक्ष्मीपति यांचे लग्न त्या इंटरमिजिएट झाल्यानतर झाले, आणि दोघांचा परिचय झाल्यानंतर झालें आणि नवरा आणि बायको ही दोघे ब्राह्मण पण निराळ्या पोटजातीतली होती त्यामुळे हें कुटुंब तेथील सामाजिक दृष्टीनें अत्यंत प्रगमनशील मंडळीत मोडले जाई. डॉ. लक्ष्मीपति यांच्याकडे असतांना आंध्र देशांतील प्रमुख लेखकवर्गाच्या ओळखी झाल्या, आणि त्यावेळेस आणि मी "आंध्रांमध्ये गीर्वाणविषयक जागृति" विविधज्ञानविस्तारांत पाठविण्यासाठी लेख तयार केला, (वि. वि. एप्रिल १९१९ ).

यावेळेस डॉ. लक्ष्मीपतीच्या आंध्रविज्ञानसर्वस्वमूच्या व्यवस्थेचे गुण व त्याप्रमाणे दोषहि कळून आहे. अंक वेळेवर निघत ना, आणि दोन अंक एकदम देण्याचीहि प्रवृत्ति झाली. पण तीमुळे नुकसानहि सोसावे लागले. व्ही. पी. दोन रुपयांची केली म्हणूनच कित्येकांनीं नाकारली. असेहि दिसून आले की ज्या अनेक ग्राहकांनीं पहिला अंक घेतला त्यांनी दुसरा अंक घेतला नाहीं आणि ज्यांनी दुसरा घेतला त्यांनी तिसरा घेतला नाही त्यामुळें संच बिघडले आणि असेंच चालू राहिले तर काम शेवट पर्यंत तडीस कसें जाईल याची शंका डॉ. लक्ष्मीपतीनांच वाटू लागलेली दिसली; तेव्हां रुपरुपायास एकेक अंक विकावयास काढणे हा योग्य मार्ग नव्हे असें मनांत मीं ठरविलें. या सर्व गोष्टींचें अवलोकन मराठी ज्ञानकोशाच्या यशाला कारण आहे असें मीं समजतों. आपल्या आंध्र मित्रांस आलेलें अपयश आमच्या यशास कारण झालें आहे.

## आंध्र आणि महाराष्ट्र

आंध्रांचा हा प्रयत्न पाहून मनाला एक तऱ्हेचें ईर्ष्येचें उत्तेजन मिळालें. आंध्रांच्या मध्यें शिक्षण कमी आहे अशी माझी त्यावेळेस समजूत होती आणि आंध्रांपैकीं निजाम हद्दींत असलेला भाग महाराष्ट्राच्या निजाम हद्दीत असलेल्या भागापैकीं जास्त आहे आणि त्यामुळे त्याच भागांत आंध्रवाङ्मयाला अपकर्षक अशी स्थिति आहे असे दिसून येत होतें, आणि अर्वाचीन आंध्रवाङ्मय त्याच्या योग्यतेकडे पाहिले तर ते मराठीपेक्षां कमी दर्जाचे आहे असे भासल्याशिवाय रहात नसे; असें असूनहि आंध्रांनी ज्ञानकोश तयार करण्याची कंबर बांधली तर महाराष्ट्राला तसें करतां येणार नाहीं काय, असा विचार उत्पन्न झाला; व माझा स्वतःच्या योग्यतेसंबधाने मोठा आत्मविश्वास होताच. तर आपण जर ज्ञानकोशरचनेचे काम अंगावर घेतलें तर आंध्रांपेक्षां ते अधिक चांगले आणि अधिक यशस्वी खात्रीने करूं असे वाटलें. तथापि यावेळेस देखील ज्ञानकोश काढण्याचे अंगावर घेण्याचा कायमचा निश्चय झाला नाहीं. अजून माझे मन स्वकीय संस्कृतीच्या संवर्धनासाठी सामाजिक व राजकीय चळवळ करण्याकडेसच होतें. आणि मद्रास येथे मी जीं व्याख्यानें दिलीं तीं याविषयावरच होती. त्या व्याख्यानांचे अहवाल तेथील स्थानिक दैनिकात प्रसिद्ध झाले होते आणि त्यामुळें माझ्या मतांविषयीं आणि विचारांविषयीं आंध्र मंडळींत बरीच जिज्ञासा उत्पन्न झाली होती. त्यामुळे मच्छलीपट्टणच्या मंडळींनीं मला व्याख्यानास येण्यास आमंत्रण केलें. तेथे व्याख्याने झालीं तीं संभाषणस्वरूपाची होतीं आणि त्या व्याख्यानांत आंध्रांच्या भाषाविशिष्ट प्रांताच्या तत्त्वास नव्या तत्त्वज्ञानाची जोड मिळाली.

आंध्रांच्या देशांत असतां त्यांनी माझा जो सत्कार केला आणि त्यांच्या चळवळीस जो मी जोर दिला त्यासंबंधाने सविस्तर माहिती देणें तो केवळ आत्मचरित्राचा भाग होईल. तो ज्ञानकोशाच्या इतिहासाचा भाग होणार नाही आणि यासाठीं त्याची विशेष माहिती येथें देतां येत नाहीं. एवढेंच सांगतां येईल कीं, आपल्या समाजाची संस्कृति कायम राखण्यासाठीं प्रयत्न करण्याची आवश्यकता आणि तीसाठीं सुधारणात्रयीचें महत्त्व आंध्रांना बरेंच पटलें. इंग्रजी भाषेनें समाजांत एक दुर्बल एकीचा सदृश वर्ग उत्पन्न होईल पण एक जात जितकी परस्पर बद्ध असते तितक्या एकीचा वर्ग तयार करावयाचा असला तर तो स्थानिक

संस्कृतीच्या महत्त्वस्थापनेनें समाजांत जे दृढीकरण उत्पन्न होते त्यानेंच होईल आणि भिन्न लोक स्थानिक समाजाशीं एकजीव होण्याचा प्रयत्न अधिकाधिक करतील.

तर थोडक्यांत सांगावयाचें कीं हिंदुस्थानाच्या प्रत्येक भागांत स्थानिक संस्कृतीचें महत्त्व स्थापन करण्यासाठीं जी एक भावना माझ्या मनांत उत्पन्न झाली आणि ज्या भावनेचा प्रसार मी इतरांत उत्पन्न करीत होतो ती भावना ज्ञानकोशाच्या उत्पत्तीस बऱ्याच अंशीं कारण झाली. या भावना उत्पन्न करण्यासाठीं मी संस्कृतमध्ये व्याख्यानेंहि दिलीं आणि समाजसंघटनेवर कांहीं संस्कृत श्लोकहि तयार करून त्यांचा प्रचार आंध्र देशांत, बेझवाडा, गुंतूर नरसरापेठ, राजमहेंद्री, काकीनाडा, विजयानगर इत्यादि ठिकाणें हिंडून आणि उत्कलांतील गंजम, कटक, जगन्नाथपुरी इत्यादि गांवें हिंडून केला आणि नंतर कलकत्ता व रायपूर येथें जाऊन नागपुरास आलों आणि तेथें ज्ञानकोशाची कल्पना मांडली आणि कार्याला लागलों. रायपूर येथें माझा जन्म झाला असल्यामुळें यावेळेस रायपूर पाहून मला मोठा आनंद झाला. नागपूरलाच ज्ञानकोशाची कल्पना कां मांडली याविषयीं थोडेसें विवेचन अप्रस्तुत होणार नाहीं.

## कार्य पुण्यास कां सुरू केलें नाहीं?

ज्ञानकोशाचा कार्यक्रम पुण्यात सुरू न करता नागपुरासच सुरू कां केला याविषयीं थोडासा खुलासा केला पाहिजे. प्रारंभीचा कार्यक्रम नागपुरासच सुरू करण्यात अनेक सोयी होत्या. पुण्यास संस्था पुष्कळ आहेत नागपूर व मध्यप्रांत येथें महत्त्वाची संस्था नाहीं याविषयीं नागपूरच्या कांहीं मंडळींस खेद वाटे. पुण्यास संस्था निघाव्यात आणि त्यानीं वऱ्हाड नागपूराकडे वर्गणीसाठीं यावें ही गोष्ट गैर आहे असे पुष्कळ लोकांस वाटू लागले. होते. माझ्या मनांतहि हीच भावना होती. मला पुण्याचा अभिमान नव्हता मला महाराष्ट्राचा अभिमान होता आणि त्यांतल्या त्यात पूर्वेकडील महाराष्ट्राचा अभिमान होता. वऱ्हाड नागपूरनें एखादें असें कार्य करून दाखवावें कीं, जे हिंदुस्थानांत गाजेल असें मलाहि वाटत होतें. या माझ्या प्रांतिक देशाभिमानामुळें माझी नागपुरासच काम करावें ही प्रवृत्ति झाली पण या प्रांतिक अभिमान शिवाय दुसरींहि कारणें होतीं. पुण्यास जर हा कार्यक्रम सुरू केला असतां तर हें कार्य पक्षविषयक प्रश्नांतच गणलें गेलें

असते. त्यावेळेस लो. टिळक जिवंत होते आणि लो. टिळक हो एक व्यक्ति अशी होती की, तिला आंत घ्यावे तरी पंचाईत व वगळावें तरी पंचाईत. लोकमान्य आंत असले तर ज्ञानकोश हा ग्रंथ विशिष्ट पक्षाचा होणार असें लोकांनां वाटले असतें. आणि त्या वेळच्या वातावरणांत विशेषेंकरून मवाळपक्षानें त्यास उपद्रव दिला असता. कांही कारणामुळें मला त्यावेळेस जहाल पक्षाचे धरण्यांत येत असे. आणि त्याला कारण काय तर "स्वार्थत्यागाची मीमांसा" हा लेख. फर्ग्युसन कॉलेजच्या कांहीं मंडळीना तो लेख केवळ मवाळांची टवाळी करण्याकरतां आहे असे वाटलें. या लेखामध्यें केवळ स्वार्थत्याग हा केव्हां उपयोगी पडेल, केव्हां शहाणपणाचा, केव्हा निरुपयोगी याविषयी तत्त्वे दिली होती व फर्ग्यूसन कॉलेजचे उदाहरण केवळ डोळ्यासमोरचे म्हणून दिलें होतें. परतु या कॉलेजच्या अभिमानी मंडळीचा असा समज झाला की, माझा मुख्य हेतु फर्ग्यूसन कॉलेजची टवाळी करणें हा आहे, व तत्त्वांची मांडणी केवळ उपबृंहण होण्यासाठी आहे. सुबोधपत्रिकेने तर त्या लेखावर टीका करतांना डॉ. केतकर हे जहालाचे पुढारी होऊं पहात आहेत असा मजवर आरोप केला. फर्ग्यूसन कॉलेजमध्ये सर्वच मंडळी अगदी विरुद्ध होती अशांतला मुळीच भाग नाही. कारण प्रो. पटवर्धन, डॉ. गुणे वगैरे मंडळींनीं त्या लेखाचे स्वागत चांगल्या प्रकारें केलें.

केसरीमध्ये जातिभेदावर जो लेख लिहिला होता तो लेख देखील मला विशिष्ट पक्षांत घालण्यास कारण झाला. तसला लेख लिहिण्याचें धैर्य मला झालें नसतें असे डॉ. भांडारकर देखील माझ्यापाशीं म्हणाले होते, व तो लेख आज जर कोणीं वाचून पाहिला तर जे विचार त्यावेळचे कट्टे सुधारक देखील व्यक्त करावयास भितील अशा विचारानें तो भरलेला आहे. पण तो लेखहि माझ्यावर जहालपणाचा शिक्का मारण्यास कारण झाला होता, आणि याचे कारण एवढेंच कीं, बुद्धाला वाईट म्हटलें. बुद्धाला वाईट म्हणणारा लेखक ब्राह्मण्याची तरफदारी करणारा होय. आणि अर्थात् तो जुन्या मताचा आहे असा त्यावरून कांहीं उदारमतवाद्यांनी आपला मुद्दाम समज करून घेतला. आणि जुन्या मताचा म्हणजे राष्ट्रीय म्हणजे मवाळांच्याविरुद्ध अशी कित्येकांची विचारपद्धति होती. परंतु बुद्धाला वाईट कां म्हटलें याच्या कारणांकडे लक्ष दिलें नाहीं. माझा बुद्धावर जो आक्षेप होता तो असा की, बुद्ध

हा जातिभेद मोडावयास उद्युक्त झालेला नसून जातिभेदाची तळी उचलून धरणारा होता. आणि तो समतेचा भोक्ता नसून केवल ब्राह्मणद्वेष्टा असा होता, ब्राह्मणद्वेष म्हणजे जातिभेदाचा द्वेष नव्हे. तथापि इतका खोलवर विचार न करतां बुद्धास वाईट म्हणणारा मनुष्य सुधारणेला विरोधी आहे असे धोपट मार्गाने लोक ठरवीत असत. व त्या मतानुसारच लोक माझें वर्गीकरण करूं पहात. पुण्यामुंबईतील लोकांच्या विचारांवर असल्या विचारांची खरपूड होती पण ती खरपूड पूर्वेकडील महाराष्ट्रांत फारशी पसरली नव्हती.पूर्वेकडील महाराष्ट्र अधिक मोकळ्या मनानें विचार करणारे होते आणि पश्चिमेकडून जे विचारप्रवाह येत त्याला बेताचाच मान देणारे होते व तेथे टिळक व गोखले या दोघांनांहि त्याच व्यक्तीकडून सारखाच मान मिळे. या गोष्टीमुळे ज्ञानकोश काढावयास पुणे हे स्थल योग्य नव्हे, प्रारंभीच फार अडचणी येतील असे मला वाटले आणि नागपूर ही जागा पसंत केली.

## नागपूर कां पसंत केलें

नागपूर ही जागा पसंत करण्याचे दुसरे एक कारण होते. आणि ते कारण म्हटलें म्हणजे माझें वऱ्हाड मध्यप्रांतावरील प्रेम हें होय. माझा जन्म रायपूरला झाला आणि माझें बरेचसे शिक्षण; उमरावतीस झाले आणि त्यामुळे मी आपणांस उमरावतीचा म्हणवीत असे; आणि उमरावतीच्या माझ्या मित्रमंडळीबद्दल मला मोठा अभिमान वाटत असे. वीर वामनराव, कै. शामराव देशपांडे वगैरे मंडळी माझ्या बरोबरीचीच. उमरावती हायस्कूलचे माझ्याबरोबरचे विद्यार्थी वऱ्हाडांतच वसती करून राहिलेले आणि यामुळे या सर्व मंडळीशीं माझ्या ओळखीहि होत्या व त्यांसहि माझ्याविषयीं अभिमान असे. व जेव्हां मी ज्ञानकोशाची योजना तयार केली आणि ती कांहीं मंडळीनां कळविली तेव्हां या कार्यास आपण मदत करावी ही भावना त्यांच्यामध्यें स्वाभाविकपणें उत्पन्न झाली. याप्रमाणे वऱ्हाडांतील मंडळी व मी यांचा येणेंप्रमाणें आपलेपणाचा संबंध असल्यामुळें वऱ्हाडांतील मंडळीस मला मदत करावी या तऱ्हेची बुद्धि होती.

शिवाय नागपूर ही जागा पसंत करण्याचें कारण म्हटलें म्हणजे कांहीं अंशीं तो योगायोग जुळून आला हे होय. कलकत्ता युनिव्हर्सिटीची

नोकरी सोडल्यानंतर मी दीड वर्ष हिंदुस्थान हिंडत होतों आणि मद्रास कडे विशेषें करून आंध्र देशांत भाषेचे तत्त्वानुसार देशविभाग पाडण्यासाठी जी चळवळ सुरू झाली तिला जोर देत होतों, हें मागे सांगितलेंच आहे. आंध्रामध्यें ही चळवळ जोराची उत्पन्न करून मी ओरिसांत गेलो. व तेथेंहि उत्कल चळवळीला टेकू दिला. त्यानंतर मी कांहीं दिवस कलकत्त्याला होतो. व तेथून मध्ये रायपूरला मुक्काम करून मी नागपुरास आलो कलकत्त्यास असताना तेथील लायब्ररीत बसून एक मध्य प्रांताविषयीं व्याख्यान तयार केले. त्या व्याख्यानांत मुख्य मुद्दा असा होता की मध्यप्रांतास हिंदुस्थान सरकाराकडून पुरेसा पैसा मिळत नाहीं. आणि बंगाल प्रांताला मात्र जास्त मिळतो. आणि खरोखर मध्य प्रांतालाच मदतीची गरज जास्त आहे हे. जे व्याख्यान मी तयार केले तें बरेच आंकडे वगैरे देऊन तयार केले होते आणि ते व्याख्यान नागपुरास आल्यानंतर प्रथम दिल्यानें नागपूरच्या मंडळीवर एकदम छाप पडली. या व्याख्यानाला गर्दी सपाटून होती व हा व्याख्यानातील मुद्दा नागपूरच्या पुढाऱ्यांच्या तोपर्यंत मुळीच लक्षांत आलेला नव्हता. आणि नागपूर सरकार आपला कारभार गचाळ रीतीने करीत आहे अशा रीतीने त्या व्याख्यानांत मांडणी केली होती. त्यानंतर नागपूर युनिव्हर्सिटीवर एक व्याख्यान दिले. आणि त्या व्याख्यानाचाहि परिणाम बराच झाला. परंतु त्या व्याख्यानाचा दुसराहि परिणाम झाला. आणि तो म्हटला म्हणजे मध्यप्रांतातील ज्या यूरोपीयन अधिकाऱ्यांची मी सरकारी नोकरीत शिरावें अशी इच्छा होती किंबहुना आग्रह होता त्यांची ती इच्छा नाहींशी झाली.नागपूरला असतांच तेथे ज्ञानकोशाची कल्पना मी जाहीर केली. आणि त्यावेळेस एक कच्ची योजना देखील तयार केली. ती योजना करतांना ज्या गृहस्थाने विशेष मेहनत घेतली ते गृहस्थ म्हटले म्हणजे कै. पांडुरंगपंत जोशी हे होत. ही ज्यावेळेस योजना तेथील लोकांच्या पुढे मांडली तेव्हां एक मौजेचा, महत्त्वाकांक्षी परतु फाजील महत्त्वाकांक्षी व त्यामुळे हास्यास्पद कार्यक्रम म्हणूनच कांहीं मंडळींनां वाटलें.

परंतु कांहीं मंडळींनीं जरी कार्यक्रम हास्यास्पद असला तरी तो हातांत घेऊन कामाला लागावें; अपयश येणारच. तरी येणार हें समजूनच काम हातीं घ्यावें असें म्हणणारी मंडळी होतीं. आणि अशा

मंडळीमध्यें तेथील अनेक पुढारी होते. त्यांत डॉ. मुंजे, डॉ. चोळकर व माधवराव पाध्ये वगैरेंचा उल्लेख करतां येईल. एवंच, नागपूरनें या कल्पनेचें प्रथम स्वागत केलें व त्यामुळें नागपुरास कार्यारंभ व्हावा हेंच युक्त होतें.

## देशी भाषांतून शिक्षणाची चळवळ

नागपूरहून सप्टेंबरच्या सुरवातीला उमरावतीला आलो त्यावेळेस मी दुसरें एक काम अंगावर घेतलें होतें. ते म्हटलें म्हणजे नागपूर युनिव्हर्सिटी स्थापन होणार होती तीत सर्व शिक्षण देशी भाषांतून करावें ही चळवळ होय. त्यानंतर थोडक्याच दिवसांनी नागपूरला प्राव्हिन्शिअल कान्फरन्स भरणार होती. व युनिव्हर्सिटीसंबंधानें ज्या सूचना कोणास करावयाच्या असतील त्यांची अखेरची तारीख देखील त्या प्राव्हिन्शिअल कान्फरन्सच्या अगोदर कांही दिवस होती. तेव्हां ही कल्पना बऱ्याच लोकांस मान्य करून घ्यावी आणि बऱ्याच सुशिक्षित लोकांच्या सहीनें ती मांडावी म्हणून लोकमत मिळविण्यासाठी वऱ्हाडभर हिंडलो आणि सुमारें ३।४ शे सुशिक्षितांच्या सह्यांनी ती सूचना सरकारकडे पाठविली. यावेळस मी वऱ्हाभर हिंडलो त्यामुळे पुष्कळशा मंडळींशीं ओळखी झाल्या आणि त्यांचें मराठी व हिंदी भाषांत उच्च शिक्षण मिळावें या कल्पनेस पाठबळ मिळालें. याच सुमारास जेव्हां प्राव्हिन्शिअल कान्फरन्ससाठीं अध्यक्ष कोण करावा म्हणून नावें मागविली होतीं त्यावेळस अध्यक्षाच्या पदासाठीं माझेहि नांव कांहीं जणांकडून सुचविण्यांत आलें. यानंतर थोडक्याच दिवसांत मला कांही समाज अनुकूल झाला होता हें दिसलें. त्यावेळस अध्यक्षपद कै. ना. शुक्ल यांस मिळालें होतें. पण अध्यक्षाच्या जागीं माझें नांव सुचविलें गेले ही जाहिरात देखील माझें थोडेसे महत्त्व वाढविण्यास कारण झाली असावी.

## फर्ग्युसनचे प्रोफेसर

नागपूरची प्राव्हिनशिअल कान्फरन्स (आक्टोबर १९१६) आटपल्यानंतर पुन्हां कांहीं दिवस उमरावतीस राहून मी मुंबईस कांग्रेससाठीं गेलों आणि तेथें देखील ज्ञानकोशाची कल्पना खासगी तऱ्हेने जाहीर केली. आणि अनेकांचें साहाय्य मिळविण्याचा प्रयत्न केला. यानंतर म्हणजे जानेवारीच्या प्रारंभाला पुण्यास गेलों तेव्हां फरग्युसन

कालेजमध्ये तेथील मंडळीचे सहाय्य मागावयास गेलो तेव्हां त्या मंडळींनां थोडेसें आश्चर्य वाटलें. त्याचवेळेस कांहीं मंडळी म्हणावयास लागली की, आमच्यावर टीका करतां आणि पुन्हां आमचें सहाय्यहि मागतों. मी सांगितलें कीं असें करूं नये हे कोणत्या शास्त्रांत सांगितले आहे. त्यावेळेस फरग्युसनच्या ज्या प्रोफेसरांबरोबर मी चहा घेत होतो,त्यांत प्रो. धर्मानंद कोसंबीहि होते. त्यांनांहि मी लेखक होण्याबद्दल विनंति केली तेव्हां ते म्हणाले की मला तुम्ही वादविवादास अयोग्य समजतां आणि मग माझ्यापाशी लेख मागण्यास कां येतां. मी त्यांस म्हटले की तुमच्याशीं वादविवाद करणे सोडून दिले कारण वादविवादास लागणाऱ्या औचित्याच्या कल्पना तुम्ही सोडून दिल्या होत्या हे होय. तेव्हां ते म्हणाले आम्हाला जर औचित्याच्या कल्पना नाहीत तर आम्हाला लिहायला कशाला सांगता? मी त्यांस उत्तर दिले की मी तुम्हांस पाली वाङ्मयावर लिहावयाला सांगणार आहे; औचित्याच्या कल्पनावर निराळा लेखक पाहीन! पण हे उत्तर प्रो. धर्मानंदांस आवडले नाही. त्यानी पुढे तुम्ही सारस्वतांचा द्वेष करतां वगैरे आरोप करण्यास सुरवात केली व मी त्यास शेवटी कटाळून आपण भांडणाची तारीख जरा कांही दिवसानतर ठरवू असे सांगितलें. त्यावेळेस कै. प्रो. पटवर्धन यांनी मात्र आपले वर्तन वादविवादाच्या मैदानांतील अट्टल खेळगड्याप्रमाणे केले. ते म्हणाले "तुम्ही आमच्यावर टीका करता काय? तुम्हीहि कधीं सापडाल, मग तुमची मी अशी काढतों की तुम्हाला आठवणच राहील."हे ते हंसत हंसत आणि माझ्या कपांत चहा अधिकाधिक ओतीत म्हणाले. तेव्हा इतर मंडळीहि हसूं लागली. आणि प्रो. पटवर्धनांच्याविषयी माझ्या मनांत एकदम प्रेम उत्पन्न झालें.

## डॉ. भांडारकर

त्याच वेळेस मी डॉ. भांडारकरांच्याकडे गेलो. त्यांच्याकडे घेऊन जाण्याची कृपा आमचे मित्र सरदार मेहेंदळे यांनी केली होती. त्यावेळेस डॉ. भांडारकर माझ्याविषयी अत्यंत वाईट कल्पना घेऊन बसले होते. माझीं पुस्तकें न वाचतां माझ्याविषयी त्यांनीं मत बनविलें होतें: तेव्हां प्रथम डॉ. भांडारकरांनीं माझ्याशीं सहकारिता करण्याचें नाकारलें पण शेवटी कांहीं लेख तपासून देण्याचें कबूल केलें. त्यावेळेस आमचें भाषण

एकमेकांवर लहान सहान हल्ले करणारे आणि त्यामुळें जरा मौजेचें झालें आणि त्यामुळें मला बरोबर घेऊन गेलों ही गोष्ट बरी झाली की वाईट झाली असे सरदार मेहेंदळ्यांस झालें असावें. पण शेवटीं डॉ. भांडारकरांचे मन बरेच खुलें झाले आणि सरदार मेहेंदळयांनां देखील थोडेसें बरें वाटलें.

## महाराष्ट्रीय ज्ञानकोश आणि बाळ गंगाधर टिळक

१९१६ च्या जानेवारींतच कांग्रेसनंतर लोकमान्यांनाहि भेटलों होतो त्या संस्मरणीय प्रसंगीं लोकमान्यांनी ज्ञानकोशाची योजना पार पडणार नाहीं. ती पार पाडणे अत्यंत कठिण गोष्ट आहे, इत्यादि गोष्टी सांगितल्या. तेव्हां त्यांस मी म्हटलें कीं, ज्ञानकोश तयार करावा कीं न करावा याविषयीं तुम्हाला सल्ला विचारावयास आलो नाहीं, तुम्हीं काय मदत देऊं शकाल एवढेंच विचारण्यास आलों आहे.

कार्य करावयाचे यासंबंधाचे निश्चयाचे शब्द ऐकून लोकमान्यांस आनंद झाला व ते म्हणाले कीं निश्चय ठरलाच असला तर जी काय मदत करावयाची ती मी आनंदाने करीन,स्वत: तुमच्याकरतां कांही लेख लिहीन, केसरींतून तुमच्या कार्याची जाहिरात करीन आणि जी काय स्वत: द्रव्याची मदत करतां येईल ती करीन आणि जे अनेक लोक भेटायला येतील त्यांच्याशीं तुमच्यासंबंधानें बोलेन. या प्रकारें काय मदतीची अपेक्षा करावी हें त्यांनीं सांगितले आणि दुसरा कांही उपदेश केला त्याचे स्थूल स्वरूप येणेप्रमाणें: लोकमान्य म्हणाले कीं "आपण डॉ. भांडारकरांनां भेटा; दुसऱ्या अनेक मंडळींनां भेटा;सर्वांचा सल्ला घ्या पण लेख स्वीकारतानां कडक नजर ठेवा.पुष्कळ मडळी लेख लिहितांना वाटेल तसे भरकटत असतात आणि पुष्कळशा मंडळीचा विद्वान म्हणून गौरवहि झालेला असतो आणि तो आमच्यासारख्यांनाहि करावा लागतो पण त्या गौरवाने फसूं नका. पुष्कळ मंडळींनां आम्ही विद्वान म्हणून सरटिफिकिटें देतो तीं वासरांत लगडी गाय शहाणी या नात्याने देतो, व तसे उत्तेजनार्थ द्यावेहि लागते पण ज्ञानकोश तयार करतांनां तुम्हाला अत्यंत निष्ठुरतेनें वागले पाहिजे. लो ांचें लेख तुम्हाला तपासावे लागतील आणि मोठमोठया मंडळींनां दुखवावे लागेल." मी त्यांस उत्तर दिलें कीं "जेव्हां लेख दुसऱ्याच्या नांवावर येणार तेव्हां त्यांत आम्ही जबाबदारी त्यांच्यावरच टाकणार, तर आम्हीं लेखांत व्यक्त होणाऱ्या मतांबद्दल फिकीर कां

बाळगावी." टिळक म्हणाले कीं "जबाबदार आणि चांगला लेखक असेल आणि तो पूर्वग्रहदूषित नसेल तर तसें करण्यास हरकत नाहीं पण तुम्हांस अशी माणसे कोठून मिळणार आणि किती मिळणार?" तेव्हां मीं म्हटलं "चांगली संशोधक माणसें थोडींच आहेत. कांही भागावर राजवाडे आणि खरे, कांही भागावर आपण स्वतः आणि कांही भागावर डॉ. भांडारकर यांस अधिकारी लेखक धरून त्यांचे लेख जसेच्या तसेच स्वीकारावयास हरकत नाहीं पण इतरांच्या लेखांवर बारीक नजर ठेवावीच लागेल." तेव्हां ते म्हणाले "की सर्वांच्याच लेखावर ठेवावी लागेल, तुम्हाला भांडारकरांनां वगळावयाचें असेल तर वगळा, मी त्यासंबंधानें कांही म्हणत नाहीं पण माझ्यासंबंधानें मी सांगतो कीं मला देखील वाटेल तसें लिहिण्याचे स्वातंत्र्य देतां कामा नये. तसेच राजवाड्यानांहि देतां कामा नये. आम्हां दोघांच्याहि लेखांवर तुम्ही कात्री चालविली तर तुम्हीं आपलें कर्तव्यच केलें असें मी समजेन."

ज्ञानकोशांत लोकमान्य टिळक लेख लिहिणार होते पण त्यांस कार्यबाहुल्यामुळे वेळ मिळाला नाहीं. ज्ञानकोशाच्या दुसऱ्या भागांत जो वेदविषयक मजकूर आला आहे त्याविषयीं त्याच्याशी देखील मधून मधून चर्चा होत असे.

लोकमान्यांची भेट घेतली व पुण्यास समाजशास्त्रावर व्याख्यानेंहि झोडली; त्या व्याख्यानांचा गडबडगुंडा गोपवारा केसरींत सांपडेल. मी १५।१।१६ च्यां सुमारास उमरावतीला व तेथून नागपूरला गेलों व तेथे जानेवारी महिन्यांतच ज्ञानकोश काढण्यासाठीं वाकररोडवरील कोंपऱ्याच्या दाते यांच्या घरांत भाड्यानें जागा घेतली.

नागपूरला मी प्रथमतः ज्ञानकोशाची योजना मांडली तेव्हां ज्ञानकोश करावयाचा तो एक ट्रस्ट म्हणून करावा आणि ट्रस्टीपाशी वर्गणी गोळा करणारांनी फंड आणून द्यावा आणि त्या ट्रस्टींनी मधून मधून रक्कम पास करून ती कामाकडे द्यावी अशा तऱ्हेची योजना ज्ञानकोशाची सहानुभूति बाळगणाऱ्या नागपूरच्या मंडळीत होती. व ज्ञानकोशाचे ट्रस्टी होण्यासाठी अनेक मंडळी कबूल होती. पण ट्रस्टी होण्यास मी जी एक अट घालीत होतो त्या अटीस कोणी कबूल नव्हते आणि ती अट म्हटली म्हणजे ज्ञानकोशमंडळास दोन दोन हजार रुपये ट्रस्टी होणाऱ्या मंडळींनीं द्यावेत ही होती; पण ती अट ट्रस्टी होण्यास तयार

असलेल्या मंडळीपैकीं कोणासहि मान्य नव्हती. त्यावेळची बैठक कांहीं एक न ठरवितां खलास झाली. ज्ञानकोशाची योजना अव्यवहार्य आहे असें मत बनवून मंडळी घरोघर गेली. मात्र त्यांत कांही अपवाद होते. डॉ. चोळकर म्हणाले, कीं तुम्ही कंपनी कां काढीत नाहीं. कंपनी काढावी व लोकांनां, आगाऊ वर्गणीदार होणाराम अमुक फायदा मिळेल असे कांही तरी कळवावे आणि लोकांच्या हप्त्याहप्त्याने वर्गण्या घ्याव्यात आणि त्या पैशावर ज्ञानकोश काढावा—ही कल्पना,ते सहज बोलून गेले. ही कल्पना मींहि अगोदर कांही मंडळींपुढें मांडली होती.पण ही कल्पना कोणासच पसंत पडली नव्हती. ज्ञानकोशाच्या पवित्र कामाला कंपनीचा धंदेवाईकपणा नको असें लोकांचे मत होते. डॉ. चोळकरांनी जात जातां ही कल्पना केव्हां मांडली की जेव्हां आपण याच्यावर पुढें बोलूं असें मी त्यांस सांगितले, व त्यांस घाई असल्यामुळें तेहि निघून गेले.

## लोकांची अनुकूलता कशी अजमावली

नागपुरांतल्या"बडया बडया" मंडळींची बैठक खलास झाल्यानंतर त्या बैठकीत काय ठरले याविषयी जिज्ञासा असलेली "छोटी" मंडळी आली. ती मंडळी कांहीं तरी इष्ट ठरले असेल अशा अपेक्षेनें व उत्साहाने आली होती. त्या मंडळीमध्ये कांहीं कायद्याचे विद्यार्थी होते व कांहीं नुकतेच कॉलेजांतून बाहेर पडलेले मास्तर होते. त्या मंडळींनां मीं प्रश्न केला की जर तुम्हांला १०० रु. भरावयास सांगितले आणि ते रुपये ९ वर्षांत भरावे म्हणून संधि दिली तर तुम्ही ज्ञानकोश घ्याल किंवा नाहीं. तरुण मंडळीमध्ये प्रथम भेटावयास आलेले गृहस्थ रा.नारायणराव पंढरपूरकर हे होते ते म्हणाले की, अवश्य घेऊं, हप्त्याहप्त्याने पैसे भरण्याची सवड असली तर माझ्यासारख्या थोडया प्राप्तीच्या मनुष्याला देखील ज्ञानकोश घेणे अशक्य नाही. आणि दरमहा ४।५ रुपये भरून मी स्वतः जरूर घेईन. रा. नारायणरावास मी विचारले कीं, जर हा आपण ट्रस्ट केला तर तुम्ही त्यास केवळ वर्गणी म्हणून काय रकम द्याल. तेव्हां त्यांनीं ९ रु. च्या आंतली रकम सांगितली. अर्थात या बोलण्यावरून लोकांची प्रवृत्ति काय आहे हे सहज दिसून आले. मी इंटर नॅशनल एन्सायक्लोपीडियासाठीं गिऱ्हाइकी मिळवण्याचें काम अमेरिकेत केलेच होतें. आणि त्यावेळेस मला असे दिसून आले कीं, प्राथमिक

शाळेंतल्या मास्तर व मास्तरणी यांच्या गळ्यांत एन्सायक्लोपीडिया बांधतां येतो. त्यांनां हप्त्यानें पैसे भरण्याची मात्र सवड पाहिजे. तोंच अनुभव हिंदुस्थानांत देखील येऊं शकेल असें नारायणराव पंढरपूरकर यांच्या बोलण्यावरून वाटूं लागलें. नारायणराव पंढरपूरकर निघून गेल्यानंतर दुसरे कांही कायद्याचे विद्यार्थी आले. त्यानां देखील मी तोच प्रश्न केला आणि त्यांनी देखील तीच उत्तरें दिली. यावरून मला असें वाटूं लागलें की, ५०।६० रु. पगाराच्या सामान्य पदवीधरांमध्यें जर उत्साह उत्पन्न करता येतो तर ज्ञानकोशाची कल्पना अशक्य कां समजावी. ज्ञानकोशाला पैशाची अडचण पडणार नाहीं. आपण १००००० रु. गोळा करूं शकूं अशी मनात खात्री उत्पन्न झाली. या बैठकीला माधवराव पाध्ये हजर नव्हते. या रात्रीला मी कंपनीची संपूर्ण योजना तयार केली. ती अशी:—५०००० रुपयाचे कंपनीचे शेअर्स करावेत व ५०० वर्गणीदाऱ्या विकाव्यात; व या दोहोंकडून उत्पन्न सरासरी १००००० रु. येईल. या एक लाखांत खर्च कसा बसवावयाचा त्याचेंहि स्थूल कोष्टक केलें. त्यावेळेस कागदाचा भाव ८४ धरला होता. आणि एक हजार प्रती छापण्यास सुमारे ४०००० रु. खर्च येईल,असा हिशोब काढला. व ६०००० रु. संपादकीय व व्यवस्थाखर्च म्हणून धरले होते. त्याचवेळेस ५००० पर्यंत गिऱ्हाइकी वाढू शकेल अशी कल्पना करून दुसरा एक हिशोब बसविला होता.

## रा. पाध्ये, रा. फडके व श्री. गंगाबाई पेंडसे

दुसरे दिवशीं हीयोजना माधवराव पाध्ये यांस दाखविली, त्यांस ती पसंत पडली व त्यांनीं १५शेअर्स घेऊन डायरेक्टर होण्याचे कबूल केले.व १५ शेअर्स घेण्यास मी तयार आहे असे मला पत्रहि लिहून दिलें.ते पत्र घेऊन आकोल्यास रा. फडके यांचेकडे गेलों; ते मला पाठिंबा देतील ही माझी खात्री होती. कां की ते माझे आप्त असून पूर्वीपासून हितचिंतक आहेत. रा. फडके यांचकडे मला जावयाचेंच होतें. कां की त्यांनी आपल्या दुसऱ्या मुलाच्या मुंजीसाठीं मला आमंत्रण केले होतें. मुंज आटोपल्यानंतर त्यांचे व माझे बोलणे झालें, व त्यांनी १५०० रु. चे शेअर्स घेण्याचे कबूल केले. तेथेंच खामगावचे वकील व रा. फडके यांचे श्वशुर रा. दत्तोपंत पेंडसे होते आले होते, व दत्तोपंत पेंडसे यांनी मला लहानपणापासून पाहिलें असल्यामुळे आणि माझ्याविषयीं कौतुक करणाऱ्या

मंडळींपैकीं ते एक असल्यामुळें त्यांनीं देखील या कार्यास आपली पूर्ण सहानुभूति व्यक्त केली. दत्तोपंत पेंडसे यांनीं आपल्या हयातींत ज्ञानकोशास काय मदत केली व त्यांच्या निधनानंतर त्यांच्या पत्नीनें (श्री. गंगाबाई पेंडसे यानीं) मदत काय केली याचा उल्लेख पुढें प्रसंगानुसार येईलच.

ज्ञानकोशमंडळाच्या सुरवातीस माझे २५ शेअर्स, रा. माधवराव पाध्ये यांचे १५ शेअर्स व रा. नारायण खंडेराव फडके वकील अकोला यांचे १५ शेअर्स अशी जोड झाल्यामुळें कंपनीस मूर्त स्वरूप येणें शक्य झाले. माझ्या इच्छेस पहिल्या प्रथम दुजोरा देण्याचे श्रेय जर कोणास असेल तर तें नागपूरचे प्रसिद्ध वकील महादेव कृष्ण पाध्ये बी. ए. बी. एल्. संपादक उद्यम यांचेकडे आहे. महादेव कृष्ण पाध्ये हे माझे पहिले साहाय्यक होत. आणि त्यांच्या या साहाय्याबद्दल मला माझी कृतज्ञता व्यक्त केली पाहिजे. पुढें कंपनीच्या व्यवहारांत भांडणें झालीं आणि कांही लबाड मंडळीचें पुढारीपण माधवराव पाध्यांनीं केले आणि हें करतांना त्यांनी मजवर बरेच शितोडे टाकले आणि कंपनीच्या कामासहि नुकसान पोहोचाविले तरी देखील ते माझे पहिले साहाय्यक होते ही गोष्ट मी कधींच विसरलों नाही.

---

## प्रकरण ३ रें.

## स्थापनेनंतरचें दीड वर्ष

### माझें भांडवल

ज्ञानकोशमंडळाची जी एकंदर रचना झाली त्या रचनेवरच ज्ञानकोशमंडळाचें यश बऱ्याच अंशीं अवलंबून आहे. प्रथम ५०००० भांडवलाची लिमिटेड कंपनी म्हणून नोंदण्यांत आली. या कंपनीमध्यें असेंच पहिल्यापासून धोरण ठेविले होतें कीं कांही मंडळीची सत्ता पहिल्यापासून शेवटपर्यंत रहावी. या हेतूनेंच कंपनीमध्यें कायमचे चालक तिघेजण होते. व यासाठी जादा चालक दोहोंपेक्षां जास्त नसावेत म्हणून नियम "आर्टिकल्स"मध्यें घालण्यांत आला. जादा चालक कोणताहि शेअरहोल्डर होऊं शकेल. याचा परिणाम इष्ट झाला नाहीं व त्यामुळे ज्यांचें कंपनींत भांडवल कांहींच नाही व जे केवळ भांडवल

न घालतां चळवळ करूं इच्छितात अशा लोकांस आंत गडबड करण्यास वांव मिळाली. परंतु पुढें अनुभवानें म्हणा किंवा परिस्थितीमुळें म्हणा कंपनीचें हें वैगुण्य नाहींसें झालें. आणि ज्ञानकोशमंडळास २००० पर्यंत रक्कम ज्यानीं कर्जाऊ दिली आहे किंवा कंपनीच्या कर्जाबद्दल जे २००० पर्यंत जामीन आहेत अशा मंडळींपैकींच जादा चालक निवडावेत असा ठराव कंपनीनें केल्यामुळें कंपनीचे कामास स्थिरता उत्पन्न झाली. कंपनी प्रथम ५०००० भांडवलाची होती व तें भांडवल १०० रु. चा एक शेअर याप्रमाणें विभागलें गेलें होतें. कायम चालकांनीं १५ किंवा जास्त शेअर घ्यावे असा नियम होता व मी स्वतः २५ शेअर घेतले होते. या २५ शेअरवर शेकडा ३० पर्यंत रक्कम पहिल्या वर्षीच भरणें प्राप्त होतें. म्हणजे कंपनी माझ्या ७५० रु. भांडवलावर निघाली असें म्हणण्यास हरकत नाहीं. कां कीं उरलेली रक्कम म्हणजे १७५० रु. मला पुढील ३ वर्षांत भरावयाचे होते. म्हणजे मला ते माझ्या पगारांतून भरण्याची संधी होती. एवंच ७५० रु. भांडवलावर मला एक मोठी कंपनी स्थापन करतां आली. हिचें भांडवल पुढें एक लाख झालें आणि ज्ञानकोश रचनेची उलाढाल साडेतीन लाखांवर झाली. या सर्वांचा प्रारंभ किती लहान होता हें या सर्व गोष्टींकडे पाहिलें असतां लक्षांत येईल. ज्ञानकोशमंडळामध्यें पुढें कांहीं मंडळी माझ्याविरुध्द झाली तरी २५ शेअरांच्या मतांमुळें मला आपले अधिकार शेवट पर्यंत कायम ठेवतां आले. माझें उच्चाटण करण्याचा इतरांकडून प्रयत्न झाला नाहीं असें नाहीं. प्रयत्न पुष्कळ झाला. परंतु त्या मंडळींनां मतें कमी पडल्यामुळे व त्यांस कंपनीच्या कायद्याचें चांगलें ज्ञान नसल्यामुळें त्यांच्या प्रयत्नास यश आलें नाहीं. मी २५०० रुपयांचे शेअर घेतले होते त्यामुळेंच दोन गृहस्थांनीं १५०० चे शेअर घेतले. नाहीं तर त्यांनीं ती रक्कम आंत घातली नसती. मी २५०० पर्यंत रक्कम घातली कारण मी नोकर म्हणून रहाणार होतों. रा. पाध्ये यांनीं कांहीं अंशीं छापण्याचें काम मिळविण्याच्या इच्छेनें रक्कम घातली असावी तर रा. फडके यांनीं मला मदत करावयाची म्हणून हे पैसे आंत घातले असावेत. रा. पाध्ये व फडके या दोघांनां कार्याचें महत्त्व नव्हतें असें म्हणावयास मी तयार नाहीं. तथापि जास्त प्रबल भावना कोणती असावी याविषयीं माझें वर दिलेलें मत झालें आहे.

## कार्यारंभ

महाराष्ट्रीय ज्ञानकोशमंडळ लि. ही कंपनी ३० मे १९१६ रोजीं नोंदण्यासाठीं पाठविली. व त्यानंतर २ जून रोजीं कंपनीच्या संस्थापकांची सभा बोलाविली. त्यावेळेस बहुतेक सर्व मंडळी हजर होती. त्या सभेंत डॉ. केतकर यांना पगार म्हणून किंवा खर्चाकरतां म्हणून दरमहा ५० रु. द्यावयाचें ठरलें. दरमहा २० रु. चा एक कारकूनहि देण्यांत आला. त्यानंतर पुढची सभा १ जुलै रोजीं भरली. त्या एका महिन्यामध्ये दोघाजणांचेच कारकुनीसाठीं अर्ज आले होते. हें सांगण्याचें कारण असे की आमच्याकडे नोकरी करण्यासाठीं यावें इतपत सुद्धां विश्वास साध्या कारकुनास वाटत नव्हता. त्यानंतरची सभा आगस्ट ५ रोजीं भरली. कंपनी नोंदल्याचें साक्षीपत्रक आल्यानंतर हीच पहिली सभा असल्याकारणानें त्या सभेमध्यें सुरवातीपासूनची हकीगत देण्यांत आली ती येणेप्रमाणे:—

(१) ज्ञानकोशासंबंधाची चळवळ प्रथम १९१५ च्या आगष्ट महिन्यांत निघाली.

(२) ता. २६ जानेवारी १९१६ रोजीं हें कार्य करण्याचा निश्चय करून प्रस्तुत घर घेतलें (वाकर रोडवरील रा. दाते यांचा बंगला).

(३) ता. १४ फेब्रुवारी १९१६ रोजीं यासंबंधानें पहिली सभा बोलावण्यांत आली.

(४) ता. २० फेब्रुवारी रोजीं कंपनी स्थापन करण्याचें रा. निळकंठराव उधोजी यांचे घरीं ठरलें. व कंपनीची योजना देखील तेथें जमलेल्या लोकांत मान्य झाली.

(५) ता. २५ एप्रिल १९१६ रोजीं मेमोरँडम व आर्टिकल्स यावर सह्या करून कंपनी रजिस्टर करण्याचा प्रयत्न केला पण कांही चुकांमुळे त्यावेळीं (त्या कागदांचा) स्वीकार झाला नाहीं.

(६) ता. १५ मे १९१६ रोजीं कंपनी रजिस्ट्रेशनकरतां मेमोरँडम व आर्टिकल्स बदलून पुन: पाठविली.

(७) ता. ३० मे १९१६ रोजीं प्रॉस्पेक्टस फाईल केला.

(८) ता. ८ जुलै रोजी कंपनी रजिस्टर झाली. व १२ जुलै रोजीं कंपनीचे सरटिफिकेट मिळालें. याच सभेंत डॉ. केतकर यांस मंडळाचे मॅनेजर व सेक्रेटरी नेमलें.

२० नोव्हेंबर १९१६ च्या सभेंत एकंदर २३८ शेअर खपले असा उल्लेख आहे.

६।१।१९१७ रोजीं कंपनीच्या शेअरचें "ॲलॉटमेंट" झालें, यावेळेस एकंदर २४१ शेअर "ॲलॉट" झाले.

३।३।१९१७ रोजीच्या चालक मंडळाच्या सभेंत हिशोब जुन्या महाजनी पद्धतीप्रमाणें ठेवावे असें ठरलें.

३१।३।१७ रोजीच्या सभेंत ज्ञानकोशाची संपूर्ण योजना (परिशिष्ट १ पहा) डायरेक्टरांपुढें ठेवण्यांत आली. व याच सभेंत डॉ. केतकर यांस १ एप्रिल पासून ५० च्या ऐवजीं १०० रु. महिना द्यावयाचें ठरलें.

३१।३।१७ च्या सभेच्या पूर्वी गुडी पाडव्याच्या शुभ मुहुर्तावर एक कार्यारंभविधीसाठीं जाहीर सभा रा. ब. ठाकूर यांच्या अध्यक्षतेखालीं भरली होती. त्या सभेची हकीकत अनेक पत्रांतून त्या वेळेस आली.

ज्ञानकोशाच्या योजनेतच कांहीं महत्त्वाची अंगे होतीं त्याचें स्पष्टीकरण केले पाहिजे. शेअर होल्डर प्रथम ५०० करावयाचे होते तर वर्गणीदार ५०० करावयाचे होते. ५०० शेअर होल्डरांनां रक्कम एकदम भरावयाची नव्हती तर चार वर्षांत भरावयाची होती. तर शेअर होल्डरांनां असें सांगतां येई कीं जर शेअरहोल्डर किंवा ग्राहक वाढत नाहींत अगर संपादकीय काम चांगलें चालत नाहीं असें तुम्हांस आढळून आले तर तुम्ही पुढें कंपनी चालूं देऊं नये. तुम्हाला ती बंद करतां येईल म्हणजे तुम्ही आज फक्त तीस रुपयेच ( अर्जाबरोबर पांच व ॲलॉटमेंट नंतर पंचवीस) धोक्यांत घालीत आहांत जास्त घालीत नाहीं. वर्गणीदार करतांना लोकांनां असें सांगतां येई कीं हिस्सेदारांनीं तीस रुपये भरले आहेत. प्रत्येक हिस्सेदाराची उरलेली जबाबदारी सत्तर रुपयांची आहे. वर्गणीदारांची रक्कम बुडण्याची भीतीच नाहीं कारण तुम्ही वर्गणीदार एका वर्षांत १५।२० रुपये भरणार. एक शेअरहोल्डर तीन वर्गणीदारांनी पहिल्या वर्षी भरलेली रक्कम भरून देऊं शकतो म्हणजे आमच्या दोनशें शेअरांमुळें उत्पन्न होणारी सिक्यूरिटी खपून जाण्यासाठीं वर्गणीदार सहाशें झाले पाहिजेत आणि त्यांनीं प्रत्येकीं वीस–पंचवीस रुपये भरले पाहिजेत. म्हणजे ६०० वर्गणीदारांकडून एक वर्षाचा हप्ता येईपर्यंत तुमची संपूर्ण रक्कम अगदीं सुरक्षित आहे. व ६००गिऱ्हाइकी झाली तर काम मुळी यशस्वीच होतें. कारण त्याच्या योगानें जवळ

जवळ लाख रुपये उत्पन्न होतात. ही आमची मांडणी पुष्कळांस पटत होती. आणि यासाठीं "मिनिमम सबस्क्रिप्शन" (जितक्या रकमेचे शेअर कंपनीच्या स्थापनेपासून १२० दिवसांत भरले नाहीत तर कंपनी मोडून टाकणे अवश्य आहे अशी रक्कम) फक्त १५००० ठेवली होती. १५००० रुपयांचे शेअर १५०;म्हणजे १५० शेअर खपले तर कंपनी मिनिमम सबस्क्रिप्शन जमली नाही म्हणून मोडण्याचे भय नाहीं. कंपनी नोंदली गेली ती नोंदतानाच ६४ शेअर जमा झाले होते, आणि पुढल्या १२० दिवसांत फक्त ८६ शेअर विकावयाचे होते. हे जर विकतां आले नसते तर कंपनी मोडण बंद पडूं नये म्हणून ४३० रुपये फार तर भरावे लागले असते व ते आपल्या नावावर करून घ्यावे लागले असते तथापि तसा प्रसंग आलाच नाही. १२० दिवसांत २०५ शेअर खपले आणि कंपनीला धंदा करण्यास परवानगी मिळण्यापूर्वी म्हणजे २४।३।१७ पूर्वी २५४ शेअर खपले होते. यानंतर वर्गणीदार करण्याला परवानगी मिळविली तर तेव्हांपासून स्टयाच्यूटरी रिपोर्टाच्या दिवसापर्यंत ३०५ शेअर खपले आणि २७ वर्गणीदार झाले.

कार्यारंभापूर्वी २५४ शेअर खपले म्हणजे लोकांकडून यावयाचे रुपये २५४०० त्यांपैकी १८२५ रुपये कायने खर्च झाले होते म्हणजे लोकांच्याकडून सक्तीनें वसूल करता येण्याजोगें २३५७५रु. इतके झाले होते. म्हणजे १००० वर्गणीदारास तेवीस रुपयेपर्यंत भरणा करण्यास तारण उत्पन्न झालें होते म्हणजे कंपनी स्थापन होऊन काम करावयास परवानगी मिळाली त्याच वेळेस भक्कम पायावर उभी केली गेली होती आणि यामुळेंच तिला पुढे काम निश्चयानें करतां आलें.

ज्ञानकोशमंडळाचें ऑफिस वाकररोडवर होतें तें फेब्रुवारी१९१७मध्यें धनतोलीस काण्यांच्या बंगल्यांत आलें. या बंगल्यासमोर आमच्या सोईसाठीं पोस्टऑफीसनें एक पत्राची पेटी दिली ती ज्ञानकोशाचें स्मारक म्हणून अजून तेथेंच आहे. कार्यारंभास कंपनीस परवानगी ४।३।१७ ला मिळाली त्याच्या पूर्वीच्या कालामध्ये आम्ही संपादकीय काम कांहींच केलें नाहीं असे नाही. रा. गो. चि. तांबे बी. ए. एल्. एल्. बी.; रा. रामचंद्र त्रिं. देशमूख, बी. एजी.; रा. गणेश वासुदेव विद्वांस, बी. ए.; विनायक लक्ष्मण घटने, बी. ए.; रा. शंकर ग. खांडेकर, एम्. ए. इत्यादि मंडळी कांहीं काम व्हालंटीअर म्हणून करूं लागली पण मी त्यांस कामाचा

हिशोब ठेवण्यास सांगितलें आणि कंपनीचें काम सुरू झालें तेव्हां कांहीं ठराविक दराप्रमाणें पैसेहि दिले. ३१।३।१७ रोजीं जो समारंभ झाला त्यावेळेस रा. ब. ठाकूर हे अध्यक्ष होते आणि त्यावेळचीं सर्व भाषणे (कर्नल ग्लाउडनखेरीज )मराठींत झालीं त्यावेळेस अनेक मंडळींनी मिळून जें खासगी काम करून ठेवलें ते लोकांत पहावयासाठीं मांडलें होतें.

## सरकारची वृत्ति

ज्ञानकोशमंडळाच्या प्रारंभापासून नागपूरच्या सरकारास काय वाटत असावें हें नक्की सांगतां येत नाहीं. कंपनी नोंदली गेली पण ती नोंदण्यासच फार वेळ लागला. आणि ती नोंदण्यापूर्वी कंपनीच्या रजिस्ट्रारचा दुसऱ्या खात्याशीं कांहीं पत्रव्यवहार झालेला मला माहीत आहे.त्यावेळचे डायरेक्टर मि. मेहयू यांनीं मला विचारलें कीं या कंपनींत सरकारचा किंवा यूरोपियन लोकांचा संबंध कांहीं नसावा असें तुम्हीं योजिलें आहे काय? त्यांच्या प्रश्नाला "नाहीं" म्हणून उत्तर दिले व ही पब्लिक कंपनी आहे वाटेल त्याला हींत शेअर घेतां येईल तुम्हांलाहि शेअर होल्डर व्हावयास हरकत नाहीं असें मी सांगितले. त्याचप्रमाणे त्यावेळचे चीफ कमिशनर सर बेंजामिन रॉबर्टसन यांनां ही कंपनी म्हणजे कांहीं फार पुढे गेलेले राजकीय विचार प्रदर्शित करण्याचे एक यंत्र होईल काय अशी धास्ती पडली होती. सर बेंजामिन रॉबर्टसन यांनीं वऱ्हाडचे त्यावेळचे कमिशनर बी. पी. स्टँडेन याजकडून मला पत्र लिहविलें होते कीं मी चीफ कमिशनरला भेटावयास जावें अशी चीफकमिशनरांची इच्छा आहे. त्याप्रमाणे मी ना. रॉबर्टसन यांस भेटावयास गेलों तेव्हां तुम्हीं "पॉलिटिक्स" यांत घालणार आहां काय? म्हणून मला प्रश्न केला. व तुमच्या कंपनीविषयीं मला थोडीशी शंका वाटत आहे, कां कीं त्या कंपनीमध्यें मुंजे व ओगले यासारखे राजकीय मतांत जास्त पुढें गेलेल्या मतांचे लोक आहेत. तेव्हां मीं त्यांनां सांगितलें कीं, ज्ञानकोश म्हटला म्हणजे त्यांत कोणतेच विषय गाळतां येत नाहींत. पॉलिटिक्स राहणारच, मात्र पक्षविषयक राजकीय मत मांडण्याचा प्रयत्न होणार नाही. राजकीय बाबतीमध्यें अगदीं त्रयस्थपणाची म्हणजे न्यूट्रॅलिटीची वृत्ति राहील. सर बेंजामिन म्हणाले, "न्यूट्रॅलिटी" राहील ना? न्यूट्रॅलिटी हा शब्द चांगला आहे. माझे मनांत काय जे व्यक्त करावयाचें तें हेंच होतें. उदाहरणार्थ चेंबर्स एनसायक्लोपीडिया

पहा, त्यांत पॉलिटिक्स वगळलें नाहीं. पण त्यांत त्यांनीं दोन्ही बाजू दिल्या आहेत.तुमचें तसेंच होईल ना? मी तुम्हाला एवढें आगाऊ सांगून ठेवतों कीं जर न्यूट्रॅलिटी राहिली नाहीं तर मी पुस्तक शाळांकरतां घेऊं शकणार नाही. मीं त्यांस सांगितलें कीं केवळ पांडित्याच्या अपेक्ष-मुळचे ( Reasons of Scholarship alone ) न्यूट्रॅलिटी बाळगण्यांत येईल. व्हालंटीअर मंडळीनीनें काम केले त्याचे पैसे स्टयाचूटरी मीटिंग-नंतर देण्यांत आले.

---

प्रकरण ४ थें.

## नागपूर येथील इतिहास ( जुलै १९१९ पर्यंत )

### (१) कार्यारंभापासून स्टयाचूटरी मीटिंगपर्यंत

( १।४।१७ ते १६।९।१७ )

रा. दाते यांची नेमणूक झाल्याचा उल्लेख ५।५।१९१७ च्या सभेंच्या अहवालांत आहे. तथापि त्यांची नेमणूक प्रथमतः मार्च १ पासूनच झाली होती. व ते प्रथमतः महिना दोन महिने रहाण्याच्या उद्देशाने आले होते व मे महिन्यामध्ये नागपूरची बरीच मंडळी पुण्याकडे गेली होती. त्यावेळेस कांहीं वकील मंडळीस १००रु.पगार देऊन गिऱ्हाइकी जम-विण्यास पाठविलें होतें. अशा मंडळींत रा. नीळकंठ बळवंत भवाळकर व रा. (प्रो.) श्रीकृष्ण नीलकंठ चाफेकर, रा. नारायणराव आळेकर, व रा. वामनराव चितळे ही मंडळी होती व त्यांत चितळे खेरीज करून बाकी कोणास यश आले नाहीं असा पुढें उल्लेख आहे. याच सभेंत संपादन खात्याचे मुख्य नियम पास झाले (परिशिष्ट १ पहा) आणि मंत्री,विभाग—संपादक, लेखक इत्यादिकांचीं कर्तव्येंहि विशद करण्यांत आलीं. त्यांतील मंत्रिमंडळाची योजना केवळ कागदावरच राहिली असें पुढच्या इति-हासावरून म्हणावें लागेल. इतर नियम साधारणपणें बऱ्या प्रकारें पाळ-ण्यांत आले. पुढच्या सभेंत (३-८-१७) कांहीं संपादकीय नेमणुका दिल्या आहेत. त्यांत डॉ. भाजेकर (मुंबई),प्रो. कानिटकर (पुणें), डॉ. गुणे. प्रो. अमृतराव (मद्रास), वैद्य पंचानन कवडे, डॉ. श्रीरंग मोरेश्वर साने, दिवाकर यशवंत फाटक ( मुंबई ), रा. टी. आर. तळवळकर ( बडोदें ),

प्रो. दामले (कानपूर), रा. कुंटे इंजिनीअर (ग्वाल्हेर), प्रो. आजरेकर, प्रो. रावबहादूर केळकर, प्रो. हाटे, प्रो. डी. व्ही. बाळ नागपूर, यांचा उल्लेख आहे. परंतु ज्यांचें कार्यकर्तृत्व शेवटपर्यंत टिकलें अशा मंडळींचा उल्लेख करावयाचा झाल्यास रा. दिवाकर यशवंत फाटक, प्रो. दामले, प्रो. आजरेकर, प्रो. रा. ब. केळकर, प्रो. हाटे इतक्यांचा उल्लेख करतां येईल. ज्यांनी थोडेसे काम केले अशा मंडळींत डॉ. भाजेकर व डॉ. साने यांचा उल्लेख करतां येईल.

कंपनीच्या कार्यारंभापासून म्हणजे एप्रिल १९१७ पासून सप्टेंबर १९१७ पर्यंत ऑफीसमध्ये गोषवारे काढण्याचें काम चालूच होते. पण या कार्यातील एक मुख्य कार्य म्हटलें म्हणजे महाराष्ट्रीय वाङ्मयसूचीचें (प्रस्तावनाखेरीज) हस्तलिखित संपूर्ण तयार झाले हें होय. या वाङ्मय-सूचीसंबंधाने डायरेक्टरांचा ठराव कांहीं झाला नाही, पण छापण्याची योजना पसंत केल्याचा ठराव ३।८।१७ च्या सभेंत आहे. वाङ्मयसूचि तयार करण्याचा ठराव झाला नाहीं याचें कारण तें कार्य ज्ञानकोशाच्या संपादनकार्याचे उपांग म्हणून सुरू झालें व तें सुरू करतांना आपल्या उपयोगाकरतां माहिती जमवून ठेवणे एवढाच आमचा उद्देश होता. ३।८।१७ च्याच सभेमध्यें हिस्लॉप कॉलेजांतील त्या कॉलेजच्या नोकरीतून सुटलेले प्रो. देग्वेकर यांस मंडळांत घेण्याचा ठराव उल्लेखित आहे. तथापि मंडळांत येण्याचा उद्देश प्रो. देग्वेकर यानी कांहीं खाजगी कारणामुळें रहित केला. प्रो. देग्वेकर एम्. ए. एम्. एस्सी. व एल्एल्. बी. झालेले गृहस्थ आहेत व हे जर आले असते तर मंडळास त्यांचा उपयोग फार चांगला झाला असता अशी अपेक्षा होती. याच एप्रिलनंतरच्या सहामाहींत रा. ब. नारायणराव केळकर यांसहि ज्ञानकोशमंडळांत आणण्याची खटपट चालू होती. व त्यांचेकडे व्यवस्थापकाचें काम सोंपवावें व केवळ संपादन खात्याकडेच लक्ष देण्यास मला सवड मिळावी अशी माझी इच्छा होती. व रा. ब. नारायणराव केळकर यांनीं यावयाचे कबूलहि केलें होते. परंतु पुढें त्यांस कोऑपरेटिव्ह सोसायटीचे गव्हर्नर म्हणून ६०० रु. पगाराची जागा मिळाली व त्यामुळें त्यांचें आमचेकडे येणें झाले नाहीं. रा. ब. केळ-कर यांनीं हें काम न करतां जबाबदार आणि कर्तृत्ववान दिवाण म्हणून पुढें यावे असा योगायोग होता.

## ज्ञानकोशाची योजना–प्रो. भानु व पटवर्धन

ज्ञानकोशमंडळास रजिस्ट्रारकडून काम करण्यास परवानगी मिळाल्या-नंतरच्या सहामाईंत म्हणजे स्टॅच्यायुटरी मीटिंगपूर्वीच्या काळांत जीं कामे झालीं त्यांचा स्थूल आढावा घ्यावयाचा म्हणजे योजना पद्धतशीर तयार होऊन चोहोंकडे वाटली गेली. तिचा निर्देश प्रथम करावा लागेल. इंदु-प्रकाश पत्राखेरीज तीवर कोणी चांगली टीकाहि केली नाही. त्यावेळेस इंदुप्रकाशाचें काम प्रो. भानु पहात होते व योजनेवरील टीका त्यांची होती असे समजते. त्या योजनेंत सहकार्य करण्यासाठीं व तीवर टीका करण्यासाठीं मुद्दाम विनंतीपत्रें गेलीं होतीं. पण त्या योजनेवर चांगली टीका फारशी झाली नाहीं.ती योजना निरनिराळ्या युनिव्हर्सिटयांकडे पाठविण्यांत आली पण त्या योजनेवर मत देण्याचें काम मद्रास युनिव्हर्सिटीशिवाय दुसरें कोणी केलें नाहीं. मद्रास युनिव्हर्सिटीनें मात्र तिच्या मराठीच्या बोर्डा-वरील दोघां गृहस्थांचीं मतें कळविली. मद्रास युनिव्हर्सिटीतर्फे मत व्यक्त करणारांत हैद्राबादचे शिक्षण खात्यांतील रा. अत्रे बी. ए. हे एक होते आणि दुसरे प्रोफेसर पटवर्धन (फरग्युसन) हे होते. रा. अत्रे यांची सूचना म्हणजे केवळ सहानुभूति व्यक्त करणारा अभिप्राय होता; पण प्रो. पट-वर्धन यांनी मात्र योजनेवर सपाटून टीका केली होती ती टीका माझ्या कडे आल्यानंतर मी प्रो. पटवर्धनाचे आभार मानले, व मी सांपडलों म्हणजे जो टीकेचा चांगला मार देणार तो हाच काय म्हणून त्यांस विचारलें. तेव्हां त्यांनीं लिहिलें कीं, तुमच्या योजनेची तपासणी केली तेव्हां टीकेचा मार द्यावयाचें विसरून गेलों होतो, आणि जी टीका योजनेवर केली ती त्यावेळेस जें वाटलें त्यावरून केली; सपाटून टीकेचा मार अजून पुढेंच द्यावयाचा आहे असें उत्तर लिहिलें. प्रो. पटवर्धन यांचें तें खुल्या दिलाचें उत्तर मला फार आवडलें.

स्टॅच्यूटरी सभा १६।९।१९१७ रोजीं भरली. ही सभा म्हणजे कंप-नीस आपला धंदा सुरू करावयास जें सर्टिफिकेट मिळतें त्यानंतर सहा महिन्यांच्या आंत भरावी लागते व या सभेच्या अगोदर सात दिवसांची नोटिस द्यावी लागते व अगदीं आजतागाईत हिशोब द्यावा लागतो. या रिपोर्टांत ३१ आगस्ट १९१७ पर्यंत अहवाल दिला होता. ता. ३१ आगस्ट १९१७ रोजीं म्हणजे कंपनीच्या स्थापनेसाठीं नागपूरला

आल्यापासून पावणेदोन वर्षांत प्रगति इतकी थोडी झाली कीं, कंपनीच्या स्थापनेपासून एकदर द्रव्याची आयात आठ हजार रुपये देखील झाली नव्हती. या सभेच्या सुमारासच ज्ञानकोशमंडळामध्यें कारस्थानें उभारलीं जाण्यास सुरुवात स्पष्टपणें झाली. तथापि कारस्थान सुरू झालें आहे याची जाणीव मला बराच काळ नव्हती. द्वैतास खरोखर वाङ्मसूचीच्या छपाईच्या करारापासून म्हणजे महिनाभर अगोदरपासून सुरवात झाली.

## वाङ्मयसूचि

ज्ञानकोशमंडळाच्या कामाचें पहिलें दृश्य फल वाङ्मयसूचि हें होय. प्रत्येक वाङ्मयाचा जेव्हां पद्धतशीर अभ्यास होऊं लागतो तेव्हां संग्रह, सूचीकरण इत्यादि क्रिया अवश्य होतात. वेदांच्या संहिता झाल्याबरोबर अनुक्रमणीची आवश्यकता भासून ती तयार झालीच आणि त्यानंतर वेदांगांची म्हणजे वैदिक शास्त्रांची रचना किंवा वाढ झाली. महाराष्ट्रीय वाङ्मयाचा अभ्यास करावयाचा म्हणजे पूर्वीं काय झालें आहे याची पद्धतशीर मोजदाद झालीच पाहिजे ती करणें म्हणजेच वाङ्मयसूचि करणे होय. मराठी वाङ्मयाभ्यासानें या बाबतींत अपूर्वता पटकावली आहे. मराठींत जशी वाङ्मयसूचि आहे तशी दुसऱ्या कोणत्याहि हिंदुस्थानांतील भाषांत नाहीं. आमच्या वाङ्मयसूचीमध्यें १८१० पासून झालेल्या पुस्तकांची नोंद आहे. वाङ्मयसूचि करण्यासाठीं साहित्य म्हटलें म्हणजे सरकारी रिपोर्ट हे मुख्य होत. तथापि हे रिपोर्ट फार अपुरे पडतात.

मराठी भाषेंत पुस्तकें केवळ मुंबई इलाख्यांतच प्रसिद्ध होतात असें नाहीं. तर हिंदुस्थानांतील बहुतेक भागांत मराठी पुस्तकें प्रसिद्ध होतात. मुंबई इलाख्याचे रिपोर्ट बऱ्या स्थितींत आहेत पण त्यांतहि अनेक पुस्तकें निर्देशिलीं नाहींत. बरेच दिवस सक्तीनें नोंदणी करण्याचा कायदाच नव्हता. आणि त्यामुळें अनेक पुस्तकें सरकारी नोंदणींतून वगळलीं गेलीं. तीं आमच्या सूचींत सांपडतील. मराठी पुस्तकें विशेषेंकरून मुंबई इलाखा, मध्यप्रांत, वऱ्हाड आणि मराठी संस्थानें आणि गोंवें इतक्या ठिकाणीं प्रसिद्ध होतात पण पुष्कळशा महत्त्वाच्या संस्थानांत मराठी पुस्तकांची नोंदच ठेवली जात नाहीं. कोल्हापूर येथें बरींच महत्त्वाचीं मराठी पुस्तकें प्रसिद्ध झालीं पण त्यांची

नोंद नाहीं. वऱ्हाडची नोंद नाहींशीं करण्यांत आली आणि पुस्तकें जाहीर रीतीनें रद्दी म्हणून लिलांव करण्यांत आलीं. अशा स्थितींत जेथें सरकारी नोंद नाहीं तेथें खासगी चौकशी करावी लागली. या यादींत सरकारजमा पुस्तकें देखील खुणेनें दाखविलीं आहेत व यादीं-तल्या पुस्तकांपैकीं मुंबईच्या ग्रंथसंग्रहालयांत कोणतें आहे हेंहि दाख-विलें आहे. वाङ्मयसूचीसारख्या पुस्तकाचें महत्त्व ज्ञानकोशकारांच्या दृष्टीनें फार मोठें होतें. मराठींत काय आहे याचा पत्ता आम्हांला लागला आणि जेव्हां कोणत्याहि विषयावर मराठींत असलेल्या लेखाकडे त्याच्या मह-त्त्वाच्या अभावामुळें दुर्लक्ष करण्याचे प्रसंग आले तेव्हां आम्ही त्या लेखाकडे त्याच्या अस्तित्वाच्या अज्ञानानें दुर्लक्ष केलें अशा आक्षेपाचें कारण राहिलें नाहीं. आमच्यापाशीं पद्धतशीर यादी नसती तर मह-त्त्वाच्या लेखांकडे देखील दुर्लक्ष झालें असतें यांत शंका नाहीं.

## सूचीचें संपादन व विक्री

वाङ्मयसूचीचें हस्तलिखिताचें काम किती खर्चानें व वेगानें तयार झालें याची थोडी माहिती दिली असतां मौजेची होईल. वाङ्मयसूचीस सुमारें ३॥ हजारांपासून चार हजारांपर्यंत खर्च झाला, आणि तिच्या प्रती ५०० काढल्या होत्या. त्यामुळें प्रत्येक प्रत आम्हांस सुमारें ७॥ रुपयांस पडली त्यांपैकीं सुमारें १०० प्रती ५ रुपये भरणाऱ्या आगाऊ वर्गणीदारांकडे गेल्या. आणि पुढें कांहीं प्रती ७॥ रुपयांस, कांहीं १२॥ रुपयांस व कांहीं पंधरा रुपयांस गेल्या. अतां सूचीची किंमत १७॥रु. आहे व प्रती १० पेक्षां कमी शिल्लक आहेत. येणेंप्रमाणें वाङ्मयसूचीवर झालेला खर्च बहुतेक वसूल होऊन येईल असें वाटतें. पण ही वसूली होण्यास १२ वर्षें लागलीं. खर्च झालेल्या रकमेवर व्याज आकारल्यास पूर्ण वसूली व्हावयाचीच नाहीं.

वाङ्मयसूचि करण्यासाठीं सुमारें ६०००० चिठ्या लिहाव्या लागल्या. हें काम तीन महिन्यांत झालें. कांहीं काम नागपुरास झालें पण मुख्य काम पुणें-मुंबई येथें झालें. मुंबईस मराठी ग्रंथसंग्रहालयापाशीं जो ग्रंथसंभार (मासिकसंभार) होता त्यावरून मासिकाच्या लेखांची यादी करतां आली. रा. रामचंद्र त्रिंबक देशमुख बी. एजी. यांनीं अलीकडच्या कांहीं वर्षांत झालेल्या पुस्तकांची यादी ठाण्यास कलेक्टर कचेरींत बसून केली.

आणि १८१० पासून १९०० पर्यंतच्या पुस्तकांची यादी डेक्कन व्हर्नाक्युलर ट्रान्स्लेशन सोसायटीनें अगोदरच केली होती. त्या यादीवरून रा. दाते यांनीं कर्वेंकरांच्या अनाथ विद्यार्थीगृहांतील बरेच विद्यार्थी घेऊन चिठया तयार केल्या. त्या यादीचा उपयोग करण्याची आम्हांस सोसायटीनें परवानगी दिली. त्याबद्दल ज्ञानकोशमंडळ त्या संस्थेच्या अधिकाऱ्याचें ऋणी आहे. आम्ही असेंहि म्हणूं कीं वाङ्मयसूची तयार करण्याचें निदान एकदशांश श्रेय त्यांचें आहे.

## अर्वाचीन पाखंडें

वाङ्मयसूचीचें महत्त्व लोकांना जितपत वाटेल असें वाटलें त्यापेक्षां जास्त वाटत आहे असें दिसून आलें. वाङ्मयसूचीचा उपयोग पुष्कळ लोकानां झाला आणि त्या पुस्तकाचा खपहि अपेक्षेपेक्षां अधिक झाला. जास्त प्रती काढल्या असत्या तर बरें झालें असतें असें आतां वाटूं लागलें. वाङ्मयसूचीची तपासणी देखील थोडीबहुत झाली. रा. भिडे (भोर) यांनी तीतील काव्याची यादी तपासून तीवर विचार करणारा एक लेख विस्तारांत प्रसिद्ध केला आणि सूचीच्या साहाय्यानें एकंदर वाङ्मयाचा आढावा घेणारा एक लेख बडोद्याच्या रा. दंडवते यांनीं नवयुगांत प्रसिद्ध केला. वाङ्मयसूचीच्या वर्गीकरणपद्धतीमुळें थोडीशी टीकाहि झाली. ब्रह्मसमाज वगैरे पुस्तकें "अर्वाचीन पाखंडें" या सदराखालीं वर्गिलीं गेल्यामुळें सुबोधपत्रिकेनें रागाचा लेख लिहिला. पाखंड हें "हेरेसी"चें भाषांतर आहे. धार्मिक वाङ्मयाचें वर्गीकरण करतांना मुख्य मतें आणि हेरेसीज असें वर्गीकरण करण्याची यूरोपीय ग्रंथवर्णनशास्त्रज्ञांची पद्धति आहे. जें मत मुख्यापासून भिन्न पण अगदीच बाहेरचें नव्हे तें "हेरेसी" होय. आणि आम्ही "पाखंड" हा शब्द त्याच अर्थानें योजिला होता. असो, या अर्थाच्या निदर्शक दुसरा एखादा चांगला शब्द सुचविल्यास आम्ही पुढच्या प्रसंगी त्याचा उपयोग करूं इच्छितों. पाखंडी हा शब्द मी द्वेषबुद्धीने लिहिला असणें शक्यच नाही. कारण प्रचलित बहुमतापेक्षां भिन्न मत बाळगणें हें मी गैर कधींच धरीत नाहीं. पाखंडी या शब्दापासून "नास्तिक" असा अर्थ सूचित होतो म्हणून तो शब्द नको असें कित्येक प्रार्थनोंनीं मला सांगितलें. पण हें त्यांचें रागावणें माझ्या मतें अनुदार भावनेचें दर्शक आहे. "नास्तिक" ही देखील मी शिवी धरीत नाहीं. हे सर्व वर्गवर्णनाचे शब्द आहेत माझ्या मतें हिंदु, मुसलमान, जैन,

हे जसे वर्गवर्णनाचे शब्द आहेत. तसेच पाखंडी, नास्तिक हेहि वर्गवर्णनाचेच शब्द आहेत. एखाद्या हिंदूस कोणी जैन समजल्यास जसे रागावण्याचें कारण नाहीं तसेच नास्तिक समजल्यासहि रागावण्याचें कारण नाहीं. मी ज्यांनां पाखंडी म्हणेन त्याविषयीं माझ्या मनांत प्रेम नसेल असेंहि नाहीं. ख्रिस्ती संप्रदायांतील युनिटेरियन या पंथाबद्दल माझ्या मनांत प्रेम वाटते, पण त्याचे वर्गीकरण करावयाचे झाले तर ते ख्रिस्ती संप्रदायांतील पाखंडांतच मी करीन. असो ही माझी वृत्ति रा. यज्ञेश्वरपंत भांडारकर, द्वारकानाथपंत वैद्य यासारख्या लोकांनाहि सांगितली पण त्याचे या स्पष्टीकरणानें समाधान झालेंसे वाटत नाहीं.

## गृहकलहास सुरुवात

ता. ३।८।१७ च्या सुमारास वाङ्मयसूचि छापण्यास रा. पाध्ये यांनीं घेतली आणि महिनाभर छापायला सुरुवातच केली नाहीं आणि माझीं माणसें तुमचें काम न छापण्याबद्दल संप करीत आहेत इत्यादि गोष्टी रा. पाध्ये (आमचे अध्यक्ष आणि मुद्रक) यांनी सांगावयाला सुरुवात केली. आणि याचें कारण करार केलेला टाईप नव्हता हें होय. व ते त्यांना लपवावयाचे होतें. हे त्यांनी लपवायचा प्रयत्न न करतां सरळपणें सांगितले असते तर बरे झालें असते व पुढचें द्वैत वांचलेंहि असतें. पण खरी अडचण कळविण्यास त्यांनां जो संकोच वाटला त्याचा वाईट परिणाम झाला. त्यांनी खरे लपविण्यासाठीं त्यांच्या माणसांची समजूत करा असें मला सांगितलें. मी त्यांच्या माणसांशीं बोललों तेव्हां मला संपाचें अस्तित्व मुळीच दिसून आलें नाही. तेव्हां मी उलट रा. पाध्ये यांसच नोटीस दिली कीं, तुम्ही जर ४८ तासांच्या आंत काम सुरू करणार नाहीं तर तुमचे काम काढून घेऊं. याप्रमाणें नोटीस देऊन मी गोंडिया बालाघाटकडे प्रवासास गेलों आणि ३।४ दिवसांनीं परत आलो तो रा. पाध्ये अगदीं संतापून गेले होते व दुसरे एक डिरेक्टर त्यांच्या तर्फेनें माझ्यावर चिडले. हेच डिरेक्टर पूर्वी रा. पाध्ये यांनां काम देण्याबद्दल मला दोष देत होते. तेव्हांपासून रा.पाध्ये यांनी दुसरे डिरेक्टर आपल्या तर्फेचे करून घेऊन मला पकडींत ठेवावयाचा प्रयत्न करण्यास सुरुवात केली होती. हें आज अगदीं स्पष्ट होतें. त्यांना ज्ञानकोशाचा चालक असा हवा होता कीं, जो

त्यांच्या छापखान्याच्या सोईप्रमाणें चालेल, जो आपल्या सोईप्रमाणे छापखान्याला वागावयास लावील असा गैरसोईचा ज्ञानकोशसंपादक नको होता. तेव्हां डॉ. केतकर फार स्वतंत्रपणें वागतो, हा कोणाचे कांहीं एक ऐकायचा नाहीं इत्यादि गोष्टी बोलण्यास त्यांनीं सुरुवात केली. आणि डॉ. केतकर हा कांहीं तरी कारणामुळें तावडींत सांपडला पाहिजे असें म्हणून कांहीं मंडळी वाट पहात होती; आणि स्टाच्यूटरीच्या अगोदर झालेल्या मीटिंगमध्यें अमुक मंडळी निवडून यावी याबद्दल खटपट करीत होती. त्यांची ही खटपट माझ्या लक्षांत त्यावेळेस आलीच नाहीं. स्टयाच्यूटरी मीटींग नंतरहि मी जेव्हां वाङ्मयसूची लवकर छापली जावी म्हणून निकड लावूं लागलों तेव्हां रा. पाध्ये यांनीं असाहि डाव मांडला कीं, माझें आणि त्यांच्या छापखान्याचे म्यानेजर यांची बोलाचाल व्हावी आणि त्यांनीं न्यायाधीश म्हणून माझी चौकशी करावी. आणि त्यांनीं ही वेळ जेव्हां आणली तेव्हां त्यांचीच कर्मधर्म संयोगानें उखडंपट्टी झाली. तिची हकीगत क्रमानें येईलच.

आपापसांतील भांडणांपासून ज्ञानकोश मुक्त नव्हता. हीं भांडणें महाराष्ट्रीयांच्या कोणत्या मनोवृत्तीमुळें होत याचें थोडेसें स्पष्टीकरण करावेसें वाटतें. कित्येकांची अशी समजूत झाली आहे कीं, गृहकलहाचा महाराष्ट्राला शाप लागला आहे. निदान नागपूरचे एकावेळचे नगराध्यक्ष डॉ. चोळकर हे ज्ञानकोशाच्या शेअरहोल्डरांच्या एका सभेंत तरी असें बोलले. माझ्यामतें भांडणाचें कारण महाराष्ट्रीयांच्या स्वभावांतच कांहीं निराळें आहे असें नाहीं. मत्सर हा सर्व लोकांत आहे. स्वार्थहि सर्व लोकांत आहे. आपण गुजराती, मारवाडी वगैरे लोक पाहिले तर त्यांच्यामध्यें स्वार्थासाठीं खोटीं भांडणें करावयाची वृत्ति कमी आहे असें नाहीं. इतर कंपन्यांचे व्यवहार समजले तेव्हां आमच्यांतील भांडणे कांहींच नाहींत असें वाटावयास लागलें. ज्ञानकोशामध्यें भांडणे तरी फारच थोडी झालीं. आणि ज्ञानकोशाच्या प्रारंभीं माझी अशी वृत्ति होती कीं, आपण होताहोईतों कोणासहि दुखवूं नये आणि या माझ्या वृत्तीमुळें पुष्कळदां नुकसान झालेलें आहे. कांहीं मंडळींस वांव दिला म्हणजे ती डोक्यावर चढत असा अनुभव वारंवार येई. व भांडणास कारण मी प्रारंभीचें दाखविलेलें मनोदौर्बल्य होय असें वाटे. तथापि मी असें आतां म्हणतों कीं कंपनी म्हटली म्हणजे तींत भांडणें हीं व्हावयाचींच.

अनेक लोक आपापल्या हेतूसाठीं एका कार्यांत प्रविष्ट होतात, व त्यांत प्रत्येकाचे हेतू साध्य होत नाहींत आणि यामुळें भांडण हें स्वाभाविकपणें उत्पन्न व्हावयाचेंच. महाराष्ट्रीय लोक भांडतात आणि इतर लोक भांडत नाहींत असें नाहीं. आणि माझ्याशीं भांडण करण्यांत पुढाकार घेऊन माझ्यावर सर्व तऱ्हेनें आरोप उत्पन्न करणारे माधवराव पाध्ये हे एक वाईट गृहस्थ होते अशांतला भाग नाहीं. मी पूना ब्यांकेतील व इतर कंपन्यांतील भांडणें पाहिलीं आहेत तेव्हां मला असें वाटूं लागले कीं, रा. पाध्ये यांनीं भांडण करतांनां सदसद्विवेकबुध्दि थोडीशी कायम ठेवली होती.

## माधवराव पाध्ये

रा. माधवराव पाध्ये यांच्या ज्ञानकोशमंडळांतील कामगिरीविषयीं जरा विस्तारानें लिहिणें अवश्य आहे. सामान्यतः चांगल्या वृत्तीचा वाङ्मयाचा अभिमानी आणि आपल्या मंडळींनीं स्वतंत्र धंद्यांत पडावें व केवळ नोकरीच्या पाठीमागें लागूं नये अशा भावनेचे हे गृहस्थ आहेत अशी त्यांच्याविषयीं जी माझी पहिल्याप्रथम समजूत झाली ती अजूनहि कायम आहे. रा. पाध्ये हे ज्ञानकोशाचे डिरेक्टर झाले त्यांत स्वतःचा फायदा होईल तो करून घ्यावा हा हेतु त्यांचा असेल तरी ते चांगल्या कार्यास उत्तेजन द्यावें या हेतूनें अगोदर या योजनेकडे प्रवृत्त झाले असले पाहिजेत असें मला अजूनहि वाटतें. स्वतःचा फायदा पहाणें हें मी गैर मुळींच समजत नाहीं. उलट जो मनुष्य चांगलें काम हातीं घेऊन ते तो स्वतःस किफायतवार करून घेतो त्या मनुष्याविषयीं माझ्या मनांत आदरच राहील. रा. पाध्ये यांनीं आपल्या अपेक्षा कळविल्या असत्यां तर चांगलेंच झालें असतें. तथापि धंदा करण्यास अयोग्य असे त्यांच्यामध्यें अनेक गुण होते, हें मात्र माझें कायमचें मत झालें. व यांचें ज्ञानकोशमंडळांत कांहीं चालूं द्यावयाचें नाहीं अशी वृत्ति माझ्यामध्यें जी पुढें उत्पन्न झाली तिचें आज पाठीमागें झालेल्या सर्व व्यवहाराकडे पाहतां समर्थनच होतें असें मला वाटतें. धंदा करतांना ज्या मंडळीच्या साहाय्यानें आपण धंदा करतों ती कार्यकारी मंडळी म्हणजे सामान्य कारकुनापासून मॅनेजरपर्यंत मंडळी यांचें हित धंद्याच्या वाढीशीं अत्यंत निगडित असतें म्हणून धंद्याशीं संयुक्त अशा प्रत्येक व्यक्तीची किफायत व्हावी हें तत्त्व रा. पाध्ये

यांस कांहींच समजलें नाहीं. ते स्वतः छापखानदार आहेत. र
असतां त्यांचा छापखाना बाल्यावस्थेंतच राहिला याचे कारण वर
तत्वाचें अज्ञान होय असे माझें मत झालें. रायपूरचे रा. सप्रे हे जे
देशसेवकाचे व्यवस्थापक होते तेव्हां त्या छापखान्याची बरीच भर
राट झाली व जेव्हां रा.सप्रे आणि माधवराव रा.पाध्ये यांच्यामध्यें द्वैत उत
झालें तेव्हां छापखान्यास उतरती कळा लागली. याचे कारण रा. र
यांस प्राप्ती जास्त होऊं नये म्हणून माधवराव पाध्ये यांची वृत्ति बन
हे होय असें नागपुरास लोक म्हणत. रा. सप्रे यांनी याविषयीं खुला
माझ्यापाशीं कांहींच केला नाहीं. त्यांनीं एवढेंच सांगितलें कीं; तु
माधवराव पाध्यांचे मित्र आहांत तर या गोष्टीची तुमच्यापाशीं चर्चा
केलली बरी. माधवराव पाध्ये यांची ज्ञानकोशमंडळांत प्रमुख अस
अशी वृत्ति बनू लागली होती कीं, डॉ. केतकर यांनी जवळजवळ फु
टांत काम करावें, त्यांनां ज्ञानकोशाची छपाई द्यावी;व या त्यांच्या वृत्तीमु
डॉ. केतकर यांच्या पगाराचा प्रश्न २२ महिने ताटकळत ठेविला आ
तुम्ही पगाराकरतां काम करता आहां की कार्याकडे लक्ष देऊन क
करीत आहां असा प्रश्न करण्यास त्यांच्याकडून सुरवात झाली. त्यां
छपाई पाहिजे होती, आपला फायदा पाहिजे होता पण माझ्या प
रास मात्र नियंत्रण करावयास पाहिजे होते. आणि स्वार्थत्यागाचें मह
मला समजावून देण्याची ते खटपट करीत होते. ज्ञानकोश हें विद्यावर्ध
नाचें काम. हे पवित्र काम आहे. हें काम करणाऱ्यानी ऋषीप्रमाणे वर्त
केलें पाहिजे म्हणजे प्राचीन ऋषींचें ध्येय उज्वल तऱ्हेनें पार पडे
असें त्यांचें सांगणें असे.

जे लोक व्यवहारांत जास्त आहेत ते लोक आपण जें कांहीं करा
ते स्वार्थासाठीं म्हणजे पैशासाठीं सर्व करीत आहो असें दाखविण्यास कम
करीत नाहीत आणि महाराष्ट्रीय मनुष्य स्वार्थाकरतां मी अमुक करीत आ
असें सांगण्यास लाजतो. मनास स्वार्थबुद्धि गैर वाटते पण स्वार्थ ह
कांहीं कोणास सुटला नाहीं. व त्यामुळे भांडणें वाढतात. व मनुष्य
आपला स्वार्थ नीट मोजून पहात नसल्यामुळें भांडणें जास्तच वाढतात
निरनिराळी मंडळी निरनिराळ्या स्वार्थांनी प्रेरित झाली म्हणजे त्यांचं
तोंडमिळवणी करण्याचें कौशल्य ज्या मानानें काम करणाऱ्यांत असेल
त्या मानानें काम सुरळीत होणार, कार्यकर्त्यास जी मंडळी मिळवून घेत

येत नसतील ती त्यानें निर्बल केली पाहिजेत. अशा क्रियांनीच कंपनीचें काम चालणार. तथापि जेव्हां मुख्य काम करणाऱ्या मंडळीचें आपापला स्वार्थ कसा साधावयाचा याचें खुल्या दिल्यानें बोलणें होत नाही आणि केवळ लोककल्याणार्थ ढोंग होऊं लागतें तेव्हां मात्र खटका उडतो. आणि अगोदर कांहींच निश्चित नसतें व पुढें प्रत्येकाचे हेतू जसजसे हळू हळू स्पष्ट होत जातात तसतसें एकमेकांचे एकमेकांविषयीं वाईट मत होऊं लागतें. यासाठी जेव्हां ज्या कोणाला जी स्वार्थबुद्धि असेल ती त्यानें सरळपणें पुढें मांडावी म्हणजे दुसऱ्याची उपयुक्तता कशी काय होईल याचा योजकाला विचार करतां येतो. ज्ञानकोशाचें कार्य मला करावयाचें होतें. त्यामुळें माझ्याशी सहकारिता करणाऱ्यांचे योग्य स्वार्थ मी लक्षांत घेतले असते. पण जेव्हां त्यांची स्वार्थबुद्धि प्रमाणाबाहेर जाऊं लागली तेव्हां डायरेक्टरांच्या हातून कंपनी कशी बचावावी याची मला काळजी पडली. व कांहीं डिरेक्टरांमध्यें माझा पगार अगदीं कमी कसा करावा हा विचार उपस्थित झाला.

मला पगार कमी मिळावा म्हणून जो विचार डिरेक्टरांत उत्पन्न झाला तो केवळ ज्ञानकोशाच्या हितासाठीं उत्पन्न झाला असें त्यांनां वाटलें असें ते दाखवीत. त्यांनां असे वाटे कीं माझा पगार कमी आहे असें सांगितल्यानें लोकाश्रय जास्त मिळेल. ज्ञानकोशाचें कार्य चांगलें आहे म्हणून माझ्या बरोबरीच्या डायरेक्टरांनां सांगून चाललें असतें. परंतु या कार्यात आमची स्वार्थबुद्धि कांही नाहीं. डॉ. केतकर यांनीं अगदी अल्प पगारावर राहण्याचें कबूल केलें आहे. अशा तऱ्हेच्या गप्पा कंपनीचे संस्थापक म्हणून ज्यांच्या सह्या घेतल्या होत्या त्यांपैकीं कांहींनी उठविण्यास सुरवात केली. असें करण्यांत त्यांचा वाईट हेतु होता असें नाहीं तर आपली निःस्वार्थता दाखविली म्हणजे कार्याचा उत्कर्ष होतो अशी त्यांची समजूत होती. डिरेक्टरांनां बैठकीसाठीं बरेच पैसे हे मात्र माझा पगार कमी ठेवूं इच्छिणाऱ्या डिरेक्टरांस हवें होतें.

त्यांचा प्रयत्न डायरेक्टरच्या बैठका वारंवार कराव्यात व त्यांची प्रत्येकी १० रुपये फी करावी आणि प्रत्येक डायरेक्टरनें आपले दरसाल ५०० रुपयाचें उत्पन्न करून घ्यावें अशा प्रकारचा होता. व त्यांनीं त्याचप्रकारचे नियम सुचविले होते व ही सर्व किफायत तीस रुपयांच्या भांडवलावर मिळवावयाची होती. कांहीं तीस रुपये भरून डायरेक्टर

झालेल्या लोकांनां त्यामुळें निःस्वार्थतेचें गाणें अवश्य होतें. पण त्यांत जे नागपूरचे स्थानिक लोक होते त्यांनां मी बाहेरचा वाटत असे आणि स्वतःसाठीं जरी ५०० रुपये उत्पन्न फुकटांत मिळविण्याची योजना करावयाची होती तरी डॉ. केतकर यांनीं फार थोडक्यांत काम करावें या बाबतींत मात्र त्यांचें एकमत होतें. डायरेक्टरांच्या फीचे पैसे फुकटांत मिळविण्याची त्यांची हिकमत होती असें मी म्हणतों याचें कारण त्या डायरेक्टरांनां खरोखर काम असें कांहींच नव्हतें. संपादकीय बाबतींत त्यांनीं कांहींच केलें नाहीं आणि व्यवहारदृष्टीनें देखील त्यांनां कांहीं एक करतां येण्याजोगें नव्हतें. कारण शेअरसाठीं आलेले अर्ज मंजूर करणें यासारखेंच काम असे. धंद्याची सर्व दृष्टि एकंदर योजनेंतच ठरली होती आणि तीप्रमाणें म्यानेजरनीं काम करावयाचें एवढेंच काय तें होतें व वारंवार आपण काय काम केलें हें डायरेक्टरांनां सांगायचें असाच कार्यक्रम होता. सभेंत महत्त्वाच्या गोष्टी ठरतच नसत. ज्ञानकोशमंडळाच्या डायरेक्टरांच्या सभेंत महत्त्वाचें खरोखर कांहींच ठरत नसे, व त्यांचा प्रयत्न मुख्य म्यानेजरला लबाड समजून मोठया संशयखोर तऱ्हेनें कसें वागवावें या प्रकारचाच होता आणि त्यांनां दरसालचे ५०० रुपये त्यासाठींच पाहिजे होते, व यासाठीं माझ्याविरुद्ध कांहीं तरी सांपडावें याची त्यांनां फार इच्छा होती. मी कंपनीचा प्रवर्तक, मुख्य कार्यकर्ता आणि सर्वांत मोठा भागीदार होतों तरी मला अधिकार सर्वांत कमी असावेत ही इच्छा इतर लोकांत होती आणि स्वार्थत्यागाच्या गोष्टी मला सांगून मला अर्धपोटी काम करावयास लावावें आणि इतर डायरेक्टर होणाऱ्या मंडळींनीं आपला चांगला फायदा करून घ्यावा ही त्यांची इच्छा होती. ही इच्छा डिरेक्टरांच्या सभेत बहुमत करून घेऊन ते पार पाडणार होते. रा. फडके ज्ञानकोशमंडळाच्या सभेस फारसे येतच नसत आणि पाध्ये, ठेंगडी आणि भवाळकर ही तीन मंडळी अगोदर खासगी बैठकी करून संगनमत ठरवून सभेला येत. ठेंगडी हे गृहस्थ साधारण दणकेबाज परंतु त्यांनां लटपटी पाहिजेत व दमबाजी करावयास पाहिजे अशापैकी दिसून आले तर भवाळकर हे निराळ्या प्रकृतीचे दिसून आले. व रा. पाध्ये यांनीं यांत जो पुढाकार घेतला तो त्यांच्या मुद्रणविषयक अपेक्षांवर मी नियंत्रण घालूं लागलों तेव्हांपासून घेतला असें वाटतें.

रा. पाध्ये वगैरे मंडळीस माझ्याविरुद्ध काहूर करण्यास एक संधि आयतीच मिळाली. स्टयाच्युटरी मीटिंगचा अहवाल तांतडीनें करावयाचा असतो. आणि ३१ तारखेपर्यंतचा हिशोब घेऊन एक तारखेला ताळेबंद करून देण्याची आवश्यकता होती. परंतु तितक्या वेळांत कारकुनाचा ताळेबंद जुळेना. तेव्हां दोन तारखेच्या सभेंत मी तसें सांगितलें तेव्हां जणूं काय मी पैशाची अफरातफर केली असाच कांगावा पाध्येकंपूनें केला; प्रत्यक्ष आरोप केला नाहीं. दररोजचा हिशोब बरोबर असतां २४ तासांत ताळेबंद न जुळणें म्हणजे कांहीं गैरव्यवस्था होत नाहीं; तो केवळ जास्त वेळ घालून हिशोब करण्याचा प्रश्न आहे. तथापि त्या संधीचा फायदा घेऊन मला हिशोब बरोबर ठेवण्याचें; आणि प्रामाणिकपणाचें महत्त्व सांगण्यास आणि हिशोबाचा कायदा सांगण्यास सुरवात केली. त्यावेळेस या सर्व मंडळींचें हें पूर्वरचित नाटक आहे हें मला ठाऊक असतें तर मी त्या धोरणानें वागलों असतों आणि त्यानंतर १२ सही करणारांकडून जे डायरेक्टर निवडावयाचे ते निराळे लोक निवडून यावेत म्हणून प्रयत्न केला असता. माझ्या मनांत ती शंका कांहीं आलीच नाहीं. आणि यामुळें रा. पाध्यांच्या टोळींत असलेल्या एका गृहस्थास मी आपलें मत दिलें. पण मला त्यांची गहजब करण्याची तऱ्हा त्यांचा संस्था चांगल्या तऱ्हेनें चालावी या हेतूनें उत्पन्न झालेला आवेश आहे असें वाटलें. १४।९।१७ रोजी स्टयाच्युटरी मीटिंगपूर्वी एक सभा भरली होती तींत पुढच्या सालासाठीं डिरेक्टर पहिल्या बारभाईनें (कंपनी स्थापन करतेवेळेस सह्या करणाऱ्या १२ जणांनीं) निवडले. त्या सभेंत माझी डिरेक्टर म्हणून निवडणूक करूं नये असें मत कांहीं जणांनीं व्यक्त केलें. त्यांचें असें म्हणणें पडलें कीं जो आपले सर्वांत अधिक पैसे घालतो आणि ज्याच्यामुळें ही कंपनी स्थापन झाली तो डिरेक्टर असला काय आणि नसला काय सारखाच; उलट डिरेक्टर नसल्यानें त्याचा स्वार्थत्याग उलटा अधिक दिसून येणार आहे !! हें म्हणणें कांहींनां पटलें पण कांहींनां पटलें नाहीं त्यामुळें माझीहि डिरेक्टर म्हणून निवडणूक झाली. तथापि माझे अधिकार कमी करावे हें पाध्ये कंपूस वाटतच होतें व यासाठीं माझी सेक्रेटरीशिप काढून घेऊन रा. गोविंद चिंतामण तांबे यांची कंपनीचे चिटणीस म्हणून नेमणूक करण्यां त

आली आणि रा. तांबे यांस पाध्ये यांनीं सांगितलें कीं तुम्ही सर्व काम शिकून घ्या म्हणजे म्यानेजरहि तुम्हांलाच नेमूं. सेक्रेटरी दुसरा करण्यांत रा. पाध्ये यांचा डाव असा होता कीं, सेक्रेटरी व म्यानेजर यांच्यामध्यें द्वैत रहावें आणि आपला अधिकार चालण्यास संधि जास्त मिळावी. त्यांत रा. तांबे रा. पाध्ये यांच्याच तंत्रानें वागतील असें वाटण्याचें त्यांनां कारणहि होतें. त्यांनां असें वाटे कीं, तांबे कऱ्हाडे, आपण कऱ्हाडे आणि अध्यक्ष व सेक्रेटरी हे दोन्ही कऱ्हाडे असले म्हणजे ज्ञानकोश काढण्यामध्यें महत्त्वाची कामगिरी कऱ्हाड्यांनीं केली असें होईल. शिवाय रा. तांबे हे वकील या नात्यानें माधवराव पाध्ये यांचे कांहीं दिवस ज्युनिअर देखील होते. पण रा. तांबे यांस ज्ञानकोशाची कळकळ असल्यामुळें आणि माझ्यावरच त्यांचा विश्वास असल्यामुळें "कऱ्हाडा पेट्रिआटिझम" उत्पन्न करून आम्हां दोघांमध्यें द्वैत उत्पन्न करणें रा. पाध्ये यांस शक्य झालें नाहीं.

ज्ञानकोशाविषयीं सरकारनें एकंदर त्रयस्थपणाची वृत्ति पहिल्यापासून ठेविलेली होती. सरकारनें ज्ञानकोशावर प्रेमहि दाखविलें नाहीं किंवा विरुद्धता दाखविली नाहीं. मध्यप्रांत सरकारच्या मदतीनें ज्ञानकोश ऑफीसला १९११ सालचे सेन्ससचे रिपोर्ट मिळाले पण पुढें १९२१ सालीं सेन्ससचे रिपोर्ट मिळविण्यांत मुख्य संपादकीय ऑफीस पुण्यांत आल्यामुळें मध्यप्रांत सरकारनें कांहीं मदत केली नाहीं आणि मुंबई-सरकारनें ते आम्हांस मिळवून देण्याची कृपा केली नाहीं. १९११ चे सेन्सस रिपोर्ट आणि ग्याझेटीअरचे कांहीं भाग आम्हांस या स्टयाच्युटरी मीटिंगच्या पूर्वीच मिळाले.

## सप्टेंबर १९१७–सप्टेंबर १९१८

हा काळ म्हटला म्हणजे स्टयाच्यूटरी मीटिंगनंतरचें पहिलें वर्ष होय. या काळांतल्या मुख्य गोष्टी म्हटल्या म्हणजे रा. पाध्ये यांची पदच्युति, डॉ. केतकर यांचा पगार ठरविला जाणें, व काम बरेचसें होणें या गोष्टी होत. या काळांत ज्ञानकोशमंडळाचीं पुणें व मुंबई येथील ऑफिसें स्थापन झालीं. या काळांतच कै. वि. का. राजवाडे यांच्याशीं ६००० रुपयांत १५०० पृष्ठें त्यांनीं तयार करावीं या योजनेचें पूर्ण स्वरूप ठरलें.

## दक्षिणा कां नको

ज्ञानकोशमंडळानें दक्षिणा घ्यावयाची नाहीं हें धोरण पहिल्यापासून ठरविलें होतें. आणि या धोरणामुळेंच ज्ञानकोशमंडळास चांगलाच फायदा झाला. ज्या मंडळींनां तुम्ही गिऱ्हाईक व्हा म्हणून आम्हीं सांगण्यास जावें त्यापैकीं कांहीं मंडळी आम्ही या कार्यास मदत म्हणून १०।२० रु. द्यावयास तयार आहोंत असें म्हणत, तीच मंडळी १००।१२५ रु. देणारीं गिऱ्हाईकें करतां आलीं. ज्ञानकोशाचा एखादा दुसरा भाग जेव्हां बाहेर पडला तेव्हां वर्गणी म्हणून कांहीं दक्षिणा देऊं असें म्हणणारी मंडळी भेटत तेव्हां आम्ही त्यांस त्या रकमेपुरते भागच घ्यावयास सांगत होतों. त्यामुळें असें झालें कीं आम्हास दक्षिणा देण्याच्या हेतूने जी मंडळी एखादादुसरा भाग घेती झाली तीच मंडळी पुढें सबंध ज्ञानकोश घेती झाली व दक्षिणा घ्यावयाची नाहीं या बाण्यामुळें ज्ञानकोशमंडळाविषयीं आदर वाढला तो निराळाच. दक्षिणा घ्यावयाची नाहीं, हा बाणा प्रथम जेव्हां जाहीर केला गेला तेव्हां साहेबी ऐट म्हणून त्याच्यावर टीकाहि करण्यांत आली व दक्षिणा घ्यावयाची नाहीं हा नियम प्रथम माझ्या मनांत असतां तो कागदावर कोठेंहि आला नव्हता. डायरेक्टर मंडळीमधील बहुतेकांचें दक्षिणा घ्यावी या प्रवृत्तीचेंच मत होत होतें परंतु त्यासंबंधीं त्यांचे मत मला फिरवितां आलें. त्यावेळेस त्यांस दक्षिणा न घेण्याचीं कारणें सांगितलीं होतीं तीं येणेंप्रमाणें:—

त्यांस सांगितलें कीं ही कंपनी आहे. आपण जर दक्षिणा घेऊन कंपनीच्या शेअरहोल्डरांस मुनाफा वाटूं लागलों तर तें वेडेवांकडें दिसून येणार नाहीं काय? तुमची जर दक्षिणा घेण्याची स्थिति आहे तर कंपनीस मुनाफा वांटण्याची शक्यता मुळींच नाहीं असें आपोआपच होतें कीं नाहीं? व कंपनीला जर मुनाफा होणार नाहीं तर लोकांनीं शेअरहोल्डर कां व्हावें आणि लोक जर शेअरहोल्डर होणार नाहींत तर वर्गणीदारांनीं आपली वर्गणीची रक्कम कोणत्या तारणावर द्यावी. अर्थात दक्षिणा घेणें म्हणजे कंपनीचे अस्तित्वासच धोका आणणें आहे, ही दृष्टि जेव्हां मीं दिली तेव्हां आम्हांस देणगी घ्यावयाची नाहीं हें तत्त्व कंपनीच्या नियमांत तारीख १३।११।१९१७ रोजीं समाविष्ट करतां आलें.

## संदेशची करामत

हें तत्त्व जाहीर मात्र अशा वेळेस झालें कीं तो दुसऱ्या एका गृहस्थाच्या करामतीविरुद्ध उलट डाव टाकण्यांत आला तेव्हां झालें. संदेशचे संपादक अच्युत बळवंत कोल्हटकर यांनीं "नारिंगीनिशाण" या नाटकाचा प्रचार करण्यासाठीं "बंधुसमाज" नांवाची नाटक मंडळी काढली होती. आणि या संस्थेचा उद्देश नाटकाच्या खेळाचें उत्पन्न इतर संस्थांस देणें हा आहे असें संदेशकारांनीं जाहीर केलें होतें. व त्यावेळेस ज्या संस्थांविषयीं लोकांनां सहानुभूति असेल त्या संस्थांनां आम्हांस मदत करावयाची आहे तर तुम्ही आमच्या खेळास या अशा अर्थाचीं पत्रकें ते काढीत असत. त्यांनीं ज्या अनेक संस्थांस मदत करण्याचा आपला संकल्प कळविला होता त्यामध्यें ज्ञानकोश मंडळाचें नांव त्यांनीं घातलें. व ज्ञानकोशमंडळास एक हजार रुपयांची मदत करण्याचा आपला इरादा त्यांनीं जाहीर केला, यामुळें परिस्थिति निराळीच उत्पन्न होणार होती, आम्ही ज्ञानकोशास ग्राहक व्हा म्हणून ज्या लोकांपाशी जाणार ते लोक म्हणणार कीं आम्हीं रुपया दोन रुपयाचें तिकीट घेऊन ज्ञानकोश मंडळास मदत केलीच आहे. लोकांची ज्ञानकोशमंडळास मदत करण्याची कर्तव्यबुद्धि रुपया सवारुपयाच्या खर्चानें शांत झाली असती आणि त्या खेळाला जें उत्पन्न आलें असतें त्यांतील ज्ञानकोमंडळाला अच्युतराव कोल्हटकरांच्या कारभारांत काय मिळणार याविषयीं देखील मला बराच संशय होता. ती अच्युतरावांची दान करण्याची इच्छा नसून ज्ञानकोशाविषयीं जी सहानुभूति लोकांस वाटत असेल त्या सहानुभूतीवर धंदा करण्याची त्यांची इच्छा होती असें त्यावेळेस मत झालें. व कंपनीच्या नियमाप्रमाणें आम्हास देणगी स्वीकारतां येत नाहीं आणि नारिंगीनिशाण संस्थेनें आम्हांस ही देऊं केलेली मदत नको आहे अशा अर्थाचें पत्र मी संदेशकारांस पाठविलें पण तें त्यांनीं प्रसिद्ध केलें नाहीं, तेव्हां त्यांची आमच्या सहानुभूतीवरच धंदा करण्याची इच्छा आहे अशी खात्री झाली; तथापि त्या अर्थाचें पत्र इतर पत्रांतून मागाहून प्रसिद्ध करतां आलें. तेव्हां आमच्या साहेबी वृत्तीवर संदेशनें टीका सुरू केली.

यानंतरची नमूद करण्यासारखी गोष्ट म्हटली म्हणजे रा. पाध्ये यांचें ज्ञानकोशाच्या शासनाध्यक्षाच्या जागेवरून व चालक मंडळांतून

उच्चाटन होय. रा. पाध्ये व मी या दोघामध्यें जें द्वैत उत्पन्न झालें त्याचा परिणाम रा. पाध्ये यांच्या उच्चाटनांत झाला, आणि पुढें रा. पाध्ये यांनीं माझ्या संबंधानें लोकमत कलुषित व्हावें यासाठीं प्रयत्न केला, तो इतिहास मी येथें जरा विस्तृततेनें पण रा. पाध्ये यांच्या विषयीं जितकी न्यायबुद्धि धरतां येईल तितकी धरून देऊं इच्छितों. माझ्या मनांत रा. पाध्ये यांच्याविषयीं कांहीं काळ राग असेल पण आतां तो नाहीं आणि यामुळें मी मुद्दाम कोणत्याहि गोष्टीचा विपर्यास करीन असें वाटत नाहीं. महादेव कृष्ण पाध्ये यांनीं १५०० रुपये ज्ञानकोशमंडळांत घातले होते, आणि ते घालतांनां त्यांनां फायद्याची आशाहि होती पण १५०० चे शेअर घेणें व डायरेक्टर होणें याशीं कंपनीशीं करार करणें हें कायद्यानें मना होतें. पण ते कंपनीचे डायरेक्टर झाले व चेअरमन देखील झाले व आमचे छपाईचें कामहि ते करीत आणि यामुळें त्यांच्यामध्यें आणि माझ्यामध्यें पुढें द्वैत उत्पन्न झालें. कंपनीचें काम करणारा मनुष्य या नात्यानें त्यांच्याकडून काम नीट झालें नाहीं तर त्यांच्यावर रागावावें कसें, तेच तर आमच्या मंडळाचेहि अध्यक्ष; अशी स्थिति उत्पन्न झाली, तेव्हां तीवर कांहीं तरी इलाज करणें अवश्य होतें. दुसरे दोघे जादा चालक व रा. पाध्ये हे नेहमी एकीनें वागत असल्यामुळे कंपनीच्या कामाला जेव्हां रा. पाध्यांकडून दिरंगाई होई तेव्हां ते नेहमीं रा. पाध्ये यांनांच उचलून धरीत. त्यांनां एकी करण्याशिवाय गत्यंतर नव्हतें. तेव्हां दुसरे दोघे डिरेक्टर एकशेअरवाले असल्यामुळें पुन्हां निवडून येण्यासाठीं त्यांस रा. पाध्ये यांचा १५ मतांचा जोर पाहिजे होता. व यासाठीं ते नेहेमी पाध्ये यांच्याशी मिळून वागत तेव्हां यावर उपाय करावा असा विचार माझ्या डोक्यांत सुरु झाला. तेव्हां डिरेक्टरांची जबाबदारी व बंधनें या संबंधाचा कायदा पाहिला तेव्हां असें आढळून आलें कीं जेव्हां एखादा डायरेक्टर कंपनीशीं करार करतो तेव्हां तो आपोआप डायरेक्टर या पदापासून च्युत होतो. तेव्हां पाध्ये यांस काढून टाकणें मला प्राप्त होतें. एवढेंच नव्हे तर तसें मी केलें नसतें तर रा. पाध्ये आणि मी असे दोघेहि कायद्याप्रमाणें शिक्षेस पात्र झालों असतों. कदाचित कायद्याकडे आमचें लक्ष मागाहून गेलें असें निमित्त करून आणि ओढाताण करून रा. पाध्ये यांस काम मिळणें मात्र बंद करून डायरेक्टर म्हणून ठेवतां आलें असतें असेंहि कित्येक वकील मागाहून म्हणाले. तथापि तशी

कायद्याची ओढाताण करावयाची माझ्या मनाची तयारी नव्हती. तो विचार माझ्या मनांतहि आला आणि तेव्हां असें वाटलें कीं ज्याच्या अपेक्षा फसल्यामुळें जो मनुष्य दुखावला आहे असा मनुष्य डायरेक्टरांत ठेवला तर तो कारभारांत दररोज त्रास देईल. तर असा मनुष्य बाहेरच रहावा हें उत्तम. बाहेर राहिला असतां तो जो त्रास देईल त्याला प्रतिकार करतां येतो पण आंत राहून मनुष्य नेहेमी अधिक त्रासदायक बनतो. तर आपल्याविरुद्ध जाणारा मनुष्य आपल्याला त्रास देण्यासाठीं मानगुटीवर ठेवण्याकरतां कायद्याची ओढाताण करून मनुष्य स्वतः लबाडी केल्याच्या गुन्ह्याला पात्र होण्याचें कोण करणार आहे? असो, अशा स्थितींत माधवराव पाध्ये यांस मी काढून टाकण्यास त्यांचें शत्रुत्व माझ्या मनांत मुळींच नको होतें आणि नव्हतेंहि. रा. पाध्ये यानां काढून टाकलें तें काढून टाकण्यापूर्वी रा. फडके यांचा देखील सल्ला घेतला होता. व रा. फडके यांनी देखील कायद्याच्या दृष्टीनें दुसरा इलाज नाहीं असें मत दिलें होतें. पाध्ये हे डिरेक्टर नाहींत म्हणून रजिस्ट्रारकडे जें पत्र गेलें तें रा. गोविंद चितामण तांबे यांच्या सहीनें गेलें. रा. तांबे, रा. पाध्यांचे एका वेळीं ज्युनिअर होते म्हणजे रा. पाध्ये तांब्यांचे गुरु होते त्यामुळें

## रा. तांबे यांनीं " गुरुसाईड " केला

असे त्यांचे मित्र त्यांस म्हणूं लागले.

रा. पाध्ये यांचें उच्चाटन डिसेंबर १९१७ च्या शेवटास झालें आणि पाध्ये यांस तें कांग्रेस आटपल्यानंतर कळलें. त्यावेळेस लोकमान्य टिळक कांग्रेस आटपून नागपुरास येऊन राहिले होते आणि त्यांचीं व्याख्यानें वगैरे माधवराव पाध्ये यांच्या छापखान्याच्या मोकळ्या पटांगणांत होत. त्यावेळेस "राष्ट्रीय" मंडळींतील एका कंपूत वातावरण एकदम माझ्याविरुद्ध झालें होतें व त्यावेळेस लोकमान्यांची व माझी भेटहि होऊं न देतां लोकमान्यांनां माझ्याविरुद्ध पुष्कळ गोष्टी सांगितल्या गेल्या असें कळतें. पण लोकमान्यांनीं त्या गोष्टींनां मुळीच महत्त्व दिलें नसावें असें वाटतें. डॉ. केतकरांचा ज्ञानकोश कधींहि सिद्धीस जाणार नाहीं असें लोकमान्य म्हणाले अशीहि गप्प कांहीं शेलक्या लोकांनीं उठविली. पण ती अगदीं खोटी होती कारण कांहीं दिवसांनंतर बुटीच्या

बंगल्यांत त्यांची आणि माझी भेट होऊन बऱ्याचशा गप्पा झाल्या तेव्हां त्यांनीं नागपुरास माझ्याविरुद्ध असलेल्या मंडळीसंबंधानें एकहि गोष्ट काढली नाहीं. आणि डिडेरोच्या साहाय्यकांचें आणि त्यांचें भांडण होऊन ती मंडळी त्यांस सोडून कशी गेली, तरी देखील तो कसा डगमगला नाहीं हें सांगितलें आणि हें ज्ञानकोशाचें कार्य तुम्हांस पुरें करण्यास वीस वर्षें लागतील असा आपला अजमास सांगितला.

रा. पाध्ये प्रकरण त्यांच्या उच्चाटनानें संपलें नाहीं; हें केवळ त्याचें पूर्वस्वरूप आहे असें १९२० सालच्या वृत्तांतावरून दिसून येईल. त्या वेळची हकीगत देऊन नंतर या भांडणाविषयीं माझे विचार मी व्यक्त करणार आहें. रा. पाध्ये यांच्याशीं भांडण झालें ही गोष्ट वाईट झाली असें अनेकदां वाटें, तर हें भांडण झालें हें बरेंच झालें आणि पाध्ये यांचा संबंध १९१८ च्या जानेवारींतच तुटला हें चांगलें झालें असेंहि एका दृष्टीनें वाटूं लागलें. तर त्याहि गोष्टी मी मांडणार आहे.

पाध्ये गेले तरी भांडण संपलें नाहीं. उलट अशा कांहीं गोष्टी झाल्या कीं, त्यामुळें माझ्याविषयीं एक शेअरवाल्या जादा चालकाचें मन कलुषित झालें. याला कारण तेच केवळ नसतील मीहि असेन. त्यांची अशी कल्पना झाली कीं, मी त्यांस तुच्छतेनें वागवितों. पण तसें नव्हतें. त्यांचा तसा समज होण्यास पुणें व मुंबई येथील ऑफीसें कारण झालीं.

## पुणें ऑफीसचा प्रारंभ

१९१७ सालच्या वर्षप्रतिपदेच्या, दिवशीं (१२ एप्रिल १९१८) पुणें ऑफिस उघडलें आणि तें उघडण्याचा समारंभ नानावाडयांत करण्यांत आला. पुणे ऑफिसवर प्रो. वै. का. राजवाडे यांची योजना करण्यांत आली, आणि प्रो. राजवाडे यांच्या वार्धक्यामुळें त्यांच्याकडून स्वतः विशेष काम होण्याजोगें नव्हतें तर त्यांचा उपयोग पुण्यांतल्या कांहीं मंडळींचीं तोंडें बंद करण्याकडे झाला. तसाच अनेक लोकांची सहानुभूति मिळविण्याकडे झाला. प्रो. राजवाडे आम्हांस मिळाले कसे याचेंच पुष्कळांनां आश्चर्य वाटलें. प्रो. राजवाडे हे मवाळ आणि डॉ. केतकर तर जहाल असें असतां प्रो. राजवाडे यांनीं केतकरांशीं सहकारिता कशी केली इत्यादि गोष्टींचें कांहीं मंडळींनां कोडें पडलें. त्यासारखें कोडें या दिवसांत पडावयाचें नाहीं. पण पक्षाच्या अभिमानी मनुष्यानें दुसऱ्या पक्षाच्या मनुष्याशीं कोणत्याच तऱ्हेनें सहकारिता करूं नये

असें वाटत होतें, प्रो. राजवाड्यांचा उपयोग दुसऱ्याहि प्रकारें झाला. बऱ्याच लोकांनां आपलीं लिखितें कोणी तरुणानें तपासावीं हें योग्य वाटत नव्हतें. मी सर्वच गोष्टींचा सूत्रधार असल्यामुळें मी लोकांचे लेख तपासूं नये असा कोणाचाच आग्रह नव्हता. पण जेव्हां शास्त्रीय विषयावर स्वतंत्र संपादक म्हणून डॉ. श्रीरंग मोरेश्वर साने यांस संपादक नेमण्याचें योजिलें तेव्हां त्या विचारास बऱ्याच शाखा संपादकांनीं विरोध केला. तथापि त्या मंडळींची भाषेच्या दृष्टीनें प्रो. राजवाडे यांनीं आमचीं लिखितें तपासावीं याला पूर्ण संमति होती. पुणें येथें ऑफीस उघडल्यामुळें पुण्यांत थोडी बहुत सहानुभूति उत्पन्न झाली आणि ज्या वेळेस पुण्यास ऑफीस उघडावयास आलों त्यावेळेस पुण्यास येथें सुमारें २५ वर्गणीदार करून गेलों. मला त्यावेळेस पुण्यांतली बडी राजकारण करणारी मंडळी म्हणत होतीं कीं पुणें शहराचे लोक लुच्चे आहेत. तुम्हांला येथें पैसा बिलकुल मिळावयाचा नाहीं. तुम्हांला वऱ्हाडांतच काय पैसा मिळवायचा असेल तो मिळवा आणि तेथें खर्च करा. पण खरोखर पुणें शहरानें जेवढी आम्हांस पैशाची मदत केली तितकी दुसऱ्या कोणत्याहि शहराने केली नाहीं. पुण्यांतून आम्हांस चाळीस हजार रुपयांच्यावर रकम मिळाली आहे. वाङ्मयासाठीं जे प्रयत्न करतात त्यांचा पाठिराखेपणा पुणें शहर जेवढें करतें तेवढें कोणतेंच शहर करीत नाहीं असें खात्रीनें म्हणतां येईल. असो.

पुणें येथे ऑफीस उघडल्यामुळें आणि प्रो. राजवाडे त्यांत आहेत अशी बातमी प्रसिद्ध झाल्यामुळे कार्यास मदत झाली ती विश्वास वाढण्याचीच झाली हे मात्र सांगितलें पाहिजे. प्रो. राजवाडे हे आपल्या चढत्या वयामुळें आणि डोळ्यांच्या स्थितीमुळें विशेष काम स्वतः करूं शकले नाहींत. व त्यांनीं नऊ महिन्यांतच काम सोडून दिलें. कारण त्यांनां तपासनीसांचें काम करावें लागे व तें करतांना त्यांच्या डोळ्यांनां त्रास होऊं लागे व जें तपासणीचें काम त्यांच्याकडून होई तें देखील दुसऱ्यांच्या साहाय्यानें होई. प्रो. राजवाडे यांच्या नेमणुकीसंबंधाने एक दोन डिरेक्टर नाखूष झाले. मी व रा. फडके या दोघांची त्यांनां नेमावे अशी इच्छा होती तथापि दुसरे डिरेक्टर असें म्हणूं लागले कीं, प्रो. राजवाडे यांनां अर्ज करूं द्या म्हणजे आम्ही त्याचा विचार करूं, प्रो. राजवाडे यांनीं अर्ज करावा व त्यांचा अर्ज मंजूर करण्याचें

श्रय आपणांस असावें हें त्यांस पाहिजे होतें तर प्रोफेसर राजवाडे यांचें मन आपण कसें वळवावें या फकिरींत मी होतों. तेव्हां ही केवळ संपादकीय बाबत आहे म्हणून मी त्यांनां न विचारतांच प्रो. राजवाडे यांची नेमणूक केली व हें रा. भवाळकर व ठेंगडी यांस मी त्यांनां कांहीं एक विचारीत नाहीं असें वाटण्यास कारण झालें.

मुंबई ऑफीस १ जुलैला उघडलें त्यावेळेस तें देखील डिरेक्टरांनां न विचारतांच उघडलें. याचें कारण ती गोष्ट देखील मॅनेजरच्या अधिकारांतलीच आहे असें माझें म्हणणें होतें. डिरेक्टरांनां न विचारतां या गोष्टी केल्या याचें कारण धंद्यासाठीं जो तावडतोब निर्णय करावा लागतो तो निर्णय करण्यास ते असमर्थ आहेत असें दिसून आलें व दोन ऑफीसें उघडण्यासारख्या महत्त्वाच्या गोष्टी देखील त्यांनां न विचारतां करणें त्यांनां गैर वाटलें तर त्यांत त्यांचा दोष आहे असें मला वाटत नाहीं.

याच वेळेस कंपनीच्या हितासाठीं मी वागत असतां केवळ आम्हांला तुम्ही विचारलें कां नाहीं एवढया मुद्यावरच छळण्याचा एक प्रयत्न दोन जादा डायरेक्टर (१ शेअरवाले) यांच्याकडून झाला. १९१७–१९१८ सालांत "इंडियन कंपनीज रिस्ट्रिक्शन आक्ट" हा नवाच कायदा हिंदुस्थान सरकारनें केला. या कायद्याचा हेतु जी रोकड लोकांपाशीं असेल ती खासगी कंपन्यांत जाऊं नये व सरकारला कर्ज काढण्यास अडचण पडूं नये हा होता. हा कायदा पास झाल्याचें माझ्या नजरेस रा. माधवराव अणे यांच्या दक्षतेमुळें आलें. त्यावेळेस मी प्रवासांतच होतों. या कायद्यानें नवीन कंपनी काढण्यास किंवा अस्तित्वांत असलेल्या कंपनीचें भांडवल वाढविण्यास किंवा शेअरवरच्या हप्त्याची मागणी करण्यास हिंदुस्थान सरकारची संमति लागत होती. या कायद्यामुळें आमचा व्यवहारच थांबावयाचा अशी स्थिति झाली. तेव्हां शेअरवरचे नवीन हप्त्याची मागणी करण्यास प्रतिबंध असूं नये आणि अवश्य वाटल्यास एक लाखपर्यंत भांडवल वाढविण्याची मोकळीक असावी असा अर्ज हिंदुस्थान सरकारास केला आणि तशी एक लाखपर्यंत भांडवल करण्यास आणि हप्ते वसूल करण्यास सरकारनें परवानगी दिली. अर्थात या आक्टाकडे बोट दाखवून कोणी आमचे हप्ते भरण्याचें चुकवूं नये म्हणून सरकारनें दिलेल्या परवानगीसंबंधाची

माहिती प्रसिद्ध करणेंहि अवश्य होतें. व या सर्व गोष्टी मी बाहेर गांवीं असतां माझ्या पत्राप्रमाणें सेक्रेटरींनीं केल्या. तेव्हां डायरेक्टर चिडले व म्हणाले कीं कंपनीचें भांडवल वाढविण्याची परवानगी मागून टेवावयाला तुम्हांला कोणी सांगितलें होतें? मी अर्थात स्पष्टीकरण केलें. तेव्हां ते म्हणाले कीं सरकारला पुन्हां लिहा कीं आम्हाला ही परवानगी नको आहे; आणि परवानगी मागितली ती डायरेक्टरांची परवानगी नसतांना मागितली होती. अर्थात हें डायरेक्टरांचें ऐकणें म्हणजे वेडेपणाच होता. पण सरकारला जें आम्ही पत्र लिहिलें त्यांत "अवश्य वाटल्यास" हे शब्द होते, त्यांकडे त्यांचें लक्ष ओढलें. आणि त्याचा असा अर्थ स्पष्ट करून दाखविला कीं "भांडवल वाढवावें अशी शिफारस डायरेक्टरांनीं केल्यास आणि ती सूचना शेअरहोल्डरांनीं स्वीकारल्यास" असाच अर्थ होतो. तेव्हां एकास तें पटलें व दुसऱ्यास तें पटलें नाहींच; तो सरकारची परवानगी मागण्यास आमची परवानगी मागावयास पाहिजे होती असेंच घेऊन बसला. तेव्हां ज्या डायरेक्टरांनां माझें म्हणणे पटलें त्यानीं दुसऱ्या डायरेक्टरास "चिड चिड करूं नको, उगा मुगा रहा ना" म्हणून दबकावले, व तो रुसवा डायरेक्टर चूप बसला. ते रुसवे डिरेक्टर द्वेष करण्यास आतुर असत. तेव्हां ज्ञानकोशास एक लाख भांडवल करण्यास परवानगी मिळाली काय? म्हणून प्रश्न केला तर ते ही "क्यापिटल जोक" आहे असें उत्तर देत.

रा. ठेंगडी आणि भवाळकर या दोघांची वृत्ति समजण्यासारखी आहे रा. ठेंगडी हा गृहस्थ चळवळ्या म्हणून प्रसिद्ध होता पण एखाद्या वाङ्मयसंस्थेंत डिरेक्टर म्हणून कसा आला हा प्रश्न उपस्थित होण्याजोगा आहे. त्याचप्रमाणें एक शेअरवाल्या लोकांनां डिरेक्टर म्हणून येण्याची संधि कां ठेवली हा प्रश्न देखील उपस्थित होईल. पैसे थोडे पण चळवळ मात्र फार अशा लोकांनां अधिकारवर येऊंच न देण्याची कंपनीचीं आर्टिकल्स करतांनां अशी धूर्तता दाखविली कां नाहीं. इत्यादि प्रश्न उत्पन्न होतील. यासाठीं त्यांचें स्पष्टीकरण केलें पाहिजे.

प्रथमतः हें सांगितलें पाहिजे कीं १९१६ साली कंपन्यांच्या कारभाराविषयीं महाराष्ट्रांत तर काय पण सर्व हिंदुस्थानांत अविश्वास होता. अनेक ब्यांकांचीं दिवाळीं वाजलीं होतीं. आणि त्यामुळें पुष्कळ लोक कंपनीचे डिरेक्टर व्हावयास भीत असत. रा. माधवराव पाध्ये यांनीं

कंपनीचे डिरेक्टर व्हावयाचें म्हणजे काम फसलें तर लोकांच्या शिव्या खाण्याची आणि आपलें नांव बदनाम करून घेण्याची तयारी करावयाची असें भाष्य केलें, आणि तें पुष्कळ अंशीं खरें होतें. ज्ञानकोशमंडळाचे १९ शेअर घेणारेच सर्व डिरेक्टर असावेत व ते काम संपेपर्यंत जवळ जवळ कायमचे असावेत असें माझें धोरण होतें. पण १९ शेअ घेऊन डिरेक्टर होण्यास पाध्ये व फडके यांखेरीज कोणी तयार होतच ना. तेव्हां मनांत अशी कल्पना आली कीं, ज्ञानकोशाच्या तीन कायम डिरेक्टरांपैकीं दोन मृत झाले तर पुढें काय करावयाचें? कंपनी म्हटली म्हणजे दोन तरी चालक लागतातच आणि वेळेस जर सर्वच कायम चालक मृत झाले तर निदान दोन तरी नवे डिरेक्टर येण्याची व्यवस्था असली पाहिजे. जर १९ शेअर घेणारी मंडळी मिळालीच नाहींत तर पुढें काय करावयाचें यासाठीं जादा चालक म्हणून जे लोक निवडावयाचे ते एकशेअरवाले देखील चालतील असा नियम केला.

## पहिली आर्डिनरी जनरल मीटिंग

या सभेच्या वेळेस ज्ञानकोशमंडळाचे कांहीं "महत्त्वाचे" नियम ठरविण्यांत येणार होते, व यावेळेस जे दोन जादा चालक होते त्यांचा प्रयत्न असा होता कीं, रा. फडके यांस डायरेक्टरांमधून काढून टाकावें व आपणच पुन्हां निवडून यावें आणि ज्ञानकोशमंडळामध्ये माझें वजन अगदीं कमी करून टाकण्याचा प्रयत्न करावा. तें वजन कमी करण्याची त्यांची खटपट होती. तींतील अंगें येणेंप्रमाणें:—तीन तीन महिन्यांचें बजेट करावें आणि तीन तीन महिन्यांनीं खर्चास परवानगी द्यावी आणि खर्चास परवानगी देण्याचे वेळेस जितका त्रास देतां येईल तितका देण्याची व आपल्या अधिकाराची जाणीव मॅनेजरला अधिकाधिक व्हावी यासाठीं खटपट करावयाची अशी त्यांची वृत्ति होती व तीच त्यांनां चालवावयाची होती.' रा. माधवराव पाध्ये हे चिडलेलेच होते. आणि त्यांनां हातीं धरून त्यांच्याकडून कंपनीचे व्यवस्थेबद्दल पुष्कळ तक्रारी बोलवाव्या आणि दुसऱ्या दोघां जादा चालकांनीं त्या तक्रारींची सत्यता मान्य करावी आणि डायरेक्टरास अधिकार फारसे नाहींत म्हणून डॉ. केतकरांच्या कारभारावर आम्हाला नियंत्रण करतां येत नाहीं म्हणून सांगावें आणि आपण पुन्हां निवडून तर यावेंच पण

निवडून येतां येतां डॉ. केतकर यांचे अधिकार कमी कमी करून निवडून यावें म्हणून खटपट झाली. या खटपटीचा सुगावा मला अगोदरच लागला होता; कां कीं आपली ही सर्व खटपट कशी काय आहे, डॉ. केतकर यांच्या तावडींतून आम्ही कंपनी कशी सोडवून आणतों याविषयीं त्या मसलतींत असलेल्या मुत्सद्यांनीं नागपूरच्या बार रूममध्यें बढाईचीं भाषणेंहि केलीं होतीं त्यावेळेस त्यांचा हेतु आम्हांस पुरा विध्वंसून टाकतां आला. त्यांस कांहीं करतां आलें असतें अशांतला भाग नाहीं. कां की, मतांची प्रबळता माझ्यापाशींच होती. त्या सभेला रा. फडके हजर होते व रा. पाध्ये व रा. फडके यांचीं मतें एकमेकांविरुद्ध पडून माझी २९ मतें व मी प्राक्झी गोळा करून मिळविलेलीं मतें यांच्यापेक्षां जास्त मतें आपलीशी करून घेणें रा. भवाळकर व ठेंगडी यांस अशक्य होतें. तथापि आपली प्रॉक्झीचीं मतें न वापरतां किंवा स्वतःचीं २९ मतेंहि न वापरतां जमलेल्या मंडळींतच माझें बहुमत व्हावें अशी माझी इच्छा होती. व यासाठीं त्यांच्या लटपटी पद्धतशीर फोडून टाकणें अवश्य होतें. यासाठीं आम्ही उपाय केलेले येणेंप्रमाणें:—

## रा. फडके यांच्याविरुध्द प्रयत्न

रा. माधवराव पाध्ये यांची प्रथमतः अध्यक्षस्थानीं योजना केली. त्यामुळें रा. पाध्ये यांस भांडणाऱ्या व्यक्तींतील एक पक्ष म्हणून जो भडिमार करावयाचा होता तो करतां आला नाहीं. व त्यामुळें रा. धुंडीराज ठेंगडी व भवाळकर यांस “कंपनीचे व्यवस्थेविरुद्ध ज्या गोष्टी दुःखानें कबूल” करावयाच्या होत्या त्या करतां आल्या नाहींत. व त्यामुळें त्यांचा कार्यक्रम बिघडल्यामुळें घोटाळा होऊन गेला. त्यांच्या पक्षाच्या पढविलेल्या एका शेअरहोल्डरानें असा प्रश्न केला कीं, तुम्ही लेख लिहिण्याकडे हजारों रुपये खर्च करीत आहां. पण अशी कल्पना करा कीं पुढें गिऱ्हाईकीच झाली नाहीं तर छापावयास पैसा राहणार नाहीं म्हणजे पैसे जातील बाहेर आणि कागद येतील घरांत, आणि ते देखील लिहिलेले असणार. म्हणजे मग त्या कागदांचें काय करावयाचें? त्याला उत्तर देणें सोपें होतें. कीं कंपनी मोडून टाकावयाची आणि कागद रद्दीचे भावानें विकून टाकावयाचे. हें उत्तर ऐकतांच हशा पिकला. व डॉ. केतकर यांस आपण पकडींत धरलें आहे असें दाखविणारी त्या

शेअरहोल्डराची मुद्रा खजील झाल्यासारखी दिसली. या बैठकींत जे ठराव आणले होते त्या ठरावांमध्यें, जो डायरेक्टर अमुक एक बैठकीला हजर रहाणार नाहीं तो आपोआप गाळावा असा ठराव होता. आणि तो रा. फडके यांस काढून टाकण्यासाठीं होता. कां कीं रा. फडके अकोल्यास असल्यामुळें त्यांनां बैठकांस हजर राहतां येत नसे. रा. भवाळकर व रा. ठेंगडी यांस रा. फडके हे नको होते. कारण त्या दोघांचें मताधिक्य त्यांस ठेवून माझ्यावर अधिकार गाजवावयाचा होता. पण गाजवणार तो काय? रा. ठेंगडी उध्दटासारखें भाषण करी. तर दुसरा द्वयर्थी भाषणें करी व रा. नारायण खंडेराव फडके मुद्दाम अकोल्याहून आले असतां त्या बैठकीला कांहीं तरी कुरापत काढून कांहीं एक काम होऊं देऊं नये अशी त्यांची वृत्ति होती. ठेंगडी व भवाळकर हे दोघेहि जादा चालक. दोघांची जिंदगी ज्ञानकोशमंडळांत तीस रुपयांपर्यंत. परंतु इच्छा मात्र अशी कीं डॉ. केतकर यांनीं पूर्णपणें त्यांच्या तंत्रानें चालावें, त्यांना ज्या गोष्टी करावयाच्या असतील त्या करूं द्याव्यात आणि त्या दोघांनीं जूट करून आपलें स्वामित्व गाजवावें. त्यांपैकीं एकाची तर अशी इच्छा होती कीं ज्ञानकोशमंडळांतले जे अनेक लेखक होते त्यांनीं आपणाशीं बाहेर देखील मोठ्या अदबीनें वागावें. व त्यांपैकीं कोणी चहाच्या दुकानांत चहा घेतला असला आणि तेथें ज्ञानकोश मंडळांतला एखादा डायरेक्टर गेला तर त्या मंडळीनें उठून उभें रहावें व मंडळांतील एक कारकून तसा उठून उभा राहिला नाहीं म्हणून एका डायरेक्टरानें मजकडे तक्रारहि केली होती. रा फडके यांस काढून टाकणें हें कंपनीच्या "आर्टिकल्स"प्रमाणें अशक्य होतें. कंपनीचा कायम चालक कोणत्या विशिष्ट कारणामुळें पदच्युत होऊं शकेल त्या अटी स्पष्ट मांडिल्या होत्या. त्यामुळे आर्टिकल्स बदलल्याखेरीज कोणताहि ठराव पास होणें अशक्य होतें. एवंच या सर्वसाधारण बैठकींत भवाळकर व ठेंगडी यांस कांहीं करतां आलें नाहीं. व ते पुनः निवडूनहि आले नाहींत. त्यावेळेस डॉ. खरे व रा. कठाळे हे नवीन जादा चालक निवडून आले. व या दोघांनीं मी नागपूरला होतों तोंपर्यंत काम चांगलें केलें. व डॉ. खरे यांनीं शेवटपर्यंत काम चांगलें केलें.

डॉ. नारायण भास्कर खरे एम्. डी. यांच्याविषयीं थोडेसे दोन शब्द लिहिले पाहिजेत. डॉ. खरे यांची व माझी ओळख प्रथम नागपुरासच

झाली आणि ती देखील झाली ती अशी; मी त्यांची पाटी पाहिली. एम्. डी हीं अक्षरें पाटीवर पाहिलीं व यांच्यासारख्या मनुष्याचें कंपनीच्या संस्थापकांमध्यें नांव असलें तर बरें असें वाटून त्यांची मेमोरांडम व आर्टिकल्स वर सही घेतली. त्यामुळें हे कंपनीच्या आद्य संस्थापकांत दाखल झाले व त्या नात्यानें दीड वर्ष डिरेक्टर राहिले. मध्यें स्टयाच्युटरी मीटिंगच्या अगोदरच्या आठवडयांत जेव्हां नवीन डिरेक्टरांची निवडणूक केली, तेव्हां ते निवडून आले नाहीत. त्यांनां रा. भवाळकरापेक्षां एक मत कमी पडलें आणि त्यावेळेस माझें मत भवाळकरांसच मी दिलें होतें तेव्हां एक वर्षभर ते डिरेक्टर नव्हते. त्याच्या पुढच्या वर्षी धुंडीराज ठेंगडी आणि भवाळकर हे डिरेक्टर निवडून आले नाहींत. कारण कोणते डिरेक्टर निवडून यावे हे बहुतेक माझ्या इच्छेवरच होतें आणि त्यांच्याऐवजीं रा. कठाळे व डॉ. खरे हे निवडून आले. त्यांच्या निवडणुकीच्या वेळेस देखील एक शंका उपस्थित करण्यांत आली होती आणि ती म्हटली म्हणजे कंपनीचे ऑडीटर रा. खरे हे डॉ. खरे यांचे सावत्रबंधु आहेत आणि यासाठीं डॉ. खरे यांनां डिरेक्टर केलें तर रा. खरे यांस आडीटर करतां येणार नाहीं. तथापि डॉ. खरे यांच्या निवडणुकीचा प्रश्न अगोदर सोडवावा लागला आणि ते निवडले गेले आणि त्यांची निवडणूक झाल्यानंतर ऑडिटर खरे यांच्या निवडणुकीच्या वेळेस तो आक्षेप कोणी घेतलाच नाहीं.

डॉ. खरे यांनीं डिरेक्टरचें काम चांगल्या तऱ्हेनें केलें. ते नेहेमी ठरलेल्या वेळीं सभेला येत आणि येण्यापूर्वी सर्व कागद वाचून येत आणि आल्यानंतर १० किंवा पंधरा मिनिटांतच सर्व काम उरकून टाकीत असत. बहुतेक वेळ बैठकीचीं मिनिटबुकें तेच लिहीत असत. त्यांच्यामध्यें ताबडतोब विचार करण्याची आणि निर्णय करण्याची हातोटी होती, आणि सार्वजनिक काम करतांना स्वतःस जरी थोडा चट्टा बसला तरी हरवत नाहीं अशी त्यांची वृत्ति असे. तथापि यांच्या हातूनहि एक दोन चुका झाल्या; त्यांचा उल्लेख पुढें प्रसंगानुसार येईलच.

रा. कठाळे हे चांगल्या तऱ्हेचे वकील आहेत. यांनां पोंच बेताचाच असे आणि यांच्याकडे येऊन कोणी गोष्टी खोट्या सांगितल्या तर ते त्यांवर लवकर विश्वास ठेवीत. यांची एक वर्षपर्यंत कारकीर्द निरुपद्रवी झाली. तथापि मी पुष्पास असतांना माझ्याविरुद्ध कांहीं तरी प्रयत्न करावा म्हणून

रा. भवाळकर जेव्हां खटपट करीत असत तेव्हां ते कठाळयांच्याकडे जात असत. रा. कठाळे यांची त्यामुळें माझ्याविरुद्ध वृत्ति झाली होती पण हे माझें फारसें नुकसान करूं शकले नाहींत.

वर दिलेल्या हकीगतींत असें वाटण्याचा संभव आहे कीं, मी डिरेक्टर मंडळीची विनाकारण उपेक्षा करीत होतों. तथापि मला अजूनहि तसें वाटत नाहीं. ज्या प्रकारच्या माणसांशीं संबंध आला त्या प्रकारच्या माणसांशीं अन्य तऱ्हेनें वागणें शक्यच नव्हतें. जे दोघे जादा चालक होते त्यांस पुन्हां निवडून येण्यासाठीं कोणत्या तरी पुष्कळ हिस्से घेणाऱ्या भागीदारास चिकटून राहिल्याशिवाय गत्यंतर नव्हतें. ते आपली दुर्बल स्थिति कांहीं अंशीं ओळखून होते तरी पण त्यामुळे मुख्य हिस्सेदार जो मी त्याच्या तंत्रानें न वागतां रा. पाध्ये यांच्या तंत्रानें ते वागूं लागले. प्रथमतः पाध्ये व मी या दोघांमध्ये असें मत होते कीं, मुख्य जबाबदारी कायम चालकांवर आहे आणि जे जादा चालक आहेत त्यांनां फारशी गडबड करूं देऊं नये व रा. फडके जर वारंवार येत असते तर दोन जादा चालकांनां वाजवीपेक्षां जास्त महत्त्वाकांक्षा उत्पन्नच झाली नसती. पण रा. फडके न येण्यामुळें या दोन जादा चालकांनां असें वाटूं लागलें कीं, ते दोघे व मी व पाध्ये असे चारच जण जागेवर आहोंत. जर ते दोघे चिकटून राहिले व आम्हां दोघांपैकीं कोणाला तरी आपल्या बाजूचे केलें तर आपल्याला कंपनी आपल्या ताब्यांत ठेवतां येईल. यासाठीं या दोघांनीं प्रथम रा. पाध्ये यांच्याविषयी माझें मन कलुषित करण्याचा प्रयत्न केला; पण तो सिद्धीस गेला नाहीं. रा. पाध्ये जेव्हां आपल्या शिफारसीचा कारकून पाठवीत तेव्हां त्यास तुम्हीं ठेवूं नका असें ते म्हणत असत. रा. पाध्ये व हे दोघे यांचें एकमेकांशीं बरें होतें अशांतला भाग नाहीं. कारण रा. भवाळकर व व रा. ठेंगडी हे दोघेहि आपणांस राष्ट्रीयपक्षाचे म्हणवीत असत, रा. पाध्ये हे नेमस्तपक्षाचे होते. व नागपूरला कांग्रेस न होतां सुरतेला कांग्रेस झाली तेव्हां रा. पाध्ये यांनीं कांग्रेसच्या स्वागत कमेटीचे पैसे आपल्या हातांत ठेवून नागपूरला कांग्रेस करण्याचा जो व्यूह अजीबात फेटाळून लावला त्यामुळेंच रा. पाध्ये व राष्ट्रीय पक्षाची मंडळी यांमध्यें परस्परांविषयीं क्रोधद्रोहादि भाव जागृत होते.

माधवराव पाध्यांच्याविरुद्ध मी राहून जादा चालकांच्या मतानें चालेन अशी जेव्हां त्यांस संधि मिळेना तेव्हां ते माधवरावांबरोबर दोस्तीचे

आविर्भाव करूं लागले व जेव्हां मी रा. पाध्ये यांस ४८ तासांत काम सुरू केलें पाहिजे, नाहीं तर काम काढून घेऊं म्हणून नोटीस दिली तेव्हां त्यांची व पाध्यांची दोस्ती घट्ट झाली. रा. पाध्ये यांच्या जोरावर ते माझ्याशीं उद्धटपणाने वागूं लागले आणि रा. पाध्ये देखील त्यांनां जोर देऊं लागले पण जेव्हां माधवराव पाध्ये चालक मंडळींतून निघाले तेव्हां आतां आपली किंमत कशी राहील असें त्यांनां वाटलें. व आम्ही कंपनी मोडून टाकण्याचा अर्ज देणार आहोंत इत्यादि गोष्टी ते बोलूं लागले. पण पुढें त्यांनां असे वाटूं लागले कीं, आतां माधवराव पाध्ये गेल्यामुळें जादा चालकांचें महत्त्व उलटे वाढलें आहे. तेव्हां आम्ही दोघे, एक-शेअरवाले जे बाहेर आहेत त्यांचे प्रतिनिधि आहोंत आणि कायमच्या चालकांच्या स्वार्थाला आळा घालण्यासाठीं आहोत अशी भाषा बोलण्यास त्यांनी सुरवात केली व आपले महत्त्व अधिकाधिक दाखवावें अशी त्यांस बुद्धि झाली. काम मला करूं देऊन जर मी कोठें कंपनीचें हित विसरत असेन तर निषेध करावा हें धोरण न ठेवतां प्रत्येक वेळेस अडवणूक करण्याचे धोरण त्यांनीं पत्करलें. तेव्हां मला देखील त्यांच्या मताला कांहींएक किंमत द्यावयाची नाहीं हें धोरण पत्करावे लागलें. यांनीं कांहीं गोष्ट मंजूर केली नाहीं तरी ती जर आपणांस योग्य वाटत असेल तर करण्यास हरकत नाहीं, आपण ती गोष्ट जनरल मीटिंगमध्ये आपल्या स्वतःच्या मताच्या व आपल्याविषयीं चांगलें मत असणाऱ्यांच्या मतांच्या जोरावर सहज पास करूं असा मला विश्वास होता. गावांत त्या दोघां-वर विश्वास नसून माझ्यावरच विश्वास अधिक आहे ही जाणीव मला होती. त्यामुळें दोघां चालकांच्या विरोधाची कांहींच पर्वा न करतां मला काम चालू ठेवतां आलें.

## सप्टेंबर १९१८–सप्टेंबर १९१९

चालक मंडळीमध्यें पक्ष उत्पन्न होऊन लढे लागूं नयेत यासाठीं दुसऱ्या वर्षी (सप्टेंबर १९१८–सप्टेंबर १९१९) रा. फडके यांनीं एक युक्ति योजिली आणि त्या युक्तीचा उपयोगहि चांगला झाला. ती युक्ति म्हटली म्हणजे तिघा डिरेक्टरांच्या सभाच कमी करून टाकल्या आणि चार डिरेक्टरांच्या तर्फे नेहेमीची काम करण्यासाठीं कमेटी दोघांचीच नेमली. तीत डॉ. खरे व मी असे दोघे जण होतों. त्यामुळें पक्ष उत्पन्न होण्याचा संभवच टळला. जी गोष्ट दोघांच्यामध्यें एकमतानें ठरणार

नाहीं ती गोष्ट चौघांच्या बोर्डापुढें मांडावी असें ठरलें. त्यामुळे बहुतेक गोष्टी सोप्या झाल्या व चौघांच्या बोर्डापुढें फारच थोडे प्रश्न ठेवण्यांत आले. पुष्कळ प्रसंगीं आमचें एकमत होई तरी त्या प्रश्नावर ठराव सर्व बोर्डानें करावा अशी आमच्याकडून शिफारस जाऊन नंतर तो ठराव होई. याच वर्षांत मुख्य काम पुणें येथें करावे असें ठरलें आणि मिस् कोहन यांस हिंदुस्थानांत येण्यास आमंत्रण द्यावें हें देखील याच वर्षांत ठरलें. दोघांची सबकमेटी करावी हें तत्त्व फारच उपयुक्त ठरल्यामुळें तें शेवटपर्यंत पाळलें गेलें. पुणें येथें डिरेक्टर निवडले जात तरी देखील हें तत्त्व पाळलें जाई. चालू काम करणारी डायरेक्टरांची कमेटी दोघाजणांची असल्यामुळें काम देखील झटपट आटपे. पुणें येथें वर्किंग कमेटीमध्यें पहिलीं दोन वर्षें कै. दांडेकर व मी असे होतों, व नंतर रा. अच्युतराव भट व मी असे दोघे जण होतो.

दोघांच्या सबकमेटीचें तत्त्व त्या दोहोंमध्यें मी एक नेहमी असेतों- पर्यंत अत्यंत उपयुक्त ठरलें. पण जेव्हां मी पुण्यास आलों आणि नाग- पुरास डॉ. खेर. व रा. कठाळे यांचीच जेव्हां वर्किंग कमेटी बसूं लागली आणि ती बसण्यापूर्वी कांहीं उपद्व्यापी मंडळी रा. कठाळे यांस येऊन भेटत तेव्हां मात्र दोघांच्या वर्किंग कमेटीचें तत्त्व निरुपयोगीच केवळ नव्हे तर नुकसानकारक होऊं लागलें. पण ही नुकसानकारकवृत्ति १९२० च्या सप्टेंबरपर्यंत दृष्टीस पडली नाहीं.

१९१९ पर्यंत ज्ञानकोशाचें काम नागपुरासच चाललें होतें व तों पर्यंत बरेंचसें संपादकीय काम नागपुरास होऊन गेलें होतें. पुणें ऑफी- सचें काम चांगल्या प्रकारें चालत नव्हतें तरी देखील पुणें येथें ऑफीस आणण्याची आवश्यकता होती. संपादकीय कामाची एकंदर हकीगत पुढें येईलच.

डॉ. खेरे व रा. कठाळे हे डिरेक्टर १९१८ सालच्या सप्टेंबरमध्यें आले. आणि त्यानंतर कांहीं महिने म्हणजे सप्टेंबर १९१८ ते मे १९१९ पर्यंत त्यांच्याशीं आमचा निकट संबंध होता. आणि या वेळपर्यंत ज्ञानकोशाचें बरेंचसें कच्चें लिखित तयार झालें होतें पण जें दुसरें कांहीं महत्त्वाचें काम होतें तें नागपुरास होणें शक्य नव्हतें. यासाठीं मे १९१९ च्या अखेरीस ज्ञानकोशाचें सर्व संपादकीय काम पुण्यास आणणें अवश्य

झालें आणि पैसे पुरविण्याचें काम देखील मलाच करावें लागत असल्या-मुळें हिशोबखातें देखील पुण्यासच आणणे अवश्य झालें. या संबं-धाचा डायरेक्टरांचा ठराव ता. ३१।३।१९ रोजीं झालेला आहे.

---

प्रकरण ५ वें.

## पुणें येथील पहिलीं तीन वर्षे

## जून १९१९–२९ एप्रिल १९२०

पुणे येथें आगमन १ जून १९१९ रोजी झालें. येथें त्यावेळेस सर्व काम रा. रा. पांडुरंग महादेव बापट हे पहात होते. पुणें ऑफिस १।४।१९१८ रोजीं उघडलें तेव्हां तें प्रो. वैजनाथ काशीनाथ राजवाडे यांच्या नेतृत्वाखालीं उघडलें गेलें. प्रो. राजवाडे यांनीं काम ६।१२।१८ पर्यंत केलें. त्यानंतर कांहीं दिवस रा. रा. श्रीधर गोविंद काळे एम् ए. हे पुणे शाखेचे मुख्य काम पहात होते पण रा. काळे हे ३१।३।१९ तारखेस काम सोडून फलटण संस्थानच्या शिक्षण शाखेचे मुख्य अधिकारी झालें. पुढें रा. बापट हे पुणें ऑफिसचे मुख्य म्हणून काम पाहूं लागले.

## पुण्यास कचेरी कां आली

ज्ञानकोशाच्या रचनेचीं मुख्य अंगें दोन होतीं. एक जी माहिती जमा झाली आहे तिची शिस्तवार मांडणी करणें हें अंग होतें पण त्याबरो-बर जी माहिती कोठें पद्धतशीर मांडली गेली नाहीं ती मुद्दाम गोळा करून किंवा लागेल तें संशोधन करून मांडणें हेंहि दुसरें एक मह-त्त्वाचें अंग होतें.

वर सांगितलेल्या दोन क्रियांपैकीं पहिली क्रिया ऑफिस नागपूर येथें असतांच झाली. गॅझिटियर्स, एनसायक्लोपीडिया ब्रिटानिका व दुसरे इतर सायक्लोपीडियाज् यांतील अवतरणलेला भाग यांचे गोषवारे नागपुरासच तयार झाले. त्याप्रमाणेंच वॅट यांच्या हिंदुस्थानांतील व्यापारी वस्तूंच्या पुस्तकाचा गोषवारा हा देखील नागपुरासच तयार झाला. विंटर-निट्झच्या पुस्तकाचें भाषांतर लंडन येथें मिस् कोहन (सौ. शीलवती-बाई केतकर) या करीत होत्या आणि पहिल्या भागाचें भाषांतर जवळ.

जवळ पुरें झालें होतें. याशिवाय निरनिराळ्या लेखकांकडे लेख वांटून देणें, विभागसंपादक नेमणें, इत्यादि क्रिया नागपुरासच पुऱ्या झाल्या होत्या व बऱ्याच जणांकडून लेखहि तयार झाले होते. तथापि बरेचसें काम राहिलेंहि होतें. १।१२।१९१९ रोजीं सर्व कच्चें लिखित तयार व्हावें अशी योजना होती. पण १ मार्च १९१९च्या सुमारास सर्व कच्चें लिखित तयार होईल असा रंग दिसेना. वर्गणीदार व शेअरहोल्डर मिळून संख्या हजारावर गेली होती. बऱ्याच शास्त्रीय विषयांवर लेख तयार व्हावयाचे होते त्यांस लेखक मिळतना. या लेखकांचा वर्ग त्यावेळेस मुंबई पुण्याकडेसच होता. व यामुळें लवकर ऑफिस पुण्यास नेऊन उरलेलें कार्य लवकर वेगाने पार पाडावें आणि १।१२।१९१९ ला हस्तलिखित पुरे करावें असा मानस होता.

शिवाय असे होई की, नागपूर येथें कामाला कायमचीं माणसें मिळण्यास अडचण पडत होती. जे पदवीधर कामास लावावयाचे ते सर्व टर्म भरल्यानंतर एल्एल्. बी. होऊन जात. त्यामुळें तयार झालेलीं माणसें निघून जात व पुनः कच्चीं माणसें ऑफिसांत येत. अशा प्रसंगीं आम्हास कायमचा संपादकवर्ग तयार करणें ही अधिक महत्त्वाची व निकडीची गोष्ट आहे हें दिसून आलें; म्हणजे संपादकीय दृष्टीने नागपुराहून-मुख्य ऑफिस पुण्यास आणण्याचीं कारणें झाली ती.–

(१) तयार न झालेल्या मजकुराची जुळणी जोराने करणे.

(२) विशिष्ट प्रकारचा मजकूर–विशेषेकरून भारतीय पांडित्याचा मजकूर–तयार करण्यासाठी लेखकवर्ग मिळविणें.

(३) जो शास्त्रीय मजकूर तयार झाला नसेल त्याच्यासाठीं देखील मंडळी निवडून काम जोरान सुरू करणें.

नवीन मजकूर घालून, भाषा तपासून योग्य संक्षेप देऊन कच्च्या मजकुराचा पक्का मजकूर करण्यासाठी मराठी भाषा चांगली लिहू शकणारा लेखकवर्ग जुळविणें इ. कार्यें उद्दिष्ट होती.

पुण्यास ऑफीस आणण्याचे व्यवहारदृष्टीनें, तसेच संपादकीय दृष्टीनें फायदे दुसरेहि झाले आहेत, पण ते ऑफीस आणण्याचें ठरविले त्यावेळीं ठाऊक नव्हेत. ते मुख्य फायदे म्हटले म्हणजे मुद्रणाची व्यवस्था जुळविणें हा होय. दुसरा फायदा म्हटला म्हणजे जेव्हां ज्ञानकोशाला पैशाची

अडचण पडली तेव्हां पुण्यांतल्या पुण्यांतच जोरानें ग्राहक मिळविण्याचे काम करतां आलें आणि मुंबई जवळ असल्यामुळें मुंबईस वारंवार जाऊन जोरानें पैसा मिळवितां आला. त्यावेळचा वृत्तांत पुढे दिलेला आहे.

नागपूरहून मुख्य ऑफीस उठल्यामुळे कांही नुकसानहि झालें. ती नुकसानी म्हटली म्हणजे तेथील असंतुष्ट वर्गांत माझ्याविरुद्ध चळवळ करण्यास संधि मिळाली. जनरल मीटिंग नागपूरला होत व काम तर पुण्यास आलें. त्यामुळे असें होई कीं नागपूरच्या शेअरहोल्डरांच्या मनांत हवे तसे खोटे ग्रह पसरून देण्यास तेथील मंडळींना सोपें होई. व या संधीचा फायदा त्या मंडळींनीं चांगलाच घेतला. त्याची सर्व हकीगत पुढील भांडणाची हकीगत देतांना येईलच.

## प्रस्तावनाखंडाची योजना

पुण्यास मी असतां ताबडतोब मुद्रणास कांही तरी घ्यावे असा विचार माझ्या मनांत आला. व ज्ञानकोश छापावयाची वेळ येण्यापूर्वी थोडें उत्पन्न जास्त काढण्यासाठीं दोन मोठीं पुस्तकें प्रसिद्ध करावीं असें वाटलें. ९।८।१९१९ रोजीं डिरेक्टरांच्या सबकमेटीची सभा भरली होती आणि यावेळेस मी हजर नव्हतों व डॉ. खरे व कठाळे हे दोघेच हजर होते. त्या वेळेस वैदिक आणि बौद्धवाङ्मय यांची माहिती देणारे दोन नवीन भाग आधीं आजच छापावयास घ्यावेत असा मी जो विचार पुढें मांडला होता त्याची चर्चा झाली. यावेळेस हे दोन्ही विभाग ज्ञानकोशाच्या बाहेरचे म्हणून संकल्पित होते व वाङ्मयसूचि हा ज्याप्रमाणें निराळा ग्रंथ काढला तसच हे काढावेत असा इरादा होता. पण ही योजना पास झाली नाही व त्यावेळेस आम्ही याविषयी कांहींच ठराव करीत नाहीं, जो कांहीं ठराव करावयाचा असेल तो इतरांच्या सल्लयानेंच करावा असा ठराव केला होता. व असा ठराव त्यांनी केला हें चांगलें केलें. यानंतर आणि पुढची चौघांची बैठक भरण्यापूर्वी (२१-९-१९ पूर्वी) दोन भाग न करतां ज्ञानकोशाच्या आंतलेच भाग म्हणून प्रस्तावनाखंडाचे दोहोंच्या ऐवजीं पांच भाग काढावेत म्हणून मी योजना मांडली व पूर्वीच्या योजनेच्या ऐवजी ही नवीन योजना पत्करावी अशी विनंति केली व ही योजना त्या दिवशीं मंजूर झाली. याच दिवशीं कंपनीची वार्षिक सभा झाली.

## भांडवल एक लाख झालें

१९१९ सप्टेंबरमधली वार्षिक सभा नागपुरास भरली. त्यावेळेस कांही विशेष झालें नाहीं. सभा पांच मिनिटांतच पार पडली. सभेला चौघेहि डिरेक्टर हजर होते. सेक्रेटरी हजर होते, व पूर्वी ज्ञानकोशमंडळांत माझे सेक्रेटरी असलेले देशमुख हजर होते. म्हणजे सर्व मंडळी घरचीच. बाहेरचें कोणी तरी असावें म्हणून रस्त्यांतून जात असलेले प्रो. गर्दे यांस वर बोलावून आणले आणि ते देखाल वर सभा आहे हें ठाऊक असतें तर आले असते कीं नाहीं हें सांगतां येत नाहीं. सभा पांच मिनिटांत पार पडली. ब्यालेन्सशीट पांच मिनिटांत पास झाला. जादा डिरेक्टर व आडिटर यांची निवडणूक म्हणजे पूर्वीच्यास कायम करणें झालें आणि कंपनीचें भांडवल एक लाखाचें करण्यांत आलें. माझें स्थानांतर झाल्यानंतरची नागपुरास झालेली ही पहिली सभा आहे.

## "मिस् कोहन" उर्फ मिसेस केतकर

ज्ञानकोशाच्या इतिहासांत यानंतरची महत्त्वाची गोष्ट म्हटली म्हणजे मिस कोहन यांचें आगमन होय. हें १९।१२।१९ रोजीं झालें. त्यानंतर त्यांचें रीतीप्रमाणें कामहि झालें. त्या कामाची संपूर्ण हकीगत पुढें परिशिष्टांत दिली आहे. मिस कोहन आणि त्यांचा व्रात्यसम्तोम आणि त्यानंतर त्यांच्याशीं माझें लग्न या सर्व गोष्टी त्यावेळेस वर्तमानपत्रांतील चर्चेचा विषय झाला होता, आणि त्यावेळेस सर्व गोष्टी करतांना जुनें धर्मशास्त्र आणि वैदिक विधि यांचा आश्रय केला होता म्हणून या गोष्टींचें लोकांस कौतुक वाटत होतें. अत्यंत नवीन गोष्टी करतांना देखील त्या गोष्टी वैदिक धर्माचेंच उपबृंहण करून करतां येतात या एका गोष्टीमुळें बऱ्याच लोकांस हें लग्न कौतुकाचें वाटलें तर कांहीं सुधारक मंडळीस तें वाईट वाटलें. मनोरंजनकारांनीं मिस कोहन यांनीं हिंदु होऊन हिंदु कायद्याप्रमाणें लग्न केलें ही मोठी चुकीची गोष्ट केली असे विचार प्रदर्शित केले. त्यांनां असें वाटलें कीं, जर जुना श्रौतस्मार्तसंप्रदायच जर सर्व प्रकारच्या नव्या गोष्टींना क्षेत्र उत्पन्न करून देऊं शकतो तर "ब्राह्मो" संप्रदाय व सिव्हिल म्यारेज आक्ट हे अनावश्यक ठरतील. त्याच प्रमाणें हिंदु मिशनरी सोसायटीनें देखील व्रात्यस्तोमावर टीका केली. कै. गजाननरावांनां असें वाटे की जर जुन्या वैदिक ग्रंथांतूनच परकीयांस

हिंदु करण्याचे विधी बाहेर पडूं लागले तर आमच्या नवीन विधींस कोण विचारतो. आणि अहिंदूस हिंदू करण्याच्या कामांत आपलें पुढारीपण ब्राह्मण हिसकावून घेणार. ज्ञानकोशमंडळाच्या भागीदारांपैकीं चळवळया व्यक्तीस ही एक तऱ्हेची उत्पन्न झालेली लोकप्रियता आवडली नाहीं. त्यांनां असें वाटूं लागलें कीं जी कांहीं मंडळी या लग्नाला खरोखर विरुद्ध असतील आणि ज्ञानकोशमंडळापाशीं वैदिक ज्ञानाचा अगडबंब सांठा आहे त्यास भिऊन चूप बसले असतील अशी मंडळी डॉ. केतकर यांच्याविरुद्ध करण्यास ही सधि बरी आहे. म्हणून त्यांनी अशी शंका उपस्थित केली कीं डॉ. केतकर यांनी आपल्या बायकोच्या येण्याचा खर्च कंपनीवर पाडला आणि तिला काम देऊन आपलीच धन करावयास सुरवात केली आहे. पुढें वार्षिक सभेच्या वेळीं असेंहि उठविलें कीं डॉ. केतकरांनीं पुण्यास आफीस नेले हें डिरेक्टरांच्या परवानगीशिवाय नेलें. व मिस कोहन यांनां काम दिलें त्यांत देखील कोणाची परवानगी घेतली नव्हती इत्यादि. यासाठीं या संबंधाची सर्व हकीगत देणें अवश्य आहे.

या सभेनंतर प्रस्तावनाखंड छापण्याची तयारी करण्यास लवकरच सुरवात झाली; आणि त्यावेळेसच माझा श्रौत संस्थांचा अभ्यास जोरानें चालू होता. या अभ्यासाचा प्रारंभ जुलैपासूनच चालू होता व नोव्हेंबर १९ पर्यंत यजुर्वेदाच्या अभ्यासांत मदत करण्यासाठी वै. अणंभट अभ्यंकर यांस दिलेले सुमारें १०० रुपये या कालांतच खर्च झालेले आहेत. रा. दातार यांची नेमणूक आगस्टमध्येंच झालेली आहे. प्रस्तावनाखंडाच्या मुद्रणास निर्णयसागरनें सुरवात करण्यापूर्वी आमच्याकडून आगाऊ रक्कम म्हणून २९०० रुपये घेतली होती. ती १८।१२।१९ रोजीं खर्ची पडली आहे.

ज्ञानकोशमंडळाच्या कारभारांतील ज्या गोष्टींविषयीं कांहीं लोकांनीं आक्षेप घेऊन चळवळ उत्पन्न केली आणि मजवर शितोडे टाकण्याचा प्रयत्न केला अशी गोष्ट म्हटली म्हणजे मिस् कोहन यांची नेमणूक आणि त्यांस येण्यासाठीं ज्ञानकोशमंडळाने जें भाडें दिलें त्यासंबंधाची होय. ह्या गोष्टीसंबंधानें स्पष्ट खुलासा करावयाचा झाल्यास मला माझ्या आयुष्यक्रमांतील कांहीं खासगी गोष्टी स्पष्ट कराव्या लागतील. तथापि ज्ञानकोशमंडळाचे पैसे मी मंजुरीशिवाय खर्च केले असा जर कित्येकांचा समज होईल तर तो दूर करण्यासाठीं मी सविस्तर हकीगत येथें

देतों. यासंबंधानें प्रसिद्धपणें कोणी आक्षेप घेतला नाहीं त्यामुळें उत्तर प्रसिद्ध करण्याची देखील जरूरी नव्हती. ज्यांनीं जनरल मीटिंगमध्यें प्रश्न विचारला त्यांनां अध्यक्षांनींच उत्तर दिलें कीं, चालकांच्या संमतीनेंच मिसेस केतकर यांचा येण्याचा खर्च डॉ. केतकर यांच्या संमतीनें दिला. याविषयीं शंका रा. पाध्ये यांनीं उपस्थित केली होती पण मिस् कोहन यांनां काम करण्यासाठीं आम्हीं ज्ञानकोशांत बोलावणार आहोंत ही गोष्ट रा. पाध्ये हे ज्ञानकोशाचे शासनाध्यक्ष असतांच प्रसिद्ध झाली आहे. रा. पाध्ये यांनीं मिस् कोहन यांस काम पहिल्याप्रथमच कां दिलें वगैरे प्रश्न भाडणाच्या वेळेस उपस्थित केले. पण जेव्हां ३१ मार्च १९१७ रोजीं चालक मंडळापुढें मी एकदर ज्ञानकोशाची योजना मांडली त्या योजनेंतच नवव्या परिच्छेदांत मिस् कोहन यांस काम दिलें याचा उल्लेख आहे आणि ती योजना त्यावेळच्या चालक मंडळानें पास केली आहे. यानंतर ११।१०।१७ रोजीं एक पत्रक तयार केलें तें पत्रक रा. पाध्ये यांच्या सहकार्यानें तयार केलें, तें रा. पाध्ये यांच्या छापखान्यांत छापलें गेलें व त्यावर रा. पाध्ये यांचें नांव आहे आणि त्या पत्रकाचीं मुद्रितें डिरेक्टरांमध्यें अगोदर पाठवून ३१।१०।१७ च्या सभेंत चर्चा करून पास केलीं व नंतर तें पत्रक छापून प्रसिद्ध केलें. डिरेक्टरांच्या सभेंत तें पास झाल्याचा उल्लेख प्रोसीडिंग बुकांत आहे. हें पत्रक मुद्दाम पास करण्यांत आलें त्याचें कारण ज्ञानकोशाचे व्यावहारिक धोरण त्यांत स्पष्टपणें मांडले होतें व ज्ञानकोशाचें वर्गणीदार होणें लांबणीवर टाकलें असतां दर सहा महिन्यास किंमती काय होतील याचें कोष्टक दिले होते. ज्ञानकोशविक्रीसाठीं प्रसिद्ध केलेली जाहिरात ही पहिलीच होती. त्या जाहिरातीमध्यें एक परिच्छेद खालीलप्रमाणें आहे.

सध्यां आमचें क्षेत्र अत्यंत नियमित असल्यामुळें फारच थोड्या जर्मन ग्रंथांचा आम्हांस उपयोग करून घेतां येत आहे. प्रथमतः जर्मन ग्रंथांचें व लेखांचें इंग्रजी रूपांतर करावें लागतें व नंतर त्याचा ग्राह्य भाग शोधून मराठींत घ्यावा लागतो. जर्मन ग्रंथाचें इंग्रजी रूपांतर करण्याचें काम मिस् ईडिथ व्हिक्टोरिया कोहन यांनीं अत्यंत अल्प मोबदला घेऊन करण्याचें पत्करलें आहे. मिस् कोहन या सेंट आंड्रयूस युनिव्हर्सिटी(स्कॉटलंड)च्या पदवीधर असून 'कंप्यारेटिव्ह रिलिजन्स' मध्यें त्यांनीं

"ऑनर्स" मिळविले आहेत. त्यांचा अभ्यास येना (Jena) वगैरे जर्मन युनिव्हर्सिट्यांतूनहि झाला आहे आणि फ्रेंच व डच या भाषांशीं चांगला परिचय आहे. यांस धाकटया भगिनीचें (या लंडन युनिव्हर्सिटीच्या बी. ए. आहेत) साह्य आहे. येथें संपादकमंडळांत येऊन काम करणें शक्य झाल्यास यावयाचें असा त्यांचा विचार आहे.

यानंतर ३१।३।१९ रोजीं जी डिरेक्टरांच्या सबकमेटीची बैठक झाली तींत असा ठराव पास झाला कीं, मिस् ईडिथ व्ही कोहन यांचा दर्जा केवळ भाषांतरकार म्हणून आहे त्याच्या ऐवजी ज्ञानकोशमंडळाच्या लंडन येथील प्रतिनिधि म्हणून दर्जा करावा व त्यांचे अधिकार, म्यानेजर जे अधिकार लेखी देतील तेवढयापुरतेच असावेत. आणि या कामाबद्दल त्यांस जो मोबदला द्यावयाचा त्याचा मसुदा डिरेक्टरांपुढें मांडावा.

या तऱ्हेचा ठराव करण्याचें कारण झालें होतें तें येणेंप्रमाणें:—फ्रेंच व जर्मन पुस्तकांसंबंधानें जें काम करून पाहिजे होतें तें सर्व एकटीच्या हातून त्या केवळ फुरसुतीच्या वेळांत काम करीत असतां होणें शक्य नव्हतें. व फ्रेंच व जर्मन भाषेतील साहित्य चांगल्या तऱ्हेनें वापरण्यासाठीं प्रथम दुसरी कांहीं तरी योजना करावी म्हणून प्रयत्न केला व रा. रा. नारायण सदाशिव मराठे यांची नेमणूकहि केली होती पण त्यांच्याकडून काम निभेना. त्यानीं कांहीं पुस्तकांची यादी केली व हें काम करण्यास शेंसवाशें रुपये पगार खर्ची पडला, व ते पुढें नोकरी सोडून गेले त्यामुळें तें काम फुकटच गेलें. मिस् कोहन यांचें तेवढें काम उपयुक्त झालें. तेव्हां इंग्लंडमध्यें गोषवारे व भाषांतरें यांचें काम करवून घ्यावें असें ठरलें. त्यानंतर २९।४।१९ रोजीं डिरेक्टरांच्या सबकमेटीचा असा ठराव झाला आहे कीं "मिस ईडिथ व्ही कोहन यांस संपादकांचे जर्मन व फ्रेंच भाषेंतील मदतनीस म्हणून सहा महिन्यांसाठीं बोलवावें. आणि यासंबंधाचा आगाऊ ठराव सर्व डायरेक्टरांच्या बोर्डापुढें ठेवावा. तो ठराव असा कीं, मिस् कोहन यांस ६ महिन्याकरतां बोलवावें त्यांचा पगार २०० पासून ३०० रुपये पर्यंत असावा आणि मिस् कोहन यांस जाण्यायेण्याचा खर्च द्यावा. ही शिफारस करतांना मिस् कोहन यांचें पूर्वीचें सर्व काम आणि उपयुक्तता कळविणारी एक नोट तयार करून पाठवावी.

या ठरावाप्रमाणें एक नोट तयार करून पाठविली व १६ जून १९१९ रोजीं डिरेक्टरांची जी बैठक झाली तींत या संबंधानें चर्चा करतांना रा. फडके यांनीं असें सांगितलें कीं डायरेक्टर कोणाहि व्यक्तीची अलीकडे नेमणूक करीत नाहींत. ती जबाबदारी संपादकांवरच ठेवावी आणि डिरेक्टरनीं केवळ रक्कम मंजूर करण्याचे अंगावर घ्यावें असें धोरण ठरलें आहे तर आम्ही फक्त रक्कम मंजूर करतों. मिस कोहन यांच्या योग्यायोग्यतेचा प्रश्न संपादकांनीं आपल्या जबाबदारीवरच सोडवावा असें म्हणून जादा खर्चासाठीं २००० रुपये मंजूर केले.

सप्टेंबर १९१९ ते सप्टेंबर १९२० या वर्षांत ज्या डिरेक्टरांच्या पांच सभा झाल्या त्यांत पहिली सभा जनरल मीटिंगच्या दिवशींच झाली व तींत नवीन भांडवल वाढविलें त्याच्या शेअरचे हप्ते कसे काय करावेत हें ठरविलें. दुसरी सभा (हजर फक्त कठाळे व खरे) २०।२।२० रोजीं झाली. या सभेंत महत्त्वाचे कांहींच ठरलें नाहीं. तिसरी सभा ७।३।२० रोजीं झाली. या सभेस खरे, कठाळे व मी तिघेहि हजर होतों, महत्त्वाचें कांहीं झालें नाहीं. एकंदर प्रगति कशी झाली आहे याची बरीच तोंडी माहिती डिरेक्टरांनां देण्याचाच या सभेचा उद्देश होता. पुढची सभा २०।६।२० रोजी झाली. या सभेंत रा. दाते यांस ३०० रुपये व रा. टिळक यांस २०० रुपये बोनस म्हणून द्यावे असें ठरलें. मिसेस केतकर यांचा राजीनामा मंजूर करून त्यांस ३० जून पासून नोकरींतून मोकळें करावें असें ठरलें. व माझा पगार तीनशेंच्या ऐवजीं सवाचारशें करण्यांत आला. २०।७।२० रोजीं पुढची सभा भरली. त्या सभेंत कंपनीनें विंटरनिझ्सचें भाषांतर प्रसिद्ध करूं नये, मिसेस केतकर प्रसिद्ध करीत असतील तर त्यांस पहिली आवृत्ति प्रसिद्ध करूं द्यावी आणि मिसेस केतकर यांनां पहिल्या आवृत्तीबद्दल काय द्याल म्हणून विचारण्यांत यावें इत्यादि गोष्टी ठरल्या. या ठरावांतीलच पुढचें वाक्य गाळून अर्धा ठराव छापून ज्ञानकोशमंडळानें विंटरनिट्झचें पुस्तक छापण्याचा अधिकार मिसेस केतकर यांस डिरेक्टरांनीं फाजील उदारपणा दाखवून बहाल केला आहे असें म्हटलें आहे. हा ठराव माझ्या गैरहजेरींत झाला.

या कालांत संपादकीय काम जें झालें त्यांत मुद्रणासाठीं कांहीं मजकूर तयार करण्याचें झालें. माझा स्वतःचा बराचसा वेळ वैदिक अभ्यासांतच जात होता. याच काळांत एका सुशिक्षित ठगाची जबानी म्हणून

माझ्यावर शितोडे टाकण्यासाठी एक गोष्ट उद्यमांत प्रसिद्ध केली. तीमुळें कांहीं डिरेक्टर चिडून जाऊन रा. पाध्ये यांवर फौजदारी खटला भरा म्हणून मला त्यांनीं पत्रे व तारा केल्या पण त्याकडे अगदी दुर्लक्ष करण्याचें ठरविलें.

नोव्हेंबरमध्यें पुस्तक छापणें सुरू होतें तें १९२० च्या सभेपर्यंत चालूच होतें. त्यावेळेस जें मंदगतीने काम चालू होतें त्यामुळें मी त्रासून स्वतःचा छापखाना काढावा यासंबंधाचा विचार करीत होतों. निर्णयसागरमध्यें पुस्तक छापणें चालू असता रा. बापट किंवा रा. दाते यांपैकीं कोणी तरी मुंबईस असेच आणि मुंबईस काम चालू असल्यामुळें खर्च बराचसा जास्त होई. आम्ही हा खर्च केला याचें कारण आमचें काम निर्णयसागर मार्फतच व्हावें ही इच्छा होती पण त्यांची त्या संबंधानें तीव्रता नव्हती. पहिला भाग नोव्हेंबरमध्यें छापावयास गेला आणि त्याची पहिली प्रत आम्हांस २।२।२१ रोजी वाचकांच्या हातीं देतां आली. म्हणजे हे काम करण्याकरतां निर्णयसागरनें १४ महिने घेतले.

तिसरी साधारण सभा १९२० च्या सप्टेंबर महिन्यांत झाली पण तींत काम न आटपल्यामुळें ती पुढें ढकलली गेली व तीनंतर पुढें डिसेंबर महिन्यांत सभा भरणार होती पण ती फेब्रुआरी महिन्यांत भरली गेली. माझें व रा. पाध्ये यांचें भांडण होऊन कांहीं वेळ माझा पराभव आणि शेवटीं माझा विजय इत्यादि गोष्टी झाल्या. ज्ञानकोशमंडळ देखील भांडणें करण्यांत पूर्ण महाराष्ट्रीय आहे असे लोकांनां वाटलें.

तिसरी साधारण शेअरहोल्डरांची सभा २६।९।२० रोजी झाली. या सभेच्या वेळीं मंडळींनीं कांहीं प्रश्नांबद्दल माहिती मागितली तेव्हां ती देण्यासाठीं डायरेक्टरांचें प्रोसीडिंग बुक नव्हतें; तें कोर्टांत होतें व कंपनीची खातेवही देखील तेथें नव्हती तेव्हां कांहीं शेअरहोल्डरांनीं इच्छा प्रदर्शित केली कीं, आजच्या सभेंत ब्यालेन्सशीट पास करूं नये व हिशोब पहाण्याची आम्हांस संधि देऊन पास करावा. डॉ. खरे यांस त्यांत कांहीं कावा न वाटल्यामुळें त्यांनीं त्यास आपली संमति दिली व सभा तहकूब झाली. आणि पुढें सभा २४।१०।२० रोजीं भरली त्या दिवशीं रा. पाध्ये यांनीं एक लांबलचक ठराव आणला. तो ठरावच साठ सत्तर ओळींचा, अशुद्ध वाक्यांचा आणि अनेक आरोप गर्भित करणारा आणि अनेक खोटीं विधानें केलेला होता. तो ठराव मुळींच

विचारांत घेतला नाहीं. त्या दिवशीं असाहि एक आक्षेप आणला गेला कीं, हिशोब पहाण्यास वेळ अपुरी होती. तेव्हां अध्यक्षांनीं (डॉ. खरे यांनीं) सभा तहकूब केली आणि आक्षेपकांची एक कमेटी हिशोब पाहून तक्रार मांडण्यास नेमली. आणि त्या कमेटीनें ता. ५ डिसेंबरच्या आंत आपला रिपोर्ट पाठवावा असा हुकूम दिला. या सभेच्या दिवशीं रा. पाध्ये यांनीं अशी एक नोटीस दिली कीं, मी डिरेक्टरचे अधिकार पुन्हां घेऊं इच्छितों तेव्हां त्या सभेनंतर भरलेल्या डिरेक्टरांच्या सभेनें असें ठरविलें कीं, कोर्टांतील प्रोसीडिंग बुक आल्यानंतर पाध्ये यांच्या प्रश्नाचा विचार करावा.

दुसरी तहकूब सभा ता. १९ डिसेंबर रोजीं भरावयाची होती पण ती नागपुरास न बोलावतां मी पुण्यास बोलविली आणि याचें कारण मधल्या वेळांत आपणास जणूं काय कंपनीचा व्यवहार पाहून शेअर होल्डरांकडे रिपोर्ट पाठविण्याचा अधिकार मिळाला आहे असा बहाणा करून एक पाध्ये मंडळींनीं अहवाल तयार केला. तो सर्व अहवाल पुढे परिशिष्टांत दिला आहे व त्याला उत्तरेंहि तेथेंच दिलीं आहेत (परिशिष्ट १२ ते १४, पृष्ठ ५७–८० पहा). या अहवालाचा हेतु स्वतःस मते मिळविण्याचा होता. तेव्हां असा, आपणास भलतेच अधिकार आहेत असें सांगून खोटा अहवाल पाठवून मिळविलेलीं मतें निरुपयोगी करावीं एवढेंच काम मला करावयाचे होतें. पण मी तें न करतां पुण्यास सभा बोलावली. त्या सभेत ब्यालेन्सशीट पास करून घेतला नाहीं. व त्या सभेंत कांहीं एक काम करावयाचें नाहीं असें ठरविलें. इकडे नागपूरच्या मंडळीनी अध्यक्षांच्या संमतीनें सभा नागपुरास बोलावली व या सभेची मंडळीनां नोटीस गेली नाहीं म्हणून दुसरी तारीख नेमली. तेव्हां तिसरी तहकूब सभा २० फेब्रुवारी रोजी बोलवावी एवढाच ठराव त्या सभेंत पास झाला आणि तिसरी तहकूब सभा २० फेब्रुवारी रोजीं भरली.

तिसऱ्या तहकूब सभेच्या अगोदर रा. पाध्ये यानीं एका ठरावची नोटीस दिली. तो ठराव म्हटला म्हणजे ज्ञानकोशाच्या संपादकाचें काम आणि व्यवस्थापकाचें काम हीं दोन्ही कामें डॉ. केतकर करीत आहेत तर हीं दोन्हीं कामें निराळीं करावीं. या नोटिशीची माहिती मला सभेच्या अगोदर सात आठ दिवस कळली. या तऱ्हेचा ठराव कायदेशीर तऱ्हेनें आणतां येणें शक्यच नव्हतें. कां कीं तहकूब सभेंत पूर्वीच्या सभेंत उरलेलें तेवढेंच काम घेतां येतें, नवें काम घेतां येत नाहीं असें

कंपनीच्या कायद्याच्या टेबल ए. मध्यें म्हणजे आमच्या कंपनीच्या आर्टिकल्स मध्येंच आहे. तथापि या रा. पाध्ये यांच्या नोटिसीचा मला फायदा करून घेतां आला. अशी कामाची विभागणी झाली आणि कंपनीस योग्य म्यानेजर मिळाला नाहीं तर कंपनीस पैशाचा पुरवठा होणार नाही तर त्या ठरावाविरुद्ध मला भांडतां यावें म्हणून आपण मला प्राक्झी पाठवावी असे मला लोकांनां लिहितां आलें आणि त्यामुळें सुमार साठ प्राक्झी मला मिळाल्या. व यामुळे माझे हात जे अधिक बळकट झाले ते पाध्ये यांच्या न घेतां येण्यायोग्या ठरावामुळेच झाले.

या सभेच्या अगोदर रा. पाध्ये यांनीं एक पत्रक काढलें होतें. त्यांत त्यांनी डिरेक्टरला छपाईचे काम घेतां यावें अशी सूचना मांडली होती व आपण डिरेक्टर जणूं आहोंतच पण केवळ सध्यां त्रयस्थपणे वागत असल्यामुळें डिरेक्टरांमध्यें बसत नाहीं; असे भासविले होते.

## रा. गणपतराव लोथे यांची महत्त्वाकांक्षा

नागपुरास गणपतराव लोथे म्हणून एक रिटायर्ड ई. ए. सी. (डेप्युटी कलेक्टर) आहेत. हे बी. ए. बी. एल्. झालेले आहेत. यांनां मध्येंच इच्छा झाली कीं ज्ञानकोशाचे म्यानेजर आपण व्हावें. आणि हे देखील माझ्याविरुद्ध चळवळीत होते. आणि तहकूब सभा पुण्यास बोलावली तेव्हां यांनीं मला एक संतापून पत्र लिहिलें होतें. मी जेव्हां नागपुरास गेलो होतों तेव्हां कांहीं मंडळींनीं म्यानेजर आणि एडीटर या कामाची विभागणी केली तर कसें होईल म्हणून विचारलें; तेव्हां मी सांगितलें की म्यानेजरचें काम करण्याला मनुष्य लायक मिळेल तर तो हवा आहे. आणि त्याच्यायोगाने मला स्वास्थ्य चांगलेंच मिळेल. असें जेव्हां मी सांगितलें तेव्हां त्यांनीं लोथ्यांचें नांव सुचविलें. तेव्हां लोथ्यांच्या पत्रामागें आणखी कांहीं आहे असें वाटलें. आणि पुढें फेब्रुवारीमध्यें सभा भरली त्या सभेला सर्वांनीं यावें म्हणून लोथे यांचीं छापील कार्डेहि गेलीं होतीं. रा. लोथे यांनीं ज्ञानकोशाचे म्यानेजर व्हावें हें मला मुळींच पसंत नव्हतें; व याचें कारण शिव्यांचें पत्र नव्हतें. कारण मनुष्य लायक असता तर शिव्यांचे पत्र मी मुळीच विसरून गेलों असतो. पण म्यानेजरचे काम यांच्याकडून होईल हे शक्य नव्हतें. व ज्या कामास जो मनुष्य लायक नाही तो अधिकारावर येऊन बसला तर त्यापासून उपद्रव मात्र जास्त होतो. लोथे हे नापसंत असण्याचें

मुख्य कारण म्यानेजरचें काम करावयास जी तडफ लागते तिचा त्यांच्यांत अभाव होय. म्यानेजरचें काम म्हणजे पुष्कळ लोकांची अशी समजूत आहे कीं दुसऱ्याच्या कामाकडे लक्ष ठेवणें आणि त्यास काम नीट करीत जा म्हणून सांगणें, मिनिटबुकें बरोबर लिहिलीं गेलीं आहेत किंवा नाहीं वगैरे पहाणे इत्यादि. पण म्यानेजरचें काम त्याहूनहि निराळें आहे. तें काम म्हटलें म्हणजे पैसा मिळवणें हें होय. मग तो पैसा ते स्वत: जाऊन मिळवोत किंवा एजंटांमार्फत मिळवोत. तथापि ही कामाची जाणीव ज्याला नाहीं असला मनुष्य काय कामाचा ? त्यांतल्यात्यांत रा. लोथे यांच्यापाशी धडाडी मुळींच नव्हती. त्यांना कांहीं मित्र होते त्यांनी पुनर्विवाह केला असल्यामुळें "सात पुनर्विवाहांच्या धनतोलींत" त्यांच्यातर्फे मत द्यावयासहि कांहीं माणसें मिळालीं असतीं. पण त्यांनां पैसे मिळविण्याचा कांही एक अनुभव नव्हता. मीटिंगच्या दिवशीं कांहीं मंडळींनी रा. लोथे यांचें नांवहि सुचविले पण मी त्याकडे दुर्लक्षच केले.

## सभेच्या दिवसाची सकाळ

त्या सकाळीं प्रत्येक बाजूला प्राक्झी किती मिळाल्या आहेत त्याची मोजदाद झाली. माधवराव पाध्ये यांस शंभराच्यावर प्राक्झी मिळाल्या होत्या. त्यामुळें ते जोरांत होते आणि आपण जिंकूं असें त्यांस वाटत होतें. पण ती आशा व्यर्थ ठरली. कारण त्यांनां फक्त पैशाचा भरणा करण्याचें चुकवूं इच्छिणाऱ्या मंडळींनीं प्राक्झी दिल्या होत्या. ज्या लोकांनीं हप्ते भरले नाहींत म्हणून मी त्यांस तुमचे पैसे कोर्टा-मार्फत वसूल करावे लागतील अशा अर्थाचीं पत्रें पाठविलीं होतीं त्या लोकांनीं माझ्याविरुद्ध चळवळ करणाऱ्या पाध्यांस प्राक्झी दिल्या. पण त्या प्राक्झी निरुपयोगी ठरल्या. कारण ज्यांनीं पैसे भरले नसतील त्यांस मत नसतें. रा. पाध्ये यांच्यापाशीं १०४ पैकीं कायत्या ३२ प्राक्झी शिल्लक राहिल्या. आणि त्यांपैकीं दहा प्राक्झी भंडाऱ्याच्या (रा. जकात-दार यांच्या वजनाने मिळालेल्या) होत्या. त्या दिवशी एकदर हिशोब होतां मला ४९ प्राक्झी जास्त होत्या असे दिसून आले. शिवाय मी कांहीं प्राक्झी अध्यक्ष खरे यांच्या नांवाने मिळविल्या होत्या त्या सुमारे वीस होत्या. रा. पाध्ये यांनां माझ्याविरुद्ध यश पावण्याचा बिलकुल

संभव नव्हता. तेव्हां रा. जकातदार म्हणाले कीं, कांहीं तडजोड करतां येणार नाही काय ? मी त्यांस म्हटलें कीं तडजोडीची गोष्ट कशाला करता ? तुम्हाला काय पाहिजे आहे तें सांगा, तें कबूल करण्यासारखें असेल तर तें मी आनंदानें करीन.

प्राक्झीची तपासणी डॉ. खेर व रा. कठाळे यांनीं केली. त्यावेळेस प्राक्झीचे तपासणीस रा. पाध्ये व मी शिवाय रा. तांबे, रा. ग. ना. टिळक रा. जकातदार, कै. कर्णिक रिटायर्ड पोलीस इन्स्पेक्टर इत्यादि मंडळी होती. त्यावेळी कांहीं प्राक्झी खऱ्या धरण्यासाठीं ज्या प्राक्झीवर तिकिट नसेल त्यांनां मागाहून तिकिट लावून खऱ्या धरतां येतील असा शास्त्रार्थ रा. कठाळे यांनीं सांगितला. त्यामुळें पाध्यांच्या कांहीं प्राक्झी खऱ्या झाल्या. नाही तर त्या याहूनहि कमी भरल्या असत्या.

दुपारी आजच्या सभेंत बरीच मौज होणार म्हणून अडतीस मंडळी सभेला आली होती. इतकी मंडळी ज्ञानकोशाच्या वार्षिक सभेस कधींच जमली नव्हती. सभेच्या अगोदर रा. जकातदार आले आणि म्हणाले कीं, "आमच्या म्हणण्याला आपण कांहींच मान देत नाहीं काय?" त्यांची भाषा याप्रमाणें जेव्हां निराळी आली तेव्हां मी त्यांस म्हटलें की, "तुमची काय इच्छा आहे?" ते म्हणाले "रा. पाध्ये यांनीं डिरेक्टर व्हावें." "मी म्हटलें कबूल! जादा चालक म्हणून त्यांचा स्वीकार करावयाला कोणतीच हरकत नाहीं." ते म्हणाले की, "त्यांनीं कायम चालक व्हावें." मी म्हटलें कीं, कायद्यानें तसें कसें करतां येईल. ते म्हणाले "कायद्याचें आम्ही पाहून घेऊं, तुमची कांहीं हरकत नाहीं ना?" तेव्हां मी म्हटलें "माझी हरकत नाहीं." तेव्हां ते म्हणाले की, "तुम्हाला सर्व अधिकार कशासाठीं पाहिजेत" मी म्हटलें "मला कोणतेच अधिकार नकोत, तुम्हाला दुसरा एडिटर पाहिजे आहे काय? तसा नेमा; माझी हरकत नाहीं." तेव्हां ते म्हणाले की, "एडिटर तुम्हीच रहावें पण म्यानेजर तुम्ही कशास रहावयास पाहिजे?" तेव्हा मी म्हटले की, "म्यानेजरचें काम जास्त कठिण आहे, जर लायक मनुष्य मिळाला तर म्यानेजरचे काम सोडावयास मी एका पायावर तयार आहे पण लायक मनुष्य आणा." इतक्यांत कोणी लेल्यांचें नांव सुचविलें. तेव्हां मी लायक म्यानेजर आणा हें वाक्य पुन्हां उच्चारलें आणि लायक शब्दावर जोर दिला. तेव्हां रा. जकातदार म्हणाले कीं,

"तुम्हांस आपल्या शेअरहोल्डरांत कोणी लायक मनुष्य दिसतो काय?" मी त्यांस उत्तर दिलें कीं "तुम्हीच लायक दिसतां, तुम्ही हें काम पत्करतां काय?" तेव्हां जकातदारांनीं हें काम पत्करतों म्हणून सांगितलें.तेव्हां मी त्यास म्हटलें. कीं"तुम्हीं पत्करीत असल्यास मी आनंदानें देतों" मग पुढें त्यानी "बिझिनेस ऑफीस नागपूरला ठेवावयास आपण तयार आहां काय?"म्हणून विचारलें तेव्हां मी म्हटलें कीं"काम तुमचें आहे. तुम्हाला वाटेल तेथें ऑफीस घ्या" तेव्हां बिझिनेस ऑफीस नागपूरला असावें याला मी संमति दिली. मग जकातदार म्हणाले कीं "आतां एक प्रश्न मिसेस केतकर यांच्या भाड्याचाच आहे तर तेंहि सोडावें म्हणजे आम्हाला आनंद होईल."तेव्हां मी ती गोष्ट कबूल केली. मी त्यांनां म्हटलें कीं" जर तुम्ही प्राक्टिस सोडून ज्ञानकोशाच्या म्यानेजरचें काम करावयास तयार आहांत तर मी साताठशें रुपयांचे नुकसान सोसावयास तयार आहें."

पुढे या सर्व गोष्टी सभेंत ठरल्या. मिसेस केतकर यांचें भाडें पुन्हां परत घेणें ही गोष्ट कंपनीच्या इभ्रतीला मुळीच शोभण्यासारखी नाहीं म्हणून डॉ. चोळकर यांनीं हरकत घेतली पण पुढें ती हरकत डॉ. केतकर यांची संमति आहे तर आपण हरकत घेऊं नये असें सांगितल्यावरून त्यानीं आपली हरकत परत घेतली. तथापि रा. रा. गोविंदराव बिवलकर व माधवराव प्रधान यांनीं आपली हरकत व्यक्त केली तेव्हां तेवढी गोष्ट बहुमतानें पास झाली व इतर ठराव एक मतानें पास झाले.

जनरल मीटिंग आटपली पण तेवढ्यानें भानगड संपली नाहीं. माधवराव पाध्ये यांची नेमणूक गैरकायदा होती. व रा. जकातदार हे काम करण्यास मुळीच तयार नव्हते. कामाची प्रथम ओळख होण्यास.ठीं त्यांनीं कांहीं दिवस काम शिकलें पाहिजे हें त्यांस सांगितलें होतें व त्यांस तें मान्यहि होतें. ही वेळ वकीलांनीं वकीली सोडावी या तत्त्वाच्या पुरस्काराची होती. व रा. जकातदार हे देखील आपण वकीली सोडून कामाला येतों म्हणून बोलत होते. रा. जकातदार यांस आपण डॉ. केतकर यांस आपलें म्हणणें कबूल करावयास लावलें म्हणून आनंद वाटत होता तर रा. जकातदार यांच्यासारख्या मनुष्याला मी पकडलें म्हणून मला आनंद वाटत होता. रा. जकातदार हे धडाडीचे गृहस्थ म्हणून मी त्यांस ओळखीत होतों. आणि त्यांस मी ९०० रुपये

पगार करावा म्हणून इतर डिरेक्टरांशीं बोलणे केले. मी म्हटलें कीं "आम्हाला दोन लाख रुपये अजून मिळवावयाचे आहेत. ते मिळविण्यासाठी ५०० रुपये महिना पगार अगदीं आनंदाने पुढें मांडला. आणि पुढे मी त्यांस सांगितले की आतां मला ज्ञानकोशमंडळाचे चेअरमन व्हावयास हरकत नाहीं. तुम्ही माझ्या हाताखालीं काम करावें, तथापि रा. जकातदार यानी वकीली सोडली नाहीं. ते पुण्यास काम समजून घेण्याकरतां आलेच नाहीत. एवढेच नव्हे तर नागपूरच्या ऑफीसमध्ये देखील ते आले नाहीत. रा. जकातदार यांचा गंभीरपणानें काम करण्याचा उद्देश नव्हता असे दिसून आलें.

या सभेच्या योगाने माझें वैगुण्य मला कळून आलें आणि तें म्हटलें म्हणजे मी एकदां दुसऱ्या पक्षाचें म्हणणें कबूल करावयास लागलों म्हणजे त्यांच्या अपेक्षेच्या बाहेर मी कबूल करतों. मिसेस केतकर यांचा येण्याचा खर्च मी परत द्यावयाचें जें कबूल केलें त्याच्या योगानें रा. फडके, डॉ. खेरे व रा. कठाळे हे नाखूष झाले. रा. कठाळे म्हणाले कीं या योगानें आम्ही मंजुरी दिली ही गोष्ट चुकीची ठरते. तर मी हें मुळींच करावयाचे नव्हतें. कांहीं लोकांस या सर्व गोष्टी ठाऊक नव्हत्या. ते म्हणाले की पहा, डॉ. केतकर कंपनीचा पैसा खासगी कामाकरतां लावतात कीं नाहीत आणि तो पुढे त्यांनां सोडावा लागला कीं नाहीं. म्हणजे आपला पक्ष खरा असता दुसऱ्यांच्या मागण्या कबूल करण्यानें आपणच उलट संशयास पात्र कसे होतो हे कळून आले.

या सभेत माधवराव पाध्यांस मिळालेली डायरेक्टरची जागा फार दिवस टिकली नाहीं. जर त्यांनी कंपनीच्या हिताची वृत्ति इतःपर ठेवली असती तर त्यास कांहीं आणखी दिवस डिरेक्टर रहातां आलें असते पण त्यांनी अशी वृत्ति दाखविली कीं मी व फडके जेव्हां नागपुरास असूं तेव्हां सभाच होऊं देऊं नये, व आम्ही नसलों म्हणजे त्यांनीं व कठाळयांनी मिळून वाटेल ते ठराव करावेत. ही त्यांची वृत्ति दिसून आली तेव्हां रा. पाध्ये यांस काढून टाकणें प्राप्त झालें.

माधवराव पाध्ये यांच्याविरुद्ध कांहीं करतां आलें तर करावें म्हणून एक गृहस्थ संधि पहात होते आणि ते म्हटले म्हणजे माझे आतेभाऊ रा. रा. दिवाकर यशवंत फाटक, एन्जीनीअर हे होत. यांचे मित्र रा. पानवलकर म्हणून होते. त्यांनीं आनेस्टी आणि कंपनी म्हणून गिरगांवांत

चालविली आहे. एकदां आनेस्टी कंपनीच्या व्यवहारांत कांहीं दस्त-ऐवज करून आपणांस फसविले म्हणून रा. पानवलकर यांचा राग रा. पाध्यांवर होता आणि रा. दिवाकरपंत हे रा. पानवलकर यांचे त्यावेळेस जिवश्च कंठश्च मित्र असल्यामुळे रा. पानवलकर यांस झालेला अपाय तो आपणांसच झालेला आहे असे ते मानीत होते. आणि त्यामुळें रा. पाध्ये याच्याविरुद्ध कांही करतां आले तर ते करावे असे त्यांस वाटे. तेव्हां पाध्ये यांची निवडणूक बेकायदेशीर आहे अशी तक्रार माझ्याकडे करण्यास मी त्यांस सांगितले आणि त्यांनी त्याप्रमाणे तक्रारहि केली अर्थात त्या तक्रारीबरोबर हिशोबखाते पुण्यास न्यावे इत्यादि तक्रारी त्यानी केल्या व एक बाब खेरीज करून ब्यालेन्सशीट पास करणे गैर आहे इत्यादि प्रश्न त्यांनी उपस्थित केले. तेव्हां मी त्यांची तक्रार कायदे-शीर आणि न्याय्य आहे म्हणून ती मान्य केली. आणि जनरल मीटिं-गचे ठरावच गैरकायदा आहेत असे धरून रा. माधवराव पाध्ये यांस डिरेक्टरच्या पदावरून पुन्हां काढून टाकले. शेअरहोल्डरांच्या सभेत जर कांही गैरकायदा झाले तर त्याला बजावणी न देणे हें काम म्यानेजिंग डिरेक्टरचच आहे आणि यामुळे रा. पाध्ये यांच्या प्रश्नावर पहिला निकाल देण्यासाठी न्यायाधीश मीच होतो. व तो आपला निकाल रजि-स्ट्रारकडे पाठविला. व यानंतर रा. जकातदार हे देखील म्यानेजरच्या जागेवर नसून मीच आहें हे देखील रजिस्टारला कळविलें. रा. कठाळे यावेळेस पाध्यांच्या तर्फेचे झाले होते व नागपूरची एकदोन उपद्व्यापी मंडळी माझ्याविरुद्ध त्यावेळेस बोलत होती त्यामुळें त्यांनीं माझा निकाल हा गैरकायदेशीर आहे वगैरे बोलणें करण्यास सुरवात केली पण त्याचा परिणाम कांहीं झाला नाही. पुढें जी डिरेक्टरांची सभा झाली तीस रा. पाध्ये यांस आमंत्रण केले नाहीं तथापि पाध्ये हे कठाळे व खरे यांच्या निमंत्रणावरून आले होते पण त्यावेळेस कोरम नसल्या-मुळें कांहींच करतां आलें नाहीं. पुढे जेव्हां डिरेक्टरांची सभा भरली तीस मी व रा. फडके असे दोघेहि गेलों आणि इतःपर कंपनीच्या साधारण आणि असाधारण सभा पुण्यास भरवाव्यात असा ठराव पास करून आलों. असा ठराव करण्याचें कारण असे होतें कीं, कंपनीस पैशाची नड होती आणि पैसा पुण्याच्या लोकांच्या वैयक्तिक सिक्युरिटी-वर देण्यास पूना ब्यांक तयार होती. तर, जे लोक जामीन रहाणार

त्यांस कंपनीच्या कारभाराकडे लक्ष ठेवण्याची संधि देण्यासाठी कंपनीच्या सभा पुण्यास होणे व पुण्याचे डिरेक्टर असणें हें अवश्य होतें. ही गोष्ट डॉ. खरे यांस पटली पण रा. कठाळे यांस पटली नाहीं. तेव्हां रा. फडके व मी पुण्यास सभा भराव्यात या मताचे होतों त्यामुळें अध्यक्षांनी आपलें मत न देतां ठराव पास झाला.

१९२१ साली सप्टेंबरमध्ये जी शेअर होल्डरांची बैठक झाली तीत ज्ञानकोशाच्या व्यवस्थेसंबंधाचे कांही महत्त्वाचे ठराव झाले. त्या सभेत असे ठरले कीं जी मंडळी ज्ञानकोशाच्यासाठीं जें कर्ज उभारावें लागलें ते उभारण्यासाठीं २००० रुपयांपर्यंत जामीन रहातील किंवा स्वतःच ती रकम कर्जाऊ देतील अशा मंडळींसच डिरेक्टर निवडण्यांत यावें. डॉ. केतकर हे स्वतः वैयक्तिकरीत्या जबाबदार असल्यामुळें त्यांच्या अधिकारांमध्यें ढवळाढवळ डायरेक्टरनी करूं नये व कर्ज उभारण्यासाठीं कंपनीचा छापील माल हा केतकर यांनीं तारण म्हणून देण्यास हरकत नाहीं. या ठरावामुळें सर्व सत्ता कायदेशीर रीतीनें एका व्यक्तीच्या ठायीं निश्चित झाली आणि तीमुळें ज्ञानकोशाच्या कामामध्यें डायरेक्टरांच्या विरुद्धतेमुळें जें नुकसान होत होते तें मिटलें. यानंतर माझे व डायरेक्टरांचे लढे उत्पन्न झाले नाहींत, असें म्हणण्यास हरकत नाहीं. डायरेक्टरांचे वजन कमी झालें असें मात्र म्हणतां येणार नाहीं. या वेळच्या निवडणुकींत रा. रा. लक्ष्मणराव फाटक व कै. शांताराम विश्वनाथ दांडेकर हे डिरेक्टर निवडले गेले. ही निवडणूक झाल्यानंतर रा. फाटक हे पूना ब्यांकेमध्यें २००० रुपयासाठीं जामीन न रहातां स्वतःच २००० रुपये देते झाले, व रा. दांडेकर, अच्युतराव भट व रा. धोडोपंत ऊर्फ लोखंडवाले साठे हे २००० साठीं जामीन राहिले. रा. दांडेकर यांचे डिरेक्टरपण त्यांच्या मृत्यूपर्यंत राहिलें आणि त्यांच्या मृत्युनंतर रा. अच्युतराव भट हे डिरेक्टर झाले. ज्ञानकोशमंडळाचें काम या सभेनंतर स्वतंत्रपणें चाललें होतें व डिरेक्टरांचा उपयोग शेअर मंजूर करणें शेअर जप्त करणें यासारख्या गोष्टी पुरताच होता तरी रा. भट हे डिरेक्टर झाल्यानंतर त्यांचा उपयोग जास्त होई. या सभेंतच मिसेस केतकर यांचे भाडें कंपनीनें परत करावें असा ठराव झाला. व माधवराव पाध्ये यांस डिरेक्टर मधून काढून लावण्याच्या कृतीस कंपनीने आपली संमति व्यक्त केली.

मिसेस केतकर यांनीं येण्याचें भाडें जर कंपनीनें मंजूर केलें होतें तर तें परत देण्याचें तरी कारण काय आणि परत दिल्यानंतर तें पुन्हां मंजूर कां करून घेतलें हा प्रश्न कित्येक जणांनीं विचारला व मी त्यांस उत्तरहि दिले तें येणेंप्रमाणें होतेः—रा. विष्णुपंत जकातदार यांनीं तें भाडे परत द्यावें अशी इच्छा व्यक्त केली होती आणि ते तर म्यानेजर म्हणून कामाला येणार होते तर त्यांना जो स्वार्थत्याग करावा लागेल त्यापुढे आपला साताठशें रुपयांचा प्रश्न कांहींच नाहीं असें मनाला वाटले. रा. विष्णुपंत जकातदार म्यानेजर होणार म्हणून मीं मनांतल्या मनांत खुष होऊन गेलों होतों. आणि मला म्यानेजर म्हणजे फक्त क्यानव्हासिंगचें काम करतां येईल असें ते बोललेहि होते. आणि मला यासाठींच एक वजनदार मनुष्य पाहिजे होता. विष्णुपंत जकातदार हे एक वजनदार वकील, त्याप्रमाणेंच एक धडाडीचे गृहस्थ म्हणून मला माहीत होते व त्यांनी खरोखर म्यानेजरचें काम पत्करल्याप्रमाणे खरोखरच केलें असतें म्हणजे मला फार आनंद झाला असता. ते त्या वेळेस महात्मा गांधींची फार तारीफ करीत होते व वकीली सोडून देण्याच्या गोष्टीहि बोलत होते. पण जेव्हां रा. विष्णुपंत जकातदार यांनीं मात्र वकीली सोडली नाही व कामावर रुजू झाले नाहीत तेव्हां आपणाहि विनाकारण आपलें नुकसान कां करून घ्यावें म्हणून अगोदर कंपनीस दिलेली दक्षणा मी परत घेतली.

येथें कोणी असा प्रश्न विचारील कीं मिस् कोहन (मिसेस केतकर) यांचें भाडे कंपनीनें मंजूर केलें पण यांत खरोखर तुम्ही आपल्या बायकोचा येण्याचा खर्च कंपनीवर लादण्याची खटपट केली नाहीं काय ? त्या प्रश्नाला उत्तर देणें म्हणजे आमची खासगी सर्व कथा सांगणें आहे. पण ती सांगणें अवश्य आहे म्हणून ती येथे स्पष्ट सांगतो. मिस् कोहन यांचा आणि माझी लंडनला ओळख झाली आणि ती देखील मी इंग्लंड सोडण्याच्या अगोदर कांही महिने झालीं. त्यावेळेस लंडन येथें कांहीं इंग्रज मंडळींनीं "दि नोबडीज क्लब" म्हणून एक क्लब स्थापन केला होता. त्या क्लबाचे मि. कोहन आणि त्यांच्या दोघी मुली सदस्य झाली. मी त्या क्लबाच्या दोन सेक्रेटरींपैकीं एक होतों. त्यावेळेस आम्हां दोघांचा चांगला परिचय झाला. मी लंडन सोडलें त्यावेळेस आमचे लग्नासंबंधानें कांहीं बोलणें झाले

नाहीं. एवढेंच नव्हें तर एकमेकांची अंतःकरणे एकमेकांस पुरीं कळली देखील नाहींत. मी इंग्लंड सोडतेप्रसंगीं मिस कोहन यांस माझ्या वियोगामुळे दुःख होत आहे असें मला दिसून आले. पुढे आमचा पत्रव्यवहारहि झाला, तथापि निश्चित कांही ठरले नाही. एकमेकांचीं अंतःकरणे मात्र एकमेकांस स्पष्ट झाली. तथापि लग्न करावे की करूं नये याविषयीं नक्की कांहीच ठरले नाहीं. मला असे वाटे की यूरोपियन बाई हिंदुस्थानांत आल्यानंतर आणि इंग्रज लोक हिंदुस्थानी लोकांस कसे वागवितात हे दृष्टीस पडल्यानंतर तिची बुद्धि कशी होईल याचा नेम सांगतां येत नाही. व आपल्यालाहि जो त्रास होईल त्यामुळे आपली बुध्दि तरी काय होईल याचाहि नेम सांगतां येत नाही. तर अशा वेळेस आपण कांहीं एक कायम करूं नये हेच बरें. मि. कोहन यांनी कै. बाळ गंगाधर टिळक यांचाहि या बाबतीत सल्ला घेतला होता. तेव्हां त्यांनीं तत्त्वदृष्ट्या असल्या मिश्र विवाहास अनुकूल असेच मत दिले. तथापि डॉक्टर केतकर हा श्रीमान मनुष्य नाही, त्याला आपल्या लेखणीच्या जोरावर आपली उपजीविका करावी लागणार आहे इत्यादि गोष्टी मिस् कोहन यांस सांगितल्या. एवंच कायमचा निश्चय हिंदुस्थानास आल्यानंतर व्हावयाचा होता.

येथें हें मात्र सांगितले पाहिजे कीं नागपूरच्या कांही शेअरहोल्डरांनी गडबड करण्यांत भाग घेतला तो आमचे पूर्वीचें लग्नाचें ठरले असून मागाहून लग्न ठरविले हे केवळ नाटक आहे अशा समजुतीनें घेतला असावा. पुण्यांत देखील मिस् कोहन आल्यानंतर या केतकरांच्या भावी पत्नी आहेत अशी समजूत आमचें दोघांचे ठरण्याच्या अगोदरच पुण्यांतील स्त्रीपुरुषांत झाली होती. असो.

## निरूढ व्रात्यस्तोम

हिंदुस्थानांत मिस् कोहन आल्यानंतर कांहीं महिने गेल्यानंतर आमचा लग्न करण्याचा निश्चय झाला. व्रात्यस्तोमविधि २१ मार्चला झाल्यानंतर तो निश्चय आमच्या श्वशुरांनां कळविण्यांत आला. जर लग्नाचे अगोदर ठरले असते तर परत जाण्याचे भाडे अगोदर मंजूर करून घेण्याचे कारणच नव्हते. आमचे लग्न १४ मे १९२०रोजीं झाले. लग्नाच्या अगोदर व्रात्यस्तोम झाला. त्या व्रात्यस्तोमाच्या वेळेस आपण गृहपति व्हावें म्हणून मी लो. टिळकांनां विचारलें होतें पण ते म्हणाले

कीं, मला तुम्ही यांत अडकवू नका. व्रात्यस्तोमाला कोणी आक्षेप घेतला तर मी त्याचें समर्थन करीन. पण असा आक्षेप कोणी घेतलाच नाहीं. कै. रामशास्त्री आखवे यांनी त्यावर श्रौतविषयाचा अभ्यास करून व्याख्यान दिले पण त्यांत त्यांनी बहुतेक आक्षेप विधींतील चुकांच्या स्वरूपाचे काढले. त्या व्याख्यानाला मी हजर नव्हतो पण कांहीं श्रोत्यांकडून असें कळले कीं, रामशास्त्री आखव्यांनां एकाने उत्तर दिलें कीं, व्रात्यस्तोमांत चुकाच झाल्या ना! पुढच्या व्रात्यस्तोमाच्या प्रसंगी तुम्हांला निमंत्रण करू! असें म्हटल्याबरोबर श्रोत्यांत हंशा पिकला. कै. रामशास्त्री आखवे यांनी जो मुख्य आक्षेप घेतला होता तो हा कीं, "व्रात्यस्तोमाचा विधि आम्ही जशाचे तसाच घेतला नाहीं, तो सोमयागापासून निराळा केला आहे." याला आमचे उत्तर असें आहे कीं तांडय ब्राह्मणाच्या अगोदरच्या कालांत व्रात्यस्तोम हा सोमयागाला मुळींच जोडला नव्हता. हा अथर्व्यांचा विधि होता आणि जेव्हां मोठाले याग तयार झाले नव्हते तेव्हां देखील व्रात्यस्तोम होता. आणि तो विधि एकादे स्तोत्र म्हणण्याइतपत लहान होता. आज सोमयागासह व्रात्यस्तोम करण्यांत अर्थ नाहीं कारण व्रात्यस्तोमानंतर ज्या समाजांत व्यक्ति प्रविष्ट होणार तो समाज याग करणार नाहीं. यासाठीं आम्ही मांडणी केली आहे कीं अथर्वाच्या मताप्रमाणे आतिथ्य हाच याग समजणारा अर्वाचीन समाज आहे. आणि ते सांगणारें आतिथ्यस्तोत्र आम्ही व्रात्यस्तोमाच्या अगोदर जोडलें आहे. या विधीचें आम्ही पुस्तकहि छापलें आहे.

माझ्या लग्नाच्या वेळेस झालल्या दुसऱ्या कांहीं गोष्टी आतां येथेंच सांगून टाकतो. लग्नानंतर आम्ही "हनीमून" माथेरान येथें साजरा केला. आणि नंतर ८ जून रोजीं पुण्यास आलों.

जूनपासून पुढे कांहीं दिवस पुणें शहरातर्फे कौन्सिलसाठीं मी उमेदवार उभा होतों या संबंधाची हकीकत परिशिष्टांत दिली आहे. मी यावेळेस उमेदवारी सोडली याचे कारण त्याच्या योगानें आपल्या अंगीकृत कामाम व्यत्यय कसा होईल याच्या कल्पना येऊन सोडली. व ज्ञानकोशाच्या हिताच्या दृष्टीनें ती सोडली हेंच चांगलें केलें असें वाटतें.

माझ्या लग्नाच्या दिवशीं आमच्या ऑफिसांत पण माझ्या गैरहजेरींत एक गोष्ट घडून आली ती म्हणजे समाजशास्त्रमंडळाची स्थापना होय. कै. विश्वनाथ काशीनाथ राजवाडे यांनीं येथें येऊन समाजशास्त्रमंडळ

म्हणून एक संस्था स्थापन केली होती. तींत रा. राजवाडे, स. मेहेंदळे, प्रो. पोतदार, रा. दाते, आहिताग्नि राजवाडे आणि मी इतकीच मंडळी होतो. या संस्थेच्या सदस्यत्वाची वर्गणी २५० रुपये ठेवली होती पण कै. राजवाडे यांनी कांही निबंध संस्थेपुढे वाचले व माझ्या हिंदुस्थान व जग या विभागाची कांही प्रकरणें येथे वाचलीं पण दुसरे कोणीहि निबंध लिहून आणीना म्हणून ही संस्था मोडून टाकण्याचें ठरलें.

याच वेळचे आणखी एक अगोदर पत्करलेलें व नंतर टाकून दिलेलें कार्य म्हटले म्हणजे "स्त्रीकर्मसदन" नांवाची एक संस्था होय. ही संस्था ब्राह्मण किंवा इतर मध्यम वर्गांतील विधवा स्त्रियांनां कांहीं उद्योग काढून द्यावा आणि जमाखर्चाची तोडमिळवणी झाल्यास चालवावा या हेतूने सौ. शीलवतीबाईंच्या व्यवस्थेखालीं चालविली होती. तीत शर्ट शिवण्याचे काम चाले. हे काम सुमारे ६ महिने चालून त्यांत सुमारें १२०० रुपयांचा चट्टा बसून पुढे बंद झालें. तथापि या कामामुळे मला कांही महत्त्वाच्या गोष्टी कळल्या आणि ते १२०० रुपये गेले याबद्दल मला आज मुळींच दुःख होत नाहीं. त्या कामामुळें जो अनुभव मिळाला त्या अनुभवामुळे ते गेलेले १२०० रुपये पुढें मागें वसूल होतील असा मला विश्वास वाटत आहे. या कामांत मला ज्या गोष्टीबद्दल जास्त दुःख झाले तें याबद्दल कीं जरी १२०० रुपये नुकसान झाले तरी स्त्रीकामकऱ्यांच्या वांटयास ६०० रुपये देखील आले नाहींत. माल तीन चार हजारांचा तयार झाला पण भाडें, कापड व जाहिरात यांनींच बरीचशी रक्कम खाल्ली.

या कामांत जी एक अत्यंत महत्त्वाची गोष्ट कळली ती ही कीं, जेव्हां एखाद्या विशिष्ट वर्गाला काम देण्यासाठीं कारखाना काढावयाचा असेल तर जे काम काढावयाचें त्यांत मालाची किंमत ज्यांत फार कमी आहे व मजूरीची किंमत ज्यांत जास्त आहे अशा तऱ्हेचा तो उद्योग असावा. या दृष्टीने छापखान्याचें काम श्रेष्ठ ठरते, व कपडे करण्याचे काम कनिष्ठ ठरतें याविषयीं विद्यासेवकाच्या दुसऱ्या वर्षांत तीन लेख लिहिले आहेत. "मध्यमवर्गांतील स्त्रियांना उद्योगांत प्रवेश" (अंक ३); "सामाजिक क्रांति व तिची तयारी" (अंक ४); "औद्योगिक दानसंस्था" (अंक ९); "दुर्बलांस उद्योग देऊन त्यांस स्वसंरक्षणास समर्थ कसे करावे या विषयावर मी जे इतरांचे लेख वाचले त्यांत

फोर्डच्या आत्मचरित्राचा उल्लेख केला पाहिजे. असो, हें विषयांतर सोडून ज्ञानकोशाकडेसच पुन्हां वळूं.

ज्ञानकोशाच्या इतिहासाचें कथासूत्र देतांना आतांपर्यंत संपादकीय, मुद्रकीय इ. बाबतींची माहिती थोडीच दिली आहे. याच्यापुढें ती सविस्तर देण्याचा उद्देश आहे. याचा अर्थ भांडणे व त्यांचें पुणे येथें वार्षिक सभा भरविण्यांत पर्यवसान हीं ज्या काळांत झाली त्या काळांतलें संपादकीय काम कमी महत्त्वाचें होतें असे नाहीं. किंबहुना बहुतेक महत्त्वाचें संपादकीय काम याच्या अगोदरच झालें होतें. तथापि यापुढें चालक मंडळीचा किंवा बडतर्फी झालेल्या चालकांचा विरोध कंपनीस बाधला नाही. आणि त्यामुळें बुडत्या कार्यास तारतां आलें. रा. जकातदार ज्या काळामध्यें म्यानेजर म्हणून झाले होते, ज्या काळांत त्यांनीं ऑफीसांत पाऊलहि घातलें नाहीं त्या काळामध्ये जें कंपनीचें नुकसान झालें तें भरून काढण्याकडेच पुढील वर्षे गेलीं. मुद्रकांचे बेजबाबदार वर्तन आणि आमच्यामध्यें निश्चित सत्तेचा १ वर्ष पर्यंत अभाव यामुळें भरभराट असलेल्या कंपनीस फारच मोठा धक्का बसला. या धक्क्यामुळें कंपनी बुडविण्याची वेळ आली होती. तथापि त्यावेळेस ती केवळ अविश्रांत श्रमामुळेंच वांचली. मुंबईच्या गिन्हाइकांनीं यावेळेस पैशाची मदत चांगली केली.

पुणें येथें ज्ञानकोशमंडळाच्या वार्षिक सभा झाल्या त्यांमध्यें तंटे उपस्थित झाले नाहींत. रा. रा. शांताराम विश्वनाथ दांडेकर हे कैलासवासी झाले तेव्हां नवीन डिरेक्टरांची निवडणूक व्हावयाची होती तेव्हां मात्र वार्षिक सभेस बरीच मंडळी जमली होती, आणि त्यावेळेस पुण्यांतील वाङ्मयसेवकांपैकीं एखादा कोणी तरी प्रमुख मनुष्य ज्ञानकोशमंडळाच्या चालकांत घालावा या इच्छेनें झालेल्या ७ जुलै १९२३च्या सभेला बरीच मंडळी जमली होती पण त्या सभेंत त्यांची ती इच्छा पूर्ण झाली नाहीं. एकशेअरवाला कोणीहि सभासद ज्ञानकोशाचा डिरेक्टर होऊं शकतो असें जरी कंपनीच्या नियमांत आहे तरी जे कंपनीच्या कर्जासाठीं जबाबदार आहेत किंवा कंपनीस मोठे कर्ज देणाऱ्या मंडळींत आहेत अशांपैकींच डिरेक्टर निवडावेत म्हणून धोरण २१ सालींच ठरलें असल्यामुळें येथील वाङ्मयसेवक म्हणून प्रसिद्ध असलेल्या व्यक्तींपैकीं डिरेक्टर न येतां पुस्तकांचा धंदा करणारे रा. अच्युतराव

भट हे डिरेक्टर म्हणून निवडून आले व त्यांचा ज्ञानकोशाला उपयोग झाला.

---

## प्रकरण ६ वें.

# मुद्रणाचा इतिहास

ज्ञानकोशाचे मुद्रण ही ज्ञानकोशाच्या इतिहासांतील धंद्याच्या दृष्टीनें महत्त्वाची उपकथा होय. छापणे म्हणजे केवळ यांत्रिक काम, तें पुरें करणें म्हणजे त्यांत कठीण काय आहे? अशी माझी कार्यारंभापूर्वी समजूत होती. आणि मुंबईची कांग्रेस आटपल्यानंतर मी पुण्यास येऊन उमरावती व नागपूरकडे जातांना मुंबईस उतरलो तेव्हां टाईम्स ऑफ इंडियाच्या मुद्रणशाखेच्या मुख्यास मी स्वतः विचारले की ५०० पानांचा एक असे २० भाग १ वर्षांत काढूं शकाल काय? तेव्हां त्यांनीं "सहज" म्हणून उत्तर दिलें. तथापि पुढे एकदां जेव्हां त्यांच्याकडे एक भाग छापावयासच द्यावयास गेलों होतों आणि १ भाग दीड महिन्यांत छापून द्या म्हणून म्हटले तेव्हां त्यांनी ते आमच्याकडून होणार नाहीं म्हणून नाकारलें. ज्ञानकोशाचा पहिला भाग निर्णयसागरकडे नोव्हेंबर १९१९ मध्ये गेला व त्याच महिन्यांत त्यांच्याकडे आगाऊ २५०० रुपये आम्ही नेऊन भरले. व पुढे थोडक्याच दिवसांनीं आणखी ५०० रुपये भरले तरी देखील निर्णयसागरने ५०० पौंड टाइपावरच काम करावयास सुरुवात केली. निर्णयसागरने ज्ञानकोशाचें काम छापावयास दिरंगाई लावून प्रथम गोत्यांत घातलें आणि नंतर आर्यभूषणनें गोत्यांत घातले आणि आम्ही जेव्हां कंपोझिंगचे काम सुरू केलें तेव्हां आम्ही अडचणींतून बाहेर पडूं लागलों. सर्वांत गचाळपणें काम करणारा, दर बराच घेणारा आणि कामांत दिरंगाई करणारा छापखाना म्हटला म्हणजे आर्यभूषण होय. हा पुण्यांतला सर्वांत मोठा छापखाना आहे तथापि हा छापखाना आमचें काम बरोबर करूं शकला नाहीं आणि या छापखान्याच्या निष्काळजीपणामुळें ज्ञानकोशमंडळाचें सुमारें कमींत कमीं वी. हजार रुपये नुकसान झालें आहे. या छापखान्यानें छापण्याची तयारी करण्यासाठीं आगाऊ ५०० रुपये १३।१२।२१ व २९।१।२२ रोजीं घेऊन निष्काळजीपणानें काम केलें आणि काम चालू असतां कामाकडे

दुर्लक्ष केलें असें सर्टिफिकिट दिल्या शिवाय रहावत नाहीं. याच वेळेस त्यांनां ५०० रुपये भरण्याऐवजीं स्वतःच ५०० रुपयांचा टाईप घेऊन कामास सुरवात केली असती तर ज्ञानकोशमंडळाचे एक वर्ष तरी वाचलें असतें.

१९२२ सालच्या सप्टेंबर महिन्यांत आम्ही एक शेअरहोल्डरांकडे पत्रक पाठविलें होतें त्यांतील मुद्रणविषयक भाग येथें अवतारितों.

## ग्रंथ छापून काढण्यासाठीं लागणारी खटपट

"सन १९१७ मध्यें योजना प्रसिद्ध केली तींत चार वर्षें ग्रंथरचना करावयासाठीं आणि एक वर्ष छापावयासाठीं असा हिशेब धरला होता; आणि त्याप्रमाणें १९१९ सालीं पहिला विभाग छापावयासहि दिला. पुस्तक निश्चयानें दोन किंवा तीन वर्षांत पार पाडण्याचे काम निर्णयसागर छापखान्यास घेववलें नाहीं. निर्णसागरकडून सुमारे दीड वर्षांत दोन भाग छापून निघाले. तिसरा भाग आर्यभूषणकडे १९२१ च्या आक्टोबर महिन्यांत छापावयास दिला. तो त्यांच्याकडेसच छापत आहे. पण त्यांच्याकडून फारसें जलद काम होत नाही असे पाहून १९२२ च्या एप्रिल महिन्यांत पाडव्याच्या मुहुर्तावर "ज्ञानकोश छापाखाना" म्हणून मंडळानें आपल्या मालकीचा छापखाना काढावयाचें ठरविलें. छापखाना रजिस्टर केला आहे. वस्तुतः छापखाना रजिस्टर केला नसून कंपोजशाखा तेवढी काढली आहे; व छपाईचें काम जगद्धितेच्छु छापखाना करतो. ज्ञानकोश छापखान्यांत ५ व्या भागाचे खिळे जुळून पुढें छापण्यांत येत आहेत. आतांपर्यंत (१५ आगस्ट १९२२) ३४ फार्म म्हणजे २१६ पृष्ठें छापून झालीं आहेत. ज्ञानकोशाचा कार्यसमातीचा अंदाज चुकला यांत तो कोणत्या कारणामुळें प्रामुख्याने चुकला असें विचारलें असतां असें उत्तर देतां येईल कीं, संपादकीय काम फारसें कमी झालें नाहीं. उलट बराचसा भाग वेळेच्या अगोदर तयार झाला होता. हा सबंध ग्रंथ एका वर्षांत छापून काढणें महाराष्ट्रांतील सर्वांत मोठमोठ्या छापखान्यांपैकीं बऱ्याच जणांस शक्य असेल असें चुकीनें धरलें होतें. पुष्कळ लोकांकडून वर्गणी वेळेवर येत नाहीं. ही गोष्ट विलंबाबद्दल बरीचशी जबाबदार आहे. वसूली करण्यासाठीं प्रयत्न करण्यांत आम्हीं कसूर करीत नाहीं ही गोष्ट प्रत्येकास परिचित असेलच.

## धंद्यांत स्पर्धेबाहेर असलेल्या छापखान्याची आम्हांस आवश्यकता

आम्ही असें म्हणू शकतों कीं, हा ग्रंथ ३ वर्षांत छापून काढण्याची ताकद महाराष्ट्रांतील कोणत्याहि मोठया पण धंद्याच्या स्पर्धेत असलेल्या छापखान्यास नाहीं. आम्हांस लहानसा पण स्वतंत्र छापखाना काढूनच ते कार्य दोन–अडीच वर्षांत करणे शक्य आहे. मात्र दररोज दोन फार्म म्हणजे सोळा पृष्ठें छापून निघालीं पाहिजेत. आम्हांला हें शक्य आहे, असें विधान आम्ही करतो याचे कारण असें:–कंपाझिटरचा तुटवडा पडला म्हणजे कोणताहि चालू छापखाना निरनिराळया कंपाझिटरांनां स्वीकारलेल्या गिऱ्हाइकांची निरनिराळी कामें वाटून देतो व तीं जेव्हां पार पडतील तेव्हां पडूं देतो. आपण छापखान्यास किफायतदार दर दिला म्हणजे आपलें काम जलद होईल असें नाहीं; छापखानदारास आपल्याच कामाकडे अधिक माणसें देतां येतील असे होत नाहीं. त्याची काम करणारास दर देण्याची व माणसें मिळविण्याची शक्ति नियमित असते. ती त्याजकडे ज्या दरानें जें इतर काम येईल त्यावर अवलंबून असते. शिवाय छापखानदारांस गिऱ्हाईकांकडून बराच किफायतीचा दर मिळाला म्हणजे कंत्राटी कामगारांत व छापखानदारांत तंटे सुरू होतात; आणि त्या तंटयांमुळे अधिक किफायतीचे काम मुळींच पडून राहतें. ज्ञानकोश छापणाऱ्या छापखान्यांत हा अनुभव आला. कंत्राटी कामगारांस चालू दरापेक्षां अधिक दर देणे आणि विशिष्ट कामासाठीं जास्त माणसें लावणे मोठया छापखान्यास शक्य नसतें. कारण कांहीं काम करण्यासाठीं जास्त पैसे देऊन माणसें लावलीं तर सर्वच माणसे अधिक पगार मागूं लागतात. तो छापखान्यास देणे शक्य नसते. या कारणामुळें आम्हांस स्वतःचा छापखाना काढणे भाग झाले. आतां आम्हांस असें दिसतें कीं. सर्व ग्रंथ छापून घेण्याची जबाबदारी आम्हांसच घेतली पाहिजे.''

ज्यावेळेस वरील वाक्यें लिहिलीं तेव्हां असें वाटलें कीं स्पर्धा क्षेत्रांत विशिष्ट छापखाना आहे म्हणूनच तो छपाई वेळेवर करण्यास असमर्थ होत असेल. आतां मात्र माझें असे मत होऊं लागलें आहे कीं जेव्हां दोन यंत्रें असलेले छापखाने दररोज दोन फरमे देण्यास असमर्थ

होतात तेव्हां त्या असमर्थतेचें व्यवस्थापकाच्या नालायकीशिवाय दुसरें कारण नाहीं. गचाळ छापखानदार आपल्या कामाची दिरंगाई करून प्रकाशकास कसे भिकेस लावतात याचे उदाहरण ज्ञानकोश हें होय. ज्ञानकोश हें काम जर मध्येंच पडलें असतें तर तें संपादकाच्या नालायकीमुळें किंवा पैशाचा पुरवठा कमी पडल्यामुळें पडलें असते असे नाहीं तर मुद्रकांच्या नालायकीमुळे अपुरें राहिले असते. प्रत्येक भाग छापून पुरा केव्हां झाला याचे कोष्टक येणेप्रमाणे आहे:—

| भाग | पहिली प्रत दिल्याची तारीख | भाग | पहिली प्रत दिल्याची तारीख |
|---|---|---|---|
| १ | २– २–२१ | ११ | १०–१२–२४ |
| २ | ६– ३–२२ | १२ | १४– २–२५ |
| ३ | २२– १–२४ | १३ | १– ४–२५ |
| ४ | १९–१०–२३ | १४ | २३– ६–२५ |
| ५ | १४– ५–२३ | १५ | ७– ८–२५ |
| ६ | ९– ४–२४ | १६ | ३०–१०–२५ |
| ७ | ११– ६–२४ | १७ | २३–१२–२५ |
| ८ | २९– ७–२४ | १८ | ३०– ३–२६ |
| ९ | २८– ८–२४ | १९ | ३– ७–२६ |
| १० | १०–११–२४ | २० | १७–११–२६ |
| | | २१ | ११– ४–२७ |

१९२२ जानेवारीपासून पुढचा ज्ञानकोशाचा इतिहास एकसारखा प्रगतीचा आहे. या काळांत प्रथमत: ज्ञानकोशाच्या २ ऱ्या भागाच्या ज्या प्रती निर्णयसागरकडे अडकल्या होत्या त्या सोडवून आणण्यास सुरवात झाली. त्यांचें १० हजारांचे बिल होतें. तें दिलें नाहीं म्हणून त्यांनी नमुन्याच्या १।२ प्रती देखील देण्याचें नाकारलें होतें. व पुढें ५ हजार रु. घेऊन कांहीं प्रती सोडविण्याचें नाकारलें. शेवटीं त्यांनां आम्ही असें कळविलें कीं प्रती आम्हांस दिल्याशिवाय तुमचें बिल लागूच होत नाहीं. गिऱ्हाईकाचें नुकसान केल्यानें छापखानदाराची भरभराट होत नाहीं. उलट त्यास मदत केल्यानेंच होते इत्यादि गोष्टी आम्ही सांगून पाहिल्या तरी त्याचा उपयोग कांहीं झाला नाहीं.

हें पत्र गेल्यानंतर निर्णयसागरने थोडीशी हुषारी आरंभिली. आणि आमच्याकडून गेलेले सर्व पैसे नुसते हिशोबी जमा केले. व पहिल्या व्हॉल्यूमचे नवीन बिल करून पाठविले व सॉलिसिटरमार्फत नोटीस पाठविली. ही सर्व लटपट अर्थात कोर्टांत कज्जा दाखल झाला असता तर बाहेर पडलीच असती. यासंबंधाने जेव्हां ज्ञानकोशाच्या प्रतिनिधीशीं व त्यांच्या सॉलिसिटर्सशीं आमचे बोलणे झाले तेव्हां सॉलिसिटरनीं त्यांनां १५०० प्रती सोडावयास सल्ला दिला व त्यांनीं केलेल्या हिशोबाच्या फिरवाफिरवीत आमची संमति घेतली. त्यामुळे १५०० प्रती लोकांच्याकडे पाठवून आम्हांस कांहीं पैसे वसूल करतां आले.

दुसरा भाग लवकर तयार झाला तरी गिऱ्हाईकांच्या हातीं तो उशीरा पडला याचे कारण हेंच होते. निर्णयसागर छापखान्याची अनुदार वृत्ति अत्यत अविचाराची होती हे सांगावयास नकोच!

एप्रिलमध्यें वर्षप्रतिपदेच्या दिवशीं आम्हीं ज्ञानकोश छापखाना प्रथम काढला. प्रथम छापायचे यंत्र नसून केवळ कंपोझिगचे खाते उघडलें.

ज्ञानकोशमंडळाच्या कारभारांत ग्रंथ तयार करणे, छापणे व विकणे या तिन्ही क्रिया एकत्वानें चालल्या होत्या आणि त्या एक कारभार म्हणून चालण्यावरच जें पुढें यश आले तें अवलंबून आहे. पुस्तक छापल्याबरोबर सात आठ दिवसांत बांधणी होऊन व्ही. पी. सुटत. हे कारभार जेव्हां परक्या छापखानदारावर अवलंबून असत तेव्हां दुसरे छापखानदार आमचे काम बाजूला टाकून दुसरे काम घेण्याचा मोह त्यांनां पडे, त्यामुळें ते कामास दिरगाई लावीत. केवळ शंभर पुस्तके बांधून यावयाचीं तीं देखील पुस्तक छापून झाल्यानंतर महिन्या दीड महिन्यानें हातीं यावयाचीं असा प्रकार होई. बांधणी सुद्धां वेळेवर होईना तेव्हां आम्हांला बांधणीखातें काढावें लागलें. जसजसा बांधणीवाले एकेक दिवस जास्त लावीत तसतसें आमचें नुकसान दरराज दीडश रुपयांच्यावर होई. ही गोष्ट आम्ही बांधणीवाल्याला, तशीच छापखानदाराला कितीदां जरी सांगितली तरी त्याला त्याची फिकीर काय? पुष्कळदां असें व्हावयाचें कीं, आम्ही पुस्तक छापून काढलें म्हणजे छापखानावाल्यानें लाविलेल्या दिरंगाईमुळें आमचे पैसे संपून जावयाचे आणि त्यामुळें त्यांनां पुन्हां आमचे पैसे कोठें आहेत ते आणा म्हणजे

पुस्तकें मोडतों एऱ्हीं सोडीत नाही असें छापखानदारास म्हणावयास सांपडे. आमचा मासिक खर्च २५०० आणि छापखानदारानें दीड महिन्याच्या ऐवजी भाग छापावयास सहा महिने लावले म्हणजे दहा हजार रुपये गेलेच! आणि आपल्या नालायकीमुळे जरी प्रकाशक बुडाला तरी त्यांनां त्याचें काय?

निर्णयसागर छापखान्याने जी बेपरवाईची वृत्ति दाखविली तिची हकीकत मागे दिलीच आहे. आर्यभूषणची कथा तशीच. त्यांनां २५० पानें छापावयास सुमार दीड वर्ष लागले. तिसरा भाग छापत असतां आम्ही कंटाळून स्वतःच खिळेजुळवीपुरता छापखाना काढला आणि त्यांत पांचवा भाग (पृ. ७००), चौथा भाग (पृ. ५७५) आणि तिसरा उत्तरार्ध (पृ. १४०) इतका छापून घेतला तेव्हां त्यांचें काम फक्त पृ. २४८ इतकें झाले होतें. म्हणजे आमचे काम सर्व जनतेच्या सहानुभूतीनें झालें पण मुद्रकवर्गाच्या सहानुभूतीचा अभाव असतां—किंबहुना त्याचे अविश्वसनीय वर्तन असतां—झाले. आमचें काम पार पाडण्यास महाराष्ट्राच्या मुद्रक वर्गास कोणतेंच श्रेय देतां येत नाही. कर्नाटक छापखान्याने सहाव्या विभागाचीं पृष्ठे २३२ छापलीं पण तीं छापण्यास सुमार चार महिने लागले. त्यावेळेस देखील मुद्रणाचा हुकूम द्यावयास कांहीं दिवस मी किंवा रा. दाते हे मुंबईत मुद्दाम हजर होतो.

येथे प्रश्न असा येईल कीं निर्णयसागर, आर्यभूषण, कर्नाटक, हे महाराष्ट्रांतले सर्वांत मोठाले छापखाने आहेत आणि हे सर्वच वाईट कसे? हाच प्रश्न माझ्याहि मनांत येतो आणि त्याचे उत्तर मी आज असे देतों कीं या सर्व मंडळींमध्यें काम करण्यास प्रत्यक्ष वेळ किती लागतो याचा मुळींच अजमास नाहीं. ज्याला प्रकाशकाचा धंदा करावयाचा आहे त्याला छापण्याचें काम दुसऱ्यावर टाकतां येणारच नाही.

प्रकाशकानें ज्या कांहीं गोष्टीं लक्षांत ठेवल्या पाहिजेत त्या येथें देतों—

(१) साधारणपणें कोणताहि कागदाचा व्यापारी साठ दिवसांपेक्षां जास्त दिवस रक्कम उधार ठेवूं शकत नाहीं. यासाठीं जे पुस्तक छापावयाचें त्याचें ४५ पासून ६० दिवसांच्या आंतच मुद्रण होऊन व बांधणी होऊन त्याच्या व्ही. पी. गिऱ्हाइकांकडे जाण्याची व्यवस्था झाली पाहिजे.

( २ ) बहुतेक छापखानदारांस आपलें काम किती दिवसांत होईल याचा मुळींच अंदाज नसतो, व दररोजचे दोन फरमे नियमानें जावयास तयारी किती पाहिजे याचाहि अंदाज नसतो व यामुळें बरेच छापखानदार 'तुम्ही कापी मात्र वेळेवर पुरविली पाहिजे म्हणजे दिवसांतून दोन फरमे छापूं' असें अभिवचन देतात पण तें त्यांस खरोखर शक्यच नसतें.

( ३ ) रोज दीड फरमा नियमानें जाण्यास कमींत कमी तयारी पुढील-प्रमाणे पाहिजे—

टाईप दहा फरम्याचा पाहिजे म्हणजे जर एका फरम्यास शंभर पौंड टाईप लागत असेल तर एक हजार पौंड तरी टाईप पाहिजे. कारण टाईपांचा फौंट येतो तो लोकांच्या गरजांप्रमाणें नसतो. उदाहरणार्थ फ, फ्र हे टाईप फारच क्वचित लागतात व अशा अनेक जोडाक्षरांच्या टाईपांनीं केस भरलेली असते. आणि ५० पौंडांच्या केसीतील उपयोगास येणार टाईप २५ पौंडापलीकडे येत नाहीं.

प्रत्येक अक्षराचा टाईप किती असावा याची शास्त्रीय मोजदाद कोणी अजून करून त्याचें कोष्टक मांडलेलें प्रसिद्ध नाहीं. बहुतेक फाउंडऱ्यांचे अजमास चुकलेले आहेत. पुष्कळशा फाउंडऱ्या आपली आर्डर मोठी करण्यासाठीं कमी उपयोगाचा टाईप प्रमाणाबाहेर फौंटमध्यें घालतात. त्यामुळे पुष्कळ टाईप निरुपयोगीच रहातो. यामुळें जरी एका फरम्यांतील टाईपाचें वजन शंभर पौंड असलें तरी तो टाईप उपयोगांत येण्यास २०० पौंडांच्या केसेस खरडून काढाव्या लागतात. २०० पौंड म्हणजे सुमारें चार केसेस होतात. केसीमध्ये असलेल्या एकंदर टैपापैकीं जो प्रत्यक्ष उपयोगांत येणारा टाईप असतो त्याचें प्रमाण वाढवीत नेणे ही गोष्ट परिश्रमानेच साध्य होण्यासारखी आहे. पण त्या तऱ्हेचा संशोधक परिश्रम कोणी केला असेल असे वाटत नाहीं. शिवाय हें प्रमाण पुस्तकपरत्वें बदलतें. एखाद्या वेळेस मनुष्य एखादा कोश छापूं लागला म्हणजे पहिल्याच फरम्यांत "अ" चा तुटवडा पडेल, "ऋषि" हा शब्द अनेक वेळ एकाच फरम्यांत आला म्हणजे "ऋ" हें अक्षर कमी पडेल. यासाठीं मोठें पुस्तक छापणारानें आपल्यापाशीं मुद्रांचें ओतकाम करणारी फाउंडरी बाळगली पाहिजे किंवा जास्त टाईपच ठेवला पाहिजे. माझा अनुभव असा आहे कीं दीड फरमा रोज छापून निघावा अशी अपेक्षा

असल्यास सुमारें १५०० पौंड टाईप जप्यत ठेवावा लागतो एरव्हीं तें कार्य होत नाहीं. तो तसा ठेवावा लागतो याचीं कारणें म्हणजे त्याचा हिशोब येणेंप्रमाणें:—दीड फरमा रोज म्हणजे दोन दिवसांनी तीन फरमे छापणे. ज्या दिवशी जो फरमा छापावयाचा असेल त्याच्या आधल्या दिवशीं तो शेवटची तपासणी व शुद्धीकरण होऊन तयार रहावा लागतो. त्याच्या अगोदर ज्ञानकोश छापखान्यांत खालील तपासण्या होत असत:— (१) पहिलें कच्चे प्रूफ. (२) दुसरें प्रूफ. (३) यानंतर संपादकास कांहीं मजकूर घालावयास तें देण्यांत येत असे, व संपादकीय दुरुस्त्या होत त्यामुळें तिसरें प्रूफ काढावें लागे व त्यांत संपादकीय सर्व फेरफार आले आहेत कीं नाहीं हे पाहिलें जाई. (४) पेजप्रूफ. (५) पेज दुसरें प्रूफ. (६) मशीन प्रूफ. कधीं कधीं यातील एक दोन प्रुफें गाळली जात असत. तथापि जो फरमा आज कपोज होतो त्याच्या पुढले तीन फरमे छापखान्यातच राहून पांचवा फरमा छापावयास जाई; हा धोपट नियम सांगतां येईल. नियमानें दीड फरमा छापला जावयास पांच फरमे टाईप गुंतवावा लागतो आणि त्याच्या निदान दुप्पट तरी टाईप केसींत रहातो. तथापि एवढयानेच भागत नाहीं. कांहीं फरम्यांत खुणा किंवा विशिष्ट टाईप आणावयाचा झाला किंवा कोठें पुस्तक छापतांना संपादनखात्यास विधानाची चूक आढळून आली म्हणजे तो फरमा बाजूलाच पडतो. म्हणजे रोजचा दीड फरमा छापावयास सहा फरमे टाईप लागतो. याशिवाय केसींतला टाईप आणि प्रत्यक्ष उपयोगास येणारा टाईप, यांचे प्रमाण १०० शीं ५० असल्यास बारा फरम्यांचा म्हणजे १२०० पौंड टाईप लागतो. आर्यभूषण छापखान्यानें आमचें काम इतके दिरंगाईनें केलें याचें कारण त्यांनीं ५०० पौंड टाइपातच सर्व काम उरकण्याचा विचार केला आणि त्यासाठीं लागणारी रक्कम ५०० रुपये तयारीसाठीं आमच्या पासूनच मागून घेतले होते. छापखानदार वचनभंग करतात याचें कारण केवळ त्यांची लबाडी असते असें नाहीं तर त्यांच्यामध्यें फाजील आशावादीपणा असतो हें होय.

आमचा प्रकाशकांस असा सल्ला आहे कीं, मुद्रकाच्या आशावादीपणाविषयीं फार सावध रहावें.

———————

## प्रकरण ७ वें.

# गिऱ्हाइकीची जुळवाजुळव

ज्ञानकोशाच्या यशाचीं जीं कारणें असतील त्यांत गिऱ्हाइकी चांगली जुळली हे एक महत्त्वाचे कारण आहे आणि या कार्याप्रीत्यर्थ जे काम झाले त्यांत गिऱ्हाईकी जुळवण्यात जो वेळ किंवा मेहनत खर्च झाली ते अत्यंत महत्त्वाचे होय. या बाबतीत बरीचशी मेहनत प्रत्यक्ष मलाच करावी लागली. मला असे वाटते की, एकंदर झालेल्या गिऱ्हाइकांमध्ये निम्म्यापासून दोनतृतीयांश गिऱ्हाइकें मी स्वतःच जुळविली आहेत. गिऱ्हाइकी झाली ती कित्येकांच्या मते अपेक्षेच्या बाहेर झाली तर कित्येकांच्या मते या प्रयत्नाने आणखी गिऱ्हाइकी पाहिजे होती. माझी स्वत:ची कल्पना अशी होती की कमीत कमी १००० गिऱ्हाइकें होईल तर जास्तीत जास्त ५००० होईल परंतु प्रत्यक्ष गिऱ्हाईकी या दोहोंच्यामध्ये झाली. ही तीन हजार गिऱ्हाईकी समाजाच्या गरजेमुळे झाली काय तर हो असेच उत्तर द्यावे लागते. कित्येकास असे वाटते कीं, ज्ञानकोश ही सामाजिक गरज नसतां डॉ. केतकर यांच्या भिडेमुळे ख्यपली झाली. खरोखर वस्तुस्थिति अशी आहे कीं, ही गिऱ्हाईकी जी जुळली ती ज्ञानकोश ही एक समाजाची गरज होती म्हणूनच जुळली. मी स्वत: जी मेहनत घेतली त्यामुळे काही गिऱ्हाईकी मिळण्यास सोपेहि झाले असेल पण खरे कारण ती सामाजिक गरज होती हेचहोय.

व्यानव्हासिंग ज्यांनी चांगल्या तऱ्हेने केले अशा मंडळीमध्ये नागपूरचे रा. वासुदेवराव चितळे व रा. विष्णुबाबा अक्कलकोटकर यांचा अंतर्भाव करता येईल या दोघांनी प्रत्येकी २५० च्यावर ग्राहक मिळवून दिले आहेत. मी नेहमी असे म्हणतो कीं, एक चांगला व्यानव्हासर मिळवणे म्हणजे अनेक महाराज मिळवणे आहे. या दोघांनां ज्ञानकोशास ५० हजार रुपये मिळवून देण्याचे श्रेय आहे तर आमच्या दृष्टीनें हे मोठे कीं संस्थानिक मोठे!! ज्ञानकोशाच्या कार्याला राजेमहाराजे यांचा उपयोग फारसा झाला नाही, मध्यमवर्गाच्या सहानुभूतीचीच मदत जास्त झाली. राजे व संस्थाने यांची मदत येणेप्रमाणें सांगतां येईल:बडोदें २० प्रती, इंदूर ३ प्रती, ग्वाल्हेर ३ प्रती, सांगली ५, जमखंडी ४, मिरज ३, औंध ३, मिरजमळा १, रामदुर्ग १, भोर १

फलटण १, जत १, इचलकरंजी ३, म्हणजे एकंदर पन्नासच्या आंत बाहेर प्रती यांनी घेतल्या आहेत म्हणजे तीन हजारांत ५० म्हणजे शंभर रुपयांपैकी दीड पावणेदोन रुपयाची मदत या राजेरजवाड्यांकडून झाली आहे.

यावरून असे दिसून येते की, ज्ञानकोशासारखी आतां मोठाली कामे व्हावयाची झाल्यास लोकाश्रयानेच होतील. वाङ्मयविकास हा संस्थानिकाऱ्यावर मुळीच अवलंबून नाही. मी राजेरजवाड्याकडे फारसा गेलेलो नाही. कारण त्याच्यापासून होणाऱ्या फलप्राप्तीवर माझा विश्वासच नव्हता. सौ. शीलवतीबाई मात्र सांगली, जमखिंडी, मिरज,बुधगांव या ठिकाणी गेल्या होत्या व त्यांच्या जाण्यापासून काय प्राप्ति झाली तिचा अदाज वरच्या आंकड्यांवरून करतां येईल.

ज्ञानकोशाच्या वर्गणीदारांच्या व शेअरहोल्डरांच्या यादीकडे लक्ष फेंकलें म्हणजे थोडीशी चमत्कृति उत्पन्न होते. कंपनी स्थापन होतानांच ज्याची नांवे मेमोरांडम आणि आर्टिकल्सच्या कागदावर घेतली गेली अशी मंडळी म्हटली म्हणजे (१) डॉ. केतकर, (२) रा. माधवराव पाध्ये वकील, (३) रा. ना. ख. फडके वकील,(४) डॉ. ना. भा. खेर,(५) रा. धुंडीराज ठेंगडी, (६) डॉ. ल. दा. गद्रे, (७) डॉ. चोळकर, (८) रा. गोपाळराव ओगले (संपादक महाराष्ट्र), (९) रा. गा. चि. तांबे (१०) रा. भवाळकर वकील, (११) रा. नीलकंठराव उधोजी व (१२) डॉ. मुंजे ही होत, म्हणजे ४ डाक्टर, ५ वकील, १ एन्जीनिअर, १ वर्तमानपत्रकार आणि मी स्वतः याप्रमाणे होती. या मंडळीस कंपनीचे संस्थापक होण्याचे श्रेय मिळाले आहे. या मंडळीनंतरचे पहिले शेअरहोल्डर झालेले गृहस्थ म्हटले म्हणजे वामन वासुदेव चितळे वकील हे होत. यांनीं काहीं दिवसांनीं आणखी शेअरहोल्डर मिळविण्याचें कामहि केले आहे आणि त्यांच्या कामातील यशस्वितेचा उल्लेख मागें (पृ. ३९ पहा) आलाच आहे. यांनीं पुस्तकविक्री आणि प्रकाशन याची संस्था प्रथम आमच्याकडेसच घेतली आणि नंतर पुढें आपले कायद्याचें "डायजेस्ट" काढलें.

ज्ञानकोशाची गिऱ्हाईकी दोन प्रकारें होई. मंडळी शेअरहोल्डर होत व वर्गणीदार होत. शेअरहोल्डर होणे ही गोष्ट पुष्कळ लोकांस आवडत असे कारण शेअर घेणे हे वर्गणीदार होण्यापेक्षां अधिक आवडे. शेअर

घेणें म्हणजे कंपनीच्या कारभारांत आपण आहों, याचेंहि महत्त्व कांहीं लोकांनां असे. ज्ञानकोशाचे कंपनी संस्थापकांच्या बाहेरचे शेअरहोल्डर रा. चितळे पहिले होत. हे २५।६।१६ रोजीं शेअरसाठी अर्जदार झाले तर आमचे पहिले ग्राहक कै. पांडुरंग प्रभाकर जोशी हे होत. हे कंपनी धंदा सुरू करण्याची परवानगी २४।३।१७ रोजीं मिळाल्यानंतर थोडक्याच दिवसांनीं म्हणजे ३१।३।२७ रोजीं झाले. हे ज्ञानकोशाच्या कल्पनेशी अत्यंत सहानुभूति बाळगणारे होते. ज्ञानकोशाची कच्ची योजना मी प्रथम केली होती ती यांच्याच खोलीत बसून केली होती. रा. जोशी यांच्यानंतरचे दुसरे वर्गणीदार रा. रा. विष्णु विनायक परांजपे पुराणीक हे होत. हे ७।४।१७ रोजी तिसऱ्या प्रकारचे वर्गणीदार झाले. हे नागपुरास पुराण सांगण्याकरतां आले होते. व तेथे असतां त्यांस ज्ञानकोशाच्या कार्यास मदत करावी अशी इच्छा होऊन कांही तरी दक्षिणा देण्यासाठी आले. तथापि आमची दक्षिणा घेण्याची इच्छा नाहीं असे सांगितल्यानंतर त्यांनी असा प्रश्न केला कीं, तुमच्या कार्याला मदत करण्याची मला इच्छा आहे आणि वर्गणीदार होण्याची तर ऐपत नाही तर ही मदत करण्याची इच्छा मी कशी पूर्ण करून घ्यावी. तेव्हा आम्ही त्यास असा सोपा उपाय सांगितला की, वर्गणीदार व्हावे. व सहा महिन्यांचे आंत आम्हास वर्गणीदार रहाणे नाही अशी आम्हांस नोटिस द्यावी म्हणजे तुमची वर्गणी आम्ही जप्त करू. ही कल्पना त्यांनां पसंत पडली व ते वर्गणीदार झाले. सहामाहीच्या आंत आम्हांस, वर्गणीदारांतून आमचें नांव काढावे अशी नोटीस येण्याचे ऐवजी त्यांनीं आणखी ६० रु. आणून भरले व ते पहिल्या प्रतीचे वर्गणीदार झाले. पहिल्या प्रकारच्या वर्गणीदारांत श्रीमत लोकच असतील अशी ज्यांची कल्पना असेल त्यांनी लक्षांत ठेवावे की, या प्रकारचा पहिला वर्गणीदार भिक्षुक आहे. विष्णुशास्त्री परांजपे वर्गणीदार झाल्यानंतर थोडक्याच दिवसांनीं म्हणजे १२।४।१७ रोजी झालेले वर्गणीदार म्हटले म्हणजे स्वामी आत्मानंद सरस्वती हे होत. हे अर्थात सन्यासी म्हणजे ग्राहक या नात्याने ज्ञानकोशाच्या कार्यास टेकू देणारी ( कै. जोशी वजा जातां ) पहिली व्यक्ति भिक्षुक तर दुसरी सन्यासी, अर्थात ही गोष्ट मला फार उत्तेजक वाटली, पैसेवाल्यापासून आपण पैसे काढूच, पण गरीब विद्याभिलाषी मंडळी देखील ज्ञानकोश घेऊं इच्छितात हे सिद्ध झाले.

यानंतर पुढें मी पुष्कळ ग्राहक केले, एका दिवसांत सात सात पर्यंत ग्राहक मिळविले आहेत पण विष्णुशास्त्री पुराणीक यांच्या वर्गणीदार होण्यानें जो आनंद झाला तो मी पुढें कधींच विसरलों नाहीं!

माझ्याबरोबर जे एक दोन क्यानव्हासर गिऱ्हाईकी मिळविण्यासाठीं खटपट करीत होते त्यांची अशी समजूत होती कीं मला जी गिऱ्हाईकी मिळते ती केवळ माझ्या वजनामुळें मिळते. त्यांनां मला हें दाखवावें लागलें का मी प्रत्यक्ष कामच पुष्कळ जास्त तास करीत होतो. मी मुंबईत काम करीत असतां अनेकदां सकाळीं आठ वाजतां जो बाहेर पडे तों संध्याकाळी दहा वाजतां परत घरीं येत असे. ज्यावेळेस ज्या भागांत असेन त्या भागांत जेवीत असें, म्हणजे पारशी, इराणी, गोवा-नीज किंवा ब्राह्मणी विश्रांतिगृहांत "विश्रांति" येत असे. माझ्या बरो-बरच्या कांहीं क्यानव्हासरनां इतकें काम करणें म्हणजेच हलकटपणा वाटत असे. मुंबईत मिसेस केतकर आणि मी असे दोघेहि काम करीत असतां दोघेहि आठ वाजतां भिन्न दिशांनीं जात होतो ते रात्रीं १० वाजतां भेटत असूं. क्यानव्हासिंग करणें म्हणजे मोठें अपमानास्पद असे आमच्या महाराष्ट्रीय पगारी नोकरांस वाटतच होतें. आणि हे काम आपणाला नको म्हणून ते टाळण्याची प्रवृत्ति बहुतेक नोकरांत दिसून आली. महाराष्ट्रीय लोक व्यापारी नसल्यामुळे मागणी मिळविण्याच्या धंद्यांत पडलेले फारसे लोक मिळत नाहीत, इन्शुअरन्स कंपन्यांची माणसें कामाला घेण्याचा विचार केला पण त्यांत अडचण येत असे ती अशी कीं बरेच दिवस एखाद्या इन्शुअरन्स कंपनीमध्ये काम केलेल्या कित्येकांस असें वाटत असेल की सामान्य एजंटाला लोक ज्या तऱ्हेने वागवितात त्यापेक्षां मला निराळ्या तऱ्हेनें वागविणार आणि त्यामुळें माझें काम इतरांपेक्षां अधिक सुलभ होणार. पण इतर लोकांस अधिक वाईट बोलणी ऐकावी लागणार आणि लोकांच्या घरीं जाण्याचा जो कांहीं कटु अनुभव असतो तो मला मिळाला नसेल; पण ही कल्पना व्यर्थ आहे. ज्या मनुष्याला पैसे खर्च करावयाचे नसतात तो मनुष्य पुष्क-ळदां आपण कांहीं तरी कारणामुळें ज्ञानकोशावर रागावलो आहोत असे दाखवी. आणि कंपन्यांचा व्यवहार म्हणजे अगदी लुच्चेगिरीचा येथपासून सुरवात व्हावयाची. असले अनुभव क्यानव्हासिंगच्या प्रसंगी मला स्वतःला आलेले आहेत.

ज्ञानकोश घेण्याचा करार करणें हा दीर्घकालीन करार आहे आणि त्यामुळें कित्येक लोक असले करार करण्यास नाखूष असत. ते म्हणत कीं शंभर सव्वाशे रुपये भरण्याची जबाबदारी घ्यावी कोणी? अशा वेळेस माझें एक उत्तर पुष्कळदां ठरलेलें असे. मी त्यांस असें म्हणे कीं तुम्ही ज्यावेळेस लग्न केलें त्यावेळेस त्या दुसऱ्याच्या मुलीला जन्मभर आणि तिच्या व तुमच्या मुलांना ती मोठी होईपर्यंत पोसण्याची जबाबदारी तुम्ही पत्करलीच नाहीं काय? जर लग्नाच्या वेळीं तुम्हाला इतक्यानां पोसण्याचें सामर्थ्य आहे काय म्हणून विचारलें असतें तर तुम्हाला काय उत्तर देतां आलें असतें? त्यावेळेस तुम्ही केवळ शेसवाशे रुपये देण्याचीच जबाबदारी पत्करली असें नाहीं तर दरमहा निदान तितके, किंबहुना त्याच्या अनेकपट रुपये खर्च करण्याची जबाबदारी पत्करली. तर तुम्हांला कांहीं रुपये भरून वर्गणीदार व्हावयाची जबाबदारी पत्करावयास काही एक हरकत नाहीं! कित्येकांना या विधानाचें हसू येई तर कित्येकांना त्यांतील सत्यताहि दिसून येई.

क्यानव्हासिंगच्या कामांतील कांहीं मौजा सांगितल्या तर थोडीशी करमणूक होईल. ज्ञानकोश ही वस्तु चांगली आहे हे लोकास पटवावयास वेळ लागत नसे. त्याचें शिक्षणविषयक महत्त्व देखील सहज स्पष्ट करता येई. मुलांच्या अभ्यासक्रमाकडे त्याचा उपयोग काय होणार म्हणून कोणी विचारलें तर असें सांगता येई कीं प्रत्येक मुलाची जिज्ञासेची वर्षे म्हणजे १४ पासून २५ हीं होत. पंचविशी उलटते त्या सुमाराला मनुष्य थबाला लागतो, आणि पुढें त्याचें फारसें वाचन होतच नाहीं. चौदापासून वीस वर्षांपर्यंत त्याचा इंग्रजी भाषेशीं फारसा परिचय नसतो आणि इंग्रजी लेख त्याला सहज समजत नाहीं. अशा वेळेस त्याला पाहिजे ती माहिती मराठींतूनच मिळाली तर त्याचें काम सोपें होतें. शिवाय आपला अनुभव असा आहे कीं आपण व्याख्यान अगर पुराण ऐकत बसलों तर पुष्कळ गोष्टी आपल्या कानांवरून जातील पण त्या लक्षांत रहात नाहींत तथापि जर आपणांस एखाद्या गोष्टीसंबंधानें जिज्ञासा उत्पन्न झाली असतां तीसंबधानें माहिती मिळविली तर ती चांगली लक्षांत रहाते. जर मुलास जिज्ञासा उत्पन्न होऊन त्यानें ज्ञानकोश उघडून पाहिला तर ती माहिती जास्त लक्षांत रहाण्याचा संभव आहे. तर मुलांस संदर्भग्रंथ उघडून माहिती मिळविण्याची संवय लावली पाहिजे. हे म्हणणें पुष्कळांस पटत असे.

नागपूरचे रा. चितळे वकील यांचे वडील वासुदेवराव चितळे यांनीं ज्ञानकोशाला ग्राहक मिळविण्याचे काम चांगल्या तऱ्हेने केले. यांच्या कामगिरीबद्दल अभिज्ञता देखाल कंपनीने बऱ्या प्रकारे दाखविली आहे. यांनी आम्हांस तीनशेच्या वर ग्राहक मिळवून दिले म्हणजे कंपनीस चाळीस हजार रुपयांच्यावर प्राप्ति करून दिली. क्यानव्हासिंगची यांची शैली इतर मंडळींच्या पद्धतीपेक्षा भिन्न असे. त्यांना गिऱ्हाईक धरताना हे केने काय बोलत होते मी एकदोनदां प्रत्यक्ष पाहिले आहे. व कांही गिऱ्हाइकांच्या तोंडून जी कथा कळली तीवरून ओळखले आहे. हे पेन्शनर असल्यामुळे व नोकरीनिमित्त याना अनेक ठिकाणी हिंडावे लागे त्यामुळे यांच्या मूळच्याच ओळखी पुष्कळ होत्या. आणि कोणीहि मनुष्य भेटला म्हणजे त्याच्या आप्तापैकी कोणी तरी यांच्या ओळखीचा निघावयाचाच. मग ज्याला हे भेटत तो ब्राह्मण असो अगर प्रभु असो. ओळखी निघाल्यावर त्या गृहस्थाचे यांच्या ओळखीचे दुसरे आप्त कोठे आहेत याची चौकशी व्हावयाची. पण हे सर्व अगोदर बोलून मग आपले काम सांगावयाचे असे हे करीत नसून अगोदर आपण कशा करितां आलो हे सांगावयाचे आणि बोलता बोलता ती चौकशी करून आपण त्या व्यक्तीच्या मित्रमंडळींतलेच आहोत असे त्यास भासवावयाचे. यांच्या ज्या ओळखी निघत त्या विशेषकरून ज्यास ते गिऱ्हाईक करू पहात त्यांच्या वडिलांशी किंवा चुलत्याशी किंवा मामाशीं निघत; त्यामुळे ते आपल्या मंडळींतलेच पण ज्यांच्यावडे वडीलपणाचे नाते येत अशापैकी आहेत असे ग्राहकास वाटे, व त्यामुळे त्यांचा प्रसंगविशेषी विशेष सत्कारहि होई. रा चितळे यांचे इंग्रजी शिक्षण झालेले नव्हते पण त्यांच्यामध्ये संभाषणकौशल्य चांगल्या प्रकारचें होते व ते अनेक विषयांवर बोलू शकत. कॉफी किंवा चहा आला तर तो घ्यावयाचा, असा त्यांचा नियम असे पण प्रत्येक ठिकाणी चहा घ्यावा लागेल या भीतीने अर्धाच कप चहा घ्यावयाची खबरदारी ते ठेवीत.

रा. विष्णुबाबा अक्कलकोटकर यांची शैली निराळ्या प्रकारची होती. त्यांचा प्रचारक्रम येणेंप्रमाणे असे:–एक तर कोठेहि गेले तर कोणा वकीलाकडे उतरावयाचे, पहिले दिवशी वकील मंडळीच्या टेनिसक्लबाकडे जावयाचें, तेथे त्यांची ओळख करून दिली जाई. तेथे नंतर टेनिस खेळावयाचे, आणि टेनिस खेळल्यानंतर काळोख पडल्यावर मंडळी गप्पा

मारायला लागतातच, तेथें बराच वेळ बसून रहावयाचें म्हणजे मंडळींनी ज्ञानकोशासंबंधाचे प्रश्न विचारले म्हणजे त्यांना उत्तरें द्यावयाचीं, त्यांत अनेक गोष्टी सांगावयाच्या, आणि नंतर दुसऱ्या दिवशीं मंडळीकडे व्यक्तिशः जावयाचें; आणि ज्ञानसंवर्धन आणि ज्ञानाचा प्रसार यासंबधानें भावना जागृत करावयाची, व त्या मंडळीस गिऱ्हाईक करावयाचें.

कंपनीच्या संपादकीय शाखेकडे काम करणाऱ्या मंडळींनींहि गिऱ्हाइकी मिळविण्याचें काम केले आहे. या कार्यांत रा. दाते, रा. भावे, रा. कर्वे. रा. चांदोरकर यांनीं कामे केलीं आहेत व त्यांच्या संयुक्त प्रयत्नामुळे १५० च्यावर गिऱ्हाइकी झाली आहे. सौ. शीलवती केतकर आणि मिस् कोहन यांची गिऱ्हाइकी सुमारें ५० पर्यंत झाली आहे. म्हणजे ज्ञानकोशाला गिऱ्हाईकी मिळविण्याच्या कामांत पुष्कळ मंडळीकडून प्रयत्न झाला आहे. श्रौताचार्य धुंडीराज बापट व सेनापति बापट यांच्या नांवावर प्रत्येकी २० गिऱ्हाइकी तरी मांडतां येईल.

---

## प्रकरण ८ वें.

## संपादकीय वृत्ति

ज्ञानकोशाच्या संपादनाचा इतिहास थोडासा सविस्तरपणे दिला पाहिजे. कारण बऱ्याच वाचकांस त्याच्यासंबधाने जिज्ञासा आहे. आणि सविस्तर इतिहास द्यावयाचा म्हणजे पहिली कल्पना, त्या कल्पनेमागे असलेली विद्याविषयक दुःस्थितीची जाणीव, व ती जाणीव झाल्यामुळे संपादकीय कार्यपद्धति, कार्यांतील अडणची आणि ग्रंथप्रसिद्धीनतरचे स्वागत या सर्व गोष्टी दिल्या पाहिजेत. एवंच त्या इतिहासाचीं अनेक अंगे आहेत. आम्ही ज्या अपेक्षा मनांत बाळगल्या त्या पूर्वीच प्रसिद्ध केल्या आहेत, आणि त्या प्रत्यक्ष संपादकीय कार्यांत उतरविल्या आहेत. ज्ञानप्रगतिविषयक आमच्या भावना आणि ज्ञानविषयक स्थितीच्या जाणीवेमुळे ज्ञानकोशरचनाप्रसंगीं जे एक विस्तृत ध्येय ठेवले होतें ते ध्येय याची मांडणी पूर्वीच झालेली आहे. ती मांडणी आज पुन्हां छापली असतां ज्या गोष्टी अपूर्ण राहिल्या असतील त्या

पुढील कार्यकर्त्यांच्या नजरेस येतील. त्या गोष्टी पुऱ्या झाल्या नसल्यास त्या पुऱ्या करण्याचा प्रयत्न इतःपर व्हावा म्हणून संपादकीय कल्पनेची पूर्वीची मांडणी येथें आम्हीं पूर्णपणें देत आहों.

ज्ञानकोशाच्या कार्यासंबंधीं आमच्या कल्पना काय होत्या त्या लोकांस कळाव्या म्हणून पूर्वीं एकदां लोकशिक्षणांत दोन लेखांकांत ( वर्ष ७ अंक २–३ ) त्या मांडल्या होत्या, त्याच लेखांतील उपयोगी भाग येथें उध्दृत करतों.

## ज्ञानकोश करावयाचा तो कां ?

या प्रकारच्या प्रयत्नाची आवश्यकता किती आहे याबद्दलची जागृति करण्याची योग्य वेळ म्हटली म्हणजे कार्यारंभापूर्वीची आहे असें कित्येकास वाटेल. कांही अंशीं तें म्हणणें खरेंहि आहे. तथापि आवश्यकतेविषयीं कार्यारंभापूर्वीच वादविवाद उत्पन्न करण्याची आमची इच्छाच नव्हती; त्याचा परिणाम असा होणेहि शक्य होतें कीं, कार्य वादविवादाच्या पलीकडे सरकलेंच नसतें. आतां कार्याची शक्यता केवळ कल्पनेतच नाहीं; कल्पना दृश्यफल पावण्याच्या मार्गास लागली आहे. महाराष्ट्रातील बहुतेक विद्वान व सुशिक्षित मंडळी या कार्यांत अडकली गेली आहे व आतां हा अशक्य वेडा प्रयत्न आपण सोडून द्या असें गंभीरपणानें सांगणारा गृहस्थ कोणी पुढें सरकेल असें वाटत नाहीं व सरकला तरी त्याची फिकीर नाहीं. कां कीं, आता पळून जाण्यास कार्यकर्त्यास वाटच नाही. ज्ञानकोश आतां असावा किंवा नसावा हा प्रश्न पुढे नाही. होणारा ग्रंथ कसा असावा याविषयीच कोणीहि झाला तरी कल्पना सुचवील. आम्ही आपलें कार्यध्येय पुढे मांडीत आहोत आणि आमच्या कार्यध्येयाचें परीक्षण आम्ही लोकांकडून अपेक्षितो. अनेकांच्या कल्पनांचें एकीकरण करून त्यांची ग्राह्याग्राह्यता व युक्तायुक्तता यांचा विचार करणें हेंच काम आमच्याकडे येईल. निरनिराळ्या सुशिक्षितांनीं आपल्या कल्पना आमच्याकडे पाठविल्यास आम्हांस आनंद होईल.

ज्ञानकोशाचें काम सर्व राष्ट्राच्या सहकारितेनें पार पडणार आहे. कोणत्याहि शासनविषयक कार्यामध्यें दोन भाग असतात, एक ध्येयनिर्णय आणि दुसरा कार्यकारिता. ध्येय ठरविणारी मंडळी निराळी आणि त्या ध्येयाप्रमाणें कार्य पार पाडणारी मंडळी निराळी असते. सर्व

लोकांकडून आम्हांस सहकारिता जर मिळाली तर ती सामान्यतः ध्येय-निर्णयापुरती मिळणार. कार्य जे करावयाचे तें सर्व एकसूत्राने एका विशिष्ट योजनेत बसविण्यासाठी व्हावयाचें आणि यामुळे ज्ञानकोशघटनेमध्ये अत्यंत मर्यादित प्रमाणाने बाहेरच्या लेखकांची आणि सुशिक्षिताची मदत घेतां येते. सर्व सुशिक्षितांकडून आम्ही खालील गोष्टींत सहकारिता अपेक्षितो--

(१) ज्ञानकोशांत आपण कोणत्या प्रकारचा मजकूर अपेक्षितां यासंबंधाने आपले मत व्यक्त करणे.

(२) जी स्थानिक माहिती मागितली जाईल, ती शक्य अल्यास देणे.

(३) ग्रंथाचे वर्गणीदार अगर भागीदार होऊन मदत करणे.

ज्ञानकोशाच्या कचेरीबाहेरील गृहस्थास फारच नियमित प्रमाणाने लेखनसाहाय्य करणे शक्य आहे. याचे कारण, बाहेरच्या गृहस्थास लेख लिहावयास सांगितला तर त्यास अवश्य ती ग्रंथसामग्री मिळविणें शक्य होत नाही, आणि आपापला विषय लिहावयास यथास्थित ग्रंथसामग्री असल्याशिवाय त्यास लेख चांगल्या तऱ्हेने लिहिता येणार नाही. प्रत्येक लेखकाकडे ग्रंथसामग्री पाठवून देणे आम्हास शक्य नाही आणि या प्रकारच्या अडचणीमुळे आम्हांस कित्येक कळकळीच्या लोकाचें लेखनसाहाय्य खेदाने नाकारावे लागले. अमेरिका व यूरोप येथील ज्ञानकोशाचे लेखक निरनिराळ्या ठिकाणी असतात. पण त्यात बरेचसे त्या त्या विषयाचे जन्माचे व्यासंगी असल्यामुळे त्यांच्यापाशीच ग्रंथसंग्रह असतो. त्यापैकी पुष्कळ युनिव्हर्सिटयामधून प्रोफेसर असतात आणि त्यामुळे त्यास ग्रंथाची कमतरता नसते. याशिवाय पुष्कळ लोक न्यूयार्क, बोस्टन, फिलाडेल्फिआ यांसारख्या शहरी असतात, तेथे प्रचंड सार्वजनिक ग्रंथालयें असतात, त्यामुळे त्यांस ग्रंथांची अडचण भासत नाहीं. हिंदुस्थानांतील परिस्थिति अगदी निराळी आहे. महाराष्ट्रात मुंबई व नागपूर या दोन शहरांखेरीज इतरत्र ग्रंथसंग्रहहि चांगल्या प्रकारचा नाही. अर्थात सर्वसामान्य जनतेकडून द्रव्य पुरविणे व आपल्या अपेक्षा कळविणे यापलीकडे मदत होणे शक्य नाही.

आमच्या पुष्कळ हितचिंतकांची एक समजूत अजून आहे ती ही की, आम्ही काय करणार, तर ब्रिटानिकासारखा ग्रंथ घेऊन त्याचे

भाषांतर करणार! ही समजूत चुकीची आहे. पुष्कळांचा असा समज होण्याचें कारण असे असतें की, ब्रिटानिकासारखा ग्रंथच त्यांनी सूक्ष्मपणे अवलोकन केलेला नसतो. ब्रिटानिका एकदां काळजीपूर्वक चाळून पाहिला म्हणजे कोणाहि वाचणाराची खात्री होईल कीं, ब्रिटानिकाचें भाषांतर करण्याकडे कोणाहि सुशिक्षिताची प्रवृत्तीच होणार नाहीं. ब्रिटानिकामध्यें वारंवार आढळून येणारे माहितीचे दोष बरेच आहेत. ब्रिटानिकाप्रमाणे आमच्या ग्रंथात देखील दोष रहाणे शक्य आहे. म्हणून या मुद्दयावर मी सध्यां फारसा भर न देता केवळ स्थूल भेदाकडेसच वळतो.

प्रथमतः हे लिहिले पाहिजे कीं,ब्रिटानिकांतील बरीचशी माहिती आपणांस अनवश्यक आहे. ब्रिटानिकांतील आपणांस अनवश्यक अशी माहिती आपण काढून टाकली तर त्या ग्रंथांतील ग्राह्य भाग दोनतृतीयांशानें कमी होतो. तो इतका कमी कसा काय होतो याची स्पष्ट कल्पना येण्यासाठींच हें विधान सविशेष केले पाहिजे.

ब्रिटानिकांतील अनवश्यक माहितीचीं अंगे येणप्रमाणे:—

( १ ) सामान्य चरित्रांपैकी नऊदशांश भाग.

( २ ) वाङ्मयेतिहासापैकीं व तदंतर्गत चरित्रापैकी निम्याहून अधिक भाग.

( ३ ) यूरोपीय इतिहास व तदंतर्गत चरित्रापैकी निम्याहून अधिक भाग.

( ४ ) भूगोलविषयक वर्णनापैकी निम्याहून अधिक भाग.

( ५ ) ख्रिस्ती संप्रदायाच्या इतिहासापैकी शेकडा ९५ हिस्से.

कोणत्याहि राष्ट्राच्या ज्ञानाचे आणि ज्ञानविषयक अपेक्षांचे विशेषत्व या वरील भागांतील विवेचनामुळेंच सिद्ध होत असते. आणि वर लिहिलेल्या बाबतींत जर ब्रिटानिका आहे तसा नसता तर ब्रिटानिकाच्या अस्तित्वाचीच जरूर नसती. कारण शास्त्रे, धंदे, कला या गोष्टी सर्वसामान्य आहेत. प्रत्येक ग्रंथांत आपल्या राष्ट्रांतील लोकांच्या अपेक्षेप्रमाणें मजकूर द्यावा लागतो. जो भाग आपणास अनवश्यक आहे तो ब्रिटानिकांत घेतला नसता तर ब्रिटानिका हा ग्रंथ इंग्रज राष्ट्रास त्याज्य झाला असता.

आपले मुख्य कर्तव्य आपण न्यायासनावर बसून ब्रिटानिकाची चौकशी करण्याचे अगर ब्रिटानिकाशी स्पर्धा करण्याचे नाहीं.

ज्ञानकोशाच्या ग्राहकांत इंग्रजी जाणणारा वर्ग बराच मोठा आहे. ज्या गोष्टी सुशिक्षित भारतीयास अनवश्यक आहेत तथापि परकीय देशांचा सूक्ष्मपणे अभ्यास करणाऱ्यांसच आवश्यक आहेत त्या ब्रिटानिकांतून लोकांनी घ्याव्यात.

आपणांस अनवश्यक भाग म्हणून वर सांगितलें, त्यांपैकीं प्रत्येक भागाची स्पष्ट माहिती होण्यासाठीं कांहीं बाबींची फोड येथें करितों. उदाहरणार्थ, वाङ्मयेतिहास व राजकीय व इतर चरित्रें घ्या; यापैकीं फारच थोड्यांची आपणास जरूरी आहे. ब्रिटानिकानें दिलेल्या चरित्रांची यादी येणेंप्रमाणें:—

| विषय. | चरित्रसंख्या अदमासे. | आपणांस अवश्य. |
|---|---|---|
| मानवशास्त्र आणि मानवेतिहास | ३० | २० |
| पुराणवस्तुशोधन | ७५ | ३० |
| वास्तुसौंदर्यशास्त्र | ९० | ५ |
| संगीत | ४२० | १० |
| चित्र आणि कोरींव काम | ९६० | २५ |
| खोदकाम | २०० | १० |
| किरकोळ कला | ६० | १० |
| नृत्य | २५० | ० |
| रसायनशास्त्र | १२० | ६० |
| ज्योतिष | १०० | ४० |
| जीवशास्त्र | २०० | २५ |
| समाजशास्त्र,शिक्षण व अर्थशास्त्र | ३७५ | ४० |
| भूगोलविज्ञान | २५० | २५ |
| भूगर्भशास्त्र | २७५ | ८५ |
| यूरोप व अमेरिकेंतील ऐतिहासिक पुरुष | ४५०० | ३०० |
| धंदे | १२० | ४० |
| कायदा व शासनशास्त्र | ३५० | २५ |
| यूरोपीय वाङ्मय | ४००० | २५० |
| गणित | १२५ | ४० |

| विषय. | चरित्रसंख्या अदमासें | आपणांस अवश्य. |
|---|---|---|
| पाश्चात्य वैद्यक | १७५ | २५ |
| युद्धशास्त्रलेखक | ५० | ०. |
| " फिलॉसफी " | ४०० | ४० |
| पदार्थविज्ञान | १२५ | १० |
| पाश्चात्य साधु ख्रिस्ती संप्रदायांतील लेखक | ७०० | २५ |

येणेप्रमाणे स्थूल मोजदाद करून किती चरित्रे आपणांस अनवश्यक आहत हें लिहिले; पण एवढ्यानेच अनवश्यक भागाचे त्या विषयापुरते मापन झाले असें होत नाही; कां कीं, प्रत्येक चरित्रांतील बराचसा भाग आपणांस अनवश्यक असतो. प्रत्येक चरित्रात नातीगोती. अनेक चरित्रकारांचे तत्कालीन स्त्रियांबरोबर असणारे बरेवाईट संबन्ध यांची माहिती त्यांत असते; ही सर्व आपणांस अनवश्यक आहे. पाश्चात्य चरित्रांतून आपणांस जे हवे ते हे कीं आपापल्या विषयापुरते अमुक व्यक्तीने कार्य काय केले.

ब्रिटानिकांतील वर सांगितलेला चरित्रांचा आपणांस अनवश्यक भाग काढून टाकला म्हणजे आपल्या वाटणीस सुमारें निम्मा ब्रिटानिका उरला.

आतां भूगोलविषयक भाग घेऊं. त्याचे वरीलप्रमाणें पूर्ण पृथक्करण न करितां स्पष्टीकरणार्थ कांही गोष्टी पुढे मांडतो:—

| देश. | ग्रामसंख्या वगैरे. | आपणांस अवश्य |
|---|---|---|
| आस्ट्रिया हंगेरी | २४० | २५ |
| बेल्जम | ७५ | ८ |
| फ्रान्स | ७२५ | ५० |
| जर्मनी | ८०० | ५० |
| इटली | ७२५ | ५० |
| स्पेन | २४० | २० |
| रशिया | ३६० | २५ |
| युनायटेड किंग्डम | १७५० | ६० |
| युनायटेड स्टेट्स | १२०० | ६० |

हीं नुसतीं लेखांचीं नांवें झालीं. याशिवाय येथे हेहि सांगितले पाहिजे की, अनेक लेख फारच लांब आणि सूक्ष्म आहेत. इंग्लंडमधील काही तालुक्यांवरील लेख पांचपासून दहा पृष्ठे लांब आहेत आणि कांहीं त्याहूनहि लांब आहेत यांतला फारच थोडा भाग आपणांस अवश्य आहे.

आतां ख्रिस्ती संप्रदायाचा इतिहास घेऊं. नुसता बायबलावरील लेख ५४ पृष्ठे लांब आहे आणि बायबलामध्ये येऊन गेलेल्या पुस्तकावर स्वतंत्र लेख आहेत. त्यांची मोजदाद केली असतां १५० पेक्षा अधिक पृष्ठे होतात. शिवाय बायबलामध्ये जे ऐतिहासिक विषय येऊन गेले आहेत त्यांस दिलेल्या जागेची मोजदाद केली असतां आणखी ६० पृष्ठे भरतील. ख्रिस्ती संप्रदायाच्या इतिहासावर एकंदर सुमारे ८०० पृष्ठे लागली असतील असा अदमास आहे. आपणास ख्रिस्ती वाङ्मय व संप्रदायाचा इतिहास यांवर सुमारे चाळीस पृष्ठें मजकूर दिला असता बस्स आहे.

अर्थात् ब्रिटानिकांतील दोनतृतीयांश भाग असा आहे की, तो आपणास जवळजवळ निरुपयोगी आहे. म्हणजे आपण असे समजावें की, जर ब्रिटानिकासाठीं ४५० रुपये खर्च केले असले तर फक्त १५० रुपयांचा माल आपल्या हातीं आला.

आतां ज्या भागाकडे ब्रिटानिकाने अजीबात दुर्लक्ष केले आहे किंवा ज्यास फारच कमी जागा दिली आहे तिकडे वळतो. आणि त्याविषयी स्थूल विवेचन झाले म्हणजे मग आपलें कार्यध्येय स्पष्ट करितो.

महाराष्ट्रीय ज्ञानकोश म्हणजे ब्रिटानिकासारख्या ग्रंथाचे केवळ रूपांतरच नाही हे दाखविण्यासाठीं ब्रिटानिकांतील आपल्या दृष्टीने अनवश्यक अशा भागाचे दिग्दर्शन केलेच. आतां महाराष्ट्रीय ज्ञानकोशात नको काय हे सांगण्याबरोबर हवे काय हे सांगणे ओघानेच प्राप्त झालें.

महाराष्ट्रीय ज्ञानकोशकारांचे कर्तव्य काय याचें स्पष्टीकरण होण्यासाठीं, ज्ञानकोशाचे मराठी वाङ्मयाच्या इतिहासांत स्थान कोणते आहे, याविषयीं विचार आपोआपच उत्पन्न होतो. या विषयावर ज्ञानकोशकारांनी आपल्या मनाशीच विचार केला आहे, तो येणेंप्रमाणेः—

( १ ) महाराष्ट्रीय ज्ञानकोश म्हणजे पूर्वपरंपरागत ज्ञान आणि भविष्यकालीन स्थिति यांस जोडणारा दुवा होय.

( २ ) आतांपर्यंत झालेल्या वाङ्मयातील ग्राह्य भाग निवडणे त्याचें कर्तव्य आहे.

( ३ ) मराठी भाषेंत अनेक लेखकांनी आपले एका विषयावरील विचार व्यक्त करण्यासाठी निरनिराळे शब्द योजिले असतां जें भाषाद्वैत उत्पन्न झालें असेल तें काढून टाकून भाषा स्थिर करणे त्याचें कर्तव्य आहे.

( ४ ) महाराष्ट्रांतील पंडितवर्गांत वागत असलेलें विविध ज्ञान मराठी भाषेंत व्यक्त झालेंच नसल्यास तें व्यक्त करण्याची संधि त्यास देणें हेंहि ग्रंथकाराचें कर्तव्य होय.

( ५ ) पाश्चात्त्य संस्कृति व परंपरागत संस्कृति यांचें एकीकरण करण्याचें स्थान महाराष्ट्रीय ज्ञानकोश होय.

( ६ ) शेतकी व सुशिक्षित वर्गाचे धंदे हे करण्यापलीकडे महाराष्ट्रीय समाजामध्यें कार्यक्षमता नाहीं, तर समाजाचें कार्यक्षेत्र अधिक विस्तृत होणें शक्य होण्यासाठीं वाङ्मय द्वारें जी मदत करणें शक्य असेल ती करणें ज्ञानकोशाचें कर्तव्य होय.

( ७ ) समाजांत ज्या क्रिया येथें होत असतात त्यांचें उत्तान अगर परिणत स्वरूप कोठें अन्यत्र दृग्गोचर होत असेल तर तें दाखविणें हेंहि ज्ञानकोशाचें कर्तव्य होय.

( ८ ) हिंदु समाजाचे व विशेषेंकरून महाराष्ट्रीय समाजाचे हितसंबंध ओळखून तद्विषयक माहिती वाचकांपुढें ठेवणें हेंहि ज्ञानकोशाचें ध्येय आहे.

महाराष्ट्रीय ज्ञानकोशाचीं शेकडा ३५ पृष्ठें भारतीय संस्कृतीच्या स्पष्टीकरणासाठीं दिलीं आहेत, आणि केवळ शेकडा १५ पृष्ठें बाह्य संस्कृतीच्या उद्बोधनासाठीं दिलीं आहेत. आमची योजना ज्या वेळेस प्रसिद्ध झाली त्या वेळेस कांहीं पत्रकारांनीं याबद्दल ज्ञानकोशकारांस पक्षपाताचा दोषहि दिला होता. त्या वेळेस जें स्पष्टीकरण केलें होतें, तेंच पुनः एकदां करतो.

परक्या देशाची आपणांस केवळ स्थूल माहिती हवी असते; तथापि आपल्या देशाची आपणांस सूक्ष्म माहिती पाहिजे असते. आपल्या

देशाची माहिती देतांना, आपल्या देशांतील पंडितवर्गास उपयोगी पडेल असा ग्रंथ केला पाहिजे. सामान्य जनता व आपल्या देशासंबंधानें संशोधन करणारा वर्ग यांच्या ज्ञानांत जें आज जमीनअस्मानाचे अंतर आहे, तें काढून टाकावयाचा प्रयत्न केला पाहिजे. महाराष्ट्रीय जनतेची ही मोठी बौद्धिक गरज आहे, आणि ज्ञानकोशकारांनीं ती लक्षांत घेतलीच पाहिजे.

महाराष्ट्रीय ज्ञानकोश हा महाराष्ट्राचें बौद्धिक स्वातंत्र्य स्थापन करण्यासाठीं झालेला प्रयत्न होय. महाराष्ट्राचें बौद्धिक स्वातंत्र्य कसें प्रस्थापित होईल हा विचार करण्यासाठीं बौद्धिक स्वातंत्र्याचा अभाव म्हणजे काय हे समजलें पाहिजे.

जेव्हां मनुष्य स्वतःच्या विचारापेक्षां परक्याच्या मतास अधिक मान देतो तेव्हां त्यास बौद्धिक परावलंबित्व थोडे तरी म्हटलेच पाहिजे. तथापि समाजांत बरेंचसें बौद्धिक परस्परावलंबित्व असतेच. उदाहरणार्थ, आपण डॉक्टरचा, वकिलाचा किंवा खरेदीविक्रीच्या प्रसंगीं दलालाचा सल्ला घेतो. हा अर्थात योग्यच प्रकार आहे. तज्ज्ञाकडे जाणें कोणासहि लाच्छनास्पद नाहीं. आपणास हें बौद्धिक परस्परावलंबित्व नष्ट होऊं द्यावयाचें नाहीं; उलट वृद्धिंगत करावयाचें आहे. समाजांतील अनेक व्यवहार तज्ज्ञांच्या सल्ल्यानें झाले म्हणजे हातून होणाऱ्या खटपटींची कार्यकारिता वाढते व समाजाचें कल्याण होतें. तज्ज्ञांच्या सल्ल्यानें चालणें म्हणजे तज्ज्ञाकडून स्वतःस ठकवून घेणें मात्र नव्हे; तर स्वतः कांहीं ज्ञान मिळवूनहि कार्य अधिक योग्य व्हावें म्हणून विशेषज्ञाकडे जाणें होय. समाजांतील परस्परावलंबित्व कायम पाहिजेच; पण एका राष्ट्रास दुसऱ्या राष्ट्रावर अवलंबून रहावें लागावें हे हितावह नाहीं. व्यापारांत कांहीं अशी परावलंबन प्रत्येक राष्ट्रास भाग आहे. तथापि बौद्धिक बाबतींत परावलंबित्व धोक्याचें व राष्ट्रास अत्यंत कमीपणा आणणारें आहे. त्यांतल्यात्यांत जें ज्ञान राष्ट्राच्या हिताशीं निकटतेनें संबद्ध आहे, त्यांत परावलंबित्व फारच धोक्याचें आहे. उदाहरणार्थ, वेदांत काय आहे, हे आपण इंग्रजांस अगर जर्मनांस विचारावें आणि त्यानें अपणापुढे पांडित्य करावें, यासारखी खेदाची दुसरी कोणती गोष्ट आहे बरें? पण आज वस्तुस्थिति मात्र

## ज्ञानकोशमंडळांतील कार्यकर्ते



रा. ग. ना. टिळक हिशेबनीस.



वे. चिं. शं. दातार शास्त्री.



प्रो. वै. का. राजवाडे व्यवस्थापक-पुणें शाखा.




*

# ज्ञानकोशमंडळाचे सावकार व कांहीं डायरेक्टर



रा. अ. चिं. भट



रा. ल. ब. फाटक.



श्रीमती गंगाबाई पेंडसे.

तशी आहे, हें मोठया खेदानें म्हणावें लागतें. पण येथें नुसतें अश्रु ढाळून काय उपयोग? या परावलंबित्वाची कारणमीमांसा केली पाहिजे.

तर्कशास्त्रांत ज्याप्रमाणें साधारण कारणें म्हणजे ईश्वर,काल, दिक् हीं आहेत पण कारणमीमांसेंत तीं बाजूस ठेवून असाधारण कारणें शोधावयाचीं असतात. त्याप्रमाणें दारिद्र्य, देशांतील उष्ण हवा, परराज्य या प्रकारचीं सर्व प्रकारच्या अवनतींचीं साधारण कारणें बाजूस ठेवून बौद्धिक दास्याचीं निकट कारणें कोणतीं आहेत, इकडे लक्ष दिलें पाहिजे.

आज आपणांस आपल्या देशाविषयींच्या अनेक गोष्टींविषयीं माहिती मिळविण्यासाठीं पाश्चात्त्य ग्रंथकारांच्या ग्रंथांकडे पहावें लागतें आणि पाश्चात्त्य भाषा अवगत झाल्याशिवाय किंवा संस्कृत भाषेचें पांडित्य असल्याशिवाय आपणास कोणत्याहि विषयावर माहिती मिळत नाहीं. मृत भाषा सर्वांस समजणे शक्य नाहीं, म्हणून भाषांतरें लागतात. जितक्या संस्कृत ग्रंथांचीं भाषांतरें इंग्रजी, फ्रेंच किंवा जर्मन या भाषांमध्यें झालीं आहेत, तितकीं हिंदुस्थानांतील कोणत्याहि भाषांत झालीं नाहींत ! आज पुष्कळांस संस्कृत ग्रंथांतील अर्थाचें ज्ञान इंग्रजी पुस्तकांवरून करून घ्यावें लागतें. त्यामुळे परावलंबित्व उत्पन्न होतें.

परावलंबित्वाचें दुसरें कारण असें आहे कीं, पाश्चात्त्य देशांतील सामान्य ठिकाणीं जशीं ग्रंथालयें आहेत, तशीं मुंबईस किंवा कलकत्त्यासहि नाहींत. संस्कृत भाषेत जें ज्ञान आहे त्याचा गोषवारा देणारे, त्यावर ऐतिहासिक विचार प्रदर्शित करणारे, जगाच्या इतिहासांत त्यांचें स्थान मोजणारे जसे ग्रंथ व लेख पाश्चात्त्य भाषांत आहेत, त्याच्या शतांशहि आपल्याकडे नाहींत. त्यांच्या बाबतींत परावलंबित्व घालवून देण्याचा प्रश्न येतच नाहीं. एकंदर ज्ञानक्षेत्राविषयीं तर बोलावयासच नको. ज्ञानविषय किती आहेत याची कल्पना जेव्हां येईल तेव्हां प्रत्येक विषयावर काय लिहिलें आहे हें जाणण्याची जिज्ञासा उत्पन्न होणार. अनेक विषयांसंबंधानें प्राथमिक स्वरूपाचीच माहिती ज्ञानकोशांत येईल. यापेक्षां अधिक दिली तर आपल्या वाचकवर्गास पचावयाचीच नाहीं. 'प्राथमिक स्वरूपाची' याचा अर्थ हायस्कुलांतील विद्यार्थ्यांस साजेलशी असा मात्र नव्हे. आज अखिल ज्ञानक्षेत्राची कल्पनाहि नाहीं तर त्यावर ग्रंथ कोठून निर्माण होणार? अनेक ज्ञानक्षेत्रांशीं निदान ओळख करून देणें

ज्ञानकोशाचें कर्तव्य आहे, विस्तृतज्ञानक्षेत्रांकडे दुर्लक्ष केलें तरी नेहमीं आपल्या परिचयांतील व्यवहाराची माहिती आपणांस कितपत असते? नेहमींचे बोलण्याचे विषय असून त्यासंबंधानें माहिती सामान्य सुशिक्षितास कितपत असते, याविषयीं कल्पना ज्याची त्यास खालील प्रश्नांचीं उत्तरें द्यावयाचा प्रयत्न करावा म्हणजे कळून येईल. हे प्रश्न जितके अगदीं सामान्य शोधून काढतां येतील तितके शोधून घातले आहेत.

(१) प्रवर म्हणजे काय? गोत्रें आणि प्रवर याची माहिती कोणत्या ग्रंथांत आहे? सगोत्र लग्न करण्यास कोणते ग्रंथकार संमति देतात व कोणते देत नाहींत?

(२) आश्वलायन ही "शाखा" आहे काय?

(३) वैद्यकांत "चिकित्सा" म्हणजे काय?

(४) यजुर्वेदाच्या मुख्य मुख्य शाखांची, निदान ज्या शाखांचे ब्राह्मण महाराष्ट्रांत आहेत त्यांची नांवे सांगावीत?

(५) सामवेदी ब्राह्मण महाराष्ट्रांत आहेत काय? अथर्ववेदी ब्राह्मण महाराष्ट्रांत आहेत काय? माध्यंदिन, काण्व, मैत्रायणीय, चरक, जाबाल या शाखांच्या जशा निरनिराळ्या जाती आहेत, तशा सामवेदी आणि अथर्ववेदी अशा कांही निरनिराळ्या जाती आहेत कीं, एखाद्या निराळ्या नांवाच्या जातींत या वेदाच्या ब्राह्मणांचा अंतर्भाव होतो?

(६) जैन व इतर हिंदु यांचीं लग्नें होतात काय? शीख व इतर हिंदु यांचीं लग्नें होतात काय? ख्रिस्ती व हिंदु यांचीं लग्नें कोठे होतात? मुसुलमानांच्या मुली करण्यास कोणत्या हिंदूस हरकत नाहीं?

(७) एका जातीचा मनुष्य दुसऱ्या जातींत जाऊं शकत नाहीं, याला अपवाद कोठें कोठें आहेत?

(८) "मराठे" या नांवानें ओळखली जाणारी जात कितपत जुनी आहे?

(९) १६२७ सालीं शिवाजी जन्मला कशावरून?

(१०) महाराष्ट्रीय ब्राह्मणांमध्यें पुरुष अधिक आहेत कीं बायका अधिक आहेत?

भौतिक शास्त्रें व तज्जन्य कला यांच्या बाबतींत आपण केलेली पाश्चात्यांची व आपली तुलनाच हास्यास्पद होईल. तथापि आपल्या संस्कृतीच्या

अभ्यासाच्या बाबतींत आपण त्यांची बरोबरी करूं, असा जर आपला भ्रम असेल तर तोहि सोडून दिला पाहिजे. संस्कृत ग्रंथांचा अभ्यास पाश्चात्य पंडित करतात, आणि आज आपल्या देशांतील लोकांच्या संस्कृत ग्रंथांविषयींच्या ज्ञानाकडे तुच्छतेनें पहाण्याचें धैर्य त्यांस आलें आहे व आपलें अध्यापकत्व पटकावण्याची त्यांची तयारी आहे. त्यांस येतो हा जोर कशानें येतो याविषयीं तर आपण विचार केला पाहिजे ना? आज त्यांस जोर येत आहे, याचीं कारणें अनेक आहेत, त्यांपैकीं मुख्य कारणें येणेंप्रमाणें:—

(१) आपल्या अभ्यासापेक्षां त्यांचा अभ्यास अधिक पद्धतशीर आहे.

(२) प्रत्येकानें अभ्यास करून जें शोधात्मक ज्ञान संपादन केलें तें लेखी व्यक्त करून त्यानें पुढील पिढीसाठीं ठेवलें आहे.

(३) हिंदुस्थानाबाहेर झालेल्या ग्रंथांचें, जगाच्या इतिहासाचें आणि शास्त्रांचे ज्ञान आपणापेक्षां त्यांस फारच अधिक आहे. भारतीय पांडित्यास या सर्व गोष्टीची जरूर आहे. इतिहासाची किंवा ज्ञानाची अशी गोष्ट आहे कीं, एका देशांतील ज्ञानाचें, राजकीय इतिहासाचें किंवा कलेचें जगांतील एकंदर ज्ञानाच्या राजकीय अगर कलेच्या इतिहासापासून पृथक्त्व नसतें. आणि यामुळें जगांतील इतर हालचालींचे ज्ञान ज्यांस असतें त्यांस हिंदुस्थानविषयक गोष्टी अधिक स्पष्टपणें समजावयास मार्ग असतो, आणि अशा लोकांच्या लेखांतील चुका काढणें इतरांस शक्य होत नाहीं.

आपल्या अभ्यासापेक्षां त्यांचा अभ्यास अधिक पद्धतशीर कसा असतो याची कल्पना येण्यासाठीं, त्यांच्या अभ्यासपद्धतीची कल्पना एकदोनच गोष्टींचा निर्देश केला असतां येईल.

पाश्चात्त्यांच्या अभ्यासांतील पहिला प्रयत्न म्हणजे ज्या विषयावर आपणांस परिश्रम करावयाचा असेल त्या विषयावर आजपर्यंत कोणी काय लिहिलें आहे याचा संपूर्ण तपास लावून **तद्विषयक वाङ्मयसूचि** तयार करणें. ही वाङ्मयसूचि करण्यास त्यांचीं साधनें येणेंप्रमाणें—एकतर त्यांच्या ग्रंथशाला बरेच दिवसांच्या स्थापन झाल्या असल्यामुळें आणि ग्रंथसंग्रहविषयक परिश्रम दांडगा असल्यामुळें जा हिंदुस्थानविषयक ग्रंथ येथें मिळण्यास फार यातायात पडेल तो ग्रंथ पाश्चात्त्य

विद्यापीठांतील विद्यार्थ्यास आपल्या ग्रंथालयांत सहज मिळूं शकतो. आक्स-फर्ड, केंब्रिज, लंडन, बर्लिन, सोर्बन, कार्नेल, कोलंबिया, येल, हार्वर्ड या विद्यापीठांत जीं हिंदुस्थानविषयक पुस्तकें सहज पांच मिनिटांत मिळतील, तीं मुंबईस अगर कलकत्त्यासहि मिळावयाचीं नाहीत. हिंदुस्थानच्या काँग्रेसचे जुने रिपोर्ट मला अमेरिकेंत सहज मिळत, पण हिंदुस्थानांत चार पांच वर्षांपूर्वीचे रिपोर्ट्स मिळवावयास यातायात पडते. ग्रंथोपलब्धीसंबंधाने जेवढी सोय तेथे आहे तेवढी इकडे नाहीं, एवढेंच नव्हे तर अमुक विषयावर ग्रंथ कोणता ही माहिती मिळविण्यास मारामार पडते. निरनिराळ्या प्रकाशकांचे व लायब्रऱ्यांचे क्याटलॉग, वाङ्मयप्रसिद्धीविषयींच माहिती देणारीं मासिकें व ग्रंथ यांची पाश्चात्त्य विद्यापीठांत रेलचेल असते. असो.

प्रत्येक पंडित आपल्या अभ्यासाचा विषय स्वतंत्र व नवीन करण्यासाठीं खटपटत असतो. निदान दुसऱ्याने जें अभ्यासक्षेत्र घेतले असेल, त्या क्षेत्रावर पुन्हां निराळा ग्रंथ लिहिण्याचें काय प्रयोजन झाले याविषयीं त्याला आपल्या ग्रंथांत स्पष्टीकरण करावे लागतें. अमुक विषयावर जें संशोधन झालें त्याचे सिंहावलोकन जर्मनमध्ये होते. कोणत्याहि पंडितास आपण ज्या विषयावर ग्रंथ प्रसिद्ध करतों त्या विषयावरील पूर्वीचा ग्रंथ ठाऊक नसणे हें लज्जाकारक वाटते आणि त्याने त्याचा उपयोग केला नसल्यास किंवा त्याकडे दुर्लक्ष केले असल्यास अज्ञान किंवा मत्सराचा आरोप त्याजवर येतो. या तऱ्हेच्या प्रगतीमुळें सर्व अभ्यासामध्यें एकवाक्यता होते. वाटेल त्या लेखकाने मनास वाटेल तें लिहावें, दुसऱ्याच्या परिश्रमाकडे दुर्लक्ष करावे असे करून चालत नाही. शोधकांच्या संस्था आहेत, त्यांत प्रत्येकास दुसऱ्याशीं प्रसंग येतो त्यामुळें जबाबदारी वाढते, व निरंकुशता कमी होते.

संस्कृतग्रंथविषयक पाश्चात्त्यांच्या अभ्यासांत केवळ शिस्तीची जोड मिळाल्यामुळें विशेष काय साध्य झालें आहे हें सांगितलें पाहिजे.

प्रथमतः मूलपाठाच्या संशोधनाविषयीं त्यांची पद्धतशीर खटपट होऊन तीस चांगलें यश आले आहे. मनुस्मृतीची आवृत्ति त्यांस काढावयाची आहे असें समजा. त्यासाठीं ते प्रथम अनेक हस्तलिखितें गोळा करतील. तीं गोळा करणेहि त्यांस सोपें आहे. निरनिराळ्या ग्रंथशालांच्या

हस्तलिखितांचे क्याटलाग असतातच, त्यांतहि एका पुस्तकाच्या अनेक हस्तलिखित प्रती असतात. त्या अनेक प्रतींचीं साग्र वर्णनेंहि त्यांत असतात. तीं वाचून एखादा ग्रंथ मागवावा असें अभ्यासकास वाटलें तर तो आपल्या संस्थेच्या लायब्ररीमार्फत तीं हस्तलिखितें मागवूं शकतो. अनेक हस्तलिखितें गोळा केल्यानंतरचा प्रयत्न म्हटला म्हणजे शुद्ध पाठ ठरविणें हा होय. शुद्ध पाठ याचा अर्थ ज्यांत व्याकरणशुद्धि अधिक असेल किंवा ज्यापासून अर्थनिष्पत्ति अधिक चांगली होत असेल तो शुद्धपाठ असें नाहीं. तर ऐतिहासिकदृष्ट्या जो मूळ पाठ असेल तो. उदाहरणार्थ आपण असें घेऊं कीं, एखाद्या मासिकाच्या संपादकास आलेला लेख प्रसिद्ध करावयाचा आहे. आलेल्या लेखांत व्याकरणाच्या पुष्कळ चुका असतात. त्या दुरुस्त करून तो प्रसिद्ध करतो. तेव्हां प्रसिद्ध केलेला लेख म्हणजे मूळ नव्हे. ऐतिहासिक दृष्टीनें किंवा कायद्याच्या दृष्टीनें जबाबदारी प्रसिद्धलेखापेक्षा मूळ पाठविलेल्या लेखाबद्दलच लेखकावर असते. बदललेल्या लेखाबद्दल कमी. यासाठीं तपासून शुद्ध न केलेला पाठ खरा व शुद्ध केलेला खोटा. याप्रमाणेंच जुन्या लेखाचे आहे. अस्सल व नक्कल यांमध्यें नकलेला महत्त्व कमी. अनेक हस्तलिखितें जमा करून त्यांतून मूळ पाठ कोणता होता, मूळ मिळविणे शक्य नसेल तर मूळपाठाच्या जवळजवळ पाठ कसा शोधावा याविषयीं शोध करण्याची पद्धति अनुभवानें ठरली आहे. पाश्चात्त्य अभ्यासांत मूलशोधनाचा भाग महत्त्वाचा आहे. ग्रंथाचें मूळ शुद्ध असलें म्हणजे त्याच्यावरून तत्कालीन परिस्थितीचा पुढल्यामागल्या परिस्थितीशीं संबंध पाहून इतिहासाची जुळवाजुळव करणें या खटपटी पुढे शक्य होतात. संस्कृत ग्रंथाच्या शुद्ध आवृत्त्या पाश्चात्यांच्याच आहेत.

आतां भारतीय ज्ञानाच्या बाबतींत त्यांची कशी काय प्रगति होत आहे याची अंधुक तरी कल्पना दिली पाहिजे. प्रगतीचीं कारणे दोन आहेत; नवीन साहित्याचा उपयोग, आणि जुन्या साहित्याचा नवीन पद्धतीने उपयोग. प्राचीन भारतीय विषयांपैकीं पाश्चात्त्य पंडित ज्या विषयांत आपल्या पुढें फार गेले आहेत, ते विषय म्हटले म्हणजे इतिहास आणि तदनुषंगिक शास्त्रें हे होत. जी शास्त्रीय पद्धति त्यांनीं आपल्या देशांत स्वकीय संस्कृतीच्या व राजकीय घडामोडींच्या इतिहासास लावली तीच पद्धत त्यांनीं इकडे लावली आणि जी माहिती जुन्या पंडितांस

नव्हती अशी अनेक प्रकारची माहिती पैदा केली. त्या माहितीचें स्वरूप मुख्यतः येणेंप्रमाणें:—

( १ ) **चिरंजीवी लिखाणांचा अभ्यासः**—ताम्रपट, शिलालेख हीं अनेक जमवून, त्यांच्या नकला घेऊन, त्यांवरील लिपि ओळखून, त्या लिपीच्या अनुसंधानानें अर्थ लावून, त्यांतील मजकुरावरून, देशांत झालेल्या घडामोडींची शकावलि, राजमालिका हीं तयार करणें.

( २ ) **मुद्राविज्ञानः**—नाण्यांचा अभ्यास करणें.

( ३ ) **पुराणवस्तुसंशोधनशास्त्रः**—जुनी शहरें, देवालयें, कलाकुशलतेच्या जिनसा हीं जमा करून त्यांचा अभ्यास करणे.

( ४ ) **मानववंशशास्त्रः**—निरनिराळ्या मनुष्यांच्या जातींचा, म्हणजे त्यांच्या चालीरीती, त्यांच्यांतील जुन्या कालाचे अवशेष, त्यांचीं दैवतें, उपासना, खाणेंपिणें इत्यादि गोष्टींचा अभ्यास.

याप्रमाणे साहित्यावरून शास्त्रांची नांवे तयार झालीं आहेत. तथापि या शास्त्रांच्या अभ्यासांत जी माहिती पैदा झाली आहे तिचे संकलन होऊन " लिपिविज्ञान " म्हणजे देशांतील आजच्या लिपींचा अशोककालीन लिपीपासूनचा इतिहास, इत्यादि अनेक शास्त्रें अगर शास्त्रांगें तयार होत आहे.

वर सांगितलेलीं अभ्यासक्षेत्रें पाहिली असतां असें दिसून येईल कीं, नवीन साहित्य पैदा करून त्यावर हा अभ्यास रचला गेला आहे. पण पूर्वीपासून ब्राह्मणांस परिचित असे साहित्य म्हटलें म्हणजे श्रुति-स्मृति-पुराणे. त्यांचा अभ्यास कसा काय होत आहे इकडे लक्ष देऊं.

उदाहरणार्थ " वेद " घेऊं. वेदांचा अर्थ कसा लावावा हें जाणण्यासाठी प्रथम यास्कसायणादि ग्रंथांच्या साहाय्याने त्यांनीं अभ्यास केलाच. पण त्यांत कांही थोडीशी सुधारणा करण्याचा प्रयत्न केला. यास्क हा देखील वेदकालानंतर बऱ्याच कालाने होऊन गेला. त्याअर्थी त्यास वेदकालीन संस्थांचे ज्ञान स्पष्ट नसेल, व त्यामुळें त्याने दिलेले अर्थ चुकलेले असतील, ही शक्यता मनात धरून वेदवाक्यांच्या दिलेल्या अर्थाविषयीं संशयवृत्ति तयार झाली. शिवाय अर्वाचीन पंडितांस झेंदावेस्ताचें व यूरोपीय भाषांचे ज्ञान यांची जोड मिळाली. तेव्हां त्यामुळें त्यांस प्राचीन यूरोपीय, प्राचीन भारतीय व प्राचीन इराणी या

तीन लोकसमूहांच्या भाषा, शब्द व संस्था यांतील सादृश्य लक्षांत आलें, व जी संस्था व जे शब्द वेदांत व या पाश्चात्य ग्रंथांत सदृश असतील तीं पुढे हिंदुस्थानांत नष्ट झाल्यामुळें यास्कादिकांस न समजणें व अर्वाचीन संशोधकांस समजणे शक्य आहे असे त्यांस वाटून त्यांनीं तौलनिक पद्धति अमलांत आणली आणि वेदार्थज्ञान स्वतंत्रपणें करून घेण्यास सुरवात केली.

शब्दांचा अर्थ स्वतंत्रपणे लावावा, वेदग्रंथांतील भाषेची ऐतिहासिक चिकित्सा करून वेदवाक्यांचा कालानुक्रम काढावा, वेदांत व्यक्त झालेल्या कथांचा ( Myths ) अर्थ काय याविषयीं स्वतंत्र बुद्धीनें शोध करावा, वेदांत ज्यांचा नामनिर्देश आला आहे असे ऋषी, राजे, जाती, राष्ट्रें, स्थलांतरें, युद्धें यांच्या उल्लेखांवरून राजकीय व बौद्धिक इतिहास जुळविण्याची खटपट करावी; प्राकृत, वेदभाषा, अवेस्ती भाषा, यूरोपीय भाषा यांचा तौलनिक अभ्यास करून अपभ्रंश व भाषेंत होणारे बदल यांचे नियम शोधून काढावेत, या प्रकारचा परिश्रम त्यांनीं अनेक वर्षें चालविला आहे. रामायण,महाभारत व वेद यांतील कथांचा मेळ घालण्यासाठींहि प्रयत्न पुष्कळ झाला. विचारसंप्रदाय व शास्त्रें यांचाहि ऐतिहासिक अभ्यास झाला आहे.

ग्रंथांतील शब्दांची सूची, विशेषनामांच्या सूची, श्लोकांची सूची, एतद्विषयक पुस्तकांच्या याद्या, मूलपाठशोधनांत घेतलेली खबरदारी यांची पाश्चात्य बुद्धीस जोड मिळाल्यामुळे आणि हीं साधनें आपणांस नसल्यामुळे संशोधनशास्त्रपरिचित अशा इकडील पंडितांस जाळ्यांत सांपडलेल्या सिंहासारखे व्हावे लागतें. दैत्यांनीं ग्रासलेल्या अरण्यास ज्याप्रमाणे ऋषी सोडून जातात अगर तेथें येत नाहींत त्याप्रमाणे, पांडित्यास अपकर्षक अशा परिस्थितीनें ग्रासलेल्या हिंदुस्थानांत येऊन शिकविण्यास देखील खरा पाश्चात्य पंडितांचा वर्ग तयार नाही.

आपल्या सुशिक्षित वर्गांपैकीं पुष्कळांमध्यें पाश्चात्यांच्या भारतीय पांडित्याविषयीं तुच्छता वाटत असते. ती सर्वांशीं योग्य नाही असें म्हणणे भाग पडतें. देशांतीलच नवीन साहित्य शोधणें व वापरणें, भारतेतिहासास उपयोगी असे बाह्य साहित्य जमा करणे, सर्व साहित्य पद्धतशीर रीतीनें जमा करून उपयोगांत आणणे, आपण केलेल्या

अभ्यासानें जमा झालेलीं अनुमानें लिहून ठेवणें, अभ्यासासाठीं नवीन पद्धति स्वीकारणें या सर्व बाबतींत थार परिश्रम पाश्चात्त्यांनींच केले आहेत. त्यांच्याच पद्धती घेऊन आपणहि अभ्यास करूं लागलों म्हणजे आपण त्यांच्या मागें न रहातां पुढेंहि जाऊं हें खरें आहे व जे थोडे भारतीय पंडित पाश्चात्त्य संशोधनपध्दतींनीं अभ्यास करून निर्भयपणें नवे नवे सिध्दान्त पुढे मांडीत गेले त्यांचा पाश्चात्त्यांनीं योग्य आदरहि केला आहे. आपले कर्तव्य आपली उच्चता परिश्रमानें स्थापित करण्याचें आहे, तुच्छता व्यक्त करण्याचें नाहीं. पाश्चात्त्यांचें संशोधन गोळा करावें, तपासून पहावें, ग्राह्य असेल तें घ्यावें, त्याज्य असेल तें टाकावें. सर्व जगाचें ज्ञानविषयक रणमैदान एक होत आहे. आपण केलेलें संशोधन जगानें आदरावें असें आपणांस वाटत असेल तर पूर्वी परिश्रम करणारांचे ग्रंथ आपण अवलोकिले पाहिजेत.

पण हें सर्व कोणी करावें? गचाळपणा व इंग्रजी भाषा भारतीय तरुणांच्या घशांत कोंबण्याची हांव, या दोन्ही चिन्हांनीं अंकित झालेल्या मुंबई, मद्रास, कलकत्ता, अलाहाबाद येथील युनिव्हर्सिटयांकडून हें काम पुढील पन्नास वर्षांतहि होईल अशी आशा वाटत नाहीं. हिंदु युनिव्हर्सिटीकडून जर कांहीं खटपट झाली तर यश येणें शक्य आहे; पण तिच्याकडूनहि कांहीं होईल असें सध्यांच्या परिस्थितीवरून वाटत नाहीं. ज्ञानकोश करतांना पाश्चात्यांचें भारतीय पांडित्य तपासून त्यांतील ग्राह्यांश घेण्याचें काम चालू आहे आणि पाश्चात्त्यांचें भारतीय पांडित्य सर्वांशीं तपासण्याचें काम जरी ज्ञानकोशकारांस अशक्य आहे तरी या कार्यांत भावी परिश्रम करणारांस आगाऊ तयारी म्हणून कार्य करतां येईल असें वाटतें. माहितीचे ग्रंथ आपल्या शहरांत दुर्मिळ आहेत. पुस्तकें मिळवावीं कोणतीं याचीच माहिती आपल्या लोकांस नाहीं, आणि त्यामुळें एकत्र जमविलेल्या माहितीची जरूर आपल्या लोकांस मोठी आहे.

पाश्चात्त्यांच्या भारतीय पांडित्यांत दोष नाहीत असें नाहीं; दोष आहेतच. सामान्य वाचकांच्या नजरेस येणारा त्यांचा दोष म्हटला म्हणजे भाषांतर करतांना होणारा दोष होय. कांहीं अंशीं हा दोष त्यांचा पांडित्यदोष नसून अपरिहार्य दोष असतो. संस्कृत शब्दांची अर्थकक्षा पूर्णपणें लक्षांत आली तरी इंग्रजी अगर इतर पाश्चात्य भाषेंतील शब्दांत ती

व्यक्त करावयाची असल्यामुळें ती अर्थकक्षा पूर्णपणें योजलेल्या प्रतिशब्दांत उतरत नाहीं. त्यामुळें भाषांतरांत मूळांतील अर्थ उतरला नाहीं असें वारंवार ध्यानांत येतें आणि वाचक एकदम भाषांतरकारास दोष देऊं पहातो. इंग्रजी भाषेंत प्रतिशब्द नसतो आणि संस्कृत शब्दांतील अर्थकक्षेचा एक भाग ज्या इंग्रजी शब्दांचें अर्थक्षेत्र विस्तृत आहे अशा शब्दांनीं व्यक्त होतो. एकदां भाषांतर झालें असलें म्हणजे पुढील लेखकांची प्रवृत्ति मूळाकडे न जातां भाषांतरावरून तहान भागवून घेण्याकडे होते. आणि पुढील लेखक इंग्रजी शब्दांतील भलताच अर्थ घेऊन पुढें जातात. या प्रकारच्या गडबडीमुळें पुष्कळ घोंटाळे झाले आहेत.

हा दोष पाश्चात्त्य भाषांतरांत वारंवार होणारा आहे आणि महाराष्ट्रीय वाचकांनीं पाश्चात्त्यांनीं केलेलीं भाषांतरें वाचलीं असतां सहज लक्षांत येणारा आहे, आणि त्यामुळें महाराष्ट्रीयांस त्यांच्या पांडित्याविषयीं संशय एकदम उत्पन्न होतो. इंग्रजी ग्रंथांवरून स्वदेशाची माहिती घेऊं पहाणारांनीं आणि त्यासाठीं संस्कृत पंडित तयार करण्याच्या योजनेस अडथळा करूं पहाणाऱ्या नामदार परांजप्यांसारख्यांनीं प्रस्तुत ज्ञानविषयक दोष लक्षांत घेणें अवश्य आहे.

पाश्चात्त्यांच्या भारतीय पांडित्यांतील दुसरा एक दोष म्हटला म्हणजे त्यांचा स्वतःच्या देशाच्या संस्कृतीविषयीं आणि संप्रदायाविषयीं असलेला अभिमान होय. हिंदुस्थानांतील अनेक गोष्टी फारच अर्वाचीन आहेत, असें दाखविण्याचा त्यांस मोह पडतो. याकोबी आणि ब्लूमफील्ड यांच्या सारखे लेखक सोडून दिले तर इतर लेखकांस वेदांच्या किंवा नंतरच्या ग्रंथांच्या प्राचीनत्वावर गदा घालण्याची प्रबल इच्छा आहे काय असा संशय वारंवार येतो. आपलें मत सिद्ध करण्यासाठीं त्यांनीं आणलेले आधार सर्वस्वी उपेक्षा करण्याजोगे नसतात, आणि त्यामुळें त्यांच्या म्हणण्याकडे बरेंच लक्ष द्यावें लागतें. हापकिन्ससारखे लेखक असें म्हणूं लागतात कीं, आम्ही सर्व ग्रंथ बरेचसे अर्वाचीन धरूं; पुराव्याचा बोजा प्राचीनत्व सिद्ध करूं पहाणारांवर आहे. अर्थात असल्या प्रकारच्या विधानांत पंडितांची मनःप्रवृत्ति दिसून आली तरी तिला मान देणें भाग पडतें.

पाश्चात्त्यांच्या भारतीय पांडित्याविषयीं आम्ही जी अपेक्षा करतों व जी अपेक्षा फारशी पूर्ण झाली नाहीं, ती म्हटली म्हणजे तटस्थपणाची

होय. आपणांस असें वाटतें कीं, ब्राह्मण पक्ष किंवा बौद्ध पक्ष यासारख्या कोणत्याहि पक्षास पाश्चात्त्य ग्रंथकार मिळणार नाहीं आणि हिंदुस्थानच्या ऐतिहासिक प्रश्नांवर निर्विकार मनानें ते लिहितील पण ही अपेक्षा व्यर्थ आहे असें वाटावयास लागतें. ख्रिस्ती संप्रदायावरील आसक्ति वारंवार घोंटाळा करते. हिंदी संस्कृतीच्या पुरस्कर्त्या म्हणून समजल्या जाणाऱ्या मॅाक्समुल्लर नांवाच्या पंडिताची अशी अपेक्षा होती कीं, ख्रिस्ती संप्रदायाच्या उच्चतम गुणांची माहिती हिंदूंस पन्नासएक वर्षांच्या शिक्षणानें होऊन सर्व हिंदु लवकरच ख्रिस्ती होऊन जातील! त्यानें ही अपेक्षा व्यक्त केल्याला साठ वर्षें होऊन गेलीं. तथापि त्यानें अपेक्षिलेला परिणाम मात्र घडून आला नाहीं.

कित्येक ग्रंथकार ब्राह्मण लबाड आहेत, त्यांच्या भिक्षुकी लेखांवर विश्वास ठेवूं नये, प्रामाणिक बौद्धांच्या ग्रंथांवर विश्वास ठेवावा असा आग्रह धरतात. वेदग्रंथांचे अभ्यासक आणि अवेस्त्याचे अभ्यासक यांमध्यें आपल्या अभ्यासविषयाच्या ग्रंथांसंबंधानें अभिमान असून एकानें दुसऱ्याच्या ग्रंथास अर्वाचीन ठरविण्याचा प्रयत्न करावा अशी धडपड आहेच. जसजसे अर्वाचीन कालाकडे यावें, तसतसें पाश्चात्त्य पंडितांचे मन अधिकाधिक दूषित झालें आहे असें दिसून येतें.

पाश्चात्त्य पांडित्यांतील दोष त्यांच्या गुणांमुळे भयंकर होतात. जे ग्रंथ आदरणीय नाहींत, त्यांतील दोषामुळें कोणाचें कांहीं नुकसान होत नाहीं तथापि जे ग्रंथ आदरणीय आहेत, त्यांतील दोष लोकांवर परिणाम घडवितात आणि यामुळें त्यांतील दोष शोधणें अवश्य असतें. पाश्चात्त्य ग्रंथकारांचे दोष शोधण्याची दृष्टि अहितकारक नाहीं, ती अवश्य आहे. ग्रंथांत दोष शोधण्याची दृष्टि नेहमीच चांगली असते असें नाहीं. पण एका राष्ट्रानें दुसऱ्या राष्ट्रांतील पंडितवर्गाच्या पांडित्यामुळें दिपून जाऊन वाचाहीन व्हावें यापेक्षां दोषैकदृक् बुद्धि देखील वाईट नाहीं. पाश्चात्त्यांचें शिष्यत्व योग्य आहे पण तें जगांतील चढाओढींत जय पावण्यासाठीं आहे. पाश्चात्त्य पांडित्यामुळे घाबरून हतवीर्य होणें आणि बाबावाक्यं प्रमाणम् या प्रकारची दृष्टि त्यांच्याविषयीं ठेवणें, हें केवळ उद्धट-पणानें पाश्चात्त्य पंडितांच्या लेखांचें महत्त्व कमी समजण्यापेक्षांहि वाईट आहे.”

वर सांगितलेल्या गोष्टी आम्हीं ज्ञानकोश तयार करतांना जागृत ठेवल्या होत्या हें आम्ही आश्वासन देतों. आम्हीं या गोष्टीकडे लक्ष दिलें नाहीं अशी जर उदाहरणें सांपडलीं तर तीं आमचा प्रयत्न अपुरा पडल्यामुळें झालीं असें समजावे.

---

## प्रकरण ९ वें.

## संपादकीय अंतर्व्यवस्था

ज्ञानकोशाच्या संपादकीय कार्याला आरंभ कंपनीचे कार्य कायदेशीर रीतीने होण्यास आरंभ होण्यापूर्वीच झाला होता. आरंभीं फक्त कांहीं इंग्रजी ग्रंथांतून मराठीमध्यें गोषवारा काढण्याचें काम चालू होतें. विषयनामें आधीं निश्चित न करतां प्रथम शक्य तितकी विविध माहिती जमवून ती अनेक विषयांवर जशी आढळेल त्याप्रमाणें विभागून पुढें विषय निश्चित करावे असें याचें धोरण ठेवल्यामुळें इंडियन अँटिक्वरी, रॉयल एशियाटिक सोसायटी, अमेरिकन ओरिएंटल सोसायटी यासारख्या संस्थांची नियतकालिकें, निरनिराळ्या प्रांतांसंबंधीं लिहिलेलीं ' कास्ट्स आणि ट्राइब्स ' नांवाचीं जातिविषयक पुस्तकें, प्रदेशविषयक माहिती देणारीं प्रवासवृत्तें, खानेसुमारीचे अहवाल, निरनिराळ्या देशांच्या इतिहासाची माहिती देणारीं पुस्तकें वगैरे अनेक ग्रंथ घेऊन त्यांतील गोषवारे काढण्याचे काम प्रथम नागपूर येथे चालू होतें व पहिल्या कार्यारंभाच्या सभेच्या दिवशीच यांतील बरीच अकारविल्ह्यानें लावून पहावयास ठेवलीं होतीं. कार्यास आरंभ झाल्यावर ऑफिसमध्ये नवीन माणसें ठेवून हेच गोषवारे काढण्याचे काम अधिक जोरानें सुरू केलें.

तथापि आपल्या एकंदर कार्याचें क्षेत्र किती आहे. कोणकोणत्या विषयावर आपणांस माहिती मिळवावयाची व एकंदर ग्रंथाची मांडणी आपणांस कशी करावयाची हे कळण्याकरितां एक ज्ञानकोशाच्या घटनेची योजना तयार करण्यांत आली व तींत विशिष्ट विषयांस किती पृष्ठें द्यावयाचीं व कार्यपद्धति कोणती असावी यासंबंधी सर्व योजना मांडली होती ( परिशिष्ट १ पहा ).

तसेच प्रारंभींच मराठींतील सर्व वाङ्मयाची माहिती व्हावी म्हणून महाराष्ट्रीय वाङ्मयसूचि तयार केली. हे काम बऱ्याच लोकांस फार

जिकिरीचें व अवाढव्य वाटत होतें व पुणें येथें डेक्कन व्हर्नाक्युलर सोसायटीजवळ असलेल्या यादीची नक्कल करण्यासच आम्हांस कांहीं महिने लागतील अशी त्या सोसायटीचे कार्यकर्ते रा. केळकर यांनीं आपली समजूत व्यक्त केली होती. पण तें काम आम्ही फक्त ८ दिवसांत केलें. तसेंच पुढें वर्गीकरणाचें कामहि आम्ही इतक्या झपाटयानें केलें कीं, सर्व हस्तलिखित तयार होण्यास पुरते तीन महिनेहि लागले नाहींत.

या वाङ्मयसूचीवरून आम्हांस एक अनुभव मिळून आपणास एखादें काम अत्यंत अल्पावधींत करावयाचें झालें तर तें करतां येईल किंवा नाहीं व करावयाचें झाल्यास कसें करतां येईल यासंबंधीं खात्री उत्पन्न झाली. या सूचीमुळें एक अपूर्व व उपयुक्त ग्रंथाची भर वाङ्मयांत पडल्यामुळें मंडळाबद्दल विश्वासहि बऱ्याच लोकांच्या मनांत उत्पन्न झाला.

वाङ्मयसूचीचे हस्तलिखित जितक्या लवकर तयार झाले तितक्या लवकर ती छापली मात्र गेली नाही. पण या छापण्याच्या दिरंगाईच्या अनुभवामुळें ज्ञानकोश छापण्याचें काम नागपुरास होणें शक्य नाही हेंहि तितकेंच स्पष्ट कळून येऊन पुढें पुणें, मुंबईकडे जाण्याची पूर्वतयारी करावी लागली.

वाङ्मयसूचीची छपाई चालू असतांच नवीन मजकूर तयार करण्याचेहि काम ऑफिसांत चालूच होते.

ऑफिसामध्यें विशेषतः ऐतिहासिक, भौगोलिक, वाङ्मयविषयक, जातिविषयक वगैरे मजकूर टीपारूपानें करण्याचें काम चालू असे व शास्त्रीय मजकूर बाहेरून येईल अशी अपेक्षा होती व याकरितां एक संपादकीय खात्याची योजना व नियमपत्रक तयार केलें होतें व त्या नियमांप्रमाणें एक मंत्रिमंडळ स्थापन करून निरनिराळ्या शास्त्रांकरितां विभागसंपादक नेमावयाची खटपट चालू होती (परिशिष्ट २ पहा). परंतु यांतील मंत्रिमंडळ हें कागदावरच राहिलें व विभागसंपादक सर्व शास्त्रांस मिळू शकले नाहींत. कांहींनीं प्रथम कबूल केलें परंतु कार्यव्यामृत्वामुळें त्यांस काम करतां आलें नाहीं. कांहींनीं अर्धेमुर्धें काम केल्यावर पुढें सोडून दिलें व कांहीं विषयांस कोणी विभागसंपादक मिळूंच शकले नाहींत. तेव्हां अशा ठिकाणीं सर्व काम ऑफिसनें पूर्ण करून घेतलें.

ऑफिसांत जी मंडळी कामाला येत ती, विशेषत: नागपूर ऑफिसमधील मंडळी, नवशिकी म्हणून फारच कच्ची असत. त्यांच्या भाषांतर करण्यामध्यें प्रथमत: चुकाहि होत व मराठी लिहिण्याची संवय नसल्यामुळे भाषाहि अशुद्ध येत असे. पुण्याकडील मंडळीस नागपुरास बोलावण्याची पुष्कळ खटपट केली. अनेकांस पत्रे लिहिलीं. पण कांहीं मंडळी इकडे आपल्या कार्यांत गुंतलेली असत व कांहीं पुणें सोडून नागपुरास यावयास तयार नसत यामुळें नागपुरास मंडळी आम्हांस शिकवून शिकवून तयार करावी लागली. याकरितां मधून मधून कांहीं व्याख्यानांचा कार्यक्रम ठेवण्यांत आला होता. रा. विश्वनाथपत राजवाडे यांसहि तेथें आणण्यांत येऊन त्यांची कांहीं इतिहाससंशोधनपद्धतीवर व्याख्यानें करविलीं पण त्यांची प्रकृति तेथें नीट न राहिल्यामुळें ते लवकरच पुण्यास परत आले.

नागपूर येथें काम बऱ्याच झपाट्यानें चालू होतें व ज्ञानकोशाचीं तीनचतुर्थांशावर कच्चीं टिपणें नागपूर येथें तयार झालीं होती परंतु त्यांवर संस्करण मात्र सर्व पुण्यास करण्यांत आलें. नागपूर येथे वाङ्मयसूचि तयार होत असतां व गोषवारे काढण्याचें काम जोरांत चालू असतां जवळ जवळ ४० माणसे काम करीत असत.

नागपूरला ज्याप्रमाणें अनुभवी किंवा तयार माणसें मिळालीं नाहींत त्याचप्रमाणे कायम राहण्याच्या इराद्यानेंहि कोणी आले नाहीत. बहुतेक कायद्याचा अभ्यास करणारे विद्यार्थी असून वकिलीची परीक्षा पास झाल्यावर वकीली करण्याचाच त्यांचा इरादा असे. त्यामुळें काम शिकून तयार झालेली मंडळी सोडून गेल्यामुळें पुन्हां नुकसान होई. एक गृहस्थ तर एक विषयाचीं सर्व तयार टिपणें वाचून झाल्यावर आतां लेख लिहावयास सुरुवात करावयाची त्याच वेळीं सोडून गेले. यामुळें पुढें संपादकीय कार्य पुण्यासच पूर्ण करण्याचें ठरविलें व त्याप्रमाणें जुलै १९१९ मध्यें मुख्य संपादकीय ऑफीस पुण्यास आणलें.

तत्पूर्वी १९१८ मध्येच पुढील धोरणाच्या दिशेने पुणें येथें एक ऑफीस सुरू केले होते व तेथें प्रो. वै. का. राजवाडे यांच्या देखरेखीखाली गोषवारे काढण्याचें काम चालू होतें.

नागपूरहून पुण्यास ऑफिस आणलें त्यावेळीं नागपूरहून फक्त डॉ. केतकर, रा. दाते, रा. देशपांडे व रा. टिळक ही चार मंडळी पुण्यास

आली व ती (रा. देशपांडे यांचे खेरीज) शेवटपर्यंत कार्य करीत आहेतच.

गोषवारे काढण्याचें काम नागपूर व पुणें या दोन्ही ठिकाणीं जरी चालू होतें तरी दोन्ही ठिकाणीं होणाऱ्या कामामध्यें थोडासा फरक आढळून आला. नागपूर येथें होणारें काम पुढें प्रत्यक्ष आपण ज्ञानकोशांत विशिष्ट विषयास किती जागा देतां येईल या दृष्टीनेंच प्रारंभापासून तयार होत असल्यामुळें नागपुरास तयार झालेलीं बहुतेक सर्व टिपणें पुढें भाषाविषयक व इतर आजतागायतपणाकरितां लागणारे फेरफार करून कमीजास्ती भर घालून मुख्य ज्ञानकोशांत अंतर्भूत करतां आलीं. परंतु पुणें आफिस मधील कामाचें धोरण या दिशेनें चाललेलें आढळून आले नाहीं त्यामुळें येथील टिपणें अवास्तव लांबलचक व फार पाल्हाळिक झालेलीं आढळलीं. त्यामुळें त्यांचा उपयोग करून घेण्याकरितां पुन्हां त्यांतील मुद्दे वगैरेचीं संक्षिप्त टांचणे तयार करावीं लागलीं. यामुळें येथील काम बरेंच निरुपयोगी झालें.

हे गोषवारे काढण्याचें कामहि एका विशिष्ट योजनेनुसारच चाललेले होतें व हें काम करतांना कोणत्या निरनिराळ्या क्रिया करावयाच्या व त्यांतील निरनिराळीं कार्यें कोणत्या काळापर्यंत पूर्ण करावयाचीं यासंबंधीहि लेखक व संपादक यांच्या उपयोगाकरितां एक योजना तयार केली होती (परिशिष्ट नं. २ पहा). या योजनेमध्ये निरनिराळ्या विषयांसंबंधीं माहिती कशी जमा करावी याचें विवेचन केलें असून शास्त्रीय लेखांमध्यें वापरल्या जाणाऱ्या संज्ञांमध्यें परस्पर संगति रहावी म्हणून एक सर्व शास्त्रीय संज्ञा एकत्र करून संज्ञाकोश तयार करावा अशीहि योजना केली होती. परंतु ही संज्ञाकोशार्थ जमविलेली सामुग्री टिपणरूपानेंच अखेरपर्यंत राहिली व संज्ञाकोश छापण्याचें काम द्रव्य व काल यांच्या अभावामुळें अपूर्णच राहिलें. हा संज्ञाकोश पूर्ण होऊन छापला गेला असता तर तोहि ग्रंथ वाङ्मयसूचीप्रमाणें अपूर्व व अत्यंत उपयुक्त झाला असता. असो. यापुढेंहि शक्य तर हें कार्य पूर्ण करयाचा संपादक मंडळाचा विचार आहे.

ज्याप्रमाणें आम्ही शास्त्रीय विषयांकरितां बाहेरील लेखकांच्या सहाय्याची अपेक्षा करीत होतों त्याप्रमाणेंच कांहीं विशिष्ट ज्ञानक्षेत्रांत कार्य

करणाऱ्या संस्थांच्याहि सहकार्याची आम्ही अपेक्षा केली होती व त्याप्रमाणें आजपर्यंत प्रसिद्ध झालेल्या शिलालेख ताम्रपटादि लिखाणांतील स्थल काळ व्यक्तिविषयक माहिती मिळविण्याकरितां त्यांच्या निरनिराळ्या सूची तयार कराव्या अशी एक योजना तयार करून पुणें येथील भारत इतिहाससंशोधकमंडळ, भांडारकर ओरिएंटल रीसर्च इन्स्टिट्यूट वगैरे संस्थांकड पाठविली होती. परंतु त्यांचें सहकार्य या बाबतीत आम्हांस मिळू शकलें नाहीं व ही योजना तशीच दप्तरांत पडून राहिली ( परिशिष्ट न. ४ पहा ).

महाराष्ट्राच्या इतिहासासंबंधींचा मजकूरहि त्या क्षेत्रांत विशेष काम केलेल्या व करणाऱ्या मंडळीकडून तयार व्हावा अशी आमची इच्छा होती व पुणें येथील भारत इतिहाससंशोधकमंडळांत या विषयाला वाहून घेतलेली कांहीं मंडळी असवी अशी आमची अपेक्षा असल्यामुळें त्या संस्थेने या बाबतीत आमच्याशीं सहकार्य करावें म्हणून आम्ही त्यांस विनंति करून पाहिली परतु त्यांचेकडून हें कार्य करण्यास आमच्याजवळ माणसें नाहींत असें लिहून आल्यामुळे आम्हांस दुसरी तजवीज करणे भाग पडले. तेव्हां आम्हा धुळे येथील सत्कार्योत्तेजक सभेमध्यें काम करणाऱ्या मंडळीमार्फत कै. विश्वनाथ काशीनाथ राजवाडे यांजकडून हें कार्य करून घ्यावें म्हणून त्यांच्याशीं पत्रव्यवहार केला व रा. राजवाडे यांनीं ६००० रुपयांस १५०० पृष्ठें मजकूर महाराष्ट्र इतिहास वगैरेवर लिहून देण्याचें कबूल केले परंतु ते पुढे ही सर्व रक्कम अगाऊ मागूं लागले व आम्हीं फक्त ५०० रुपये आगाऊ देण्यस तयार होतों यामुळें त्यांनीं पुढें हें काम करण्याचे नाकारले.

कै. वासुदेवशास्त्री खरे यांसहि यासंबंधी आम्हीं विनंति केली परंतु त्यांजकडूनहि नकारार्थी उत्तर आले. मात्र ज्ञानकोशाचे बरेंचसें काम झाल्यावर एकदां ते पुण्यास आले असतां त्यांनी कांहीं लेख तपासून देण्याचें कबूल केले होते व २५० रुपये दरमहा घेऊन दोन वर्षांत पेशवाईच्या इतिहासावर ज्ञानकोशाच्या १००० पृष्ठांइतका मोठा स्वतंत्र ग्रंथ लिहून देण्याचें कबूल केलें होतें परंतु हें कार्य पार पाडण्याच्या आंतच त्यांनां काळानें आपल्यामधून ओढून नेल्यामुळें मराठी इतिहासावर होणाऱ्या एका अपूर्व ग्रंथाचा संकल्प तसाच राहिला.

इतिहासाविषयांत बाहेरचें साह्य अल्प होणार असें दिसलें तेव्हां कै. देशपांडे यांनीं हिंदु इतिहास प्रथमपासून शेवटपर्यंत करण्यास कंबर बांधली.

याखेरीज मराठी भाषेमध्यें ज्यांनी कांही ग्रंथरचना केली आहे अशा कांहीं गृहस्थांसहि संपादकमंडळांत येऊन काम करण्यास विनंति करण्यांत आली, परंतु बहुतेकांकडून नकारात्मक उत्तरें आलीं.

ज्याप्रमाणें आम्ही कांहीं बाबतींत कांहीं संस्थांचें व व्यक्तींचें सहकार्य मागितलें त्याप्रमाणेंच सामान्य महाराष्ट्रीय जनतेचें व विशिष्ट गोष्टींशीं किंवा प्रश्नांशीं ज्यांचा संबंध निगडित आहे अशा वर्गाचेंहि साहाय्य आम्ही उघड रीतीनें मागितलें.

उदाहरणार्थ, धर्मशास्त्रीय लेख ज्ञानकोशामध्यें कोणत्या धोरणानें लिहावे या प्रश्नाचा विचार करून धर्मशास्त्राच्या अभ्यासकांनीं आम्हांस कांहीं सूचना कराव्या व आपलीं मतें कळवावीं म्हणून 'महाराष्ट्रापुढील धर्मशास्त्रीय प्रश्न व ज्ञानकोशाची अडचण' (परिशिष्ट नं. ५ पहा) या मथळ्याचें एक पत्रक केसरीद्वारा प्रकाशित करून त्याच्या अनेक प्रती ठिकठिकाणीं अनेक लोकांकडे पाठविण्यांत आल्या. परंतु या प्रश्नाचा विचार करून त्यासंबंधीं सूचना अगर मत पाठविण्याचे श्रम कोणीहि घेतले नाहींत. याच तऱ्हेचा दुसरा प्रश्न आज व्यापारामध्यें ज्या निरनिराळ्या व्यवहाराच्या पद्धती आहेत त्यांचें प्रत्यक्ष ज्ञान लोकांस देतां यावें म्हणून आपआपल्या बाजारांतील व्यवहारासंबंधीं माहिती पाठविण्याविषयी एक विनंति पत्रक (परिशिष्ट नं. ६ पहा) मुंबई येथील अनेक व्यापाऱ्यांकडे पाठविण्यांत आलें. परंतु याहि पत्रकास प्रत्युत्तर कोणीच दिलें नाहीं. अशाच तऱ्हेचें तिसरें एक विनंति पत्र महाराष्ट्रांतील नृत्याभिमानी स्त्रीपुरुषांस पाठविलें होतें (परिशिष्ट नं. ७ पहा) महाराष्ट्रामध्यें हल्लीं संगीत व नृत्य या कला सभ्य व सुशिक्षित वर्गांतून नाहींशा झाल्या आहेत व नृत्य ही कला तर जवळ जवळ नष्ट होत आली आहे. या कलेचे अस्तित्व थोडेसे वेश्यावर्गांत कायतें दिसून येतें यामुळें या विषयाची माहिती वाङ्मयाच्या अभावीं मिळविणे कठिण असल्यामुळें ही विनंतिपत्रे काढण्यांत आलीं होतीं. परंतु यांचाहि मुळीच उपयोग झाला नाहीं.

परंतु निरनिराळ्या जातींची माहिती त्या त्या जातींतीलच पुढारी व विश्वसनीय मंडळींकडून मिळावी म्हणून एक बावीस निरनिराळ्या बाबींसंबधी प्रश्न विचारून माहिती मागविली होती (परिशिष्ट नं. ८ पहा). सदरहु प्रश्नपत्रिका अनेक वर्तमानपत्रांत छापवून व अनेक

जातींच्या पुढाऱ्यांस पाठवून तिचा पुष्कळच प्रसार करण्यांत आला होता. या प्रश्नपत्रिकांस मात्र अनेक लोकांकडून उत्तरें आलीं. आपल्या जातीसंबंधीं ज्ञानकोशामध्यें काय माहिती येणार यासंबंधीं जितकी जिज्ञासा लोकांनीं दाखविली तितकी दुसऱ्या कोणत्याहि प्रश्नासंबंधीं दाखविली नाहीं. परंतु जितकी यासंबंधी लोकांकडून जिज्ञासा दिसली तितकाच आम्हाकडे लिहून आलेल्या माहितीमध्यें विचित्रपणाहि दिसला. अनेक जातींनीं आमच्या जातीस अमुक क्षत्रिय म्हणावें, अमुक ब्राह्मण म्हणावें, अमुक वैश्य म्हणावें अशा तऱ्हेने कळविलें. कांहींनी अमुक जातीचा अंतर्भाव आमच्यांत करूं नये असें कळविलें. तर एका जातीच्या नांवाबद्दलच पुष्कळ पत्रव्यवहार व सभा–परिषदा झाल्या. एका जातीच्या लोकांनीं दोन निरनिराळ्या ठिकाणीं सभा भरवून त्या सभांच्या अध्यक्षांमार्फत आम्हांस अशी नोटीस दिली कीं आम्ही आपल्या जातीबद्दल जी माहिती आपणांकडे पाठवूं तीच माहिती तुम्हीं छापावी, दुसरी छापल्यास तुमच्यावर कायदेशीर इलाज करूं. परंतु या अध्यक्षांनीं किंवा सभा भरविणाऱ्या मंडळींनां आपल्या जातीची माहिती आम्हांस अद्यापपर्यंतहि पाठविली नाहीं. व संपादकवर्गापैकीं कांहींचें मत या जातीची माहिती जातीकडून न आल्यामुळें व आम्हास दुसरी माहिती छापूं नये अशी नोटीस दिल्यामुळे या जातीची माहिती देतां आली नाहीं असेंच छापावें असे होतें; परंतु तसें केल्यानें जातींतील कांहीं चळवळ्या मंडळीच्या दोषाकरतां सर्व जातीस शिक्षा देऊं नये असें मत पडलें, आणि त्या ज्ञातींतीलच एका गृहस्थाकडून माहिती घेऊन छापण्यांत आली. बहुतेक जातींची वृत्ति चातुर्वर्ण्यविषयक संस्कारांचा पूर्णपणें लोप झाला असतांहि ब्राह्मण किंवा क्षत्रिय वर्गांत गणना करून घेण्याकडे असे. जातिविषयक माहितीबरोबर फोटोहि मागविले होते परंतु जातीचें वैशिष्ट्य दाखविणारा पोषाख वगैरे असलेला फोटो फक्त सोनकोळी जातीशिवाय दुसऱ्या कोणत्याहि जातीकडून आला नाहीं. कांहीं माहिती पाठविणारांनीं आपले स्वतःचे फोटो स्वतःच किंवा आपल्या आप्तांमार्फत जातीचे पुढारी म्हणून पाठविले; तर कांहींनीं आपणांकडे अमुक फोटो पाठविणारे गृहस्थ आमच्या-जातीचे पुढारी नसून त्यांचा फोटो आपण छापूं नये असें कळविलें. एका गृहस्थानें आपण अमक्या गृहस्थाचा फोटो छापीत असल्यास मी पहिल्या प्रकारचा वर्गणीदार होतों असेंहि कळविलें. अर्थात त्यास तसे

करतां येणार नाहीं असें कळविल्यावर त्याची वर्गणीदार होण्याची इच्छाहि अदृश्य झाली हें सांगावयास नकोच.

ज्ञानकोशाकरितां माहिती पाठवितांना पाठविणाऱ्यांची दृष्टि ऐतिहासिक किंवा चिकित्सक अशी क्वचितच दिसून आली. बहुतेक दिलेली माहिती जातीच्या गौरवपर असून जातीचीं वैगुण्यें किंवा तिच्याबद्दल समाजांत असलेल्या समजुती कोणत्याहि तऱ्हेचा पुरावा न मांडतां केवळ खोटया आहेत एवढेच नमूद केलेलें असे. कांहीं जातींच्या बाबतींत त्यांच्यां जातींतील गृहस्थानींच पाठविलेली माहिती आम्ही छापिली असतां ती त्या जातींतील इतर कांही व्यक्तींस पसंत न पडल्यामुळें ज्ञानकोशकारांवरच टीका करण्यांत आली. ज्या जातीची माहिती छापल्यामुळे विशेष चळवळ, चर्चा वगैरे झाली अशा जाती म्हणजे गोवर्धन व देवरुखे ब्राम्हण या होत. त्या वादविवादांची माहिती पुढे दिलीच आहे ( परिशिष्ट पृष्ठ १२८ व पुढे पहा ).

महाराष्ट्रांतील व एकंदर हिंदुस्थानांतील अनेक संस्थानांचे इतिहास व माहिती त्या त्या संस्थानांकडून तयार होऊन साधार व बिनचूक मिळावी म्हणून एक छापील पत्रक तयार करून सर्व संस्थानांच्या दरबारांस विनंति करण्यांत आली होती. परंतु महाराष्ट्रांतील जमखंडी भोर वगैरे एक दोन संस्थानाखेरीज कोणीहि अशी माहिती पुरविण्याची तसदी घेतली नाही. याप्रमाणे माहिती तयार होऊन येत नाही तेव्हां इतिहास वगैरे ऑफिसांत तयार करून ताजे आंकडे वगैरे घालतां यावे म्हणून ॲडमिनिस्ट्रेशन रिपोर्ट वगैरे माहितीहि मागविण्यांत आली परंतु अशा पत्रांसहि उत्तरें आलीं नाहींत किंवा अहवाल वगैरेहि पाठविण्यांत आले नाहीत.

ज्या घराण्यांचा महाराष्ट्रीय मंडळी अभिमान बाळगतात त्या घराण्यांतील मंडळींनां स्वाभिमान कितपत आहे हें त्यावरून स्पष्ट होईल.

हिंदुस्थानांतील सर्व प्रांतिक सरकारानांहि आपले वार्षिक अहवाल मोफत पाठविण्याविषयीं विनंतिपत्रें पाठविण्यांत आलीं होतीं व मुंबई सरकाराशिवाय बाकी सर्व प्रांतांनीं ब्रह्मदेशसुद्धां आपले वार्षिक अहवाल नियमितपणे आजतागायत पाठविले. मुंबईसरकारने मात्र काटकसरीची सबब पुढे करून आपला अहवाल मोफत पाठविण्याचे नाकारलें. यावरून मुंबई सरकारचे दाक्षिण्य, वाङ्मयाचा पुरस्कार करण्याची वृत्ति व आपल्या प्रांतांत होणाऱ्या कार्यासंबधीं अभिमान हीं चांगलींच दृग्गोचर होतात.

याप्रमाणेंच आम्हांस कांहीं गांवांच्या लोकसंख्येचे नक्की आंकडे पाहिजे होते म्हणून ज्या जिल्ह्यांत हीं गांवें होतीं त्या जिल्ह्यांच्या कलेक्टरांस आम्ही पत्रें पाठविलीं. त्यांची चार जिल्ह्यांकडून चार प्रकारचीं उत्तरें आलीं. एकानें ही माहिती आपण कोणत्या आधारावर मागतां तें कळवा असें विचारलें. एकानें ही माहिती पाठवितां येत नाहीं असे स्पष्ट कळविलें. एकानें योग्य अधिकाऱ्याकडे आपलें पत्र पाठविलें आहे असे उतर दिले व एकाकडून मात्र पाहिजे ते आंकडे आले.

सरकारकडून कांहीं पुस्तके मोफत मिळविण्याचा प्रयत्न केला. त्या बाबतीतहि असेंच दिसून आले. १९१७ सालीं मध्यप्रांत सरकारमार्फत १९११ च्या खानेसुमारीचे अहवाल मोफत मिळाले पण १९२१ च्या खानेसुमारीचे अहवाल तसेच मागविले असतां मुंबईसरकार व मध्यप्रांत सरकार यांनीं एकमेकांकडे बोट दाखवून अखेरीस कोणीच अहवाल पुरविले नाहींत.

वाचावयास पुस्तकें मिळविण्याच्या बाबतींतहि मध्यप्रांत सरकारने प्रथम कांहीं गॅझेटिअरचे भाग मोफत देऊन बाकीचे सेक्रेटारिएट लायब्ररीमधून नेण्यास व इतरहि पुस्तकें नेण्यास परवानगी दिली परंतु पुढें लायब्ररी लावण्याचें काम चालू असण्याच्या सबबीवर पुढे पुस्तकें देण्याचें नाकारलें.

नागपूर सेकंडक्लास सायंटिफिक लायब्ररीनें नागपुरास काम चालू असेपर्यंत पुस्तके पुरविलीं पण तीं वैयक्तिक जबाबदारीवर आणावी लागत. त्यांनीहि संस्थेस पुस्तकें देण्याचें नाकारलें. मुंबईच्या रॉयल एशियाटिक सोसायटीच्या शाखेतील पुस्तकें मिळावी म्हणून मी तिचा सभासद झालों व ती संस्था माझ्या नांवावर पुस्तकें पाठवी पण तिनें संस्थेस पुस्तकें देतां येत नाहींत असें कळविलें व पुढें माझ्या प्रतिनिधीसहि पुस्तकें देण्याचें नाकारलें. तथापि एकंदरीत आम्ही प्राचीन विज्ञानावरील माहिती जमविण्याच्या कामीं रॉयल एशियाटिक सोसायटीच्या लायब्ररीचा पुष्कळच उपयोग करून घेतला.

संपादकीय कार्याचे धोरण व कार्यपद्धति यासंबंधीं आमची योजना परिशिष्ट नं. ३ व १० मध्यें दिलीच आहे. त्यांत ज्ञानकोशाचा कच्चा खर्डा कसा तयार करावयाचा आणि निरनिराळीं कामें केव्हां पूर्ण

करावयाचीं यासंबंधीं आमचे धोरण दिलें आहे. येथें फक्त प्रत्यक्ष ऑफिसमध्यें काम कोणत्या पद्धतीनें होत असे याची माहिती देतों.

प्रथम कांहीं ग्रंथ ज्यामध्यें अनेक प्रकारची माहिती एकत्र केलेली मिळण्यासारखी होती अशा ग्रंथांमधून त्या माहितीचीं टिपणें तयार करण्यांत आलीं होतीं. उदाहरणार्थ हिंदुस्थानविषयक भौगोलिक माहितीची प्राथमिक टिपणें इंपीरियल व प्रांतिक गॅझेटिअरमधून तयार केलीं. जातीविषयक माहितींची टिपणें कास्ट्स अँड ट्राइब्स नांवाच्या ज्या प्रत्येक प्रांतासंबंधीं ग्रंथमाला आहेत त्या, गॅझेटिअर व खानेसुमारीचे अहवाल यांवरून केलीं. बाह्यदेशाविषयक ऐतिहासिक, भौगोलिक व वाङ्मयात्मक माहितीचीं टिपणें निरनिराळ्या इंग्रजी एनसायक्लोपिडियां· मधून घेतलीं, मराठी संत कवी वगैरेचीं टिपणें कविचरित्र, संत–कवि,–काव्यसूची, अर्वाचीनकोश वगैरे ग्रंथांतून घेतलीं, व्यापारी जिन्नसांसंबंधीं टिपणें वॅटच्या कमर्शिअल प्रॉडक्ट्स ऑफ इंडिया या ग्रंथावरून तयार केलीं. याखेरीज सामान्य सांस्कृतिक मजकूर इंडियन अँटिक्वरी, रॉयल एशियाटिक सोसायटीचे जर्नल, अमेरिकन ओरिएंटल सोसायटीचें जर्नल सारख्या नियतकालिकांतून टीपारूपानें घेतला. अशातऱ्हेनें सर्व विषयांवरचीं प्रथम कच्ची टिपणें तयार केलीं. हीं करतांनां कोणत्या विषयांवर टिपण करावयाचें व तें कसें करावयाचें यासंबंधीं माहिती संपादकीय व्यवस्थापक प्रत्येक लेखकास खुणा करून व सूचनारूपाने देत असे. कांहीं गोष्टींसंबंधीं धोरणाबद्दल नियम करण्यांत आले होते. त्याप्रमाणें प्रथम लेखकानें टिपण केल्यावर कोणीतरी टिपणें करून व ऑफीसमध्यें होणारीं व्याख्यानें ऐकून तयार झालेला लेखक तीं टिपणें तपासीत असे. प्रथम हीं टिपणें विषयवार लावण्यांत येत असत व सर्व विषयांचीं टिपणें तयार झाल्यावर तीं अकारविल्ह्यानें लावण्यांत आलीं.

ज्या विषयांवर एकाच पुस्तकांत माहिती मिळण्यासारखी नसे त्या विषयांवर प्रथम वाङ्मय कोणतें आहे तें पाहून त्यांतील पुस्तकांची प्रथम निवड करण्यांत येत असे व अशीं निवडक पुस्तकें जमविल्यावर कोणत्या पुस्तकांतून कोणता मजकूर घ्यावयाचा यासंबंधीं टांचणें करण्यांत येत. हे काम संपादकीय व्यवस्थापक करून पुढें प्रत्यक्ष माहितीचीं टांचणें करण्याचें काम उपसंपादकाकडे देण्यांत येत असे. अशा

तऱ्हेचे बहुतेक काम मुख्य ऑफीस पुण्यास आणल्यावरच झालें. व तें प्रथम अनुभव मिळविलेल्या उपसंपादकांकडून करून घेण्यांत आलें.

वरील पद्धति ज्या विषयावर वाङ्मय तयार होतें त्या विषयासंबंधी अंगिकारिता आली परंतु ज्या विषयावर वाङ्मय मुळीच नव्हते किंवा नवीन संशोधन करणें जरूर होते, अशा बाबतींत निराळी पद्धति अंगीकारावी लागली. उदाहरणार्थ, प्रस्तावनाखंडाच्या दुसऱ्या व तिसऱ्या भागांत अंतर्भूत केलेला वेद व यज्ञसंस्थेसंबंधीचा मजकूर सर्व नवीन संशोधन करून तयार करावा लागला व या संशोधनात पाश्चात्त्य संशोधकापेक्षां आम्हास प्रत्यक्ष यज्ञसंस्थेंत काम केलेल्या याज्ञिक व वैदिकांची मदत असल्यामुळें व येथील परिस्थितीशी आमचा अधिक परिचय असल्यामुळे आम्हांस अनेक गोष्टींवर अधिक प्रकाश पाडतां आला. व बऱ्याच गोष्टींची संगति अधिक चांगल्या रीतीने लावतां आली. याकरितां आम्हांस संहितांचें पादशः पृथक्करण, पदसूची व तिच्या कार्डी तयार कराव्या लागल्या. तैत्तिरीय संहितेची पदसूची अद्याप तयार केली गेली नसल्यामुळें ती आम्हांसच तयार करावी लागली. व तिची प्रेसकॉपी आज आमचेजवळ तयार आहे. ही पूर्वतयारी आम्हांस पुष्कळच करावी लागली व स्वतः वेदविद्येचा अभ्यास करावा लागून अनेक गोष्टींची छाननी करून हा मजकूर तयार करावा लागला. व त्यामुळें महाराष्ट्रीय वाङ्मयांत दोन अपूर्व ग्रंथांची भर पडली. वेदांच्या अभ्यासास या ग्रंथांचे महत्त्व किती आहे हें एम्. ए. च्या परीक्षेकरितां अभ्यास करणाऱ्यांस विशेषतः दिसून आलेंहि आहे.

भारतीय इतिहासाचा एकंदर ज्ञातभाग किती व अज्ञात भाग किती हें काल व स्थलानुक्रमाने संशोधन करून त्याचे तक्ते तयार करावयाचे व उपलब्ध वाङ्मय त्या तक्त्यांत दाखवून मधून अज्ञात अशोधित भाग किती आहे तो दाखवावयाचा व त्या भागावर संशोधन करून या उणीवा भरून काढावयाच्या म्हणूनहि एक प्रयत्न करण्यांत आला. व तसे तक्ते काही तयार करून त्यांतील कांहीं भाग भरलाहि होता, परंतु द्रव्य व काल यांच्या अभावी हें कार्य आम्हांस पूर्ण करतां आले नाहीं.

संज्ञाकोशाची पूर्व तयारी करूनहि तो आम्हांस पूर्ण करतां आला नाही हे पूर्वी लिहिलेंच आहे.

धर्मशास्त्रीय प्रश्नासंबंधी निश्चित मत बनविण्याकरितां सर्व धर्मशास्त्रीय ग्रंथांचें पृथक्करण करून प्रत्येक मुद्दयाच्या चिठ्ठया करून त्यांवर संशोधन करून धर्माज्ञांचे स्वरूप निरनिराळ्या काळीं व स्थळीं कसें बदलत गेलें व आज धर्मशास्त्र कोणत्या स्वरूपांत प्रत्यक्ष व्यवहारांत उरले आहे हें पहाण्याचा प्रयत्न करण्याकरितां एक योजना नागपुरास संपादकीय ऑफिस असतांनां पुणे शाखेचें कार्यकारी रा. राजवाडे, यांजकडे पाठविण्यांत आली होती, परंतु ही योजनाहि वरीलप्रमाणें संकल्पांतच राहिली.

ज्ञानकोशांतील वेदविषयक व भारतीय संस्कृतिविषयक जो मजकूर लिहिला गेला आहे तो बहुतेक मूळ संस्कृतसंहिता व त्यांचे उपबृंहण करणारे, ब्राह्मणे, सूत्र वगैरे ग्रंथांवरून तयार करण्यांत आला. वैदिक विषयांवर इंग्रजी व विशेषत: जर्मन भाषेत बरेच महत्त्वाचे संशोधनात्मक ग्रंथ आहेत व त्यांचाहि उपयोग आम्ही केला यांत संशय नाहीं. परंतु वैदिक विषयांवर लेख लिहावयाचा तो मूळ पाहिल्याशिवाय लिहिणे केव्हांहि समाधानकारक होणार नाही असें आमचें व आमच्या संपादक वर्गाचें निश्चित मत असल्यामुळें आम्ही वेदाचा प्रथमपासून अभ्यास केला व पाश्चात्यांचे लेख तपासून पाहतां त्यांतील बरेच एकांगी व परिस्थितीचें पूर्ण ज्ञान नसतांना लिहिलेले आढळले व त्यामुळें पाश्चात्यांचे अनेक सिद्धान्त आम्हांस खोडून काढावे लागले.

तथापि इतर विषय लिहिण्याच्या कामीं आम्हांस मुख्यत: इंग्रजी ग्रंथांचाच आश्रय करावा लागला. अनेक भारतीय विषयांवरहि देश्य भाषेत वाङ्मय नसल्यामुळे व येथील परकीय सरकार सर्व आपले रिपोर्ट वगैरे इंग्रजी भाषेंत छापीत.असल्यामुळे, जातींची माहिती, खानेसुमारीवरून मिळणारी अनेक प्रश्नांवरची माहिती, गॅझेटिअरसारख्या ग्रंथांवरून मिळणारी भौगोलिक माहिती इत्यादि माहिती सर्व इंग्रजीतूनच घेऊन आम्हांस वापरावी लागली. यामुळें कांहीं गांवांचीं नांवें किंवा इतर नांवें मराठींत मांडतांना मूळ नांवाशीं जुळलीं नाहींत असेंहि आढळून आलें. व याकरितां पत्रव्यवहार करून स्थानिक नांवें मिळविण्याचाहि कांहीं बाबतींत प्रयत्न केला. पण अशा वेळीं आमच्या पत्रांचीं उत्तरे कांहीं महिन्यानंतर व आमचा मजकूर छापला गेल्यानंतर आलीं अशा वेळीं त्यांचा आम्हांस कांहींच उपयोग झाला नाहीं.

बाह्यदेशांचें भूवर्णन, ऐतिहासिक, वाङ्मयविषयक व चरित्रात्मक भाग बहुतेक निरनिराळ्या इंग्रजी सायक्लोपीडिया व इतर त्या त्या विषयांचीं पुस्तकें यांवरून सजविला.

महाराष्ट्राचा इतिहास, वाङ्मय व जाति वगैरे मजकूर तयार करतांना मात्र आम्हांस उपलब्ध मराठी वाङ्मयाचा उपयोग करून घेतां आला आणि या विषयावर आजपर्यंत लिखाण तरी काय झालें आहे हें पाहण्याकरितां आम्हांस आमच्या वाङ्मयसूचीचा उपयोग झाला. परंतु एकंदर मराठी वाङ्मयाचा विस्तारच फार अल्प असल्यामुळें एकंदर ज्ञानकोशाच्या फारच थोडया अंशास महाराष्ट्रीय वाङ्मयाचे साह्य झालें असें म्हटलें पाहिजे. मात्र उपलब्ध सर्व मराठी ग्रंथांचा आम्ही शक्य तितका उपयोग करून घेतला ही गोष्ट येथें नमूद केली पाहिजे. तसेच पारिभाषिक संज्ञा जमविण्याच्या कामींहि आम्ही उपलब्ध मराठी पुस्तकाचा उपयोग करून घेतला.

आम्हांस मुख्य भर इंग्रजी भाषेंतील ग्रंथांवरच द्यावा लागला परंतु इंग्रजी ग्रंथांतील केवळ भाषांतर स्वरूपाचा मजकूर फारच अल्पांशानें ज्ञानकोशांत पहावयास मिळेल. कारण बहुतेक माहिती निरनिराळ्या ग्रंथांतून सारांशरूपानें व टीकारूपानें निरनिराळ्या मुद्यांवर घेऊन ती पुढें एकत्रित करण्यांत आली.

फ्रेंच, जर्मन, डच वगैरे पाश्चात्त्य भाषांतील ग्रंथांचाहि मिसेस केतकर व मिस् कोहन यांचें साहाय्य असल्यामुळें आम्हांस थोडाबहुत उपयोग करून घेतां आला परंतु चिनी, हिब्र्यू, अवेस्ता वगैरे वाङ्मयाचा आम्हांस त्या त्या भाषा जाणणाऱ्या लेखकांच्या अभावीं मुळींच उपयोग करून घेतां आला नाहीं.

---

## प्रकरण १० वें.

## ज्ञानकोश आणि वैदिक संशोधन

ज्ञानकोश तयार करण्याची कल्पना जेव्हां प्रथम मांडली गेली तेव्हां नवीन संशोधन करावयाचें हा त्यांत हेतु नव्हताच तर आपल्याकडे जें संशोधन झालें आहे तेंच मांडावयाचें हा हेतु होता. तथापि वेदविषयक क्षेत्रांतील विषयाकडे जेव्हां मी लक्ष देऊं लागलों आणि वेदविषयक माहिती मांडण्याचा विचार करूं लागलों तेव्हां या विषयांत बरेंच खोल

गेल्याशिवाय आपण कांहींहि लिहिणें धोक्याचें आहे असें वाटूं लागलें. मी ऋग्वेद पूर्वी दोनदां वाचला होता याचा अर्थ एवढाच कीं, ऋग्वेदांतील दोनतीनशें सूक्तें मूळांतून वाचलीं होतीं आणि विल्सन व ग्रिफिथ यांचीं भाषांतरें वाचलीं होतीं आणि अथर्ववेदाचें ग्रिफिथचें भाषांतर व निवडक सूक्तांचें ब्लूमफील्डचें भाषांतर हीं वाचलीं होतीं. तसेंच कांहीं ब्राह्मणग्रंथ वाचले होते. त्यांत गोपथ ब्राह्मण मूळांतून वाचलें होतें, तांडय ब्राह्मण नुसतें एकदां चाळून पाहिलें होतें व ऐतरेय व शतपथ या ब्राह्मणांचीं भाषांतरें वाचलीं होतीं.पण तीं त्यांचें मूळ जवळ ठेवून वाचलीं होतीं. त्यामुळे वेदांत काय आहे याविषयीं मला स्थूल माहिती झाली होती. हें सर्व वाङ्मय ज्या एकाच दृष्टीनें वाचलें ती दृष्टि म्हटली म्हणजे सामाजिक इतिहासाची—विशेषेकरून जातिभेदाच्या इतिहासाची—दृष्टि होय. माझें वेदांचें वाचन हें १९०८।९ च्या सुमारास झालें. त्यानंतर ज्ञानकोशाला हात घालीपर्यंत फारसें झालें नाहीं. तथापि अगदीं पहिल्या वाचनाच्या वेळेस देखील यूरोपीय संशोधकांच्या अनेक मतांविषयीं संशय उत्पन्न झाला होता; तथापि त्याविषयीं कांहीं निश्चित मतें झालीं नव्हतीं. यावेळेस ही संधि साधून वेदाभ्यास आपण बराच करून घ्यावा आणि आपले कोड पुरवून घ्यावे ही इच्छा उत्पन्न झाली आणि डायरेक्टरांची त्यास संमतीहि मिळाली. ही संमती अर्थात तोंडी होती. डॉ. खरे ( ज्ञानकोशमंडळाचे अध्यक्ष ) यांनी मला एवढेंच सांगितलें कीं, जर या अभ्यासांत पैसा खर्च केल्यानें ज्ञानकोशाचें महत्त्व वाढेल असें तुम्हांला वाटत असेल तर आम्हांलाहि वाटत आहे; व संपादकीय धोरणामध्ये आम्हीं ढवळाढवळ कांहीं एक न करण्याची वृत्ति कायम ठेवणार आहों; जो खर्च पडेल तो करावा. वेदाभ्यास जोरानें १९१९च्या डिसेंबरच्या सुमारास सुरू झाला, तो तीन वर्षे चालू होता आणि ज्ञानकोशाच्या मुद्रणास जी दिरंगाई झाली तिचा हा अप्रत्यक्ष फायदा आम्हांस मिळाला. मुद्रणास दिरंगाई झाली नसती तर ज्ञानकोश बराच अगोदर बाहेर पडला असता पण हें संशोधनहि झालें नसतें. तर ज्ञानकोशाचें काम रेंगाळण्याचा हा एक निश्चयात्मक फायदा मिळाला आहे. ज्ञानकोश रेंगाळण्यानें दुसरा एक परिणाम असा झाला आहे; ज्ञानकोशाची किंमत १५७ पर्यंत वाढली असती ती १७७ पर्यंत वाढली. पण हा फायदा नाहीं. कारण त्यामुळें गिऱ्हाईकी करणें जड होऊं लागलें.

वेदविषयक जें संशोधन झालें तें थोडक्यांत देखील येथें देण्याची सोय नाहीं तथापि माझ्या पूर्वीच्या मतांत पडलेले कांहीं मुख्य मुख्य फरक किंबहुना पूर्वकालीन संशोधकांशीं असलेले मतभेद येथें देतों. माझे मत असें झालें आहे कीं सर्व वैदिक वाङ्मय हिंदुस्थानच्याच भूमीवर निर्माण झालें आहे, उत्तरध्रुवप्रदेशीं निर्माण झाले नाहीं. आणि वैदिक यज्ञसंस्था देखील येथेंच विकास पावली, उत्तरध्रुव प्रदेशांत विकास पावली नाहीं. लो. टिळक यांच्या कल्पनांत तथ्य नाहीं असें मात्र नाहीं. ज्याप्रमाणें

**आंबा पिकतो, रस गळतो । कोंकणचा राजा बाई झिम्मा खेळतो ॥**

हे गाणें जरी बरेंच अर्वाचीन काळचें आहे तरी ते पुरुष झिम्मा ज्यावेळेस खेळत असतील आणि कोकण देशाला स्वतंत्र राजा होता, अशा काळची आठवण त्या गाण्यांत ज्याप्रमाणे शिल्लक राहिली आहे त्याप्रमाणें ऋग्वेदांत उत्तरध्रुवकालीन कल्पना वैदिक ऋचांत शिल्लक राहिल्या असतील, असें माझें मत झालें आहे. तथापि लोकमान्य टिळकांचे मुख्य म्हणणें म्हणजे आर्यन् लोक उत्तरध्रुवप्रदेशाकडून इकडे आले आणि हे मला सयुक्तिकच दिसतें. मला वाटतें ते एवढेच कीं आज जें वैदिक ऋचांचें स्वरूप आहे, ते अर्वाचीन आहे व त्यांतील कल्पना फार प्राचीन असून त्यांतील कांहीं उत्तरध्रुवकालीन असणें शक्य आहे.

आज दृष्टीस पडणाऱ्या संहिता येथेंच झाल्या एवढेच नव्हे तर सर्व सूक्तें देखील येथेच तयार झालीं आणि तीं देखील दाशराज्ञ युद्धानंतर झालीं. दाशराज्ञ युद्ध म्हणजे दिवोदास आणि सुदास हे सरहद्दीवरून निघुन कुरुक्षेत्रांपर्यंत लढत लढत आले ते वृत्त. या युद्धाचा आणि या युद्धांत भाग घेतलेल्या व्यक्तींचा आणि त्या व्यक्तींशीं संबद्ध असलेल्या व्यक्तींचा उल्लेख सर्व ऋग्वेदभर पसरलेला आहे आणि त्यावरून ऋग्वेदांतील सर्व सूक्तें या युद्धानंतरचीं आहेत हे मला सिद्ध झाल्यासारखे वाटते. हें युद्ध ज्या पक्षांमध्ये झाले ते दोन्ही पक्ष आर्यन् होते. आर्य व दास यांचें जातियुद्ध कधींच झाले नाहीं. आर्य–दास या वैरुद्ध्याची कल्पना वैदिक लोक आपल्याबरोबर घेऊन आले. ती कल्पना हिंदुस्थानांतच स्वतंत्र तऱ्हेनें उत्पन्न झाली नाहीं. दिवोदास आणि सुदास हे भरत होते. त्यांनीं विजय हिंदुस्थानांतील आर्यन् लोकांवरच मिळविला. ऋग्वेद हा ग्रंथ आर्यन् लोकांचा दासांवर किंवा काळ्यांवर विजय दाखवीत

नसून भरतांचा देश्य आर्यन् लोकांवर विजय दाखवितो. दास व आर्य हा भेद जाति विषयक म्हणजे रक्त विषयक नसून यजनविषयक होता. आर्य आणि दास यांच्यामध्यें जसा सांस्कृतिक भेद होता तसाच तो देश्य आर्य आणि नवीन आलेले आर्य यांच्यांतहि होता. नवीन आलेल्या आर्यांचें वाङ्मय वेदांतील सूक्तें होत.

पण देश्य आर्य लोकांचे वाङ्मय निराळें आहे. सूतांनीं सांगितलेल्या कथा उर्फ इतिहासपुराणें हें स्थानिकाचें वाङ्मय होतें. त्यामुळें नवीनांच्या संस्कृतीस मात्र संस्कृति हें नांव दिलें आहे. जुन्या लोकांमध्यें देखील अनेक निरनिराळया जाती व संस्कृती होत्या. शक व मग यांची वसाहत देशांत वेदपूर्वकालीन आहे. आणि जुन्या आणि नव्या लोकांच्या संस्कृतीचें एकीकरण जेव्हां मोठमोठे यज्ञ होत त्यावेळेस झालें. वैदिक वाङ्मयाच्या संहिता बनल्या त्या कांहीं अंशीं नवीन सूक्तें झालीं त्याच वेळेस बनत होत्या. व्यासाच्या काळीं म्हणजे महाभारताच्या काळीं वेदांचें संहितीकरण बरेंचसें झालें होतें व व्यास शिष्यांच्या काळीं म्हणजे कुरुयुद्धानंतर १०० वर्षांच्या अवधीच्या आंत संहितांचें स्वरूप जळवजवळ आजच्या सारखें झालें इत्यादि गोष्टी मी मांडल्या आहेत. ही एकंदर मांडणी करताना ज्ञानकोशमंडळांतील मंडळीमध्यें वेदावर चर्चा दररोज होई आणि दाशराज्ञयुद्धानंतर सर्व सूक्तें झालीं असा पक्ष मी घेतला होता. तर रा. सिद्धेश्वरशास्त्री चित्राव व श्रौताचार्य धुंडीराज बापट हे विरुद्ध पक्ष घेत. रा. दाते हे प्रथम एक दोन दिवस जरी माझ्या विरुद्ध मताचे होते तरी पुढें ते माझ्याच मताचे झाले व कांहीं दिवसांनीं रा. चित्राव व रा. धुंडिराज बापट यांची देखील खात्री पटली. प्रत्येक सूक्त दाशराज्ञ युद्धापूर्वीचें आहे हें कारणासह दाखविणारें कोष्टक रा. दाते यांच्या हातचें आहे.

आमचीं मतें पूर्वीच्या अभ्यासकांपासून निराळीं आहेत हें दाखविण्यासाठीं आम्हीं एक पत्रक काढलें होतें. तें पत्रक जगांतील सर्व महत्त्वाच्या युनिव्हर्सिट्यांकडे पाठविलें होतें. त्या पत्रकांत काय आलें आहे हें लंडनटाईम्सच्या लिटररी सप्लिमेंटनें मांडलेंहि होतें पण त्यावर विशेष चर्चा झाली नाहीं त्यामुळें पुस्तकाची जाहिरात परदेशीं होऊन पुस्तकास मागण्या मात्र आल्या.

मराठी ज्ञानकोशास परदेशांतून ज्या संस्थांकडून व युनिव्हर्सिटयां- कडून मागण्या आल्या त्यांची यादी पुढीलप्रमाणें आहे:-

१ रॉयल अँथ्रोपॉलॉजिकल इन्स्टिटयूट-लंडन.

२ मेसर्स प्रोबस्थियन आणि कं. लंडन.

३ उपसाला युनिव्हर्सिटी-स्वीडन.

४ प्रशीअन स्टॅटबिब्लीओथेक, ओरिएंटॅलिस् अॅबटेलंग-बर्लिन.

५ प्रागच्या युनिव्हार्सिटीची लायब्ररी-चेकोस्लोव्हाकिया.

६ एल्. इकोल फ्रॅन्साइस डी इ एक्सट्रीम ओरिएंट-हॅनोइ ( फ्रेंच इंडो चायना ).

७ कोलंबिया युनिव्हर्सिटी-न्यू यॉर्क अमेरिका.

८ ग्रोनिंगनची युनिव्हार्सिटी-नेदरलँड्स्.

९ रॉयल लायब्ररी कोपनहेगन-डेन्मार्क.

## भारतांतील वेदपूर्व आर्यन् संस्कृति व वैदिक संस्कृतीचा तिजवर घडलेला परिणाम

"महाराष्ट्रीय ज्ञानकोश तयार करण्याच्या कामांत प्रसंगतः वेद वाङ्मयाचा अभ्यास आम्हांला फार बारकाईनें पृथक्करण करून करावा लागला. हा सूक्ष्म पृथक्करणात्मक अभ्यास दहा एक विद्वान अभ्यासक तीन वर्षांवर पावेतों माझ्या देखरेखीखालीं करीत होते. आम्ही ऋग्वे- दांतील प्रत्येक पाद तपासून त्याचें वर्गीकरण केलें आहे. ऋग्वेदाच्या मंत्रभागांत प्रतिबिंबित झालेला यज्ञक्रियेचा क्रमानें झालेला विकास आम्ही बारकाईनें तपासला आहे. व हा विकास होत होत त्यांतून श्रौतसूत्रांत दिसून येणारा धर्म कसा उदयास आला त्याचे धागे आम्ही लावले आहेत. हें काम करीत असतां आणि वेदवाङ्मयांतील विषय- सूत्रांचा इतिहास पुराणांतील विषयांशी संबंध तपाशीत असतां आम्ही कांहीं सिद्धांत बसविले आहेत. हे सिद्धांत पंडितांपुढे ठेवून त्यांच्या- कडून या सिद्धांतांचें परीक्षण करून घ्यावें अशी आमची इच्छा आहे. म्हणून हें पत्रक आम्ही काढलेलें आहे. यांत आमचा पुरावा आम्ही दाखल करीत नाहीं. आमचे सिद्धांत मात्र दाखल करीत आहों.

१ ऋग्वेदाच्या मंत्रांत जो इतिहास आहे तो भारतांतील अगदी पहिल्या आर्यन् वसाहतीचा नाहीं.

२ मंत्रांत ज्या आर्यन् वसाहतीचें चित्र सांपडतें, त्या वसाहतीच्या अगोदर आर्यन् महावंशांत मोडतील अशा जातीचें वास्तव्य देशांत झालेलें होते. पूर्वबंगाल व महाराष्ट्र वगळून आज आर्यन् भाषा बोलणारा जेवढा प्रदेश आहे तेवढा किंवा थोडासा कमी अधिक प्रदेश सदरील आर्यन् जातींनी व्यापला होता. सीलोन किंवा लंकाप्रदेशहि त्या काळीं या आर्यन् वंशाच्या लोकांनीं वसला होता.

३ शक आणि मग या जातीही भारतांत मंत्रकर्त्या लोकांच्या म्हणजे ज्यांनां आर्यन् म्हणण्याचा प्रचार आहे त्या लोकांच्या अगोदर येऊन राहिल्या असाव्या. मांत्रसंस्कृति अथवा ज्या लोकांचा भारत प्रवेश ऋग्वेदांत चित्रित झाला आहे त्या लोकांची संस्कृति, भारतांत अगोदर अस्तित्वांत असलेल्या आर्यन् संस्कृतींहून थोडी निराळी होती. या अगोदरच्या संस्कृतीला प्राचीनतर आर्यन् संस्कृति हे नांव देणे युक्त होईल.

४ प्रचलित समजुतीनें ज्यांस आर्यन् नांव दिले आहे ते अथवा मंत्रकर्ते लोक भारतांत येण्यापूर्वी तेथील आर्यन् जाती ज्या संस्कृतीचा उपभोग घेत होत्या ती संस्कृति निदान १००० वर्षांची तरी असावी.

५ प्राचीनतर आर्यन् संस्कृतींत समाजाचें धुरीणत्व क्षत्रियांकडे होतें व ब्राह्मण वर्गाचा अभाव होता. आथर्वण विद्येचे लोक थोडेफार तरी या प्राचीनतर समाजांत असावे. हे वेदपूर्वकालीन आथर्वण वर्गीय लोक सामान्य जनतेंत मिसळून गेले असावे, अथवा त्यांची अवनति होऊन गारुडी, भुतें काढणारे, गारपगारी, ( गारांपासून रक्षण करणारे ) वगैरे वर्ग त्यांतून निघाले असावे.

६ या प्राचीनतर आर्यन् संस्कृतींत लेखनव्यवसायी वर्गाच्या जातीचा असा महत्त्वाचा वर्ग म्हणजे सूतांचा अथवा भाटांचा होता.

७ गंगानदीच्या खोऱ्यांत पूर्वेकडील भागांत एकदां चालू असलेला अथर्व्यांचा यज्ञसंप्रदाय ( पुढे मंत्र कर्त्यांचा अग्न्युपासनेचा संप्रदाय नष्ट झाला त्याप्रमाणे ) मांत्र आर्यन् येण्यापूर्वीच सर्वस्वी नष्ट झाला असावा. सरस्वती नदीच्या आसपास अथर्व्यांची विद्या थोडीफार जगली असावी.

८ पुराणांतील कथांचे मूळभाग, उपनिषदांतील मताचा बराचसा भाग, जैन व बौध्द मतांचे पूर्वस्वरूप आणि विद्याधर–गुह्यकादि देवयोनींचे काल्पनिक वर्ग या गोष्टी प्राचीनतर आर्यन् संस्कृतीतील आहेत.

लिंगोपासनाहि या संस्कृतीतील असावी. या संस्कृतींत आर्थिक संस्था चांगल्याच उन्नतावस्थेंत गेलेल्या असाव्यात.

९ वाङ्मयांतील विवक्षित राष्ट्रविषयक उल्लेखाची प्राचीनता आणि त्या राष्ट्राच्या भारतभूमींतील वास्तव्याची प्राचीनता या दोन गोष्टींचा घोटाळा करूं नये. एखाद्या राष्ट्राचा उल्लेख वेदवाङ्मयाच्या उत्तरकालीन भागांत आला असल्यास तो त्या राष्ट्राच्या अर्वाचीनत्वाचा पुरावा आहे असें समजून चालूं नये. उल्लेखित राष्ट्र पूर्वेकडील असेल तर त्यास हा नियम विशेष लागू आहे. वेदकालीन ग्रंथकारवर्ग पश्चिमेकडून पूर्वेकडे प्रयाण करीत होता त्यामुळें पूर्वेकडे पूर्वीपासून असलेलें राष्ट्र या वर्गाच्या नजरेस पश्चिमराष्ट्रांच्या नंतर येण्याचा संभव होता. राष्ट्र अधिक जुनें असेल तसें तें अधिक नंतरच्या वाङ्मयभागांत येण्याचा वरील परिस्थितीमुळे संभव आहे.

१० ऋग्वेदसूक्तांचा मोठा भाग विशेषतः मंडलें २ ते ७ यांतील-म्हणजे गोत्रमंडलातील सूक्तें दाशराज्ञयुद्धाच्या काळीं अथवा त्या युद्धाच्यानंतर रचलेलीं आहेत. ऋग्वेदांतील उल्लेखांवरून व्यक्त होणारा विषय दिवोदास व सुदास यांच्या नेतृत्वाखालीं भरतांचा भारतांत प्रवेश व वसाहत हा आहे; सामान्यत्वानें आर्यन् लोकांचा प्रवेश व वसाहत हा नाहीं.

११ वेद हे तीन संहितीकरणाच्या क्रियेनें तयार झाले आहेत. ऋग्वेदमंत्रांत दिसून येणारें सोमयागाचें प्राथमिक स्वरूप बदलून यजुर्वेदांत व ब्राह्मणांत दिसून येणारें अवयवबाहुल्यात्मक विस्तृत स्वरूप ज्या काळीं या यागाला प्राप्त झालें त्या काळीं वेदांचें पहिलें संहितीकरण झालें. सोमयागाचें बदललेलें रूप बाहेरून आलेल्या मंत्रकर्त्या लोकांच्या पुरोहितवर्गानें आपल्याच अकलेनें बसविलें कीं या कामांत या वर्गाला कसा तरी जीव धरून राहिलेल्या स्थानिक पुरोहितांची मदत झाली असावी पण ती कितपत झाली हें निश्चित सांगतां येत नाहीं.

१२ यज्ञ चालू असतां मध्यें मध्यें इतिहास पुराणांचा उपयोग होई. या क्रियेंत दोन संस्कृतींची जोड घालण्याचा प्रयत्न दिसतो. ब्राह्मणांतून ऐतिहासिक गोष्टींचा निर्देश येतो त्यावरूनहि हेंच अनुमान निघतें.

१३ तीनहि संस्करणांची म्हणजे संहितीकरणांची वेदवाङ्मयावर स्पष्ट छाप पडली आहे. ऋग्वेदांतील आठव्या व नवव्या मंडलांतील जीं

सूक्तें सामवेदांत आलीं असून त्या वेदांतील मोठा भाग ज्यांनीं व्यापला आहे तीं सूक्तें मूळच्या मंत्रकर्त्या लोकांबरोबर आलेल्या पण विशिष्ट गोत्रांच्या वाङ्मयांत नव्हतीं. तीं सोमयागाचें उपबृंहण झालें त्या कालीं गोत्रवाङ्मयाशीं जोडलीं गेलीं. तीं घालण्याचा उद्देश सामगायकांनां सोमयागामध्यें स्वतंत्र स्थान देण्याचा असावा.

१४ पहिलें सम्करण झालें त्या काळाच्या सुमारासच सामवेदाचा मोठा भाग तयार झाला असावा आणि ऋग्वेदांत ८ व ९ हीं मंडळें घातलीं असावीं.

१५ दुसरें संस्करण कुरुयुद्धाच्या काळीं झाले असावें आणि या संस्करणाचा कर्ता द्वैपायन व्यास हाच असावा.

१६ तिसरें संस्करण व्यासाच्या नंतर कांही काळानें म्हणजे सुमारें ९०।१०० वर्षांनीं झालें असावें.

१७ पहिल्या व तिसऱ्या संस्करणाच्या दरम्यानचा काळ हा पुरोहित वर्गातील मोटया लढयाचा काळ होता. आरंभीं हा लढा एका बाजूला अथर्वे व दुसऱ्या बाजूला त्रैविद्य (म्हणजे ऋग्वेदी, यजुर्वेदी व सामवेदी) यांच्यामध्यें उपस्थित झाला. हा लढा मंत्रकर्त्या लोकांच्या समाजांतच चालला असावा, त्याच्याबाहेर गेला नसावा.

१८ अथर्वन् लोकांत प्रथम एकाग्निपूजा चालत असे. तिचे स्वरूप कांहीं अंशीं आपणांस गृह्यसूत्रांत पहावयास मिळते. या अथर्व्यांचे संस्कार लांबलचक नसत, अगदीं थोडक्यांत होणारे असत.

१९ मंत्रकर्ते आर्यन् जसे भारतांत वस्ती करून राहिले, तशी रोजची अग्निपूजा कमी होत गेली. सोम दुर्मिळ झाला, आणि सामान्य जनतेंत यज्ञसंप्रदाय मागें पडला. हळू हळू धंद्याकरतां नव्हेतर पोकाकरतां भिक्षुकी कर्मे करणारा अशा अर्थाचें ऋत्विज नांव धारण करणारा धंदेवाईक याज्ञिकांचा वर्ग उत्पन्न झाला. ऋतुपरत्वें म्हणजे प्रसंगानुसार यजन करीत ते ऋत्विज्; ते धंदेवाईक याजक नव्हत. हे ऋत्विज लोक सार्वजनिक वर्गणीने मोठाले यज्ञ करू लागले व यज्ञामध्ये लांबलचक विधीची व संस्कारांची भर यांनीच घातली.

२० ब्राह्मण जातीचा इतिहास हा वेदवाङ्मयाच्या इतिहासाशीं व यज्ञविधीच्या विकासाच्या इतिहासाशी अन्योन्याश्रयानें निगडित झालेला आहे.

२१ मांत्रसंस्कृतींत अगदीं जुन्यात जुन्या कालापासून अथर्वे लोक असले पाहिजेत. या संस्कृतीत ते वर्गाच्या रूपानें होते व कीं त्यांची जात होती, त्याचप्रमाणें त्यांची जात नसेल तर त्यांचा वर्ग पितापुत्रपरंपरेनें चालणारा होता कीं नव्हता हें स्पष्ट होत नाहीं.

२२ अथर्वे लोकांचा वर्ग प्राचीनतर आर्यन् संस्कृतींतहि असावा. परंतु हा वर्ग वर एके ठिकाणीं वर्णिल्याप्रमाणे लवकरच नष्ट झाला असावा.

२३ मांत्रसंस्कृतींत अथर्व्यांची जागा त्यांच्याहून बलिष्ठ अशा वर्गानें म्हणजे त्रयी विद्येचा मूळ उत्पादक व वहिवाटदार, तसेच उपबृंहित यज्ञसंस्थेंत पौरोहित्य करणारा असा जो वर्ग त्या वर्गानें घेतली. हा वर्ग कांहीं अंशानें अथर्व्यांमधून म्हणजे ‘मंत्रद्रष्ट्यां’ मधून तयार झाला असावा.

२४ तीन विद्या धारण करणारे असें जें उपबृंहित यज्ञसंस्थेचे पुरोहित त्यांचें पहिलें शिक्षण निराळें असल. समाजामध्ये सामान्य आर्थिक कारणांनींच या लोकांचे वर्ग प्रथम अस्तित्वांत आले असतील. पुढें हे वर्ग यज्ञांत पुरोहितपणाचे काम करूं लागले तेव्हां निरनिराळी स्वतंत्र कर्मे त्यांजकडे आलीं. या कर्मांची व्यवस्था करण्याच्या हेतूने विशिष्ट कर्मांसाठीं मंडळी या धोरणाने सदरील वर्गांनीं भिन्न वेद स्थापिले. यज्ञविद्येत या रीतीनें विविधता उत्पन्न झाली.

२५ अध्वर्यूंचा अथवा व्यवस्थापकांचा वर्ग कोणत्या वर्गाच्या पोटांतून निघाला याचा विचार करतां होत्याच्या कर्माचें विविधिकरण झालें तेव्हां त्या होतृवर्गाच्या पोटांतून अध्वर्यूंचा वर्ग निघाला असें दिसतें.

२६ यज्ञपुरोहितांत अथवा ऋत्विजांत एकामागून एक भांडणे झालीं. या भांडणांचा उगम अध्वर्यूंच्या आपसांतील भांडणांत असावा. सार्वजनिक कार्यांत अथवा समारंभांत व्यवस्थापक मंडळी संहतप्रयत्नानें पैसा जमवितात व व्यवस्था करतात. तेव्हां या व्यवस्थापकांत फळ्या आणि तट पडण्याला जीं कारणे होतात तशींच कारणें वरील भांडणांनां झालीं.

२७ वेदसहितांची आज उपलब्ध असलेली आवृत्ति तयार केली गेली त्याकाळीं ब्राह्मणांमध्यें वेदांप्रमाणे व शाखांप्रमाणे म्हणजे यज्ञांत कराव्या लागणाऱ्या विशिष्ट कर्मांनुसार व ऋत्विजांमधील पक्षानुसार

भेद उत्पन्न झालेले होते. ब्राह्मण तेव्हां वर्गरूपानें असोत वा जाति-रूपानें असोत, हे आतां सांगितलेले भेद मात्र तेव्हां जातिभेदाच्या स्वरूपाचे बनलेले नव्हते, असें दिसतें. आज या भेदांपैकीं कांहीं प्राचीन काळीं होते तसे शैक्षणिक व धार्मिक स्वरूपाचेच राहिले. कांहीं कृष्ण यजुर्वेदी—शुक्ल यजुर्वेदी—याप्रमाणें पक्षात्मक होते त्यांनां मात्र कालांतरानें जातींचें स्वरूप प्राप्त झालें. सूत्रभेदानुसारहि पुढें भेद झाले परंतु या भेदांमुळें समाजांत फळ्या कांहीं नेहमींच उत्पन्न झाल्या नाहींत. त्रैविद्यांनीं यज्ञसंस्था उपबृंहित केली तेव्हां अथर्वन् लोक एकीकडून या संस्थेंत हक्काचें स्थान मागूं लागले व दुसरीकडून यज्ञकर्मांत कांहीं अर्थ नाहीं असें म्हणून त्या कर्माचा प्रचार कमी करण्याचा त्यांनीं उद्योग चालविला. यज्ञकर्मांत स्थान मिळविण्याच्या हेतूनें त्यांनीं अथर्व संहितेची पुनर्रचना केली. अथर्व्यांची मागणी त्रैविद्यांनीं कांहीं काळ पावेतो कानाआड केली. पुढें त्रैविद्यांत कृष्ण आणि शुक्ल अध्वर्यूंच्या नेतृत्वाखालीं पक्ष उत्पन्न झाले तेव्हां शुक्ल अध्वर्यूंनीं अथर्वन् लोकांशीं मिळून घेण्याची वृत्ति स्वीकारली, आणि यामुळें अथर्व्यांचें म्हणणें हळूहळू ऐकलें जाऊन यज्ञांत ब्रम्ह्याचें स्थान त्यांनां मिळालें. या स्थानाला मिळाला तर फार विद्वान व विचक्षण मनुष्य लागतो तो तसा न मिळाला तर एखादा मूर्खच परवडतो.

२८ वेदांचें तिसरें संस्करण झालें त्याच्या अगोदर त्रैविद्यांचा अथर्व्यांशीं सलोखा झालेला होता. या संस्करणाच्या काळीं यज्ञकर्म मागें पडत चाललेलें होतें. अथर्व्यांशीं समेट व वेदांचें तिसरें संस्करण या गोष्टी घडून येण्याच्या अगोदर ऋग्वेदी लोकांनं आपल्या वेदांत अथर्व्यांच्या संस्कारविधेचा समावेश दहाव्या मंडळ[illegible] करून घेतला होता; गृह्यकर्में व गृह्यसंस्कार हें जें अथर्व्यांचें क्षे[illegible] यांत पाऊल टाकून आक्रमण करण्याचीहि त्यांची तयारी झालेली [illegible] अथर्व्यांना हटवीत हटवीत अगतिक करण्याची क्रिया ज्या काळीं [illegible]ह्य[illegible]त्रें रचली गेलीं व श्रौतसूत्रें तयार होऊन त्यांत ब्रम्ह्याच्या मंत्र[illegible] [illegible]मावेश केला गेला तेव्हा पूर्ण झाली.

२९ ऋग्वेदांतील मंत्रांत दिसणारा सा[illegible] याग जाऊन त्याच्या ठिकाणीं संकीर्ण व श्रमसाध्य अस[illegible] [illegible]ग्रंथांतील विधिवचनांनुसार चालणारा यज्ञ आला त्याकाळ[illegible] [illegible]गति बदललेली

होती. मंत्रकर्त्या आर्यन् लोकांबरोबर जो पुरोहितवर्ग भारतांत आला त्याला या काळीं प्राचीनतर आर्यन् संस्कृतीच्या लोकांत व राजन्य वर्गांत वागावयाचें होतें. या नव्या परिस्थितींत यज्ञविषयक विधींचें समर्थन अर्थवादांनीं करतांना पुरोहितांनीं प्रसंग ओळखून अर्थवादांत केवळ खऱ्या इतिहासाचा आश्रय करणें सोडून दिले, आणि हरिश्चंद्र, भीम, जनक वगैरे नव्या यजमानांच्या पूर्वजांचीं नांवें अर्थवादांत समाविष्ट करून अमुक विधि हरिश्चंद्रानें यज्ञ केला त्या प्रसंगीं प्रचारांत आला, अमुक भीमाच्या वेळीं सुरू झाला असें मंडन त्यांनी आरंभिलें. तसेच पंजाबच्या प्रदेशांतील आर्यन् लोकांच्या वस्तीत वेदांतील सूक्तें तयार झालीं तीं गंगाप्रदेशांतील आर्यन् वस्तीत तयार झालीं असें कल्पून हे पुरोहित लोक त्यांचा अर्थ लावूं लागले.

३० ब्राह्मणग्रंथांत पुराणांतील कथांचे उल्लेख आहेत, ते पुराणांतील विस्तृत कथांचे मूल आहेत असें समजूं नये. पुराणांतील कथा, पुराणविद्या ब्राह्मणरचनेच्या पूर्वीच अस्तित्वांत होती व ब्राह्मण ग्रंथांत पुराणकथांचे उल्लेख हे यज्ञकर्म सजविण्यासाठीं पुरोहितांनीं घातलेले आहेत. ”

“याप्रमाणें वेदांच्या सूक्ष्म अभ्यासानें जी मतें आम्हांला बनवावी लागलीं तीं सारांशरूपानें वर दिलीं आहेत. या मतांचें पंडितांनी परीक्षण करावें अशी आमची इच्छा आहे.

आमच्याजवळ असलेला पुरावा पंडितांनां पहावयास मिळाला नाही तोंपर्यंत आमचीं मते त्यांनां मान्य होतील अशी आशा आम्ही करीत नाही. आपणांपुढें आज आम्ही केवळ आमची सामान्य कल्पना ठेवीत आहों. व या सामान्य कल्पनेवर आपले मत आम्ही मागत आहों. या कल्पनेला आधारभूत असलेल्या तपशिलाच्या गोष्टी आज आम्ही मागे ठेविल्या आहेत. या विषयाचें ज्यांनां चांगलें ज्ञान आहे, या विषयाच्या वाङ्मयाशीं ज्यांचा चांगला परिचय आहे ते लोक आम्ही पुढे मांडलेल्या गोष्टींवरून भारतीय समाजाच्या विकासासंबंधी आमची काय कल्पना आहे ती सर्वस्वी जरी नाही तरी बहुतांशानें ओळखतील व या कल्पनेला धरून चालल्यास कांहीं असंबद्धता व असंगति उत्पन्न होते कीं काय तें सांगूं शकतील. आम्ही बसविलेल्या सिद्धांतांची विशेष बारकाईनें तपासणी करण्याची ज्या पंडितांची इच्छा असेल त्यांजशी पत्रव्यवहारानें विचारविनिमय करण्यांत आम्हांस मोठा आनंद होईल.

वेदादि वाङ्मयाचें संशोधन करून ज्यांचें भारतीय इतिहासावरील मत आमच्या वर निर्दिष्ट केलेल्या मतासारखें जवळजवळ झालेलें असेल त्यांनीं आमच्याकडे दोन शब्द लिहून धाडण्याची कृपा करावी. आम्ही ज्या मार्गावर आहोंत त्याच मार्गावर आलेल्या लोकांनां आमची कल्पना इतरांपेक्षां अधिक चांगली छानतां येईल व त्या कल्पनेंत महत्त्वाचे फेरफार सुचवितां येतील." श्री. व्यं. केतकर

× × × × ×

वरील सर्व मजकूर मराठींतूनहि प्रसिद्ध केला आणि त्यामुळें बऱ्याच लोकांचें लक्ष ज्ञानकोशांतर्गत संशोधनाकडे वेधलें गेलें, हे मात्र येथें सांगतां येईल. या संशोधनावर व्याख्यानें देण्याकरितां संपादकमंडळापैकीं रा. दाते व मी अशा दोघांनांहि आमंत्रणें आलीं होतीं. यावरून महाराष्ट्रामध्यें वेदकालविषयक संशोधनासंबंधानें जिज्ञासा आहे हें मात्र स्पष्ट झालें. यूरोप आणि अमेरिका येथील संस्कृत भाषेच्या अभ्यासकांकडून आमचें म्हणणें एखाद्या पाश्चात्त्य भाषेंत मांडण्यासाठीं इच्छा प्रदर्शित केली गेली आणि प्रो. विंटरनिट्झ यांनी सांगितलें कीं, जर तुम्ही आपलें म्हणणें इंग्लिशमध्यें मांडलें तर तें जर्मनमध्यें मांडण्याचें काम मी करीन.

---

## प्रकरण ११ वें.

## मुद्रणकालांतील संपादन

मुद्रण चालू असतां संपादनाचें काम काय चाललें होतें याची कल्पना देणें अवश्य आहे. वैदिक संशोधन इकडे जरी चालू होतें तरी मुद्रणासंबंधानें लौकर व्यवस्था व्हावी ही आमची इच्छा होती एवढेंच केवळ नव्हे तर संशोधन हें प्रकाशनाला दुय्यम ठेवण्याचीच वृत्ति होती. संशोधन कधींच संपावयाचें नाहीं याची जाणीव आम्हाला होतीच. १९२२ च्या एप्रिल मध्यें मुद्रणशाखा सुरू झाली, तरी तिचें दृश्य फल (म्हणजे ९ वा विभाग) बरेच दिवस दिसलें नाहीं व त्यामुळें लोकांत अविश्वास वाढत होता. कच्चें हस्तलिखित तयार झालें तरी बरीच मंडळी कायम ठेवली आहे याचें कारण काय, इत्यादि संशयगर्भ प्रश्न पुण्यांतील कित्येक शेअर होल्डर आणि वर्गणीदार एकमेकांत विचारीत; आणि त्यांस आपापल्या बुद्धीप्रमाणें उत्तरें देत, आणि हे माझ्या नजरेस आलें होतें.

ज्ञानकोशाचे भाग बाहेर पडत नाहींत आणि ज्ञानकोशमंडळ हें एक वाङ्मयचर्चेचा क्लब आहे आणि त्या क्लबांतील मंडळी आपल्या उपजीविकेचा भार शेअरहोल्डरांवर घालीत आहेत, पुस्तक बाहेर पडत नाहीं तरी मंडळी मात्र राखली आहेत अशा तऱ्हेचा ध्वनि पुण्यांत मधून मधून ऐकू येई. तो शेअरहोल्डर व वर्गणीदार यांच्या बाहेरच्या वर्गांत जास्त येई. स्थानिक पत्रांतून मात्र अशा तऱ्हेची चर्चा आली नव्हती तथापि या तऱ्हेच्या टीकेस उघड तोंड केव्हां फुटेल याचा नेम नव्हता.

आमचें छापणें छापखानदारांच्या दुर्दैवी असमर्थतेमुळें लांबणीवर पडलें होतेंच; पण छापखाना काढण्याच्या विरुद्ध मत डिरेक्टरांत होतें. डॉ. केतकर यांस पगार मिळतो तो छापखानदार म्हणून मिळत नाहीं, त्यांची छापखानदार या नात्यानें किंमत मोठी नाहीं, त्यांनीं आपल्या उत्साहाचा दुरुपयोग करण्याचें कारण नाहीं अशीं मतें प्रतिपादिलीं जात. पण असें प्रतिपादण्यांत प्रतिपादणाऱ्या व्यक्तीचा केवळ स्वार्थ होता असेंहि नाहीं. नागपूरची मंडळी ज्ञानकोशमंडळीनें आपला छापखाना काढावा याच्याविरुद्ध होती. ज्ञानकोशमंडळाने छापखाना काढूं नये म्हणून रा. पाध्ये खटपट करीत होते, व त्यांच्या बोलण्याचा प्रतिध्वनि रा. कठाळे यांच्यामार्फत चालकमंडळांत उठे. दुसऱ्या छापखानदारांनी काम वेळेवर केलें नाहीं म्हणून आमचे ग्रथ बाहेर पडत नाहींत असें सांगण्याची आज संधि आहे पण तुम्ही स्वतः छापखाना काढल्यास तसें सांगून सुटण्याची संधि गमावाल असेंहि एका गृहस्थानें सांगण्यास कमी केले नाहीं. ही स्थिति १९२० मध्यें होती; व १९२२ मध्यें देखील ती वृत्ति डिरेक्टरांत होतीच. तीमुळें मी छापखाना डिरेक्टरांस न विचारतां काढला आणि त्यावेळेस आम्हीं जरी मुद्रणाचें काम जोरानें सुरू केले तरी त्यावेळेस आम्ही ऑफीसमध्ये काय करीत आहोत याविषयीं शेअरहोल्डरांनां आणि वर्गणीदारांनां विश्वासांत घेणें अवश्य झाले आणि त्यामुळें १९२२ च्या सप्टेंबरच्या पत्रकांत पुढीलप्रमाणें खुलासा करणे अवश्य झालें.

## ज्ञानकोशमंडळाचें उरलेलें संपादकीय कार्य

ज्ञानकोशाचें हस्तलिखित जर जवळ जवळ तयार झालें आहे, तर सध्यां संपादकवर्ग काय करीत आहे, असा प्रश्न वारंवार कित्येक हितचिंतक विचारतात तर त्यांस हें सांगितलें पाहिजे की हस्तलिखित

जवळ जवळ तयार झालें तरी त्यांत कांहीं भाग नवीन करून घालावा लागतो. उणीवी वारंवार सांपडतात, लेखकांस आपले इष्ट विषय ज्ञानकोशांत आहेत किंवा नाहींत हें छापण्यास सुरवात होण्यापूर्वी पहावे म्हणून आमंत्रण केलें आहेच. त्या आमन्त्रणाप्रमाणें कांहींकडून ते ( गळालेले विषय ) दाखविण्यांतहि येतात.

शिवाय हस्तलिखित छापण्यापूर्वी त्यावर अनेक संस्कार करावे लागतात. लेखनशुद्धि पहाणें, संज्ञांचे एकीकरण करणे, पॅरिग्राफ पाहाणें, प्रत्येक परिच्छेदास सूचक नांव आहे किंवा नाहीं हें पहाणें, पूर्वीच्या परिच्छेदाचा आणि पुढच्या परिच्छेदाचा संबंध चांगला नसला तर दुरुस्त करणें, भाषा तपासणें, संदर्भ तपासणे, कोणता मजकूर कोणत्या टायपांत घालावयाचा याची सूचि देणे, पूर्वी वापरलेल्याच संज्ञा पुढें वापरल्या आहेत किंवा नाहीं हें तपासणे, तसेंच पूर्वी लिहिलेल्या मजकुराची छाटाछाट करून तो लहान करणें इत्यादि अनेक क्रिया करावयाच्या असतात. याशिवाय जी माहिती अपूर्ण असेल ती पूर्ण करावी लागते; आणि जे लेख लोकांकडून आले आहेत ते वाचून पाहून त्यांतील मजकूर अपूर्ण असल्यास किंवा त्यांत दुरुस्त्या करावयाच्या असल्यास त्याविषयीं टीप लिहून ती पुन्हां लेखकाकडे पाठविणें, किंवा त्याच्या संमतीनें कचेरींत दुरुस्ती करणें इत्यादि क्रिया सध्यां तयार असलेल्या लेखांवर कराव्या लागत आहेत. याशिवाय हेंहि लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, जे काम पूर्वी बाहेरच्या लेखकांवर विश्वासिलें होतें तें त्यांच्याकडून १ डिसेंबर १९१९ला जेव्हां आलें नाहीं तेव्हां तें ऑफीसांतच तयार करावे लागले. त्यामुळें नवीन माणसें शोधणें व ठेवणें इत्यादि गोष्टींत कांहीं काळ गेल्यामुळें नवीन मंडळींकडून झालेले काम नुकतेच पुरें झाले आणि कांहीं ( फारच थोडे ) व्हावयाचे आहे, तें छापावयाच्या काळापर्यंत म्हणजे विशिष्ट अक्षर येईपर्यंत पुरें होईल असा आम्हास विश्वासहि आहे.

## कामाचें स्वरूप आणि संपादकवर्गाची मेहेनत

कामाच्या विस्ताराची पूर्ण कल्पना आली म्हणजे ऑफिसमध्यें असलेल्या थोडक्या संपादकवर्गावर काय काम पडतें याची कल्पना येईल. रा. रा. यशवंतराव रामकृष्ण दाते, सर्वोत्तम वासुदेव देशपांडे, चिंतामण गणेश कर्वे, लक्ष्मण केशव भावे, हौत्रवेत्ते चिंतामणभट्ट दातार,

इत्यादि मंडळींचे या वाङ्मयसेवेंत लोकांस न दिसणारे अविश्रांत श्रम लक्षांत घेतले म्हणजे महाराष्ट्रानें याबद्दल त्यांचें किती ऋणी असले पाहिजे याची जाणीव मुख्यसंपादकापलीकडे इतरांनां असणे शक्य नाहीं. यांच्यासारख्या मंडळीकडून उणीवी भरून काढण्याची महत्त्वाचीं कामें होत आहेत. मुख्य संपादकावर पडणाऱ्या कामाची अगदीं यथार्थ कल्पना देणें शक्य नाहीं. पण कांहीं कल्पना यावी म्हणून थोडासाच हिशेब येथें देतों. समजा, सर्व हस्तलिखित अगदीं शेवटच्या दुरुस्त्या करूनहि तयार आहे; तरी तें छापण्यापूर्वी एकदां तरी वाचलें पाहिजे, गॅलिप्रूफच्या अवस्थेंत एकदां चांगलें पाहिलें पाहिजे, व छापावयाचा हुकूम देण्यापूर्वी त्यावर नजर टाकली पाहिजे. ज्ञानकोशाचें एक पृष्ठ म्हणजे लिखिताचीं फुलस्केपचीं साडेतीन पानें होतात, आणि उरलेले १७॥ भाग म्हणजे ८७५० पृष्ठें छापाव-याचीं म्हणजे लिखिताचीं सुमारें तीस हजार पृष्ठें होतात; आणि तीं छापावयाचीं म्हणजे तीन वेळ पहावयाचीं म्हणजे नव्वद हजार पृष्ठें झालीं. हें काम तीस महिन्यांत करावयाचें झाल्यास दर महिन्याला तीन हजार पृष्ठें वाचलीं पाहिजेत. वाचलीं पाहिजेत याचा अर्थ पूर्वोक्त क्रिया झाल्या आहेत किंवा नाहींत हें पाहिलें पाहिजे. महिन्यांतून तीन हजार पृष्ठें व कामाचे दिवस चोवीस हा हिशेब घेतां दररोज शंभरावर पृष्ठांचें वाचन होते. रोज सुमारें ३९ पृष्ठें हस्तलिखित वाचलें पाहिजे; तितक्याच पृष्ठांचें रोज गॅलिप्रूफ वाचलें पाहिजे आणि तितक्याच पृष्ठांचें शेवटचें मुद्रित वाचलें पाहिजे. हें काम करावयाचें; शिवाय पैशाचा पुरवठा बरोबर होतो आहे किंवा नाहीं वगैरे पाहणें, आणि खप वाढ-विण्याकरितां व पैसे उत्पन्न करण्याकरितां योजना करणें वगैरे कामें आहेतच. संपादकाचें वर दिलेल्या हिशेबाप्रमाणें काम किती होते याची कल्पना करावी, ही सर्व कल्पना काम सर्व तयार—छापावयाच्या स्थितींत आहे असें धरून केली आहे. जेव्हां मजकूर छापावयाच्या स्थितींत नसतो तेव्हां करावयाचें काम निराळेंच. ज्ञानकोशाच्या वाचक-वर्गाच्या हातीं दोन भाग आहेतच. त्यांवरून संदर्भ तपासणें वगैरे कामास किती वेळ लागत असेल याची कल्पना होईलच. कामाची व्यापकता लक्षांत आली म्हणजे, जरी थोडा वेळ ग्रंथ बाहेर पडण्यास उशीर लागला तरी ग्राहकांचा धीर सुटणार नाहीं. लोकांस धीर

धरण्यास सांगतों, याचा अर्थ मंद गतीनें काम करण्यास परवानगी मागतों असा मात्र नाहीं.

## आमचें काम मंद गतीनें चाललें आहे काय?

हे ठरविण्यासाठीं ज्ञानकोशाच्या ग्राहकवर्गानें हाहि विचार करावा की, हा ग्रंथ आमच्याकडून ज्या गतीनें त्यास मिळतो त्यापेक्षां त्यांची फक्त वाचनाची गति अधिक आहे काय? त्यांच्यावर विधानाच्या सत्य-तेची जबाबदारी नाहीं, संदर्भ पाहण्याचीहि नाहीं. असें असतां आंतील मजकुराचे आकलन करण्यास लागणारा वेळ मात्र त्यांनीं द्यावा; आणि जर त्यांच्याकडून वाचन आमच्या उत्पादनशक्तीपेक्षां अधिक गतीने झालें तर आम्हांस मंदगतीनें काम करण्याबद्दल दोष देण्यास तयार व्हावें. असो. आमची गति ठरविण्यापूर्वी दुसऱ्याहि एका गोष्टीचा विचार केला पाहिजे. ती गोष्ट म्हणजे आमच्या कामाचें स्वरूप होय.

## अपेक्षेपेक्षां अधिक केलें तें काम

ज्ञानकोशाचें काम आतांपर्यंत होऊन गेलें ते अत्यंत कठिण काम होऊन गेलें. या कामाच्या मानानें पुढील काम फार सोपें आहे. सर्वांत कठिण भाग दुसऱ्या व तिसऱ्या विभागांत येऊन गेला आहे. दुसऱ्या विभागांतील कामाचें महत्त्व पृष्ठसंख्येनें मोजतां येणार नाहीं. दुसऱ्या भागांतील मजकूर अनेक संहितांचें सूक्ष्म पृथक्करण करून लिहिला आहे. परिशिष्ट पृष्ठ ४ व ५ यांमध्ये जें हौत्रवेत्ते दातार यांचें टांचण आलें आहे, तें टांचण एका पृष्ठांत छापतां येते खरें, परंतु ते करण्यास दीड महिन्यावर अवधि गेला. तसेंच परिशिष्ट पृष्ठ ९ पासून पृष्ठ १२१ पर्यंतचे टांचण करण्याकरितां हौत्रवेत्ते दातार व धुंडिराजशास्त्री बापट यांचे अनेक महिने गेले. वेदाविद्या व गृह्य यांवरहि टांचण करण्यास महिना दीड महिना लागला; आणि काम दिसावयास मात्र तीनच पृष्ठें दिसतें. यापेक्षांहि सगळ्यांत चिकट पण न दिसणारें काम म्हणजे २७२ पृष्ठांतील अर्ध्या पानावरील कोष्टक पाहावे. तें कोष्टक ऋत्वि-जांच्या कर्मांच्या विकासाच्या दृष्टीने म्हणजे ब्राह्मणांतील जातिभेदाच्या इतिहासाच्या दृष्टीने अत्यंत महत्त्वाचे आहे. आणि ते करण्यासाठीं धुंडि-राजशास्त्री यांस पांच संहितांतील सुमारें १२०० उल्लेख शोधून प्रत्येक ठिकाणीं अर्थाची चिकित्सा करून कोष्टक तयार करावें लागले; व हें

करण्यास सुमारें सहा महिने लागले असावेत (हे कोष्टक करतांना प्रत्येक ठिकाणच्या उताऱ्याची चर्चा केलेलें हस्तलिखित आमच्या ऑफीसांत जपून ठेवलेलें आहे). भारतीय सामाजिक इतिहासांत अत्यंत महत्त्वाचीं वर निर्देशिलेलीं कोष्टकें होत. वैदिक विषया-संबधाने महाराष्ट्रांत वाचन मुळींच नाहीं; व समाजांत आहे तेवढेच ज्ञान लोकांस द्यावयाचे असे आपण ध्येय ठेविलें असते तर ग्रंथ अत्यंत अल्प उपयोगाचा करावा लागला असता. प्रत्येक विषयासंबंधानें शांतपणे माहिती गोळा करण्याचें काम जर केलें नसते तर ग्रंथाची उपयुक्तता मोठीशी झाली नसती. अनेक प्रकारचें ज्ञान मराठींत मांडण्याचा हा पहिलाच प्रयत्न होय. अनेक विषयांस वाहिलेला वर्ग समाजात नाही. आणि तरी देखील हा प्रयत्न करतांना असे वाटे कीं, भारतीयेतिहास-पांडित्याच्या बाबतींत तरी हा ग्रंथ जगाच्या पाठीमागे राहूं नये. येवढेंच नव्हे तर भारतीय पांडित्याच्या बाबतीत परिश्रम करणाऱ्यानें महाराष्ट्रीय ज्ञानकोशाचे सूक्ष्म परिशीलन केले नाहीं तर तो विद्येविरुद्ध गुन्हा होईल अशा योग्यतेचा आपला ग्रंथ झाला पाहिजे हें आमचें पहिल्या-पासून ध्येय आहे. भारतीय विद्येच्या बाबतीत तरी जगाकडून आपली छी थू होतां कामा नये. हा प्रश्न राष्ट्राच्या मानापमानाचा आहे. हेंच ध्येय मित शब्दांनी अगदीं प्रारंभीच्या योजनेंत वर्णिले आहे. आणि या ध्येयास त्या त्या वेळच्या चालकांची—उदाहरणार्थ, रा. फडके व अध्यक्ष डॉ. खरे यांची, मनापासून सहानुभूति होती; आणि त्यामुळे हें कार्य करता आले. या ध्येयाच्या पूर्णतेस मनःपूर्वक सहानुभूति ज्या डॉ. खरे यांच्यासारख्या पूर्वीच्या चालकांनीं दाखविली त्याचे आभार मानणे अवश्य आहे.

तिसरा विभाग "बुद्धपूर्वजग" यांतहि जीं पानें तयार करण्यास मेह-नत पुष्कळ पण दृश्य फल थोडें असा भाग पुष्कळ आहे. तो तयार करण्यांत रा. दाते आणि हौत्रवेत्ते दातार यांनी पुष्कळ मेहनत घेतली आहे. या दोन पंडितांच्या मेहनतीबद्दल महाराष्ट्राने त्यांचें ऋणी असले पाहिजे. हे तो भाग बाहेर पडल्यानंतर लोकांच्या नजरेस येईल. या दोघांचे जितके मनःपूर्वक सहकार्य झाले तितके झाले नसतें तर तो भाग तितक्या विशद रीतीनें मंडवितां आला नसता. आज आम्ही धैर्यानें आणि अभिमानाने म्हणूं शकतों की, दुसरा व तिसरा भाग

महाराष्ट्राच्या वेदविषयक पांडित्याचा दर्जा वाढवील; आणि भारतीय पांडित्याच्या बाबतींत महाराष्ट्रापासून जगास कांहीं तरी शिकावयाचें आहे अशी खात्री उत्पन्न करील. येवढेंच नव्हे तर, महाराष्ट्रीय पंडित-वर्गांत हा ग्रंथ आत्मविश्वास वाढवील. या कार्याचें महत्त्व भविष्यत्कालीं दिसून येईल."

मुद्रण चालू असतां जे संपादनकार्य होत होते त्याचे स्वरूप वरील उताऱ्यांत स्पष्ट दिले आहे. तथापि या काळांत जो नवा मजकूर झाला तो थोडाथोडका नाही. वैद्यक विषयावरील भाग याच काळांत तयार झाला. तसेच प्रत्येक लेख आजतागाईत करण्याचें कामहि चालू होतें. इतक्यांत एन्सायक्लोपीडियाब्रिटानिकाचे नवीन पुरवणीविभाग प्रसिद्ध झाल्यामुळें १९२० पर्यंत मजकूर घालण्याची सोय झाली. त्यानंतरच्या काळामधील मजकूर घालण्यासाठीं वर्तमानपत्राचे तुकडे गोळा करून त्यांचें वर्गी-करण करून ठेवणे चालूंच होतें, तें काम मिस् एच्. कोहन बी. ए. (मिसेस केतकर यांच्या धाकटया भगिनी) यांनीं फार काळजीपूर्वक केलें. शेवटीं ते तुकडे गोळा करून संकलित टीप तयार करण्याचें काम त्याच करीत असत.

ज्ञानकोशाचे कांहीं काम तर इतकें उशीरा झालें कीं ज्या दिवशीं ज्ञानकोश पूर्ण छापून झाला त्या दिवशीं संध्याकाळीं ५ वाजतां पूर्ण लिखित हातीं आलें. याप्रमाणें अगदीं लांबणीवर टाकून पण ३१ मार्च १९२७ रोजीं लेख पुरा करून देण्याचें श्रेय प्रो. नाईक यांस आहे. यांच्या-कडे स्थितिगतिशास्त्रावर लेख लिहावयास दिला होता पण तो त्यांस ३१ मार्च १९२७ रोजीं ५ वाजेपर्यंत पुरा करतां आला नाहीं. तेव्हां तो फरमा रात्रीं १२ वाजेपर्यंत जागून काढला आणि येणेंप्रमाणें १।४।२७च्या सूर्योदयाच्यापूर्वीं ज्ञानकोश पुरा झाला.

---

## प्रकरण १२ वें.

## ज्ञानकोश आणि वैयक्तिक प्राप्ति

ज्ञानकोशाचा एवढा खटाटोप केला त्यांत स्वतःला फायदा काय झाला याविषयीं थोडेसें लिहिलें पाहिजे. जो कोणी मोठें काम करतो त्याला जास्त फायदा व्हावा ही गोष्ट रास्त आहे. तथापि व्यवहारांत तसें होतें असें नाहीं. ज्ञानकोशापासून आज मला विशेष फायदा झाला नाहीं हें

सांगितलें तरी त्याच्या योगानें मला खंत वाटत नाहींत. व्यापारांत फायदा-तोटा आहेच. त्याप्रमाणेंच जें कार्य हातीं घेतलें त्या कार्याच्या उत्कर्षा-पकर्षावर जर त्या कार्यकारी मंडळीचे उत्कर्ष आणि अपकर्ष अवलंबून आहेत तर त्या कार्यांत कांहीं फायदा झाला नाहीं तर त्यांत तक्रार ती कोणास सांगावयाची? ज्ञानकोशाचें कार्य मला दुसऱ्या कोणी सांगितलें नव्हते, तें मीच उचललें होतें. इतर मंडळींनीं मजविषयीं सहानुभूति बाळगून उलट मला मदतच केली असें जर आहे तर मला स्वतःला प्राप्ति काय झाली हें सांगण्याचें कारण काय? सांगण्याचें कारण एवढेंच कीं, त्याविषयीं कांहीं तरी मंडळीस जिज्ञासा असेल ती पुरवावी एवढेंच.

मला पगार येणेंप्रमाणे मिळाला:—

ज्ञानकोशाचे कार्य आगस्ट १९१५ मध्यें सुरू झालें. त्या कार्याची जाहिरात करणें, त्यास सहायक मिळविणे वगैरे कामांत जानेवारी २५ (१९१६) पर्यंत वेळ गेला. पदरचा खर्च सुमारें ४०० रुपये झाला. या-वेळेस पगार वगैरे कांहीं मिळाला नाहीं.

| काल | महिने | प्राप्ति रु. |
|---|---|---|
| १ आगस्ट १९१५ ते १ फेब्रुआरी १९१६ | ६ | ० |
| १ फेब्रुआरी १९१६ ते १ एप्रिल १९१७ (दरमहा ५०) | १४ | ७०० |
| १ एप्रिल १९१७ ते १ जान्युआरी १९१८ (दरमहा १००) | ९ | ९०० |
| १ जान्युआरी १९१८ ते १ जुलै १९२० (दरमहा ३००) | ३० | ९००० |
| १ जुलै १९२० ते १ एप्रिल १९२७ (दरमहा ४२५) | ८१ | ३४४२५ |
| एकूण | १४० | ४५०२५ |

यापैकीं ५१७४—०—६ रुपये रक्कम कंपनीकडून पगारापैकीं येणें होती, व कंपनीमध्यें आपलें पद कायम राखण्यासाठीं खर्च सुमारें ३०० आला (प्राक्झी मिळविणें वगैरेसाठीं) व ज्ञानकोशासाठीं केलेला पण त्यास न आकारलेला खर्च देण्यासाठीं रुपये खर्च झाले ते अजमासें रु. २०० ही सर्व वजा करतां मला ५७०० रुपये वरील प्राप्तींतून वजा केले पाहिजेत. हा सर्व हिशोब घेतां १४० महिन्यांत नक्की प्राप्ति ३९३०० पर्यंत होते म्हणजे फक्त २८० रुपये दरमहा पडतो.

ही प्राप्ति जरी कमी दिसते तरी हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं पहिले २९ महिने कमी पगाराचे असतां मी अविवाहित होतों खर्च बेताचा होता. व

त्या वेळेस प्राप्तीपेक्षां जास्त खर्च (पहिले बिन पगाराचे सहा महिने खेरीज) झाला नाहीं. ते एकोणतीस महिने आणि प्राप्ति हीं वगळतां ३७७०० रुपये १११ महिन्यांत मिळाले. म्हणजे सरासरी तीनशेवीस रुपये महिन्याच्यावर प्राप्ति झाली. ही देखील प्राप्ति कमीच आहे. तरी याप्रकारें दरमहा प्राप्ति फारच कमी झाली असें असतां घरखर्च चालला कसा व या दिवसांतच घर बांधलें कसे हा प्रश्न येईल. याचे स्पष्टीकरण येणेंप्रमाणें करतों. सुमारें २००० रुपये मिसेस केतकर यांचे लग्नापूर्वीचे होते आणि मिसेस केतकर यांनी २००० रुपये विंटरनिट्झचें भाषांतर केले त्यावर मिळविले. व त्यानंतर सुमारें ७००० रुपये पगारांतले घातले. बांधलेल्या घरासाठी खर्च झालेले पैसे वजा जातां घरखर्चासाठीं तीनशेच्या आसपास शिल्लक राही. ही शिल्लक आणि मिस् कोहन यांना होणारी प्राप्ति मिळून घरखर्च पांचशे रुपयांपर्यंत कसा बसा चालत असे.

ही प्राप्ति आज झाली म्हणून सांगितली ती धोक्याच्या बाहेर नाहीं असें मात्र नाहीं, कारण ज्ञानकोशाला जे कर्ज आहे तें कर्ज वैयक्तिक जबाबदारीवर काढले असल्यामुळे पूर्वीचें सर्व मिळविलेले एकदम केव्हां जाईल याची शाश्वति नाहीं. कारण आज एकंदर कर्ज वगैरे सुमारे ३६००० आहे. तें देतां आलें नाहीं तर सर्वस्व एका दिवशीं जाणार हीहि शक्यता आहे.

वर दिलेल्या फायद्यापेक्षां जो माझा मुख्य फायदा झाला आहे तो फायदा मात्र कोणीहि घेऊं शकणार नाहीं आणि तो फायदा म्हटला म्हणजे स्वतःच्या काही इच्छा पूर्ण करण्यास मिळालेली संधि हा होय. मला चारहि वेद काळजीपूर्वक वाचावयाचे होते व त्यावर संशोधन करावयाचें होतें. तें करण्याची संधि मला ज्ञानकोशांनी दिली आणि आज जरी माझे संशोधनफल जगप्रसिद्ध झाले नाहीं तरी ते उद्यां होईल आणि वेदांच्या अत्यंत मोठया अभ्यासकांत माझें नाव केव्हां तरी होईल ही माझी खात्री आहे. मी असे म्हणूं शकतों कीं ज्ञानकोशमंडळांत नवीन वैदिकसंशोधन प्रसिद्ध झालें आहे तें जगांतील अत्यंत मोठया, वेदाच्या अभ्यासकांच्या सबंध आयुष्यांतील कामाइतके मोठे ठरेल आणि याचे कारण दहाबारा माणसे हाताशीं घेऊन वेदाभ्यास करण्याची संधि मला मिळाली हे होय. ज्या मनुष्यास पैसा मिळतो त्या मनुष्यास कीर्तीचा लोभ असतो. पैसा हातचा जातो पण कीर्ति लवकर जात नाही वैदिक

संशोधन म्हणून माझी कीर्ति झाली नाहीं. हें खरें आहे. ती पुढें होईल अशी माझी खात्री आहे. त्यामुळें मला समकालीनांनीं जरी योग्य अभिज्ञता दाखविली नसली तरी त्याबद्दल देखील खंत मुळींच नाहीं. मला असें वाटतें कीं, मी जें काय लिहिले आहे त्याची उत्तम प्रकारें जाणीव होण्याइतका ज्ञानविकास भोंवतालच्या जनतेंत नाहीं त्यामुळें लोकांच्या स्तुतिनिंदेचीहि मला फारशी फिकीर वाटत नाहीं. जो पुढें वेदाभ्यासक वर्ग निघेल तो माझें कर्तृत्व ओळखील ही माझी खात्री आहे. तसेंच ज्ञानकोशामध्ये जे समाजशास्त्र घातले आहे तें जगांतील प्रचलित समाजशास्त्रज्ञांच्यापेक्षां कांहीं बाबतीत वरच्या दर्जाचें आहे हाहि मला आत्मविश्वास आहे तथापि त्याची पारख देखील समकालीन महाराष्ट्राकडून होणे शक्य नाहीं. जें मी लिहिले आहे ते इंग्रजींत लिहिले असते तर त्याचे महत्त्व लोकांस पटलें असतें. मी जे लिहिले आहे त्याचें खरे महत्त्व जो समाजशास्त्र आणि वैदिक संशोधन यांमध्ये आजतागायत आहे त्यासच पटेल पण त्याच्या दृष्टीस तें आजच पडणें शक्य नाहीं व महाराष्ट्रीय वाचकांस त्याचें महत्त्वहि समजणार नाहीं. ज्यावर लोक मोठमोठाले ग्रंथ लिहितील अशा अनेक गोष्टी विशेषकरून जगद्‌विकासविषयक सत्यें मी फार थोडया पानांत मांडलीं आहेत आणि अनेक शास्त्रांच्या विकासाविषयीं कांही तरी नवीन सांगितलें आहे असें आजतागाईत शास्त्रीय वाङ्मय वाचणारांस दिसून येईल. या सर्व गोष्टी केल्या त्या अर्थात कीर्तीच्या आशेने केल्या नाहींत. कारण कीर्ति म्हणजे काय तर आपण जे करतो त्याची जाहिरात. ती करण्याकडे जर लक्ष जास्त जाऊं लागलें तर काम अपुरें पडते व कीर्तीची लालसा कर्तृत्व सतत ठेवण्यास आडवी येते. कांहीं वय उलटले व कीर्ति उपभोगेली म्हणजे कीर्तिलोभाची प्रेरक शक्ति कमी होते. आजपासून अनेक दशकांनीं माझ्या संशोधनाची जाणीव उत्पन्न होईल ही माझी खात्री आहे. शिवाय कीर्ति तरी कोणाची मिळवावयाची? सध्याच्या पिढींत जो समाजशास्त्रज्ञ वर्ग आहे तो मला फारच अल्प कर्तृत्वाचा वाटतो व त्यामुळे त्यांच्या प्रसंशेची लालसा माझ्या कार्यक्रमांत बंध उत्पन्न करूं शकत नाहीं.

वर सांगितलेल्या फायद्यापेक्षांहि मला एक आणखी फायदा झालेला आहे असें वाटतें तो फायदा म्हटला म्हणजे मोठाली कामें करण्यामुळे जे कर्तृत्व अंगीं येतें तें होय. ग्रंथप्रकाशन हें जर क्षेत्र धरलें व त्या क्षेत्रामध्ये आजचें माझें कार्य पाहून जगांतील मोठयामोठया कार्यांशी तुलना केली असतां तें अगदींच क्षुल्लक भासतें. इंग्लंड, फ्रान्स, अमेरिका,

जर्मनी येथील मोठाले प्रकाशक घेतले तर त्यांच्याशीं आमचें काम पासंगालाहि पुरावयाचे नाहीं व शास्त्र आणि वाङ्मय यांच्या विकासास प्रेरणा करणें हें जें प्रकाशकाचें महत्त्वाचे कार्य आहे तें कार्य इतरांच्या मानानें माझ्या हातून फारच थोडें झालेले आहे; तथापि तें इतःपर याहूनहि जास्त होईल अशी मी आशा बाळगतों.

---

## प्रकरण १३ वें.

## ज्ञानकोशाच्या कार्यांतील माझे सहायक

एखादा युद्धप्रसंग उद्भवला तर त्या युद्धाचे श्रेय मुख्य सेनापतीस येते, व इतर लोकांची कामगिरी त्या युद्धाचा जास्त अभ्यास करणारांखेरीज इतरांस समजत नाहीं. युद्धामध्यें अनेक बाजूस मोहिमा होतात आणि शिवाय एका मोहिमेंत अनेक लढाया होतात, त्यामुळें मोहिमांचे सेनापती व लढाईतील मुख्य इत्यादि अनेक व्यक्तींस महत्त्व येते, तथापि युद्ध चालू असतां दारूगोळयाचा पुरवठा चांगल्या प्रकारें कोणी कसा केला आणि त्यांचें त्या बाबतीत जे कार्य होतें तिकडे लोकांचें लक्ष क्वचितच असतें. ज्ञानकोशरचनेचें श्रेय किंवा दोष मुख्यत्वेंकरून मुख्य संपादकाच्याच वांटयास आले आहेत, आणि ज्या अनेक कर्तबगार आणि एकनिष्ठ व्यक्तींचे प्रयत्न ज्ञानकोशाच्या यशस्वी पूर्णतेस कारण झाले आहेत त्यांच्याकडे सामान्य जनतेचें दुर्लक्ष होणारच पण कार्याचे खरे स्वरूप जाणूं इच्छिणाऱ्यानें त्याकडे दुर्लक्ष करणें कधींहि योग्य होणार नाहीं.

ज्या माझ्या सहायकांच्या अंतःकरणपूर्वक सहाय्यामुळें हें काम मी अनेक अडचणीतून जवळजवळ पार पाडूं शकलों त्यांचा मी ऋणी आहे आणि त्यांचें कर्तृत्व आणि योग्यता ही महाराष्ट्रानें ओळखली पाहिजे असें मला वाटतें. मी अभिमानाने असें सांगूं शकतों कीं ज्ञानकोशाच्या संपादनखात्यांत अनेक अशी मंडळी आहेत कीं त्यांनीं संपादकीय कार्याकडे लक्ष न देतां शिक्षणाकडे लक्ष दिलें असतें तर ते ज्या कॉलेजांमधून शिकवावयास गेले असते त्या कॉलेजांच्या इतिहासांत देखील त्यांचा अत्यंत गौरवपूर्वक उल्लेख करावा लागला असता, एवढेंच नव्हे तर प्रसिद्ध विद्वान म्हणून त्यांची ख्यातीहि झाली

असती. ही मंडळी ज्ञानकोशाच्या कामाला लागल्यामुळें त्यांचे जसें द्रव्यदृष्टीनें नुकसान झालें आहे. तसेंच सामाजिक महत्त्व या दृष्टीनेंहि नुकसान झालें आहे. ही गोष्ट मला मोठ्या खेदानें कबूल करणे भाग आहे.

मोठया कार्याच्या यशस्वी परिसमाप्तीस केवळ पत्करलेल्या कामास लागणारे कौशल्य असल्यानें निभाव लागत नाहीं. सर्वांनीं एका शिस्तीनें चालण्याची संवय, त्याप्रमाणेच अडचणीच्या प्रसंगीं धैर्य, तसेच मुख्याला त्रास न देतां त्याच्याशीं सर्व प्रकारें सहकारिता करण्याची वृत्ति हीं सर्व लागतात. आमच्या मंडळींत एकशिस्तीनें चालण्याची संवय कितपत आहे हें त्यांनीं ज्ञानकोशाहून निराळे एक स्वतंत्र कार्य करून दाखविलेंहि आहे त्यावरून समजेल. पुण्याची सरस्वतीमंदिर ही संस्था पुष्कळांस माहीत नसेल. माहीत नसण्याचें कारण एवढेंच कीं, कर्तृत्वाच्या मानानें जी बेसुमार जाहिरात अनेक प्रयत्नांत दिसून येते तिच्याविरुद्ध या संस्थेच व्यवहारनीति आहे हें होय. आणि ही गोष्ट सर चुनीलाल मेहता यांसारख्या गृहस्थांसहि पटली आहे. सरस्वतीमंदिरानें पुण्यांतील अत्यंत अडचणींत असलेल्या तरुण स्त्रीपुरुषांस विद्यादान केलें आहे, एवढेंच नव्हे तर शिक्षण इतकें चांगलें दिलें कीं या संस्थेच्या हायस्कूलाच्या मॅट्रिकचा निकाल पुष्कळ सरकारी व प्रसिद्ध खाजगी शिक्षणसंस्थांस मत्सर उत्पन्न करतील. या संस्थेच्या मंडळीमध्ये मी नाहीं आणि वर्षांतून एकाद्या दिवशीं पाहुणा म्हणून जाण्याच्या खेरीज मी या मंडळीशीं सहकारिता कोणत्याहि तऱ्हेनें केली नाहीं तथापि ज्ञानकोशाच्या आफीसमध्यें जे एकच काम करण्याचें वळण लागलें तें या संस्थेच्या यशास कारण झालें असा गौरवयुक्त जेव्हां उल्लेख करण्यांत येतो तेव्हां मात्र मला आनंद झाल्याशिवाय रहात नाहीं. एवढी एक गोष्ट खरी कीं अत्यंत विरुद्ध मताची मंडळी एकत्र जमून हे कार्य चालवीत आहे. सिद्धेश्वर शास्त्री चित्राव यांसारखें ब्राह्मण्याचे पुरस्कर्ते आणि रा. गवंडी यांसारखें आवेशी सत्यशोधक या दोघांचेंहि सहकार्य या संस्थेंत झालें होतें. एवढेंच नव्हे तर या संस्थेची योजना प्रथम तयार झाली तेव्हांपासून अत्यंत भिन्न मताची मंडळी एकत्र काम करीत आहेत. ह्या भिन्नमतांची मंडळी एकत्र येणें व मतें भिन्न असतां देखील एकत्र काम करणें शक्य आहे याची जाणीव त्या सरस्वती मंदिराच्या

कार्यकर्त्यास होण्यास त्यांचा ज्ञानकोशमंडळांतील अनुभव कारण झाला असें म्हणण्यास मला शंका वाटत नाहीं.

ज्ञानकोशाची सेवा ज्यांनीं मोठया एकनिष्ठतेनें केली अशी मंडळी मी शोधून काढली असें श्रेयहि मला मिळूं शकत नाहीं. ज्या मंडळीस आस्था होती अशी मंडळी आपोआपच चिकटली गेली; कां की ज्यांस आस्था नव्हती अशी मंडळी चिकटूनच राहिली नाहींत.

ज्ञानकोशमंडळांत काम करणारी मंडळी आजपर्यंत दोनशेंच्यावर होऊन गेली. त्यांपैकीं कांहीं प्रोफेसर वगैरेंच्या जागांवर पूर्वी काम करून ज्ञानकोशमंडळांत मागाहून आलीं तर कांहीं मंडळी अगोदर येथें काम करून मागाहून प्रोफेसर बनली. अगोदर प्रोफेसरचें काम करून मग ज्ञानकोशमंडळांत आलेल्या मंडळीमध्यें प्रामुख्यानें नांव द्यावयाचें झाल्यास प्रो. वैजनाथ काशीनाथ राजवाडे एम् ए. (फरग्युसन कॉलेज) यांचें नांव देतां येईल. त्याचप्रमाणें ज्ञानकोशमंडळांत काम करीत असतां ज्यांची प्रोफेसर म्हणून नेमणूक झाली त्यामध्यें प्रो. डॉ. वैद्य यांचें नांव देण्यांत येईल. ज्ञानकोशमंडळांत असतां ज्यांनीं एल् एल. बी. चा अभ्यास केला व नंतर जे वकील, मुनसफ किंवा तह-सिलेदार झाले अशी मंडळी तर पुष्कळच आहेत. या सर्व मंडळीचा प्रयत्न ज्ञानकोश-मंडळास सहाय्यक झाला पण ज्ञानकोश-मंडळाची खरी भिस्त या संस्थेस जे अनेक वर्षे चिकटून राहिले त्यांच्यावरच होती हें विशेष सांगावयास नकोच.

ज्ञानकोशाच्या कायम सेवकांमध्ये अत्यंत महत्त्वाचा कार्यभाग ज्यांनीं उचलला अशी मंडळी म्हटली म्हणजे रा. यशवंत रामकृष्ण दाते बी. ए. एल्एल्. बी. आणि रा. ग. ना. टिळक ही होत. रा. ग. ना. टिळक यांचे नांव ज्ञानकोशाच्या पुस्तकावर कोठेंहि दिसत नाहीं म्हणून त्यांचे काम कमी महत्त्वाचें असें धरणें म्हणजे अगदीं चुकीचे होईल. त्यांच्या कामामुळें मला पुष्कळच स्वास्थ्य प्राप्त झालें. सुमारें पावणेचार लाखांचा आतांपर्यंत व्यवहार झाला. त्या सर्व व्यवहाराचा हिशोब रा. टिळक यांनीं अत्यंत काळजीपूर्वक ठेविला एवढेच नव्हे तर वसुलीमध्ये व लोकांस माल बरोबर पाठविला जावा म्हणून यांनीं फारच काळजी घेतली. ज्ञानकोशाचा पावणेचार लाखांचा सर्व हिशोब

त्यांच्या हातानें लिहिलेला आहे. त्यांच्या हिशोबीपणामुळें ते नेहमीं इतरांस प्रिय होते असा मुळींच भाग नाहीं. तर त्यांच्या काळजीपूर्वक हिशोब ठेवण्यामुळें आणि पुष्कळदां दिसून येणाऱ्या रागीटपणामुळें ते ऑफिसमध्यें थोडेसे अप्रियच असत व त्यामुळें त्यांच्या व इतरांच्या अनेक चकमकी मजकडे येत. प्रो. राजवाडे यांच्याकडे पुणें शाखेचा व्यवहार कांहीं दिवस होता त्या वेळेस त्यांच्या हिशोबांत एक पैशाची कोठें चूक निघाल्यामुळे ती चूक दुरुस्त करण्यासंबंधानें जेव्हां अनेकदां टिळक यांच्याकडून पत्रें गेलीं तेव्हां प्रो. राजवाडेहि रागावले होते. त्या वेळेस जें काय झालें होतें तें एवढेंच कीं, अमुक रुपये अमुक आणे एका मनुष्यास देऊन तसा खर्च प्रो. राजवाडे यांनीं लिहिला होता. पगारपत्रकांत मात्र त्या मनुष्याचा हिशोब देतानां पुरे आणे लिहिले नसून पावणे अमुक आणे असे लिहिलें होतें व त्याची सही घेतली होती. अगोदर पुणें ऑफीसकडून जमाखर्च लिहून आला त्याप्रमाणे नागपूरच्या ऑफीसांत तो लिहून गेला. आणि व्हाऊचरें मागाहून आलीं. तव्हां व्हाऊचर आणि लिहिलेला हिशोब यांत फरक दृष्टीस पडला व पत्रव्यवहार सुरू झाला. टिळकांनीं अडचण उपस्थित केली, ते म्हणाले, व्हाऊचर बदलून आणा. राजवाडे म्हणाले, एका पैशाकरितां मी व्हाऊचर बदलायला जाणार नाहीं पाहिजे तर तो पैसा मजकडून घ्या. टिळक म्हणाले हिशोब पूर्ण आणे म्हणून लिहिला गेला. याप्रमाणें पत्रव्यवहार होऊन शेवटीं ते प्रकरण माझ्यापर्यंत आलें, अर्थात त्याला उपाय म्हणजे एक पैसा जास्त दिला असें प्रो. राजवाडे यांच्या सहीचें व्हाऊचर करून घ्यावयाचें; व तें त्याप्रमाणें पुढें घेतलें जाऊन प्रकरण मिटलें!! रा. टिळक यांच्यामध्यें केवळ कागदी हिशोबीपणाच होता असें नाहीं तर गिऱ्हाइकांशीं कंपनीनें अत्यंत प्रामाणिकपणानें वागावें याविषयीं हे दक्ष असत. कंपनीला चुकून जास्त पैसे मिळाले म्हणजे कंपनीचा फायदा झाला अशी भावना रा. टिळक यांनीं कधींहि ठेवली नाहीं. कोणी चुकून जास्त पैसे पाठविले म्हणजे त्यांचें त्यांस कार्ड गेलेंच. या प्रकारच्या अत्यंत कसोशीच्या वृत्तीमुळें कंपनीच्या चोख व्यवहाराचा महाराष्ट्रांत लौकिक वाढला आणि त्या लौकिकाचें श्रेय बहुतेक सर्वांशीं रा. टिळक यांच्याकडेसच आहे. टिळकांच्या सतेतोड स्वभावामुळें ज्ञानकोशमंडळांत बऱ्याच आख्यायिका

सांगण्यासारख्या उत्पन्न झाल्या आहेत. पण त्या येथें दिल्यास जागा बरीच अडेल म्हणून त्या देतां येत नाहींत.

ज्ञानकोशाच्या मुख्य संपादकीय कामाचा भार ज्यांच्यावर पडला असे गृहस्थ म्हटले म्हणजे रा. यशवंत रामकृष्ण दाते बी. ए. एल्‌एल्. बी. हे होत. ज्ञानकोशमंडळाचा धंदा 'आर्फाशिअली' सुरू व्हावयापूर्वी एक महिना ते अगोदर आले. हे प्रथम आमच्याकडे दोन महिन्यासाठी कामाला आले. पुढें त्यांस वकिली करावयाची होती. तथापि दोन महिन्यांत ते कामांत इतके रंगले कीं, त्यांनां ज्ञानकोशमंडळ सोडावेसें वाटलें नाहीं. त्यांनां आल्याबरोबर गोषवारे काढण्याची तालीम कांहीं दिवस मिळाल्यानंतर त्यांच्याकडे वाङ्मयसूचि करण्याचे काम देण्यांत आले. ते काम त्यांनीं व रा. देशमुख नांवाच्या एका कायस्थप्रभु तरुणाने बरोबर केलें त्यामुळें त्या दोघांचीं नावें सूचीचे संपादक म्हणून सूचीवर आढळतील, सूचींचें साहित्य जमविण्यांत त्यांनीं केवळ सांगकाम्यासारखें केलें नाही. सूचीमध्यें सरकारकडे नोंदल्या गेलेल्या पुस्तकांचाहि उल्लेख आहे एवढेंच नव्हे तर न नोंदल्या गेलेल्या अनेक पुस्तकांचा उल्लेख आहे. हें काम करण्यासाठीं पुस्तकांच्या दुकानांचे अनेक चालू आणि अनेक जुने क्याटलाग जमा करणें, सरकारजमा झालेल्या पुस्तकांची यादी मिळवणें इत्यादि अनेक कामें रा. दाते व देशमुख या जोडीनें स्वयंप्रेरणेने केलीं आहेत. सूचीच्या कामाचें महत्त्व पटल्यामुळें आपण कांहीं तरी महत्त्वाचें काम करीत आहोंत ही भावना रा. दाते यांस होतीच पण सूचीचें काम करीत असतां रा. दाते यांस सुमारें पंचवीस माणसांच्या कामावर देखरेख करावी लागे. त्यामुळे त्यांस थोडीशी अधिकाराचीहि जाणीव झाली असावी आणि त्यामुळे त्या कामांत गोडी लागली असावी. सूचीचें काम चिकाटीचे व त्रासाचे होतें पण त्यांतल्यात्यांत मौजाहि पुष्कळ होत्या. पुस्तक वर्गीकरणाची योजना बनविणें तसेच कांहीं बाबतींत अगोदर वर्गीकरण करून प्रत्येक वर्गास नांव शोधून काढणे, या प्रकारच्या गोष्टी करतांना पुष्कळ मौजेचे प्रकार उत्पन्न होत. कधीं कधीं गुंतागुंतीचे प्रश्न येऊन त्यावर ताबडतोब निकाल द्यावा लागे. कांहीं वेळेस वर्गीकरण हाताखालच्या कमी शिकलेल्या लोकांकडून होऊन तें पुढे कायम करण्यांत आले आहे. यामुळे वर्गीकरणांत थोडासा विचित्रपणा उत्पन्न झाला आहे. 'चहा' वरील सामाजिक वाङ्मय हें 'व्यसनें'

या वर्गांत समाविष्ट झालें आहे ! कांहीं वर्गीकरणामुळें थोडी चळवळहि उडालेली आहे. धार्मिक वाङ्मयाचें वर्गीकरण करतांना यूरोपीय वर्गीकरणाचें थोडेसें भाषांतर झालें. आणि तें भाषांतर लोकांनां चीड आणणारें झालें. ' हेरेसी ' याचें भाषांतर ' पाखंडें ' असें झालें. हेरेसी म्हणजे मुख्य मतापासून भिन्न पण अगदींच बाहेरचें नाहीं असें मत. उदाहरणार्थ, प्रॉटेस्टंट मत हें कॅथलिक मताची ' हेरेसी ' होय. याप्रमाणें ब्राह्मसमाजाचें वाङ्मय हें सनातनी हिंदूंच्या दृष्टीनें ' हेरेसी ' च वाङ्मय होय. पण ' हेरेसी ' याच्या ऐवजीं जेव्हां ' पाखंडें ' हा शब्द आला आणि ब्राह्मसमाजाचें वाङ्मय जेव्हां ' अर्वाचीन पाखंडें ' या नांवाखालीं वर्गिलें गेले तेव्हां सुबोधपत्रिकेने त्याकडे लक्ष ओढून त्यावर टीका करण्यास सुरुवात केली. 'हेरेसी' या शब्दाला ' पाखंड ' यापेक्षां अधिक अनुरूप शब्द मलाहि सुचला नाही आणि अजून सुचत नाहीं. या सर्व गोष्टीचा मागें उल्लेख आलाच आहे. तथापि पाखंड या शब्दावर जे आकांडतांडव झाले त्या एका गोष्टीमुळे समाजांतील निरानिराळे लोक शास्त्रीय वर्गीकरणासाठीं योजिलेल्या शब्दांच्या मागें ' हेतु ' कसे शोधून काढतात हे रा. दाते यांसहि कळून आले. पत्रकारांनीं टीका माझ्यावर केली पण तीपासून जो बोध घ्यावयाचा तो रा. दाते यांनी घेतला. जातिविषयक किंवा संप्रदायविषयक सहिष्णुता व त्रयस्थपणा त्यांच्यामध्ये क्रमानें उत्पन्न झालाच पण केवळ सहिष्णुता व त्रयस्थपणा हीं संपादकानें बाळगलीं असलीं तरी केवळ तेवढयानें भागत नाहीं. नकळतपणें आपण दुसऱ्यास कसे दुखवूं शकलों याची जाणीव देखील त्यांस अगदी लवकर झाली आणि ही गोष्ट देखील चांगली झाली. ब्राह्मण जातीचें महत्त्व स्थापन करण्यासाठीं आम्ही प्रयत्न करीत आहोत, ज्ञानकोश चित्पावनी ग्रंथ आहे इत्यादि प्रकारची टीका ज्ञानकोश–मंडळ स्थापन झाल्यापासून होऊं लागली होती. तीमुळे आपण किती जपून शब्दयोजना केली पाहिजे या सर्व गोष्टी त्यांस अगोदरच कळल्यामुळे त्यांची संपादकीय कार्यासाठीं लागणारी मनोरचना तयार केली गेली.

रा. दाते यांची प्रकृति चांगली असे, स्वभाव मेहनती, पण अट्टल खेळाडूला लागणारे गुणहि त्यांच्या अंगीं असल्यामुळें त्यांचा संपादकीय व्यवस्थेच्या कामांत चांगला उपयोग झाला. ऑफीसमध्यें खालच्या मंडळींच्या बरोबर खेळून देखील आपला कार्यभाग कसा करून घ्यावा हें

त्यांस समजतें हें मला दिसून आलें. त्यांची स्मरणशक्ति फारच चांगली आहे. मला माझ्या स्मरणशक्तीबद्दल गर्व आहे, तथापि त्यांची स्मरणशक्ति माझ्या बरोबरीची आहे असें मोठ्या आनंदानें मी कबूल करीन. ज्ञानकोशाच्या संपादकीय कार्य-व्यवस्थापकास जर कोणत्या गुणाची आवश्यकता असेल तर ती स्मरणशक्तीची होय. काम दहा वर्षांवर चाललें. कोणत्या विषयावर काय टीपा लिहिल्या आहेत, कोणत्या पुस्तकांतील टीपा तयार होऊन पडल्या आहेत, या गोष्टीची आठवण संपादकास, त्याप्रमाणें संपादकीय कार्यव्यवस्थापकास असावी लागते. त्या बाबतींत रा. दाते यांची आठवण जबरी. काय झालें आहे याची आठवण मला असून त्यांनां नाहीं असे प्रसंग फारच थोडा वेळ आले.

रा. दाते यांचा दुसरा मुख्य गुण म्हटला म्हणजे मेहनतीपणा होय. यामुळें कामामध्यें कधीं कधी ते वाजवीपेक्षां जास्त मेहनत घेत असत. दिवसभर काम करून पुन्हां रात्रीं प्रुफें वाचीत बसलेले असतां मी यांनां पुष्कळदां पकडलें आहे व त्याच्या हातांतून प्रुफें हिसकावून घेतलीं आहेत. रा. दाते यांची घरची मंडळी कोंकणांत गेली म्हणजे दाते बसले रात्रीं ऑफीसचें काम करीत! हें सर्व करणे नियमाच्या विरुद्ध होतें, तेव्हां त्यांस सरळ सांगितलें की, वेळ जात नसेल तर झोंपा घ्याव्यात, पत्ते खेळावेत, दुसरें कांहीं करावें पण ऑफीसचें काम घरी करतां कामा नये.

संपादकीय व्यवस्थापकाच्या कामाला अवश्य असणारा आणखी एक गुण म्हटला म्हणजे कोणताहि विषय येवो त्याची माहिती नसली तरी ती करून घेऊन आलेला लेख वाचून पहाण्याची शक्ति असणें हा होय. हा गुण देखील रा. दाते यांच्या अंगीं चांगल्याप्रकारें दिसून आला. निर्णयसागर छापखान्यामध्यें रा. दाते मुद्रितें वाचीत असतां छापखान्यामध्यें कोणत्या खुणा आहेत याची माहिती प्रसंगीं कंपाझिटरच्या फोरमनला नाहीं पण ती रा. दात्यांनां आहे असें देखील कांहीं वेळ दिसून आलें.

रा. दाते यांच्या खालोखाल ज्यांची नोकरी जवळ जवळ प्रारंभापासून झाली असे गृहस्थ म्हटले म्हणजे कै. सर्वोत्तम वासुदेव देशपांडे. हे गृहस्थ आजन्म अविवाहित होते आणि ज्ञानकोशाचें कार्य चालू असतांच ते क्षय होऊन वारले. त्यांच्या कामाची आणीव त्यांच्या इतर

सहकारींस इतकी आहे की त्यांनीं रा. सर्वोत्तम देशपांडे यांचें नांव ज्ञानकोशाच्या ग्रंथशाळेस देऊन त्यांचें स्मारक करावें अशी सर्वानुमतें विनंति केली आणि ती विनंति डायरेक्टरांनीं मोठ्या आनंदानें मान्य केली. हें नांव देशपांडे हे जिवंत असतां आणि राऊ येथें हवा पालट-ण्यासाठीं गेले असतांच देण्याचें ठरलें. रा. देशपांडे यांनीं त्यांचें नांव देण्यास परवानगी दिली नाहींच पण त्यांच्या मृत्युसमयीं त्यांनीं आपली खासगी पुस्तकें आणि टिपणें ज्ञानकोश-मंडळास देऊन टाकलीं. ज्ञान-कोश-मंडळाचे डायरेक्टर, संपादक, मुद्रक, इत्यादि मंडळीमध्यें संस्थेकडून, जर कोणाचा गौरव केला असेल तर तो याच व्यक्तीचा होय. हा मान दुसऱ्या कोणासहि लाभला नाहीं. देशपांडे मंडळींत मिसळून काम कर-णारे नव्हते. ते बहुधां एकटेच असत. ऑफीसमध्यें वाटेल तेव्हां त्यांनीं यावें आणि वाटेल तेव्हां जावें अशी त्यांस मोकळीक होती, पण ते बहुतेक वेळ ज्ञानकोशाच्या कामाकडे घालवीत असत. त्यांच्या आयु-ष्यांत त्यांनां दुसरें कामच नव्हतें. घरीं असले तरी वाचन चालू राही. ऑफीसमध्यें तर वाचन—लेखन हाच कार्यक्रम. ते फार संथपणानें काम करणारे होते. त्यांच्या कामांत घाई नसावयाची. जे काय लिहाव-याचें तें शांतपणानें, स्वच्छ अक्षरांचें लिहावयाचें. त्यांच्याकडे मुख्य विषय हिंदु इतिहास हा होता त्यामुळें त्यांचा पुष्कळच वेळ टिपणें काढ-ण्यांत आणि वाचण्यांत जाई. त्यांच्या कामाकडे मी कांहींएक पहात नव्हतों. मधून मधून काय काम चाललें आहे, कोणकोणतीं पुस्तकें वाचून टीपा काढल्या एवढी मात्र चौकशी करीत असें.

देशपांडे यांच्या स्वभावाविषयीं लिहिण्यास मला शब्द शोधावयास नको आहेत. तें काम श्री ज्ञानेश्वरांनीं पूर्वीच करून ठेवलें आहे. ज्ञाने-श्वरांस त्यांच्या काळांत एखादा सर्वोत्तम देशपांडे दृष्टीस पडला असल्या-शिवाय खालील ओळी त्यांस लिहितां येणें शक्य नाहीं.

**तरी कवणेंहि विषयींचें । साम्य होणें नरुचे ।**
**संभावितपणाचें । ओझें जया ॥ १ ॥**

**आथिलेचि गुण वानितां । मान्यपणें मानितां ।**
**योग्यतेचें येतां । रूप अंगा ॥ २ ॥**

**तै गजबजों लागे कैसा । व्याधें रुंधला मृगु जैसा ॥**
**का बाहीं तरतां वळसां । दाटला जेवी ॥ ३ ॥**

पार्थों तेणें पाडे । सन्मानें जो सांकडे ।
गरिमेतें अंगाकडे येवोंचि नेदी ॥ ४ ॥
पूज्यता डोळां न देखावी । स्वकीर्ति कानीं नायकावी ।
हा ऐसा नो ह्मवीं । सैंचि लोकां ॥ ५ ॥

रा. देशपांडे यांच्या मृत्यूनें ज्ञानकोशमंडळाची मोठी हानि झाली असे म्हणण्यास मुख्य अडचण ही की त्यांनी बहुतेक काम करून ठेवले होते. पण त्यांच्याविषयीं जी आमची अपेक्षा होती ती ज्ञानकोश आटपल्यानंतर त्यांच्याकडे सबंध मराठी इतिहास देऊन ग्रंथ तयार करविण्याची होय. त्यांच्या मृत्युनंतर थोडक्याच दिवसांनी विद्यासेवकांत (वर्ष १ अंक १२) जो मृत्युलेख लिहिला तोच येथे अवतरितो.

## कै. सर्वोत्तम वासुदेव देशपांडे यांच्या आठवणी

"जुलै महिन्याच्या १२ व्या तारखेस सर्वोत्तम वासुदेव देशपांडे यांचें देहावसान झाले. ही गोष्ट वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध झालीच आहे. रा. देशपांडे यांच्याविषयीं आम्हांस असें सांगतां येईल कीं एक मोठा विद्यासेवक नाहींसा झाला! रा. देशपांडे यांचे नांव आम्ही उपसंपादकांत अग्रस्थानीं दिलेले आहे, यावरून आम्हांस त्यांच्या कार्याचें महत्त्व किती वाटत होतें हें स्पष्ट होईल. रा. देशपांडे यांच्या विषयीं ज्ञानकोशमंडळांतील प्रत्येक व्यक्तीच्या मनांत प्रेम होतें व यास कारणे त्यांचा साधेपणा, व त्यांची कर्तव्यनिष्ठा होत. त्यांच्या साधेपणाचा कांहीं बाबतीत अतिरेक झाला होता. त्यांनां कोणीहि कधींहि आपलें दैन्य सांगितलें म्हणजे त्यास देण्यास यांच्यापासून पैसे निघत. पत्त्यांचे डाव खेळत असतां (हे कोजागरी किंवा अशाच दुसऱ्या प्रसंगी पत्तेहि खेळत)नेहमी डाव यांच्यावरच येई. कां कीं, दुसऱ्याची कारवाई यांच्या लक्षांत कधींहि येत नसे. विचाराप्रमाचें वागण्याचा यांच्यांत अतिरेक झाल्यामुळें यांनीं साखर टाकून दिलीच होती, व दुध प्यावयाचें तें पितांना त्यांच्या मनांत संकोच उत्पन्न होई. त्यांस वाटे कीं, गाईचें दूध पिऊन वासरांचे दूध कमी करण्यास आपणांस अधिकार आहे काय? ही विचारमाला अधिकाधिक वाढत जाऊन स्वतःचें शरीरदंडन करण्याकडे यांची प्रवृत्ति होऊं लागली. बऱ्याच अंशीं विरक्त स्थिति, कर्तव्यनिष्ठा, आणि निरलस लेखनपरिश्रम यांमुळें यांच्याविषयीं ज्ञानकोशमंडळांतील सर्व लोकांस

आदर होता व त्याप्रमाणेंच त्यांच्या साधेपणाच्या अतिरेकामुळें ते थोडेसे चेष्टेचाहि विषय होत, पण ती चेष्टा प्रेममिश्रित असे. ज्ञानकोश मंडळाच्या प्रारंभीच्या दिवसांत ज्ञानकोशाचे अकोल्याचे डिरेक्टर रा. नारायण खंडेराव फडके यानीं देशपांड्यांच्या कामांतील पद्धतशीरपणा पाहून त्यांची चालकमंडळांत प्रशंसा केली होती. त्यांचीं इतिहासावरचीं कांहीं टिपणें कै. वासुदेव शास्त्री खरे यांच्या दृष्टीस पडली. त्या वेळेल ते म्हणाले कीं, इतकीं पद्धतशीर टिपणें रा. देशपांडे करीत असतां आम्हीं येऊन अधिक काय करणार! जर आम्ही पेशवाईचा इतिहास तुमच्यासाठीं लिहावयास घेतला तर तुम्ही देशपांडयांनां आमच्याकडे द्या. ज्योतिष शास्त्राचा इतिहास म्हणून जे विज्ञानेतिहासांत प्रकरण आले आहे त्यांतील बराचसा भाग रा. देशपांडे यानीं लिहिला होता. ते प्रकरण वाचून रा. व्यंकटेश बापूजी केतकर हे ज्ञानकोशमंडळाच्या ऑफिसांत आले. त्यांच्या मतानें पौरस्त्य व पाश्चात्त्य ज्योतिःशास्त्राचा इतका सरळ आणि समतोल इतिहास त्यांच्या अवलोकनांत नाही म्हणून ते अभिनदन करण्यासाठीं मुख्य संपादकाकडे आले तेव्हां मुख्य संपादकानीं रा. व्यंकटरावजी केतकरांची व ज्यांनीं त्या इतिहासांतील बहुतेक भाग लिहिला त्या दोघा व्यक्तीची म्हणजे (कै. सर्वोत्तम देशपांडे व रा. ल. के. भावे यांची) ओळख करून दिली. तेव्हां व्यंकटरावजींनीं रा. देशपांडे यांची पुष्कळ स्तुति केली. तेव्हां रा. देशपांडे एखाद्या फजीति केलेल्या व्यक्तीप्रमाणे गांगरून गेले; व तें पाहून पुष्कळ मंडळीस मौज वाटली. देशपांडे यांच्या हातचा मराठेशाहीतील अर्थशास्त्रविषयाचा लेख (ज्ञानकोश-अर्थशास्त्र पहा) वाचून त्यांच्या स्वतंत्र विचाराची खात्री होईल रा. देशपांडे यांच्या इंदूर येथील,वऱ्हाडांतील व पुण्यांतील स्नेही मंडळीस त्यांच्या मृत्यूनें दुःख झालें असेल यांत शंका नाहीं."

रा. चिंतामण गणेश कर्वे बी. ए. आणि रा. लक्ष्मण केशव भावे बी ए. एल्‌एल्. बी. हे दोघेजण ज्ञानकोशाच्या कामाला वाहिलेली माणसे होत. नियमानें काम करणें आणि कोणतीहि अडचण संस्थेवर आली असतां देखील संस्थेला चिकटून रहाणें या गुणांत ही मंडळी कोणासहि हार जाणारी नाहीत. विद्यासेवक सुरू झाल्यापासून रा. कर्वे यांनीं स्वतंत्र माहितीचे चुटके लिहिण्याकडे लेखणी वळवून विद्यासेवकाची लोकप्रियता वाढविण्यास मदत केली आहे. रा. आबा चांदोरकर आमच्याकडे

नवीनच आले आहेत तथापि त्यांस लेखनव्यवसायाची किती आवड आहे हें सांगावयास नकोच.

ज्ञानकोशाच्या कामामध्यें गुंतलेले, तथापि अन्य कारणामुळे प्रसिद्धीस आलेले गृहस्थ म्हटले म्हणजे पांडुरंग महादेव उर्फ सेनापति बापट हे होत. रा. बापट यांचे चळवळी करणारा गृहस्थ या नात्यानें जे चरित्र आहे तें सुप्रसिद्धच आहे व ते वर्तमानपत्रांच्या द्वारें लोकांच्या पुढें आहे. त्यांच्या चरित्रावर एक लहानसें पुस्तक रा. लालजी पेंडसे यांनी लिहिलेच आहे. बापट यांचा ज्ञानकोशाशीं संबंध जोडण्याचे श्रेय प्रो. वैजनाथ काशीनाथ राजवाडे यांच्याकडे आहे. प्रौ. वैजनाथ काशीनाथ यानीं रा. बापट यांची नेमणूक केली व नवीन मंडळीपेक्षां यांनां पगार जास्त द्यावा म्हणून त्यांची शिफारस केली व त्याप्रमाणे त्यांची जास्त पगारावर प्रारंभापासून नेमणूक झाली. साधी पण प्रौढ भाषा रा. बापट यांस लिहितां येई हा रा. बापट यांचा विशेष गुण होता. प्रो. राजवाडे व रा. काळे हे पुणे ऑफीसमधून गेल्यानंतर पुणे ऑफिसचे चालकत्व मी पुण्यास येईपर्यंत रा. बापट यांच्याकडे होतें. रा. बापट याचे व इतर मंडळीचें जुळावयाचें नाही म्हणून माझी प्रथम समजूत होती पण ती खोटी ठरली. ऑफिसमधल्या हाताखालच्या मंडळीशी वागतांना केवळ कडकपणानें न वागतां प्रेमानें वागून तितकेंच काम करून घेण्याचा गुण त्या संधीस त्यांनी चांगल्या तऱ्हेने दाखविला. रा. बापट यांच्या चेहऱ्यावर जरी तिरसट आणि रागीटपणाची छटा दिसते तरी त्यांचे वर्तन त्यांच्या चेहऱ्यांशीं विसंगत होतें. रा. बापट ऑफीसमध्यें चांगलेच लोकप्रिय झाले. आणि जेव्हां ऑफीसमध्यें कांही सामाजिक प्रसंग किंवा खेळ होत त्यांत ते रा. दाते यांच्या इतकेच उत्साहाने भाग घेत. शीलवतीबाईच्या व माझ्या लग्नाच्या वेळी रा. बापट हेच पुरोहित होते.

रा. बापट यास ज्ञानकोशाचे एकनिष्ठ सेवक असें म्हणतां येणार नाहीं. त्यांचें मुख्य ध्येय राजकीय चळवळ हें होतें. त्यांतल्यात्यांत ब्राह्मणेतर जनता किंवा विशेषेंकरून शेतकरी व कामकरी वर्ग यांच्यामध्यें आत्महितसाधनेसाठी जागृति व्हावी या भावनेचे ते होते. मुंबईमध्यें जेव्हां मेहेतरांचा संप झाला तेव्हां त्यांच्यासाठी वर्गणी गोळा करणें, त्यांच्या तर्फेनें वर्तमानपत्रांतून लिहिणें इत्यादि गोष्टी त्यांनीं केल्या. जो वर्ग जागृत नाही जो जागृत व्हावा आणि त्यांस आपल्या

हक्कासाठीं भांडावयास शिकवावयाचे व ते भांडण भांडतांना त्यांस धीर देऊन नेट उत्पन्न करावयाचा, हें आपले काम आहे असें ते म्हणत. ज्ञानकोश–मंडळातली पुष्कळशी मंडळी मुळशी पेट्याच्या चळवळीच्या विरुद्ध असतांहि बापट यांनी त्यांच्याकडून वर्गणी काढलीच. रा. बापट यांचें बाहेरच्या चळवळीकडे जरी लक्ष होते, तरी त्यांनीं ऑफिसचें काम कधीं चुकविले नाही. ते कामावर वेळेवर येत. आणि ऑफिसचें काम करावयाचे तें उपजीविकेचे साधन म्हणून करावयाचें तथापि तें इमानाने करावें इतपत त्यांची वृत्ति होती; इतपत वृत्तीची माणसे देखील कोणत्याहि कार्यास फार मिळत नाहीत हे देखील सांगितलें पाहिजे.

ज्ञानकोशाच्या कार्यालयांतील काम करणारी वरील मंडळी इंग्रजी शिकलेली होय. जुन्या शिक्षणची तथापि आस्थेनें काम करणारी मंडळी देखील ज्ञानकोशास मिळाली. त्यामध्यें प्रमुख मंडळी म्हटली म्हणजे, वे. सिद्धेश्वर शास्त्री चित्राव, श्रौताचार्य धुंडीराज बापट व हौत्रवेत्ते चितामणभट्ट दातार हे होत. सिद्धेश्वरशास्त्री व श्रौताचार्य बापट यांचा ज्ञानकोशाशीं संबंध तीन चार वर्षांपूर्वी तुटला आणि ते दोघेहि आज सामाजिक कार्याकडे प्रवृत्त झाले आहेत. रा. दातार यांचा ज्ञानकोशाशी संबंध मात्र अजून कायम आहे. रा. दातार यांच्या आयुष्याचा वृत्तांतहि जरा मनोरंजक आहे. प्रथमपासून त्यांचे शिक्षण याज्ञिकीचें. त्यांत गति किती होती हे त्यांनीं १०–१२ यज्ञांत ऋत्विजाचे काम केले यावरून स्पष्ट होईल. वे. भाऊशास्त्री लेले यांच्या यज्ञांत देखील रा. दातार यांच्याकडे होत्याचे कर्म होतें. भाऊशास्त्री लेले हे ऋत्विज मंडळीकडून किती कसोशीनें काम घेणारे होते हे बऱ्याच जणांस परिचित असेलच. त्यांनीं होत्याच्यासारख्या जबाबदारीच्या कामासाठीं रा. दातारांची निवड केली होती. दातार कांहीं दिवस कोष्टी बनले होते व त्यानंतर शेतकरी बनले होते व त्यानंतर दातार ज्ञानकोश–मंडळांत आले. ज्ञानकोशाच्या अत्यंत आस्थेवाईक सेवकांमध्ये रा. दातार यांचा अंतर्भाव केला पाहिजे. छापखान्याकडील त्रासाचें काम यांच्याकडे आहे. संपादकीय वर्ग आणि मुद्रणखातें यांच्यामधील दुवा रा. दातार हे होत. तर यांच्या कामाचें महत्त्व थोडेथोडकें नाहीं. ज्ञानकोश–मंडळाच्या साहाय्यकांत ग्राहक मिळवून आणणाऱ्या व्यक्तींचा उल्लेख जरूर केला पाहिजे. मी नेहमीं हे म्हणत

असे कीं चांगल्या कॅनव्हासरची किंमत मला एका महाराजापेक्षां जास्त आहे. एक महाराज फार तर १०–१२ प्रती घेईल ( खरोखर पाहिलें तर बडोदेसरकार खेरीज करून पांच प्रतींच्या वर कोणीहि संस्थान ग्राहक झालें नाहीं ). तथापि एखाद्या चांगल्या कॅनव्हासरनें वर्षभर काम केलें तर तो शेदीडशे प्रती सहज खपवितो. या दृष्टीनें आम्हांस काम करणारांचें महत्त्व अर्थात जास्त आहे. ग्राहक मिळविण्यामध्यें ज्यांची मदत झाली अशांत रा. वासुदेव लक्ष्मण चितळे, विष्णुबाबा अक्कलकोटकर, रा. वामन सखाराम संत बी. ए. यांचीं नावें देतां येतील. या मंडळीच्या कामाचें वर्णन द्यावयाचें म्हणजे कॅनव्हासिंगचें प्रत्येकाचें कौशल्य वर्णन करावयाचे. ते मागें केलेंच आहे. प्रत्येकाच्या कौशल्याचें निरनिराळ्या प्रकारें मागे वर्णिलेंच आहे. त्यापेक्षां जास्त वर्णन देणें म्हणजे या कलेवर पुस्तक लिहिणेंच होईल. तें करण्यास येथें अवकाश नाहीं.

आतांपर्यंत ज्ञानकोशमंडळांतील साहाय्यकांचा जो उल्लेख केला त्यामध्यें एक महत्त्वाची व्यक्ति वगळली गेली आहे आणि ती व्यक्ति म्हटली म्हणजे मुख्य संपादकाची पत्नी होय. सौ. शीलवती केतकर यांचे लग्नापूर्वी व लग्नानंतर जें साहाय्य झालें त्याचें वर्णन करणें सोपें नाहीं. त्या इंग्लंडमध्यें असतांच एका पौंडास १५ पृष्ठें या दरानें त्यांनीं भाषांतर केलें होतें व हा दर अत्यंत अल्प होता. कां कीं त्यावेळेस पौंडाची किंमतहि फार थोडी होती. आणि इंग्लंडमध्यें त्यावेळेस प्रत्येक गोष्टीची महागाई होती. असें असतां त्यांनीं हें कार्य केलें तें जवळ जवळ फुकटच केलें असें म्हणण्यास हरकत नाहीं. यांनीं तें काम जरी अल्प मजुरीनें केलें तरी त्यांनां त्याचा पुढें दुसऱ्या तऱ्हेनें फायदा झाला आणि तो म्हणजे प्रो. विंटरनिट्झ जेव्हां हिंदुस्थानांत आले तेव्हां आमचा व त्यांचा परिचय झाला. कलकत्ता युनिव्हर्सिटीला आपल्या ग्रंथाचे भाषांतर करण्याची त्यांनीं परवानगी दिली तेव्हां पुन्हां भाषांतर करण्याचें काम त्यांनीं मिसेस केतकर यांस देवविलें व त्यांत प्राप्ति बरी झाली. त्यावेळेस दुसऱ्यांदा भाषांतर करावेंच लागलें कारण पहिलें भाषांतर माझ्या मागणीप्रमाणें अगदीं शब्दशः केलें होतें व दुसरें भाषांतर इंग्रजी भाषापद्धतीस अनुसरून करावे लागलें. शिवाय हें भाषांतर करतांना प्रो. विंटरनिट्झ मूळांतच फरक करीत असत त्यामुळें नवीन भाषांतराचे पैसे केवळ फुकट मिळाले नाहींत. त्यांत दुसऱ्यांदां मेहेनत पडली होती तथापि काम मिळून रोकडीचा फायदा झाला

यांत शंका नाहीं. आणि ज्ञानकोशाच्या सांपात्तिक स्थितीमुळें घर खर्चा-साठीं जर कधीं ओढाताण झाली तर यांतील कांहीं पैसे उपयोगी पडले. मिसेस केतकर यांचें लग्नापूर्वीचें झालेलें काम परिशिष्टांत दिलेंच आहे. व त्यामुळें त्याची पुनरुक्ति करण्याची जरूर नाहीं. त्यांनीं केवळ भाषां-तराचेंच काप केलें असें नाहीं तर त्यांनी कॅनव्हासिंगचेंहि काम केलें आहे; आणि कॅनव्हासिंगच्या बाबतींत त्यांनां माझ्या खालोखाल यश येत असे. त्यांनीं आतांपर्यंत ३१४ हजार रु. ज्ञानकोशाला मिळवून दिले असावेत.

वर सांगितलेली कामागिरी ही त्यांनींच केलेल्या इतर कामगिरींपेक्षां अत्यंत अल्प आहे. त्यांची खरी कामागिरी म्हटली म्हणजे माझें स्वास्थ्य राखणें ही होय. माझें स्वास्थ्य आणि आरोग्य राखण्याकडे त्यांनीं बरीच मेहनत केली व ती कामगिरी मी फारच महत्त्वाची समजतों, मी रोज काय खातों, सिगारेट किती ओढतो,यावर त्यांचें बरेच लक्ष असे. व या बाबतींत मी त्यांच्या नेहेमी धाकांतच असे.वारंवार डाक्टराकडे नेऊन माझी तपासणी करून घेणें या गोष्टी त्यांनीं केल्या आहेत. एखादें मोठें कोशासारखें काम घेतलें म्हणजे तें पुरें होण्यापूर्वीच कार्यकर्ता मरावयाचा किंवा कार्य आटपल्यानंतर तो मरावयाचा असा पूर्वीचा अनुभव आहे. निदान् महाराष्ट्राला तरी असा कडू अनुभव आलेला आहे. तर अशा प्रसंगीं मुख्य कार्यकर्त्याच्या स्वास्थ्याकडे आणि आरोग्याकडे लक्ष देणे या कार्याचे महत्त्व थोडेंथोडकें नाहीं. आज हें कार्य संपलें तरी दुसरीं अनेक मोठालीं कामें आपण करूं असा जो मनाला आत्मविश्वास वाटत आहे तो वाटण्यास कारण सौ. शीलवती बाईंचीच मेहनत कारण आहे असें मी समजतों.

---

## प्रकरण १४ वें.

## ज्ञानकोश व महंमदप्रकरण

ज्ञानकोश हा ग्रंथ महाराष्ट्रीय जनतेसाठीं केला आणि महाराष्ट्रांतील निरनिराळ्या वर्गांतून यास गिऱ्हाइकी मिळाली. गिऱ्हाइकीचें पृथक्करण केलें तर जवळ जवळ दोनतृतीयांश गिऱ्हाइकी ब्राह्मणांतील निघेल. सुमारें ९शें गिऱ्हाइकी संस्थानांतील आहे. सुमारें २९० गिऱ्हाइकी मराठे व तत्सम

जाती यांची आहे व इतर जातीची गिऱ्हाइकी कमी आहे. कायस्थ प्रभूमध्यें व पाठारेप्रभूमध्यें मिळून गिऱ्हाइकी ६०च्या आंतच आहे. पारशी व मुसुलमान या दोहोंतील गिऱ्हाइकी १० च्या आंतच आहे. गिऱ्हाइकीच्या मानानें ज्या लोकांनीं या ग्रंथास प्रसिद्धि जास्त दिली असा वर्ग म्हटला म्हणजे मुसुलमानांचा होय. मराठी ज्ञानकोशाकडे एका वेळीं सर्व हिंदुस्थानांतील मुसुलमानांचे लक्ष वेधलें होतें व मराठींतील ग्रंथ सर्व हिंदुस्थानभर माहीत होण्यास महंमद प्रकरण कारण झालें आहे व ज्ञानकोशांतील महंमदाचे प्रकरण हे हिंदुमुसुलमानांतील दुही वाढविण्याचें एक कारण आहे असे कांहीं लोकांस तात्पुरतें वाटूं लागलें होतें. या प्रकरणाची सविस्तर माहिती येथे देतो.–

ज्ञानकोशांतील महंमद प्रकरणासंबंधानें थोडेसे लिहिले पाहिजे. महंमदासंबंधाचा मजकूर चौथ्या विभागांत आला. सेमेटिक संस्कृतीची जगद्व्यापकता या विषयावर लिहितांना महंमदाविषयी लिहावे लागले. तो मजकूर 'एन्सायक्लोपीडिआ ऑफ रिलिजन ॲण्ड एथिक्स' या ग्रंथांत जे महंमदाचे चरित्र प्रसिद्ध झाले आहे त्यांतुन घतला होता. प्रो. मार्गोलिथ यांनीं तो लिहिला होता. प्रो. मार्गोलिथ हे आक्सफर्ड युनिव्हर्सिटींत आरबी भाषेचे आणि वाङ्मयाचे प्रोफेसर आहेत आणि त्यांचीं मुसलमानी संस्कृतीवर पुस्तकें प्रसिद्ध आहेत. यामुळे त्यांच्या लेखाला ज्ञानकोशाच्या संपादकमंडळानें महत्त्व दिलें यांत कांही वावगे झालें नाहीं. आपलें म्हणणे मुसलमानांस पटले नाहीं तरी ते खरेच आहे असा प्रो. मार्गोलिथ यांचा अजून आग्रह आहे. या लेखासंबंधाने मुसलमान मंडळीस जी चीड आली तिचे कारण स्वाभाविक आहे. कारण त्या लेखात महंमदाची कार्यकर्ता मनुष्य म्हणून तारीफ करण्यांत आली होती तरी त्याच्या खासगी वर्तनासंबंधाने अत्यत भयंकर विधाने केलीं होती. प्रो. मार्गोलिथ यांची विधाने आम्ही प्रथम प्रमाण म्हणून स्वीकारलीं व नंतर महंमदाच्या चरित्राचीं सर्व पानें कापून काढण्याचे ठरविले; तेव्हां हे कां केलें याचे स्पष्टीकरण करणें अवश्यच आहे. आणि यासाठी मुसलमान मंडळींनीं जी चळवळ केली त्या चळवळीचा सर्व इतिहास दिला पाहिजे. ह्या इतिहासाचे साधारणतः दोन भाग पाडतात: (१) माझ्या स्वतःच्या मतांत फेरबदल काय झाला याची चर्चा; व (२) मुसलमानांनीं केलेली चळवळ.

महंमदाविषयीं जो लेख होता तो तर चांगल्या ग्रंथाच्या आधारानें घेतला. तेव्हां तो लेख परत कां घेतला आणि तो लेख परत घेण्यास कारण मुसलमान मंडळीची भीति वाटत होती काय? असा प्रश्न उत्पन्न होईल. व यासाठीं यासंबंधाची सविस्तर हकीगत प्रसिद्ध केली पाहिजे. त्याविषयीं हे सांगितलें पाहिजे कीं जेव्हां या लेखाविषयीं वाद उपस्थित झाला तेव्हां या लेखाविषयीं पुन्हां विचार करूं लागलों. आणि प्रसिध्द केले त्याच्या सत्यतेविषयीं मला शंका येऊं लागली; ती कां येऊं लागली हे स्पष्ट करीत आहें. गौतमबुद्धाविषयीं मी आपलें म्हणणें परत घेत नाहीं पण महंमदाविषयीं परत घेतलें याचें कारण मुसलमान लोक माथेफिरू आणि मार देणारे आहेत, आणि बुध्दाविषयीं आदर बाळगणारे हिंदु माथेफिरू नाहींत असा आरोप देखील प्रसिध्द झाला आहे. आणि मुंबईच्या बुद्धिस्ट सोसायटीच्या कांहीं सदस्यांनी हा आरोप माझ्या तोंडावर केला. डॉक्टर केतकर हे उच्च शिरावरून खालीं उतरले आणि त्यांनी महंमदासंबंधानें आपलें म्हणणें परत घेतलें. आतां त्यांनीं बुद्धासंबंधानें देखील विधानें परत घ्यावीत अशा अर्थाचें क्रानिकलमधून पत्र प्रसिद्ध झालें. यासाठीं या दोहोंविषयीं माझी भिन्न वृत्ति कां आहे हें सविस्तर दाखविलें पाहिजे. गौतबुध्दावरील लेख आणि महंमदावरील लेख यांत अंतर आहे. गौतमाविरुध्द अत्यंत वाईट मत झालेल्या मंडळींत मी आहे, आणि त्यामुळें मी ज्या मताचा मुख्य अध्वर्यु त्या मताचा मी त्याग कसा करीन? कै. चांदोरकर हे एक बुध्दाविरुध्द अत्यंत कठोर मत व्यक्त करणारे दुसरे एक गृहस्थ होते. तथापि कै. चांदोरकर यांनीं प्रथम बौध्द ग्रंथांचा जोरानें अभ्यास सुरू केला तो केसरींत माझा जातिभेदावरील लेख प्रसिध्द झाल्यावर आणि त्यावर रा. धर्मानंद कौसंबी यांच्याशीं झालेला वादविवाद प्रसिध्द झाल्यावरच सुरू केला असें चांदोरकर यांनीं सांगितलें. ज्या विषयावर अभ्यासक जगापेक्षां माझें मत अगदी निराळें आहे तें मत मी मांडणारच; आणि त्यानंतर जो वादविवाद होईल त्यांत जें काय सिध्द होईल तें होईल.

महंमदाची गोष्ट निराळ्या प्रकारची होती. महंमदाविषयीं मी कोणत्याहि एका मताचा प्रवर्तक नाहीं. कारण त्याविषयीं माझी माहिती सर्व दुय्यम प्रकारची रहाणार. आपण दुसऱ्या कोणाच्या मतांवर अवलंबून राहून त्याकरितां विनाकारण भांडणें उपस्थित करावीं हें मला योग्य

वाटलें नाहीं. प्रो. मार्गोलिथ आपलें विधान करतात तें इब्न इशाकच्या आधारावर. इब्न इशाकचा ग्रंथहि उपलब्ध नाहीं. ज्याप्रमाणें मेगॅस्थिनीसचा ग्रंथ उपलब्ध नाहीं आणि त्याचें म्हणणें इतर ग्रंथकारांतील उतारे गोळा करून काढावें लागतें त्याप्रमाणें इब्न इशाकच्या ग्रंथाची स्थिति आहे. इब्न इशाकचा ग्रंथ नष्ट झाल्यावर त्याचा आधार सांगून वाटेल तशा गप्पा वाटेल त्या ग्रंथकारानें सांगणें शक्य आहे. म्हणजे महंमदाविषयीं इब्न इशाकनें जें लिहिलें आहे तेंहि निःसंशय उपलब्ध नाहीं. इतक्या गोष्टी असतां त्या इब्न इशाकच्या म्हणून सांगितलेल्या उताऱ्यावर अवलंबून राहून प्रो. मार्गोलिथ यांनीं जें लिहिलें ते सर्व बरोबर आहे असा आग्रह धरून बसणे मला प्रशस्त वाटेना. त्यातल्या त्यांत बडोद्याचे प्रो. नबाबअल्ली यांनीं मला एक पत्र लिहिलें त्यांत असे दाखविलें कीं इब्न इशाकने जें पैगंबराचें चरित्र लिहिलें ते देखील केवळ इतिहाससंशोधक या नात्यानें लिहिलें नाहीं. तर तें सरकारी हुकुमानें किंवा आश्रयानें लिहिलें; आणि तें लिहिलें तें ईजिप्तच्या एका जुलमी बादशहाच्या हुकुमावरून लिहिलें. त्यांत त्या बादशहाला आपल्या सर्व वागणुकीचें समर्थन करावयाचें होतें, आणि तें समर्थन करावयाचा एक मार्ग म्हटला म्हणजे महंमद साहेब देखील आपल्यासारखेच वागले असें दाखविणें. ज्याअर्थी इब्न इशाकच्या महंमदचरित्रामागें येणेंप्रमाणें हेतू होते त्याअर्थी इब्न इशाकचें म्हणणें विश्वसनीय नाहीं. प्रो. नबाबअल्ली यांनीं पुन्हां असें दाखविलें कीं, प्रो. मार्गोलिथ यांच्या लेखाचें सविस्तर खंडनहि प्रसिद्ध झालें आहे आणि त्या खंडनाचें तयार झालेलें वाङ्मयहि बरेंच आहे असें दाखविलें आणि त्यांतील बरेंचसें आमचा लेख प्रसिद्ध होण्यापूर्वी प्रसिद्ध झालें होतें आणि त्याअर्थी जर प्रो. मार्गोलिथच्या लेखाकडे लक्ष देणें आमचें कर्तव्य होतें तर त्याच्या खंडनाकडे देखील लक्ष देणें आमचें कर्तव्य होतें. प्रो. नबाबअल्ली यांचें पत्र आल्यानंतर असें वाटूं लागलें कीं आपण जरी न्यायदेवतेच्या कोर्टातून दोषमुक्त ठरूं तरी संशोधक वर्गाच्या कोर्टाकडून दोषमुक्त ठरणार नाहीं. या प्रश्नाकडे लक्ष पुरवून त्याविषयीं कांहीं तरी केलें पाहिजे असें मला वाटावयास लावण्याचें जर श्रेय प्रामुख्यानें कोणास द्यावयाचें असेल तर माझ्या मतें त्या श्रेयाचे मुख्य वांटेकरी प्रोफेसर नबाबअल्ली आहेत.

या लेखाकडे हिंदुस्थानांतील सर्व मुसलमानांचें लक्ष ओढण्याचें श्रेय अझमगढ येथील "मारिफ" मासिकास आहे. मारिफ हें उर्दूतील एक चांगले मासिक गणलें जाते आणि त्या मासिकानें या लेखाकडे अगोदर लक्ष ओढलें. त्या मासिकाचा तात्रडतोब परिणाम झाला नाहीं. तथापि त्या मासिकांतील लेखाचा सारांश टाईम्स ऑफ इंडियाने प्रसिद्ध करून त्याच्या चर्चेस चेतना दिली. पुढे क्रानिकलचे संपादक रा. ब्रेलवी यांनीं या विषयाकडे ज्ञानकोश संपादकांचे लक्ष पत्र लिहून ओढले. आणि त्यामुळे तो प्रश्न चव्हाठयावर आला. त्यावेळेस आम्ही प्रथमच स्पष्टीकरण केले कीं आम्ही कांहीं पदरचे लिहिले नाहीं. प्रो. मार्गोलिथ यांच्या लेखावरून मजकूर घेतला आहे वगैरे. पण त्यावर पुढे पत्रव्यवहार वाढला. इतक्यांत मुंबईत मुसुलमानांमध्यें चळवळ सुरू झाली, आणि गव्हरनरकडे डेप्युटेशन पाठविण्याचा विचार ठरूं लागला. या चळवळीचे मुख्य प्रवर्तक रा. कादरभाई नांवाचे ब्यारिस्टर होते. पहिली निषेधाची सभा पायधुणीवरील हामदिया नांवाच्या मशीदींत झाली. आणि त्यावेळेस तेथे अध्यक्ष रा. अबदुलरहीम दिमटिमकर जे. पी. हे होते. ही सभा झाल्यानंतर थोडयाच दिवसांनीं ज्ञानकोशास निजाम राज्यांत बंदी करणारे फर्मान निघालें. त्या फर्मानांत, हामदिया मशीदींत भरलेल्या सभेचा टाईम्समध्ये जो उतारा आला त्याचे अवतरण केलें होतें.

ही सभा झाल्यानंतर रा. दिमटिमकर यांची मी गांठ घेतली आणि त्यावेळेस असें ठरलें कीं, चार मंडळी जमून या प्रश्नावर विचार करावा आणि झालेल्या गोष्टीवर इलाज काढावा. येथे हेंहि सांगितले पाहिजे कीं, प्रो. नबाबअल्लीचा माझ्याशीं पत्रव्यवहार झाल्यानंतर, आणि माझी व रा. दिमटिमकर यांची भेट होण्यापूर्वी आपल्या पूर्वीच्या लेखावर कांही तरी उपाययोजना आपण केलीच पाहिजे असा माझा निश्चय नबाब अल्लींच्या पत्रामुळें झाला होता. प्रश्न एवढाच होता कीं, उपाययोजना कोणत्या प्रकारे करावी. माझे असे मत होते कीं, महंमद पैगंबरांची बाजू पुढें मांडणारा एक निराळा लेख पुरवणी विभागांत प्रसिद्ध करावा, म्हणजे झालें. केवळ पुरवणी विभागांत दुरुस्ती करावी ही सूचना कांही मुसलमान मंडळीस आवडली पण बऱ्याच लोकांस आवडली नाहीं व वाद पुढें जास्त माजला.

माझें व रा. दिमटिमकर यांचें जें बोलणें झालें त्यांत त्यांस ही कल्पना पसंत पडली की मुसलमान मंडळींपैकीं कोणी तरी एक चांगला विद्वान त्यांनीं निवडावा आणि त्यानंतर पैगंबरांचें चरित्र पुरवणी विभागांत प्रसिद्ध करावें. प्रो. नबाबअली व प्रो. सर्फराज या दोघांपैकीं कोणास तरी लेख लिहिण्यास आमंत्रण करावे असें माझें ठरलें होतें. मी त्यावेळेस रा. दिमटिमकर यांस असें सांगितलें कीं मुसलमानांनीं सरकारकडे जाण्यांत अर्थ नाहीं, कारण सरकारकडे हें प्रकरण गेलें आणि सरकारकडून आम्हाला लिहून आलें म्हणजे मुद्रणस्वातंत्र्याच्या दृष्टीनें आम्हांस सरकारच्या म्हणण्याचा विचार करावा लागेल आणि मुसलमानांचा हेतु लांबणीवर पडेल. मुसलमानांनां दुखावण्याचा आमचा उद्देश असणेंच शक्य नाहीं कारण आम्हांला मुसलमानांतून देखील गिऱ्हाइकी मिळवावयाची आहे. आणि मराठींत मुसलमानांची गिऱ्हाइकी जरी थोडी असली तरी गुजराथीला गिऱ्हाइकी अधिक असण्याचा संभव आहे. आम्ही सत्य मांडणें हे आपलें कर्तव्य समजतोंच आणि मुस्लिम मंडळीनीं प्रो. मार्गोलिथ यांच्या विधानांचे चांगलें निराकरण केले तर तेच हिताचे होईल. एखादे विधान लपवून कधींहि फायदा नाहीं. मार्गोलथिनें लिहिले आहे तें "इब्न इशाक' नांवाच्या आरबी ग्रंथकाराच्या पैगंबराच्या चरित्रावरून घेतलें आहे आणि मुसलमानास योग्य मार्ग म्हटला म्हणजे इब्न इशाकाच्याच चरित्राचें परीक्षण करविणें हा होय. ज्ञानकोशांतील पानें कापावयास लावण्यासाठीं सरकारकडून आम्हांस समज देण्याची गोष्ट फार कठीण होईल." हें म्हणणें मि. दिमटिमकर यांस पसंत पडलें. व त्यांनीं चळवळ करणाऱ्या मुसलमानांपुढें तें मांडलें, तथापि त्यांच्या सल्ल्याचा उपयोग झाला नाहीं. तीं पानें डॉ. केतकर यांस कापावयास लावून आपला जोर दाखवावा असेंच कांहीं मुसलमानांस वाटत होतें.

कांहीं दिवसांनीं वर्तमानपत्रांत बातमी प्रसिद्ध झाली कीं मुंबईतल्या ११२ प्रसिध्द गृहस्थांनीं आणि संस्थांनीं या संबंधाचा मुंबईच्या गव्हरनराकडे अर्ज केला. त्या अर्जाचे स्वरूप येणेंप्रमाणे होतें. त्यांत त्यांनी माझ्यावर अनेक हेतु लादले होते व पानें कापविण्यास हिंदुस्थान सरकारकडून मला हुकूम द्यावा असें लिहिलें होतें. हा अर्ज केल्याचें मला कळल्यानंतर "आपलें चार मंडळी मिळून राउंड टेबल करून पुढें काय

करावयाचें याविषयीं विचार करावा असे ठरलें असतां मुसलमान मंडळींनीं सरकारकडे अर्ज कसा केला हें मी अबदुल रहीम यांनां विचारलें तेव्हां त्यांनीं असें सांगितलें कीं "लोक माझ्या सल्ल्याप्रमाणे वागले नाहींत उलट मीच डॉ. केतकरांना फितूर झालो असा माझ्यावरच आरोप करूं लागले, आहेत." अबदुलरहीम यांनीं मला पुढें अंजुमाने झिया–उल–इस्लामचे सेक्रेटरी यांच्यांशी पत्रव्यवहार करण्यास सांगितलें पुढे त्या मंडळीशी मी पत्रव्यवहार केला त्यांत एवढेंच लिहिलें कीं तुम्ही सरकारकडे विनाकारण जाऊन तुमची केस खराब करून घेतली आहे. सरकार बहुतकरून या भांडणांत पडणार नाहीं. आणि पडलेंच तर आम्हांला सरकारशी मुद्रणस्वातंत्र्यासाठीं प्रतिकार करावा लागेल. आणि त्यावेळेस आम्ही सरकारशी भांडत बसलों म्हणजे तुमची इच्छा साध्य होणें फार दूर होईल. तथापि सरकारनें तुमच्या करतां कांहीं करावयाचें नाकारलें म्हणजे मात्र तुम्ही मजकडे या आणि मग दोन भले हिंदी गृहस्थ या नात्यानें आपण काय तोड काढायची ती काढूं. त्या संस्थेचे सेक्रेटरीस इंग्रजी चांगलेसे येत नव्हतें म्हणून पुढे पत्रव्यवहार त्याच्या ऐवजीं संस्थेचे अध्यक्ष ब्यारिस्टर कादरभाई यांनींच केला.

ब्यारिस्टर कादरभाई यांची व माझी जी भेट झाली त्या भेटीमध्यें पानें कापविण्याची योजना करण्यापेक्षां पुरवणी विभागात मुसलमान गृहस्थांस महंमदाचें चरित्र मुसलमानी दृष्टीनें लिहिण्यास आणि मार्गोलीथ यांचे खंडन करण्यास संधि देणे हे अधिक चांगले हें पटलें. तथापि त्यांनां यासंबधाने स्वतः संमति देणे योग्य नव्हतें. त्यांनां सांगितलें कीं जसे त्यानां पटले तसे सही करणाऱ्या ११२ जणांस देखील पटेल, व यासाठीं त्या मंडळीची सभा बोलवावी आणि त्या सभेला मला आमंत्रण करावें. आमचें येणें प्रमाणें ठरलें; पण इतक्यांत बोहारी लोकांचे मुख्य गुरु (बडे मुल्ला) पुण्यास आले होते, व त्या संधीस डॉ. केतकर यांस गांठून या गोष्टीचा निकाल लावावा अशीं कांहीं स्थानिक मुसलमानांची इच्छा झाली. यांत सर इब्राहिम हरून जाफर आमच्याकडे इतर मुसलमान गृहस्थांस घेऊन आले. त्यांची व माझी (मी मुंबईस असल्यामुळें) भेट झाली नाहीं पण त्यांची आणि सौ. शीलवतीबाईंची भेट झाली. आणि त्यांनीं मला तार करून बोलवा असा मिसेस केतकर यांस आग्रह केला आणि त्याप्रमाणें मिसेस केतकर यांनीं तार केली,

मोस्लेम पुढारी मुद्दाम मला भेटण्यासाठीं आले होते. मुक्काम थोडे दिवस आहे तर तावडतोब यावें अशी त्यांची इच्छा आहे अशा अर्थाची सौभाग्यवतींनीं मला तार केली. ही तार पोंचतांच तावडतोब मी पुण्यास आलो. दुसऱ्या दिवशीं सकाळीं माझी सर्वांची भेट झाली. त्यांनां देखील पुरवणी विभागांत मुसलमानानें इस्लामी दृष्टीनें लिहिलेलें महंमदाचें चरित्र छापावें ही कल्पना पसंत पडली. व तें अभिवचन देणारें व आपली मुसलमानांना दुखविण्याची इच्छा नव्हती इत्यादि गोष्टी व्यक्त करणारें पत्र लिहावें अशी इच्छा व्यक्त केली. त्या इच्छेस मी आनंदानें रुकार दिला. आणि त्याप्रमाणे मी पत्र लिहिलें. त्यानंतर सर इब्राहीम यांनीं असे सांगितलें कीं बडे मुल्ला साहेबांची आपणांस भेटावें अशी इच्छा आहे, तर कसें करावयाचें? मी त्यांनां सांगितलें कीं त्यांनी आमच्या ऑफीसला भेट दिली तर आमचा सन्मान झाला असें वाटेल. तेव्हां सर इब्राहीम पुढें म्हणाले की आपणच जर त्यांच्याकडे आला तर त्यांनां तर आनंद होईलच पण पुष्कळ मुसलमानांनां आनंद होईल. तेव्हां मी त्यांस सांगितले कीं त्यांच्याकडे जाऊन त्यांनां भेटण्यास माझी मुळींच हरकत नाहीं. त्याप्रमाणे मी त्यांनां भेटलों. सामोपचाराच्या चार गोष्टी झाल्या व त्यावेळेस मी पत्र त्यांनां लिहिलें होतें ते एका गृहस्थानें वाचावयास सुरवात केली तेव्हां ते गृहस्थ वाचतांनां थोडेसे अडखळू लागले तेव्हां मींच तें वाचलें. त्यावेळेस हे पत्र मी वाचण्याचा अर्थ पुढे काय करण्यांत येईल अशी माझी कल्पनाच नव्हती. त्या पत्रांत आपण गव्हरनरकडे पाठविलेल्या खलित्याचा जोर काढून घ्यावा किंवा माझ्यावर कोणती विशेष मेहेरबानी करावी अशीहि इच्छा प्रदर्शित केली नव्हती. तर बोहोरी लोकांचे गुरु म्हणजे एक थोर गृहस्थ आहेत त्यांनां आपण भेटण्याची संधि वांया घालवूं नये एवढयाच इच्छेने त्यांस भेटलों होतों. या भेटीच्या वेळेस बोहोरी लोकांच्या गुरूकडून मला एक शाल अर्पण करण्यांत आली. यावरून त्यांचा सन्मान करण्याचा रिवाज हिंदू आचार्यांच्या रिवाजाप्रमाणें आहे असें दिसून येईल.

हें प्रकरण येथे संपले अशी माझी कल्पना नव्हती; व इच्छाहि नव्हती बडे मुल्ला साहेबांस जें मी पत्र लिहिलें त्यांत माझा हेतु ब्यारिस्टर कादरभाई हे जी सभा बोलवणार होते त्या सभेच्या अगोदर जितकी मंडळी अगोदरच माझें म्हणणें समजून माझ्या सूचनेला मान्य होतील तितकी

# ज्ञानकोशमंडळाचे कांहीं डायरेक्टर



रा. ना. खं. फडके.



रा शां. वि. दांडेकर.



डॉ. भा. ना. खरे.

# ज्ञानकोश विभाग-संपादक



रा. वि. त्र्यं. आगाशे-स्थापत्य.



रा. ब. ग. कृ. केळकर-कृषिशास्त्र.



प्रो. र. वि. दामले-वनस्पतिशास्त्र.



रा. आर. डी. खांडेकर-कोंबड्या बदकें.



रा. पां. स. केळकर-विणकाम.



प्रो. वि. ना. हाटे-प्राणिशास्त्र.

मंडळी मिळवावी एवढाच होता. आणि मी जी सूचना करीत होतों तीत माझा मुख्य हेतु मुसलमान मंडळींचे हित पहाण्याचाच होता. कारण तीन हजार प्रतींपैकी २८०० प्रतीस अगोदरच गिऱ्हाइकी झाली होती आणि पुष्कळांकडे अगोदरच पुस्तकें गेलीं होतीं. अशा प्रसंगी अमुक अमुक पानें रद्द आहेत असे त्या मंडळींनां कळवून त्या पानांऐवजीं दुसरी पानें पाठवावीत ही जी मुसलमान मंडळीची इच्छा होती ती त्यांच्या हिताची नव्हती. त्याच्या योगानें केवळ आक्षेप घेतलेल्या मजकुराकडे लोकांचे लक्ष जास्त ओढल्यासारखे होणार होते. आणि लोकांकडे एखादा मजकूर आम्ही नवीन पाठविला असता तो मुसलमानाच्या आग्रहामुळे पाठविला असे लोकास कळले तर त्याच्या योगानें मुसलमान मंडळींनी माझ्यावर वजन कसे पाडले एवढेच दिसेल. त्याच्या योगानें पैगंबराच्या चरित्रावरचे आक्षेप दूर होणार नाहीत. हे मी मुसुलमान मंडळीस चांगले समजावून सांगितले. तथापि मुसलमान मंडळी हट्टास पेटली होती, आणि ती पानें कापवावींत असाच त्याचा आग्रह होता. मुसलमान मंडळीचे हे वर्तन आपल्या पैगंबराच्या इभ्रतीच्या रक्षणाचे द्योतक नसून त्यांच्या गर्वाच्या तृप्तीसाठी खटपट करणारे होते असे माझे मत झाले ते अजून आहे. पानें कापावीत अशी मागणी ब्यारिस्टर कादरभाई यांनी उत्पन्न केलेल्या ११२ सहीवाल्यांची होती तशीच ती खिलाफतवाल्यांचीहि होती. मि. शौकतअल्ली यांनीं एक मोठें प्रेमळ पत्र लिहून हीच मागणी केली होती. असो.

बडे मुल्लासाहेबांच्या भेटीने आणि त्यांस मुसलमान बंधूस दुःख होतें याबद्दल खेद झाल्याचे दाखविल्याने प्रकरण मिटलें असें मी मुळीच समजलो नाहीं. उलट सही करणारी एकशेंबारा मंडळी यांच्या भेटीची अपेक्षा करीत होतों; व मुंबईस गेलों तों पत्रांत अनेक गोष्टी वाचल्या. गुजराती पत्रांनीं असें छापले होते कीं डॉ. केतकर यांनी बडे मुल्ला यांची माफी मागितली! व त्यांनीं त्यामुळें गव्हरनरला ११२ सह्यांनीं जो अर्ज केला होता त्यावरील आपली व आपल्या एका अनुयायाची सही बडे मुल्लांनीं काढून घेतली; तथापि गुजराथी पत्रांतील हा मजकूर माझ्या नजरेस सहज आला नव्हता. तो माझ्या करारभंगाची गोष्ट म्हणून कादरभाईनीं माझ्या नजरेस आणला. ११२ सही करणारांनीं माझ्याशीं सहविचार करून जें काय ठरवावयाचें तें ठरवावें असें ठरलें असतां मी

जाऊन त्यांच्यांतला एक मनुष्य फोडला असे मि. कादरभाईस वाटलें. मि. कादरभाई यांनां स्वतःला मी सुचविलेला मार्ग पसत पडूं लागला होता, पण त्यानी ठरविले होते की जे कांही करावयाचे ते ११२सह्या करणाऱ्या मंडळीनी करावे. इतपत आम्हा दोघांचे जुळले असता मी पाठीमागे असली फूट उत्पन्न करणाचा कारभार का केला असे त्यांस वाटले.

मि. कादरभाई यांनी मुसल्मानामध्ये फूट पाडण्याचा जो आरोप मजवर केला तो खरा नव्हता हे उघड आहे मुसल्मानामध्ये आपसात तटे लावून मला कांही साधावयाचे नव्हते: माझ्या दृष्टीने जे मुसलमानानाच हितकर होते ते समजावून द्यावयाचे होते. मला तडजोड मुळीच नको होती. मला माझ्या कल्पनेस मुसलमानाची अंतःकरणपूर्वक संमति पाहिजे होती आणि त्यासाठी मला भेदनीति नको होती. भेदनीति माझ्या मते मुळीच कल्याणकारक नाहीं. मुल्लाजींच्या मडळीना देखील माझी सूचना पसंत आहे तर आता ११२ मडळींची सभा बोलवावी व पुरवणी विभागांत महमदी दृष्टीने पैगंबराचे चरित्र यावे हा ठराव ११२मडळीकडून पास करून घ्यावा असे सागण्यास गेलो तेव्हां आपल्या संस्थेच्या सेक्रेटरीबरोबर कादरभाई माझ्या वर्तनाबद्दल आश्चर्य दाखविणारी चर्चा करीत बसले होते. मला पाहिले तेव्हां कादरभाई म्हणाले की तुम्ही आमच्यांत घोंटाळा केला. हे प्रकरण मिटविण्यास बडे मुल्लांस अधिकार नाही. जर कोणास अधिकार असेल तर तो ११२ सहीवाल्यांनां आहे; एकट्या मुल्लासाहेबांनां नाही, आणि मुल्लासाहेबांनां तो ११२ जणांचा खलित परत मागविण्यास किंवा काढून घेतला आहे असें सांगण्यासहि अधिकार नाही. मी कादरभाईस सांगितले की, बडेमुल्लांनी आपला जोर काढून घेतला असे तुम्हीं कसे समजतां? मी तर त्यांनां तशी कोणत्याच प्रकारे विनंति केली नाहीं जर कांहीं विनंति केली असेल, तर तीं एवढीच की, मुसुलमानबंधूंचे मने दुखवली याच्याबद्दल आम्हांस खेद होतो हे आमचे म्हणणे त्यांनीं सर्व मुसुलमानांस कळवावें. सरकारास केलेल्या अर्जासंबंधाने त्यांनीं कांहीं कारवाई करावी अशी माझी इच्छाच नव्हती. तुम्हीं ११२ मंडळीची सभा अजून बोलवा व आम्ही सुचविलेला मार्ग त्यांना पसंत पडेल तर ठीकच होईल. आपली आमच्याकरतां ११२ मंडळींची सभा बोलवावी असा जो तुमचा आमचा ठराव झाला आहे तो ठराव

तुम्ही अमलांत आणावा. तो ठराव मुल्लासाहेबांच्या सेक्रेटरीपाशीं मी दिलेला आहे. मुल्लासाहेबांनी जे काय करावयाचे ते ह्या ११२ सही करणाऱ्या मंडळींशी संगनमत करून ठरवावे अशी मी मुल्लासाहेबांच्या सेक्रेटरीस सूचनाहि दिली होती; व त्याप्रमाणे सर इब्राहिम हरुन जाफर यांनी देखील त्या मंडळीशी पत्रव्यवहार करा नाही तर आणखी कांही भानगड उपस्थित होईल असेहि त्यांनी मुल्लासाहेबांच्या सेक्रेटरीस सांगितले. कादरभाई व मी यामध्ये झालेला "समजाचा" कागद नक्कल करण्यास सेक्रेटरींनी नेला, तो पुढे परत आला नाही.

माझ्या मनात ही ११२ मंडळींची सभा मुळीच चुकवावयाची नव्हती. कारण ही सभा भरली असती तर मुसलमान मंडळीच्या पुढाऱ्यांची एकाच बैठकींत ओळख होण्याची संधि मिळाली असती, व ही संधि गेली ह्याच्याबद्दल मला खरोखरच नुकसान झाल्यासारखे वाटत आहे. मला माझे कांही हिंदु मित्र सांगत होते कीं, तुम्ही या ११२ मुसुलमानांत जाऊ नका, विनाकारण मार वगैरे खाल, कारण मुसलमान लोक माथेफिरू आहेत; परंतु त्या प्रकारची भीति मला मुळीच वाटत नव्हती, कारण मुसलमानांतली देखील पुढारी मंडळी पन्नासी उलटलेली व त्यामुळे बरीच सथ डोक्याची, शांतपणे विचार करणारी अशी असणार यासंबंधाने माझी खात्रीच होती या ११२ मंडळींत मी एकटाच जाणार होतो व आपले म्हणणे मांडून ते योग्य आहे असे पटवून देणार होतो, पण तो योग आला नाही. ही ११२ मंडळींची सभा कधीच भरली नाही व मुसल्मान मंडळी व ज्ञानकोश संपादक यांची तडजोड झाल्यानंतर मला जो मुसलमान मंडळींकडून खाना मिळणार होता तो मिळाला नाहीं. व डॉ. केतकर यांच्या सौजन्यामुळें हिंदु-मुसलमानांत तेढीचा प्रसंग टळला याबद्दल आनंद प्रदर्शित करणारी एक सभा कादरभाई भरविणार होते ती देखील भरली नाहीं. तर ही ११२ सहीवाल्यांची सभा कां भरली नाही याचे स्पष्टीकरण केलें पाहिजे.

असे दिसून येतें कीं, वडे मुल्ला व त्यांचे एक अनुयायी या दोघांनीं ११२ सह्यांच्या खलित्यास पूर्वी दिलेला आपला जोर काढून घेतला; हें प्रसिद्ध झाल्यानंतर त्यांनीं तो जोर कां काढून घेतला याबद्दल चर्चा सुरू झाली आणि मुसलमान लोकांच्या हितसंबंधांकडे दुर्लक्ष करण्याचें

काम मुल्लाजीनीं केले असा त्यांच्यावर आक्षेप घेण्यांत आला तर कित्येकां कडून मुल्लांवर व सर इब्राहीम हम्रून जफर यांच्यावर विनाकारण मध्येच उठाठेव करण्याचा आरोप प्रसिद्ध होऊं लागला. अनेकांकडून असा आक्षेप घेण्यांत आला की, वडे मुल्लानां सर्व मुसलमान समाजातर्फे डॉ. केतकरांनां माफी करण्यास काय अधिकार होता? इत्यादि प्रकारची चर्चा सुरू झाली. मी बडे मुल्लास आपली सही काढून घेण्यास विनंति केली नाही किंवा याची क्षमा मागितली नाही. तर मी त्यांच्यासमोर मुसुलमानांस दुःख झाले याबद्दल खेदाचे पत्र वाचून दाखविले त्याचा भलताच अर्थ करण्यांत येत आहे असे स्पष्टीकरण प्रसिद्ध करविलें. त्या- वेळेस बडे मुल्लासाहेबांच्या तर्फे असे प्रसिद्ध करण्यांत आले की, मि. कादरभाई हे बोहोरीसमाजांतून बहिष्कार पावलेले गृहस्थ आहेत. तर त्यानी ज्यांत पुढाकारपणा घेतला आहे अशा खलित्यावर बडेमुल्लानीं सही करणे हे गैर आहे, असे वाटून बडे मुल्लांनी आपली सही परत घेतली. यानंतर थोडक्याच दिवसानीं असे प्रसिद्ध झाले कीं, सरकारनें तो ११२ जणांच्या सह्यांचा खलिता परत केला आहे. सरकारकडून अर्ज फेटाळल्याचे हे प्रसिद्ध झाल्यानंतर पुन्हा चळवळ सुरू झाली. बडे मुल्लानां जे पत्र लिहिले होते ते पत्र तडजोडीची अट घातलेले पत्र असे समजले जाऊन ती तडजोड इतर मुसलमानास मान्य नाहीं असें सांगणारी चर्चा वर्तमानपत्रांतून येऊ लागली; अर्थात ही तडजोड नव्हती तर माझीच सूचना होती. ११२ सहीवाल्याची बैठक होऊन कांही तरी ठरवावयाचे होते. इकडे मि. कादरभाई ११२ सहीवाल्यांची बैठक बोलविण्याच्या खटपटीत होते व त्यांनीं एक सभा बोलावून त्या सभेला मी यावे अशी मला तार केली, पण वेळ इतका थोडा होता कीं, त्या सभेला मला जातां आले नाही. आणि त्या वेळेस सौभाग्यवती शीलवतीबाई आजारी होत्या व मी त्यांस महाबळेश्वरास घेऊन जाण्याच्या गडबडींत होतो व यासाठी सभेची तारीख पुढे ढकला म्हणून मी तार केली. ती तार देखील पोष्टाच्या गडबडीमुळे कादरभाईस उशीरा मिळाली. तेव्हां कादरभाईचा असा समज झाला की, सरकारने हे प्रकरण फेटा- ळून लावलें आहे त्यामुळे मी मुसलमान पुढाऱ्यांच्या सभेस येण्याचें दुर्लक्ष करितों, पण त्यांचा हा समज चुकीचा होता. प्रकरण सरकारकडे गेले नसतांनाच मुसलमानांचें म्हणणें मान्य करावें अशी माझी इच्छा होती

व तिचें कारण मागें सांगितलेंच आहे. तथापि मी ती वेळ न साधल्यामुळे मि. कादरभाई यांनी पानें कापविण्यासाठीं पंचवीस हजार सह्यांचा अर्ज करण्याची चळवळ पुढे जोराने सुरू केली. ही १९२६ च्या आक्टोबरमधील गोष्ट होय. त्यानंतर मी पुढे उमरावती हायस्कूलच्या ज्युबिलीसाठी उमरावतीस गेलो होतो व परत आलों तो मी पुणे शहरतर्फे कौन्सिलसाठी उभा राहण्याची इच्छा असल्याचे जाहीर झाले होतें व त्याच सुमारास स्थानिक मुसलमानांमध्ये चळवळ सुरू होऊन आक्षेप घेतलेली पानें कापून टाकावी अशी मागणी करण्यात आली होती व सरकारकडे मागणी करण्यापूर्वी माझ्याकडेच मागणी करण्याचे स्थानिक मुसलमानांनीं ठरविले तेव्हा मागणी करणाऱ्या मंडळीची एक बैठक बोलवा असें त्या स्थानिक सभेचे अध्यक्ष शहा रुखयार जग यानां मी सांगितले; त्यावेळेस पाने कापून न टाकतां खंडन प्रसिद्ध करावे ही गोष्ट अधिक श्रेयस्कर आहे असे मुसलमानांस पटविण्याचा माझा उद्देश होता. पण तो सिद्धीस गेला नाही: ती मंडळी पाने रद्द करवावीत असाच आग्रह धरून बसली. व त्यावरून त्या ११२ सहीवाल्यांच्या सभेत देखील माझे म्हणणे पटविणे सोपे होणार नाही असे मला कळून आले आणि त्यांची मागणी, खिलाफतवाल्यांची मागणी व मि. कादरभाई याची मागणी ही एकच स्वरूपाची असल्यामुळे ती मागणी मी मान्य केली असे मी जाहीर करणार आहे असे त्यास तेथेच सांगितले. त्यावेळेस पुणेकर मुसलमानांनी त्यास "त्यांच्याशी झालेला करार" असे स्वरूप देण्याचा प्रयत्न केला. तेव्हां मी त्यास सांगितले की, मी कोणाशीच करार किंवा तडजोड करीत नाहीं; कारण तुमच्याशी करार केला तर तुम्ही माझ्याशी करार करणारे कोण? असा तुमच्या-विरुद्ध इतरांस मत्सर उत्पन्न होऊन कांही मंडळी त्याच्या-विरुद्ध जातील व हा करार आम्हांस मान्य नाहीं म्हणून पुन्हां भांडण सुरू होईल; तुमच्या अगोदर मि. कादरभाई व मि. शौकतअल्ली यांनीं माझ्याकडे पत्रव्यवहार केला आहे व मि. कादरभाई यांनीं यासाठीं जास्त मेहनत घेतली आहे. जर कोणापाशीं करार करावयाचा असला तर खिलाफत कमेटी किंवा सरकारकडे अर्ज करणारे ११२ सहीवाले यांच्याशी करीन व हा तंटा मिटविण्याचे श्रेय त्यांना देईन, हे म्हणणें तेथें जमलेल्या वस्ताद गुलामदस्तगीरसारख्या कांहीं मंडळीस पसंत

पडलें; तेव्हां मि. रफिउद्दीन एम्. एल्.. सी. हे म्हणाले की, कोणाशीं करार करून तुम्हीं पाने कापण्याचे कबूल केलें असें ठरण्यापेक्षां तुम्ही ही गोष्ट आपखुशीनेंच पण सर्व मुसुलमानांचीं अंतःकरणे लक्षांत घेऊन केली असे होणे आम्हांस जास्त श्रेयस्कर आहे. त्याप्रमाणे मी तीं पानें कापण्याचा निश्चय केला. व तो निश्चय दुसऱ्या दिवशीं वर्तमानपत्रांतून जाहीर केला. सरकारने प्रकरण फेटळले असता मुसलमानांचे म्हणणे मान्य करण्याची संधि मला साधावयाची होती व ती या वेळेस साधली. येणेप्रमाणे हे प्रकरण मिटले.

हे प्रकरण चालू असतां हिंदु मंडळीची वृत्ति माझ्यासंबंधाने सहानुभूतीचीच होती. ज्ञानकोशासारख्या मोठया ग्रंथामध्ये मजकूर चांगल्या आधारावर दिला आहे तर मुसुलमान मंडळींनी संतापावयाच्या ऐवजीं तो खोडून टाकण्याचाच प्रयत्न करावा व खंडन प्रसिद्ध करण्यास ज्ञानकोशकारांनीं जी संधि दिली तिचा त्यांनी फायदा घ्यावा, असेंच त्यास वाटत होते; तथापि याबरोबर हेहि सांगितले पाहिजे की, ज्ञानकोशाची महंमद प्रकरणामुळे जाहिरात चांगली झाली म्हणून उपहास व मत्सर ज्यांत आहे अशी अभिनंदनाची पत्रे पाठविणाराहि थोडासा वर्ग होता. त्यांच्या मत्सराविषयीं थोडेसे लिहिले पाहिजे. त्यांस हे कळविले पाहिजे की, त्या जाहिरातीमुळे आमचा फायदा झाला नाहीं व त्यामुळे त्यांनी आमचा मत्सर करण्याचे कारण नाहीं. ही जाहिरात आम्हास हवी होती काय? व फायदेशीर झाली काय ह्याविषयीं सरळ सांगावयाचे म्हटल्यास ही जाहिरात आम्हास मुळीच फायदेशीर झाली नाहीं व त्यामुळे आमच्या पुस्तकांच्या खपास मदत झाली नाहीं. असेंच कबूल करावे लागेल. महंमदाची नालस्ती झाली आहे तर तो ग्रंथ आपणांस हवा असे म्हणून कोणी १५० रुपयांचे पुस्तक घेत नाहीं. एखाद्या वर्तमानपत्राचा किंवा मासिकाचा अंक असता तर तो या प्रकारच्या प्रसिद्धीनें खपून दहा वीस रुपये मिळाले असते पण ज्ञानकोशासारखा ग्रंथ घेतांनां तो एका बाजूचा आहे अशी त्याची प्रसिद्धि झाल्यानें त्याच्या खपास उलट व्यत्ययच येतो. जो ग्रंथ ज्ञानाचा ग्रंथ म्हणून कायम बाळगण्याजोगा आहे असा बाणा बाळगतो तो ग्रंथ मुसुलमानांविषयीं पूर्वग्रहाने दूषित झाला आहे अशी जर त्याविषयीं हिंदूंची समजूत झाली तर हिंदु मंडळी देखील तो ग्रंथ कमी योग्यतेचा व त्यामुळे विकत

घेण्यास कमी लायक आहे असेंच समजतील व मुसुलमानानें ज्ञानकोश तयार केला व तो जर हिंदूंविषयी खोटें लिहिणारा असला तर तो ग्रंथ मुसुलमान ग्राहक देखील त्याज्य ठरवितील ही माझी पक्की खात्री आहे. माहितीचा बिनचूकपणा हा ज्ञानकोशाचा मुख्य विक्रीचा गुण आहे, व निःपक्षपातीपणा हेंच आमचें मोठें भांडवल आहे व आम्ही देणग्या घेण्याचें नाकारलें व श्रीमंत संस्थानिकांच्या आश्रयाची पर्वा केली नाही या सर्व गोष्टी ज्या केल्या त्या एकाच खात्रीवर केल्या, आणि ती खात्री म्हटली म्हणजे ज्ञानकोश घेणारी जनता निःपक्षपाती प्रामाणिक लेखाची चहाती आहे याविषयींची होय. लोकास तात्कालिक म्हणून व एकपक्षीय म्हणून आवडेल पण चिरकाल वाङ्मय म्हणून मनुष्य संग्रह करूं इच्छितो तेव्हां त्यास निःपक्षपाती वाङ्मय पाहिजे, या लोकाच्या वृत्तीविषयीं आमची खात्री होती व ही आमची खात्री अधिक अनुभवानें अधिक बळकट होऊं लागली आहे.

---

## प्रकरण १५ वें.

## उपसंहार

आतांपर्यंत झालेल्या निवेदनांत ज्या गोष्टी सांगतां आल्या नाहींत त्या गोष्टी सांगण्याची संधि या प्रकरणांत घेतों.

एकदर या बारा वर्षांतील धंद्याचा विचार केला असतां मनांत अनेक विचार येतात. ज्ञानकोश हा कांहीं धंदा समजला गेला नाहीं आणि ज्ञानकोश चालू असतां बरींच वर्षे लोकांस अविश्वास असून कार्य तडीस गेलें व माझ्या मतें इतर किफायतीसाठीं काढलेल्या कंपन्यांपेक्षां देखील ही कंपनी किफायतशीर झाली. आमच्यापेक्षां अनेक पटीनीं "टाटा पब्लिसिटी कार्पोरेशन" हिचें भांडवल होतें ही गोष्ट लक्षांत घेतली व तिची कामगिरी लक्षांत घेतली असतां ज्ञानकोशानें तुटपुंज्या भांडवलावर मोठी कामगिरी केली याचें लोकांस आश्चर्य वाटेल. कंपनी स्थापन करण्यास मला ७॥ शें रुपयेच भांडवल लागलेंआणि इतक्या थोडक्या भांडवलावर ही कंपनी उभारली गेली व आपलें कार्य पुरें करती झाली. कंपनी मुद्रकांच्या वेडेपणामुळें व कंपनीच्या डायरेक्टरांचा आपण मुद्रणास लागूं नये या आग्रहामुळें कंपनी जरी ७९ हजार रुपयांस मुकली तरी

तिला त्यांतून वर डोकें काढतां आले आणि कार्य पुरें करतां आले व आणि टाटा पब्लिसिटी कार्पोरेशन बावीस लाखांची सहा लाखावर आली तर ज्ञानकोशाची कंपनी यशस्वी कां झाली याचा विचार करणे जरूर आहे.

आमच्या कंपनीच्या यशाचें एक पहिले कारण म्हटलें म्हणजे कंपनीचे भांडवल जमा होत जाणें आणि गिऱ्हाइकी जमा होत जाणे या दोन्ही क्रिया बरोबरच होत होत्या म्हणजे कंपनी जवळ जवळ प्रारंभापासूनच गिऱ्हाइकी मिळवीत होती हे या यशाचे पहिले कारण होय. ज्या कार्यास गिऱ्हाइकी मुबलक ते कार्य फसणार कसे आणि त्या कार्यास लोकांच्या दक्षणेची जरूर काय? कंपनीची गिऱ्हाइकी कशी वाढत होती याचे पहिल्या तीन वर्षांचे दरमहाचे व पुढील वर्षांचे दरसालचे कोष्टक येणेप्रमाणें:–

| १९१६–१७ | | १९१७–१८ | | १९१८–१९ | |
|---|---|---|---|---|---|
| महिना | संख्या | महिना | संख्या | महिना | संख्या |
| एप्रिल | ३५ | एप्रिल | ८ | एप्रिल | २७ |
| मे | २ | मे | १७ | मे | ४ |
| जून | ११ | जून | २९ | जून | २३ |
| जुलै | ४५ | जुलै | २० | जुलै | ७० |
| आगष्ट | ३० | आगष्ट | ३१ | आगष्ट | २१ |
| सप्टेंबर | ५१ | सप्टेंबर | २५ | सप्टेंबर | २८ |
| आक्टोबर, | २७ | आक्टोबर | १९ | आक्टोबर | ४२ |
| नोव्हेंबर | ७ | नोव्हेंबर | १ | नोव्हेंबर | ३० |
| डिसेंबर | ३२ | डिसेंबर | १० | डिसेंबर | ८८ |
| जानेवारी | १३ | जानेवारी | ९ | जानेवारी | ७० |
| फेब्रुवारी | ० | फेब्रुवारी | ३५ | फेब्रुवारी | ६९ |
| मार्च | ४ | मार्च | ६० | मार्च | ५९ |

| साल | संख्या | साल | संख्या |
|---|---|---|---|
| १९१९–२० | ४३० | १९२३–२४ | ३६३ |
| १९२०–२१ | २०६ | १९२४–२५ | १९९ |
| १९२१–२२ | २०९ | १९२५–२६ | १४९ |
| १९२२–२३ | ३७६ | १९२६–२७ | १२० |

ज्ञानकोशाची सांपत्तिक स्थिति पहिल्यापासून अनेक वर्षे जरी समाधानकारक होती तरी मंडळापाशी शिलक अशी फारच थोडी होती. छपाईखर्चासाठीं फंड म्हणून आम्ही आगाऊ शिल्लक टाकीत होतो पण तीहि ४ हजारावर झाली नाहीं व ती ज्ञानकोशाच्या चालू खर्चाच्या मानाने फारच थोडी होती. ज्ञानकोशाचा खर्च २००० रु. महिनापर्यंत नागपूर येथे ऑफिस असतांच गेला होता व जसजसा आम्ही खर्च वाढवीत होतो तसतसे उत्पन्न मिळविण्याची क्रियाहि करीत होतो. काम पुष्कळ करावयाचे आहे तर भराभर माणसे वाढविली पाहिजेत अशी माझी संपादकीय वृत्ति होती तर जसजसा खर्च वाढेल तसतसे पैसे मिळविले पाहिजेत अशी माझी व्यवस्थापकीय वृत्ति होती. ही माझी वृत्ति पूर्णपणे न समजल्यामुळे प्रथम भांडणे उत्पन्न झाली. दुसऱ्या डायरेक्टरास असे वाटते की, इकडे फारशी शिल्लक नाही आणि कोठे५०० रुपये शिल्लक जमते, तो हा एकदम ५० रुपयाची १० माणसे नेमून टाकतो, हा प्रकार काय आहे ? त्यांचे मत असे होतें की, १०।२० हजार रुपये मिळवून आम्ही ब्यॅकेत ठेवावेत आणि मग त्या पैशाची विल्हेवारी कशी काय लावावयाची ते ठरवावे पण १० हजार रु. शिल्लक कधीच झाली नाहीं. काम वेगाने आटपले पाहिजें इकडे माझे लक्ष होते आणि पैसे ताबडतोब खर्च करण्याची आवश्यकता मी दाखवीत होतों.

ज्ञानकोशाच्या सांपत्तिक स्थितीचा इतिहास द्यावयाचा म्हणजे जमाखर्चाचे कोष्टक मांडावयाचे एवढेच नव्हे तर सांपत्तिक स्थिति कशी कशी बदलत गेली यासंबंधाने कांही गोष्टी सांगावयाच्या; व त्या सांपत्तिक स्थितीचे ज्ञानकोशावर काय परिणाम झाले हे सांगावयाचे. ज्ञानकोशाच्या निरनिराळ्या काळीं झालेल्या सांपत्तिक स्थितीसंबंधानें स्थूल गोष्टी येणेंप्रमाणे सांगतां येतील:—ज्ञानकोशाचे काम ज्ञानकोश छापावयास जाईपर्यंत इतके सुरळीत चालले होते कीं पगाराची पहिली तारीख कधीच चुकत नसे. तथापि जेव्हा आमचे काम छापण्यास निर्णयसागरनें दिरंगाई केली तेव्हांपासून कांहीं महिन्यांनीं ज्ञानकोशमंडळांतील मंडळीचे पगार वेळेवर देणे बंद होऊं लागले. मुद्रणाच्या दिरंगाईमुळें जे आम्हांस कर्ज झालें आहे त्यांतील सुमारे निम्मा भाग लोकांच्या पगारांतील बाक्या एकत्र होऊन झालेले आहे. ज्ञानकोशाने जो पैसा मिळविला तो देणग्या घेण्यास आम्ही तयार असतो तरी

मिळाला नसता. त्यामुळे आम्हांस देणग्यांची आवश्यकताच नव्हती. ज्ञानकोशमडळास प्राप्ति कमी होती असे नाही ज्ञानकोशाची प्राप्ति कांही वर्षे दरमहा २५०० च्या वर होती व कांहीं महिने ११हजार रुपये पर्यंत देखील प्राप्ति झालेली आहे. असे झाले म्हणजे त्या महिन्यांत पूर्वीचे देणे दिलें जाई पण ते देखील पुरे दिले गेले नाही. लोकांना दरमहा पगार अजीबाद मिळत नव्हता असे नाही. कधीं पगाराचा पाऊण हिस्सा मिळे तर कधी निम्मा हिस्सा मिळे. महाराष्ट्र हे जर व्यापारी राष्ट्र असते, व आम्हांस गिऱ्हाईक मिळवे जर कामाला मुबलक असत तर आम्हाला पैशाची तूट कधीच पडली नसती.

ज्ञानकोशमंडळाचा मख्य खर्च म्हटला म्हणजे छपाई व लोकाचे पगार. कागदाचा खर्च सुमारे ४० हजार रुपये झाला आहे आणि घरभाड्याचा खर्च २० हजार रुपये झाला आहे आणि सामानाचा खर्च सुमारे २० हजार रुपये (लायब्ररी आणि छापखाना धरून) झाला. उरलेला खर्च माणसांच्या पगारातच झालेला आहे. म्हणजे या कामाचा मुख्य खर्च म्हटला म्हणजे माणसाचे पगारच होत. व भांडवलखर्च म्हणजे माणसांनां एकत्र काम करीत राहण्यासाठी लागणारा खर्च. तो खर्च म्हटला म्हणजे कायतो भाडे, लायब्ररी, छापखाना व पोष्टेज यांचा खर्च होय. म्हणजे अडीच–पावणेतीन लाख रुपये खर्च माणसाच्या पगाराकडे झाला आहे आणि त्यांपैकी कंपोझिंगचा खर्च सुमारे २२५०० रुपये झालेला आहे. व मुद्रणाचा खर्च म्हणजे प्रेसमनचा खर्च ५॥ हजार रुपये झाला आहे. हा खर्च खेरीजकरून इतर सर्व खर्च संपादनखाते, व्यवस्थाखाते यावर झालेला आहे. म्हणजे सामान्यत: या कामाला अनेक संपादक व कारकून यांनी एकत्र होऊन चालविलेल्या कामाचें स्वरूप आलेले आहे व भाडवलवाल्यांना कांहींच डिव्हिडेंड मिळाले नसल्यामुळें या कामास एकाद्या सोशलिस्ट कंपनीचें स्वरूप आलें असें म्हणण्यास हरकत नाहीं. म्हणजे ही कंपनी शेअरहोल्डरांची नसून केवळ काम करणाऱ्यांची होती असे सहजच सिद्ध झालें. व जोरानें पुस्तकें काढणे, जोरानें गिऱ्हाईक मिळविणे या क्रियांवरच आम्ही आपला कारभार यशस्वी केला असे वाटतें. ज्या कार्याची बऱ्याच लोकांनां जरूर आहे पण ती जरूर वाटणारा वर्ग थोडा आहे

अशा स्थितीत जरूर वाटणारा वर्ग वाढविणे हा धंद्यांतलाच भाग होय. आणि ते काम आपण केले तर उपयुक्त वाङ्मयकार्यास पैशाची तूट पडावयाची नाहीं अशी माझी समजूत आहे.

दर सालची कंपनीची प्राप्ति खालीलप्रमाणे आहे.

| साल | रक्कम |
|---|---|
| १९१७–१८ | १३५०४–११–४ |
| १९१८–१९ | २३२५१– २–३ |
| १९१९–२० | २७३८१–११–९ |
| १९२०–२१ | ३४६१०– २–९ |
| १९२१–२२ | १९०२५– ४–८ |
| १९२२–२३ | ३५५८४– ९–० |
| १९२३–२४ | ४२८७०– ६–३ |
| १९२४–२५ | ५१२०२–१२–६ |
| १९२५–२६ | ४७०९९– ०–३ |
| १९२६–२७ | २४०६३– १–९ |

हे एकदर उत्पन्न पाहतां व छापखान्याकडे लागलेले भांडवल केवळ १५००० रुपये आहे असे पहातां असे दिसून येते की धंदा म्हणजे मुख्यत: अनेक व्यक्तींनीं एकत्र काम करणे हेच आहे आणि त्याला लागणाऱ्या साधनसामुग्रीची किमत त्या मानाने फारच अल्प असते. व भांडवलाचा उपयोग केवळ प्रारंभीची सामुग्री जुळविण्यासाठी आणि माणसे केंद्रीभूत करण्यासाठीं लागणारा विश्वास उत्पन्न करण्यासाठींच असतो.

ज्ञानकोशाचे चिरस्थायित्व होण्यास जर कांही गोष्टी कारणीभूत झाल्या असतील तर त्यांपैकीं एक गोष्ट म्हटली म्हणजे आमच्यावर असलेलें कर्ज ही होय. हें कर्ज फेडण्यासाठीं नवीन खटपटी कराव्या लागणार व ज्ञानकोश अनेक भाषांत करण्याची योजना करावी लागणार. त्यामुळे भवितव्य काय होईल याची आज कल्पना करतां येत नाहीं. ज्ञानकोश अनेक भाषांत करण्याचा प्रयत्न केला तर त्याचे अनेक परिणाम

होतील. हिंदुस्थानांतील प्रत्येक व्यक्तीस स्वभाषेतून सर्व ज्ञान प्राप्त करून घेण्याची सोय तर होईलच पण देशाच्या प्रत्येक भागांत स्वभाषा-सेवक वर्ग निर्माण होऊन तो वर्ग एकमेकांशी संबद्ध राहील. व त्याचे भावी काळांत बरेच मोठे परिणाम होतील अशी माझी अटकळ आहे.



# ज्ञानकोश इतिहास—परिशिष्टें.

## ( परिशिष्ट नं. १ योजना. )

## महाराष्ट्रीय ज्ञानकोशाच्या घटनेची योजना.

( ता. ३१ मार्च १९२७ तारखेस चालकांपुढें प्रस्तुत योजना ठेविली ती त्यांच्या हुकुमानें विद्वान मंडळींच्या परीक्षणार्थ प्रसिद्ध करीत आहों—

श्रीधर व्यंकटेश केतकर )

( १ ) ज्ञानकोश हा कसा करावयाचा या संबंधानें संपादकीय योजना चालक मंडळींपुढें आज ठेवण्यांत येत आहे. आपणांपैकीं ज्या कांहीं मंडळींनीं अनेक सूचना केल्या त्यांपैकीं प्रत्येकीचा योग्य विचार करून प्रस्तुत योजना बनविली आहे.

( २ ) मागें २५ मे १९१६ रोजीं जो " प्रास्पेक्टस " काढिला होता त्यांत ज्ञानकोशाच्या घटनेची योजना अंशतः प्रसिद्ध केली होती त्यापेक्षा ही योजना अधिक सविस्तर लिहिण्यांत येत आहे. अनुभवानें कांहीं गोष्टी अधिक समजल्यामुळें पूर्वींच्या कल्पनेत कांहीं ठिकाणीं बदल करण्यांत येत आहे. त्या प्रसिद्धिपत्रकांत सांगितलें होतें कीं, ज्ञानकोश महाराष्ट्रीय दृष्टीनें बनवावयाचा आहे; ती मूळ कल्पना जशीच्या तशीच ठेवली आहे, आणि जो फेरबदल झाला आहे तो, तें काम कोणाकडून कसें करून घ्यावयाचें या संबंधींच्या योजनेंत झाला आहे.

( ३ ) ज्ञानकोशाचें काम नवीन संशोधन करण्याचें नाहीं. आज जें लोकांत ज्ञान उपलब्ध असेल तें संकलित करावयाचें आहे. आपल्या इतिहासासंबंधानें, प्राचीन भूगोलज्ञानासंबंधानें, जे कांहीं पाश्चात्यांनीं, अगर अर्वाचीन पद्धतीच्या एतद्देशीय संशोधकांनीं शोध लावले आहेत ते सर्व तपासून पहावयाचे आहेत, आणि त्यांतील ग्राह्य भाग शोधून घ्यावयाचा आहे. हे काम सोपेंहि नाहीं व अत्यंत बिकटहि नाहीं. पाश्चात्यांचे टीकात्मक लेख ज्यांत आले आहेत असे ग्रंथ सुमारें मुख्यतः ५०० आहेत. एक सुशिक्षित पदवीधर त्यांतील ग्राह्य भागाचा मराठींत गोषवारा काढावयास लागला तर सुमारें दर आठवड्यास एक ग्रंथ पडतो. हें इंडियन ॲंटिक्करीच्या चार वर्षग्रंथांचे पृथक्करण मुंबई युनिव्हर्सिटीच्या एका तरुण पदवीधराकडून करवून अनुभवानें ठरविलं आहे.

( ४ ) कांहीं मंडळींनीं आम्हांस अशी सूचना केली कीं, सर्व ग्रंथ चार वर्षे तयार करून पांचव्या वर्षीं छापून एकदम वीस भाग लोकांच्या हातीं द्यावयाचे हा जो आमचा विचार आहे तो आम्हीं बदलावा, आणि आतांपासूनच एक

एक ग्रंथ तयार करून तो छापून लोकांच्या हातीं द्यावा कां कीं पांच वर्षें, लोकांकडून पैसे घ्यावयाचे आणि त्यांच्या हातांत पांच वर्षें काहींएक द्यावयाचें नाहीं हा हो पद्धति व्यवहार्य नाहीं. सकृद्दर्शनी ही कल्पना चांगली वाटते; कां कीं, सर्व पैसे देण्यापूर्वी वाचकांना काहींतरी मोबदला मिळतो. शिवाय " आंध्रविज्ञानसर्वस्वमु " ( तेलगू सायक्लोपीडिया ) ने हीच पद्धति अमलांत आणिली आहे प्रत्येक अंकांत कशावर आर्टिकल आणावयाचीं हें अगोदरच योजून मग प्रत्येक अंक पूर्वी ठरविलेल्या अनुक्रमानें प्रकाशक प्रसिद्ध करितात या पद्धतीनें त्यांनीं दोन हजार पानें प्रसिद्धहि केलीं आहेत ' हिंदी विश्वकोश ' ' नें जवळ जवळ तोच प्रकार केला आहे. सहा आण्यास ३२ पृष्ठें याप्रमाणें "विश्वकोश " कार वाचकांच्या हातीं देत आहेत ही पद्धत व्यवहार्य नाहीं असें आम्हीं ठरविलें याचीं कारण येणें प्रमाणेः—

ज्ञानकोश करण्याचें मुख्य कारण जें अस्तित्वांत असलेल्या ज्ञानाची तपासणी करावयाचें आणि तें जमा करून पद्धतशीर रीतीनें वाचकांपुढें मांडावयाचें तें या पद्धतीनें साध्य होत नाहीं. उदाहरणार्थ, वेदामध्यें एकंदर किती महत्त्वाचे विषय आहेत याची तरी आम्हांस आज पूर्ण माहिती कोठें आहे? आज वेदांतून, महाभारतांतून, व बृहत्संहितेसारख्या ग्रंथांतून किती महत्त्वाचे विषय आहेत हें सामान्य अंदाजानें अगोदर काढणें निराळें आणि त्यांचें शांतपणें पृथक्करण करून त्यांतील माहिती विषयवार मांडणें निराळें. चोख काम करण्याचा प्रकार म्हटला म्हणजे अनेक ग्रंथांचें पृथक्करण करून व अनेक प्रकारची माहिती मिळवून जसे विषय पडतील तसे प्रथम पडूं देणें आणि मागाहून ग्रंथ प्रसिद्ध करणें. असें करीत असतां ग्रंथाचा पहिला भाग व शेवटचा भाग एकदमच तयार होईल " कर्ण " याची माहिती दुसऱ्या, तिसऱ्या भागांत येईल व " ययाति " वरील माहिती सतराव्या अठराव्या भागांत येईल. अरबस्तानावरील माहिती पहिल्या दुसऱ्या भागांत येईल व सर्विहयांवरील माहिती शेवटच्या कोणत्या तरी भागांत येईल " तेलगू सायक्लोपीडिया " ने ग्रंथाचे भाग एकामागून एक काढावयाचें ठरविलें आहे तथापि त्या ग्रंथाच्या संपादकांशीं संभाषण करतां असें कळलें कीं त्यांनीं हा ग्रंथ प्रारंभींचा म्हणून आरंभिला आहे आणि त्याच्या पद्धतीनें जे दोष ग्रंथांत राहतील त्यांना इलाज नाहीं म्हणून राहूं द्यावेत असें ठरविलें आहे. बाबू नरेंद्रनाथ बसु यांनीं जो हिंदी विश्वकोश हातीं घतला आहे त्याला प्रारंभींची मदत म्हणजे त्यांनींच बनविलेला व पूर्णपणें प्रसिद्ध केलेला बंगाली विश्वकोश आहे आणि त्याचेंच हिंदी विश्वकोश हें ' सुधारून वाढविलेलें ' रूपांतर आहे. इतकें असूनहि आम्ही एवढें सांगतों कीं, त्यांचा प्रयत्न विशेष नांवाजण्यासारखा नाहीं. आम्हीं बंगाली " विश्वकोश " वाचून पाहिला नाहीं तथापि

सुधारून वाढविलेल्या हिंदी आवृत्तीचे भाग वाचून पाहिले आहेत. व त्याविषयीं आम्ही एवढेंच सांगतों कीं तो ग्रंथ सुशिक्षित महाराष्ट्रीय जनतेमध्यें आदर उत्पन्न करण्यासारखा नाहीं त्या ग्रथाची जी स्तुति थोडीबहुत ऐकूं येते ती अभिप्राय देणाऱ्यांच्या मार्मिकतेची द्योतक नसून सौजन्याची द्योतक आहे.

( ५ ) ज्ञानकोश १० हजार पृष्ठांचा बनवावयाचा आहे हें मागेंच सांगितलें आहे दर पृष्ठांत सरासरी १२२५ शब्द येतील माहिती अकारविल्ह्यानें येईल. दहा हजार पृष्ठांचा विनियोग कसा करावयाचा याचें सामान्य कोष्टक येणेंप्रमाणेः—

दहा हजार सुपररायल अष्टपत्री पृष्ठांपैकीं ५००० पृष्ठें शास्त्रीय विषयासाठीं व व्यापार, कला इत्यादिकांसाठीं ठेवावयाचीं, ३५०० पृष्ठें आर्यसंस्कृतीच्या निदर्शनासाठीं ठेवून १५०० पृष्ठें बाह्यसंस्कृतीच्या स्पष्टीकरणार्थ द्यावयाचीं आहेत

१५०० पृष्ठें बाह्यसंस्कृतीच्या स्पष्टीकरणार्थ आहेत म्हणजे भारतीयेतर राष्ट्रांचे इतिहास, कायदा, समाजस्थिति, शासनसंस्था, कलाकौशल्य, वाङ्मय, खिस्ती–महंमदीयादि संप्रदाय व त्यांचे पारमार्थिक ज्ञान इत्यादि विषयासाठीं आहेत व त्यांत शास्त्रीय ज्ञान खेरीजकरून इतर माहितीसाठीं हीं पृष्ठें लाविलीं जातील.

५००० पृष्ठें शास्त्रीय ज्ञानासाठीं योजिलीं आहेत. तीं अनेक भौतिक शास्त्रें व त्यांचा व्यावहारिक उपयोग याजकडे दिलीं जातील.

( ६ ) शास्त्रीय भागाकडे ५००० पानें दिलीं आहेत, त्यांत वैद्यक, शेतकी, व यांत्रिककला व अनेक उद्योगधंदे यांच्या दृष्टीनें उपयोगी जो शास्त्राचा भाग आहे त्याकडे अधिक लक्ष देण्याचें योजिलें आहे. उदाहरणार्थ हजारों कृमींसंबंधानें ज्ञान द्या. मनुष्याच्या सुखदुःखास कारणीभूत होणाऱ्या कृमींसंबंधानें ( Insects of Economic importance ) अधिक माहिती द्यावी असा शास्त्रीय लेखकमंडळानें ( प्रो० गोडबोले M.Sc; रा. रानडे M.Sc; प्रो. देवधर M. A. M. Sc रा. रा. त्र्यं. देशमुख B. Ag यांनीं ) ठरविलें आहे. शास्त्रीय लेखकमंडळानें आणखी ठरविलेल्या गोष्टी येणेंप्रमाणें आहेत.

(अ)प्राणी, वनस्पती अगर खनिज पदार्थ यांचीं प्रचारांतील नांवें घेऊन त्याखालीं माहिती द्यावयाची शास्त्रीय नावाखालीं माहिती द्यावयाची नाहीं. [ व्यवहाराशीं ज्या उद्भिज, अगर खनिज वस्तूंचा संबंध आला आहे असे पदार्थ निवडून त्यांची यादी शास्त्रीयमंडळानें केली आहे ती छापून इतर शास्त्रज्ञांकडे अभिप्रायार्थ पाठविण्याचें योजिलें आहे ]

( ७ ) आपल्या मंडळास साहाय्य दुसऱ्या एका दिशेन मिळालें आहे. रा. चांदोरकर यांनीं धुळें येथें एक मंडळ स्थापन केलें आहे ( त्यांत दहा बारा मंडळी आहे ), त्यांनीं रा. राजवाडे यांच्या वीस खंडांची सूची केली आहे. त्याच मंडळाकडे आम्हीं शिलालेख, ताम्रपट इ० जीं लिखाणें प्रसिद्ध झालीं आहेत, त्यांचें पृथक्करण करून प्राह्यांश काढण्याचें काम दिलें आहे. रा. चांदोरकर यांनीं कामास आरंभहि केला आहे.

( ८ ) आर्यसंस्कृत्यात्मक जो भाग तयार करावयाचा तो बनविण्याच्या पायऱ्या येणेंप्रमाणें आहेत.—

पहिली पायरी म्हटली म्हणजे संशोधकांच्या लेखांचें पृथक्करण करणें व गोषवारा काढणें होय.

दुसरी पायरी म्हटली म्हणजे त्याच्या लेखांत संशोधकांनीं संस्कृत ग्रंथांचें व शिलालेखांत आलेल्या ज्या नांवांचीं अगर तारखांचीं अवतरणें केलीं असतील तीं अवतरणें व उल्लेख तपासून पहाणें हें होय.

तिसरी पायरी म्हटली म्हणजे कांहीं संस्कृत ग्रंथांचें आणि ग्रीक व अरब भूगोलवेत्त्यांच्या प्राचीन ग्रंथांच्या भाषांतरांचें स्वतः पृथक्करण करणें होय. त्या ग्रंथांचें स्वतः पृथक्करण करण्याचें काम शेवटीं ठेवलें आहे याचें मुख्य कारण हें कीं, पाश्चात्त्य संशोधकांचे काम वाचून तें तपासतां तपासतां अर्वाचीन तऱ्हेची दृष्टि उत्पन्न होऊन मग संस्कृत ग्रंथांचें पृथक्करण करतांना त्यांतून काय घ्यावयाचें हें समजेल.

कांहीं जर्मन ग्रंथांचें शब्दशः इंग्रजींत भाषांतर करवून मग त्याच्या टीपा काढावयाच्या आहेत. त्यास खर्च काय लागतो हे पाहण्यासाठीं एक ग्रंथ ( विंटरनिझ्झचा भारतीय वाङ्मयाच्या इतिहासाचा पहिला भाग ) पण-पणें भाषांतर करण्यासाठीं एका जर्मनांग्ल सुशिक्षितेस [ Miss E. V. Kohn LL. A. of the Universities of St. Andrews and Jena] भाषांतर करण्यास दिला आहे.

( ९ ) भारतीय इतिहास व संस्कृति यासंबंधाची सामान्य योजना येणेंप्रमाणें आहेः—

### भारतीय इतिहास आणि संस्कृति ( पृ. ३५०० )

हिंदुस्थानचा प्राचीन इतिहास पृ. ६००, हिंदुस्थानांतील प्राचीन आणि अर्वाचीन ललितकला पृ. १५०, संस्कृत गीर्वाणाचा इतिहास ५० मराठी गीर्वाण ( भाषा-व्याकरण यांसहित ) पृ. ३००, महाराष्ट्रेयेतर हिंदु-स्थानांतील गीर्वाण पृ ३००, महाराष्ट्रेतिहास पृ. ६२५, हिंदुस्थानांतील मुसल मानांचा इतिहास पृ. २५०, युरोपियांचा हिंदुस्थानांतील इतिहास पृ. २२५, हिंदुस्थानचा इतर इतिहास पृ. ४००, इतर ३००.

## हिंदुस्थानचा प्राचीन इतिहास ( पृ. ६०० )

### वेदकाल. पृ. २००.

( अ ) आर्य हिंदुस्थानांत येण्यापूर्वीची हिंदुस्थानची सामाजिक आणि सांस्कृतिक स्थिति. प्रास्तरसंस्कृति ( Paleolithic and Neolithic ) चीं अवशेषें आणि हिंदुस्थानांतील आधुनिक मानवजातींच्या स्थितिज्ञानाच्या साहाय्यानें पृ १०,(आ)आर्य लोकांची पूर्वपीठिका-जेव्हां भारतीय आर्यांचे पूर्वज आणि इराणी लोकांचे पूर्वज एकत्र होते, आणि जेव्हां यूरोपीय आर्य लोकहि आपल्या पूर्वजांपासून वेगळे झाले नव्हते त्या काळासंबंधाच्या संशोधनाचा गोषवारा पृ. ३०, ( इ ) वेदकालीन वृत्तपरंपरांचा गोषवारा, वेदकालीन राजकीय घडामोडी, वेदविहित राष्ट्रें,वेदकालीन राजांसंबंधानें पौराणिक उल्लेख, वेदोक्त वृत्तांचें सार, वेदकालीन शासनसंस्था पृ. ६०, ( ई ) वेदकालीन सामाजिक आणि आर्थिक स्थिति पृ ४०, ( उ ) विविध पृ ६०.

### वेदकालापासून मुसुलमानी स्वारीपर्यंत ( पृ. ४०० ).

( अ )इतिहासपुराणोक्त वृत्ताचा कालनिर्णय पुराणांतील इतिहाससाहित्य पृ. २४, ( आ ) ऐतिहासिक, पौराणिक व बौद्ध पुरुषांचीं चारित्रें पृ. २००, ( इ ) बौद्ध संप्रदायाचा इतिहास. पृ. १६, (ई) ग्रीकांच्या स्वारीची ऐतिहासिक माहिती पृ. ८, ( उ ) चंद्रगुप्तवंश पृ. ८, ( ऊ ) शक, यवन, पल्हव आणि हूण यांचा हिंदुस्थानांतील इतिहास पृ. ८, ( ऋ ) जुन्या तामिळ ग्रंथांतील माहितीवरून निघणारा दक्षिण देशाचा इतिहास ( सांस्कृतिक) पृ. ८, ( ऌ ) चाणक्याची शासननीति पृ. ८, ( ए ) बुद्धापासून मुसुलमानी स्वारीपर्यंत सर्व - सामान्य पर्यालोचन पृ. २४, ( ऐ ) दक्षिणेंतील इतिहासाचें सामान्य पर्यालोचन पृ. १२, ( ओ ) निरनिराळीं मतें आणि संप्रदाय, जैनमत, चार्वाकमत इत्यादि. पृ. १०, ( औ ) प्राचीन आर्थिक इतिहास, पृ. २०, ( क ) धर्मशास्त्राव्यतिरिक्त आढळून येणारा शासनसमुच्चय पृ. १०, (ख) आर्यसंस्कृतिवर्धनाचा इतिहास पृ १०, ( ग ) विविध पृ. ३४.

### प्राचीन हिंदुस्थानीय वैदिक, पारमार्थिक आणि कलाविषयक स्थिति आणि त्यांचें अर्वाचीन स्वरूप. (पृ. १५०.)

( क ) पारमार्थिक ज्ञान आणि परमार्थसाधनें यांचा सामान्य इतिहास पृ. १५, ( ख ) संगीत आणि वाद्य (प्राचीन आणि अर्वाचीन) पृ. १५, ( ग ) नृत्य ( प्राचीन ग्रंथ, विविध जातींचीं नृत्यें, महाराष्ट्रीय नृत्य ) पृ. ९, ( घ ) स्त्रीपुरुषविभूषण [ प्राचीन व अर्वाचीन ] पृ. ६, ( च ) चित्रकला प्राचीन व अर्वाचीन प. १०, ( छ ) नाट्य, प्राचीन नाट्यशास्त्र व अर्वाचीन नाट्यशास्त्र पृ. १५, ( ज ) मूर्तिकर्म, पृ. १०, ( झ ) गृहशिल्प, देवालयशिल्प इत्यादि पृ. १५, (ट) पारमार्थिक आणि गृह्यवस्तूंचें शिल्प. प. ५, (ठ) विविध प. ५०.

## संस्कृत गीर्वाण [ वैदिक आणि पाणिनीय आणि प्राकृत भाषा व गीर्वाण ]. (पृ. ३५०.)

( क ) वेदग्रंथवर्णन पृ. १२, ( ख ) रामायण आणि महाभारत ( यांच्या घटनेचा इतिहास व कथाभाग ) पृ २०, ( ग ) इतिहासपुराणें, कथासारत्सागर यांचा उत्तरकालीन संस्कृत गीर्वाणाशीं संबंध पृ १३, ( घ ) कालिदास, भवभूति, सुबंधु, बाण, भास, दंडी, मयूर, अश्वघोष, भट्टी, भारवि' माघ, नैषधीय इत्यादिकांवर निबंध पृ ४०, ( च ) प्राकृत गीर्वाण पृ. ७०, ( ज ) पाली ग्रंथ. पृ. ११, ( झ ) षड्दर्शनें, पृ ६०, ( ट ) शास्त्रीय संस्कृत गीर्वाणाचें समालोचन यांत भौतिक शास्त्रखेरीज इतर शास्त्रासाठीं म्हणजे विशेषकरून शिक्षा, व्याकरण, निरुक्त, छंदस, साहित्य, इत्यादिकासाठीं राखून ठेवलेल्या जागेचा समावेश होतो। पृ. १००, ( ठ ) शास्त्रेतर संस्कृत वाङ्मयाचें समालोचन पृ. ३०, ( ड ) विविध पृ. ४०.

## मराठी भाषा, व्याकरण आणि गीर्वाण ( पृ ३०० )

( क ) मराठी गीर्वाणाचा संस्कृत व इतर गीर्वाणाशीं संबंध, पृ. ५, (ख) मराठी शब्दशास्त्र ( व्युत्पत्ति आणि नियम) पृ. ६, (ग ) मराठी व्याकरण ( ऐतिहासिक दृष्टीनें ) पृ. ८, ( घ ) मराठी व्याकरण ( निरपेक्ष दृष्टीनें ) पृ. ९. ( च ) ज्ञानेश्वरीपूर्वीचें मराठी वाङ्मय पृ ४, ( ज ) ज्ञानेश्वरकालीन पृ. ६, ( झ ) ज्ञानेश्वरापासून रामदासापर्यंत. पृ. १०, ( ट ) रामदासाचें व त्याच्या संप्रदायाचें गीर्वाण पृ. ८, ( ठ ) इतर संप्रदायांचें गीर्वाण--शके १७४० पूर्वीचें. पृ. १० ( ड ) इतर संप्रदायांचें गीर्वाण-शके १७४० नंतरचें पृ. १०. ( ढ ) मोरोपंतीय ग्रंथ पृ. १०, ( त ) मराठी ललित गीर्वाण पृ, ४ ( थ ) शके १७४० पर्यंतच्या गीर्वाणाचें पर्यालोचन पृ. १५, ( द ) वैदर्भीय कवि पृ ३, ( ध ) शके १७४० नंतरच्या नाटकें, काव्यें, कादंबऱ्या, व इतर शास्त्रीय ग्रंथाव्यतिरिक्त इतर गीर्वाणाचें पर्यालोचन आणि अर्वाचीन ऐहिक संप्रदायांचें पर्यालोचन आणि त्यांचा महाराष्ट्रीयेतर वाङ्मयाशीं आणि चळवळींशीं संबंध पृ. ३०, ( न ) मराठीच्या उपभाषा पृ १०, ( प ) वृत्तपत्रांचा इतिहास पृ. ५, ( फ ) प्रसिद्ध लेखकांचीं आणि कर्त्यांचीं चरित्रें. पृ. ७५, ( ब ) विविध. पृ. ७५.

## महाराष्ट्रीयेतर हिंदुस्थानीय गीर्वाण ( पृ ३०० )

[येथे गीर्वाण या शब्दाचा अर्थ केवळ ललितगीर्वाण असा न धरितां राष्ट्राच्या सर्व खटाटोपींचीं व आयुष्याशीं निदर्शक वाक्यें,म्हणी दंतकथा,मंत्र,तंत्र,खुळया कल्पना इत्यादिकांचा समावेश होतो. मात्र त्याविषयीं त्यांच्यामधीं लेख असले पाहिजेत]. ( अ ) हिंदी पृ २५. (आ ) तामिळ पृ. २५, (इ) तेलगू पृ. १५. ( ई ) मलयाळी पृ. १०, ( उ ) कानडी पृ. १०, ( ऊ ) गुजराथी पृ. १५'

( ऋ ) उर्दू पृ. १५, ( ॠ ) भाटांचें गीर्वाण पृ ५, ( ऌ ) बंगाली पृ. २०, ( ए ) उडिया पृ. १०, ( ऐ ) ब्रह्मी पृ १०, ( ओ ) नेपाळी पृ. ७, ( औ ) सिंधी पृ ३, ( क ) आसामी पृ. ३, ( ख ) पुश्तु पृ. २, ( ग ) चरित्रें पृ. ७५, ( घ ) हिंदुस्थानीय प्राकृत गीर्वाणाचें सामान्य स्वरूप, आणि आधुनिक वाङ्मयविषयक प्रवृत्ति पृ १०, ( च ) बंगाली, गुजराथी, उर्दू, तामिळ, तेलगू नाटकें पृ १०, (ज) मराठी भाषेचा व गीर्वाणाचा इतर भाषांशीं व गीर्वाणाशीं संबंध पृ. १० ( झ ) हिंदीच्या उपभाषा आणि त्याचें व्याकरण पृ. १०, ( ट ) विविध पृ. १०

## महाराष्ट्रीय इतिहास (पृ ६२५ )

( १ ) महाराष्ट्रीयांच्या इतिहासाचें हिंदुस्थानीय आणि जागतिक इतिहासांत स्थान पृ. ५, ( २ ) महाराष्ट्राचा हिंदुस्थानांतील इतर भागाशीं सांस्कृतिक संबंध पृ ५, ( ३ ) देवगिरीच्या यादवांच्या नाशापर्यंतचा महाराष्ट्राचा प्राचीन इतिहास पृ. १५, ( ४ ) दिल्लीच्या मुसुलमानांची सत्ता आणि स्थानिक मुसुलमानी राज्यें पृ. ५, ( ५ ) शिवकाल पृ. २५, ( ६ ) शिवाजीच्या मृत्यूपासून बाळाजी विश्वनाथ पर्यंत. पृ ५, ( ७ ) निजाम पृ ५, ( ८ ) महाराष्ट्रवर्धन ( १७६० इ. पर्यंत ) पृ. १५, ( ९ ) पाणिपतची लढाई पृ. ५, ( १० ) पेशव्यांचें राज्य–१८१८ इसवी पर्यंत पृ ३०, ( ११ ) त्यानंतरचें शतक पृ ५, ( १२ ) आर्थिक इतिहास पृ. १०, ( १३ ) महाराष्ट्रांतील जाति आणि तत्संबंधीय मानवशास्त्र पृ. १०, ( १४ ) महाराष्ट्रांतील कायदा पृ. १०, ( १५ ) महाराष्ट्रांतील आणि विशेषेंकरून पुण्यांतील समाजचरित आणि सामाजिक घटना पृ १०, ( १६ ) महाराष्ट्रांतील किल्ले आणि महाराष्ट्राचें लढाऊ दृष्टीनें भूगोलवर्णन पृ १०, ( १७ ) भारी निवडक लढायांचीं आणि मोहिमांचीं वर्णनें पृ १० ( १८ ) चरित्रें पृ. ३००, ( १९ ) महाराष्ट्राबाहेरील मराठी राज्यें पृ. २०, ( २० ) नागपुरकर भोंसल्यांचा इतिहास पृ ४५, ( २१ ) महाराष्ट्रांतील ऐतिहासिक गीर्वाण पृ. ५, ( २२ ) शिक्षण [ १ वाङ्मयविषयक आणि शास्त्रीय, २ राजकीय ( शासनात्मक ), ३ स्त्रीशिक्षण, ४ लष्करी, ५ व्यावहारिक]. पृ १५, ( २३ ) विविधविषय, नगरशासन, पंचायती, शिष्टसंप्रदाय, दरबारी रीती, राजांचीं आणि पेशव्यांचीं लग्नें, देवळांस देणग्या, राजाश्रय पृ. २५, ( २४ ) ब्राह्मणांच्या धर्मशास्त्रीय आणि शासनविषयक चळवळी पृ १०, ( २५ ) ऐतिहासिक अवशेष पृ ५ ( २६ ) अनिर्दिष्ट विविध पृ २०.

## मुसुलमानांचा हिंदुस्थानीय इतिहास ( पृ. २५० )

( १ ) मुसुलमानांच्या जातींचें आणि मध्यआशियांतील जातींचें मानवशास्त्र पृ. ८, ( २ ) मुसुलमानी संप्रदायाचा राजकीय संबंध ( महंमदपासून

पॅन इस्लामिझम पर्यंत ) पृ. १७, ( ३ ) गुलाम घराण्यापूर्वीच्या मुसुलमानी स्वाऱ्या पृ. ४, ( ४ ) गुलाम घराण्यापासून मोगलांपर्यंत पृ. ३५, ( ५ ) मोंगल घराण्याचा इतिहास ( उदय, भरभराट आणि पाडाव ) पृ. ३५, (६) चरित्रें.–१गिझनीचा महमूद,२ तैमुरलंग, ३ चेंगीझखान, ४ हिमू,५ शेरशहा, ६ अकबर, ७ औरंगझेब, ८ नादीरशहा, ९ सय्यदबंधू, १० बहादुरशहा, ११ सुलताना रेझिया, १२ नूरजहान इ. पृ. २५, ( ७ ) मुसुलमानी कारकीर्दीतील कायदा पृ १७, ( ८ ) सामाजिक स्थिति ( गीर्वाण आणि कलाकौशल्याखेरीज) पृ. १०, ( ९ ) मुसलमानाची युद्धकला पृ. ९, (१०) विविध पृ. ९०.

## यूरोपीयांचा हिंदुस्थानांतील इतिहास. (पृ. २२५ )

( १ ) पोर्तुगीज, फ्रेंच, डच वगैरेचा इतिहास पृ. १०, ( २ ) आधुनिक यूरोपीय राजकारणें ( हिंदुस्थानसंबंधाचीं ) पृ. १०, ( ३ ) ईस्ट इंडिया कंपनी पृ. २, ( ४ ) इंग्रजी सत्तेचा इतिहास पृ. २५, ( ५ ) हिंदुस्थानचे निरनिराळे भाग जिंकल्यानंतरचा मुलकी इतिहास. ( अ ) राज्यव्यवस्थेचा, ( आ ) व्यापारधंद्यासंबंधाचा, (इ) आगगाड्यांचा (ई) कायद्याचा पृ. १२५, ( ६ )चरित्रें पृ. १०, (७) हिंदुस्थानांतील यूरोपीयांच्या आधुनिक राजकीय सामाजिक, आणि पारमार्थिक चळवळी पृ. ५, ( ८ ) १८५७ साल पृ. ५, (९) सत्तावन सालानंतरच्या एतद्देशीय संस्थानिकांचा ब्रिटिश रिसायतीशीं संबंध पृ. १०, (१०) किरकोळ ( आधुनिक स्थितीचें निदर्शन करण्यासाठीं योजिलेला कांहीं भाग निरनिराळ्या शाखाखालीं वर्णिला आहे. उदाहरणार्थ शेतकी, जंगल, भूशास्त्र, शासनशास्त्र, कायदा, वगैरे) पृ. २३.

## हिंदुस्थानच्या इतिहासाचा उरलेला भाग ( पृ. ४०० )

(१) रजपूत पृ. ४५, (२) शीख व पंजाब, ( पंजाबी वाङ्मयासह ) पृ २२, (३) नेपाळ पृ. १०,(४) भूतान पृ. ५, (५) ब्रह्मदेश पृ. ५, (६) सिलोन पृ. ५, (७) विजयानगर पृ. १०. (८) त्रावणकोर व मलबार पृ. ५,(९) जर्मनद्याऱ्या व तत्संबंधींचें राजकारण पृ. ५, (१०) जंजिरा पृ. ७, (११) गोंड राज्यें पृ. २, (१२) ओरिसांतील राज्यें पृ. २, (१३) जव्हार पृ. ८, (१४) इंग्रजांचीं महाराष्ट्रीय दोस्तसरकारें व त्यांची आजची स्थिति पृ. १५, (१५) प्राचीन हिंदुस्थानांत तयार झालेला राजधर्म व राजव्यवहार पृ. २०, (१६) चरित्रें पृ. २५ ,(१७) विविध पृ. ९.

(१०) ज्ञानकोशार्थ देश्य व बाह्य संस्कृतींची माहिती देण्यासाठीं जी जागा राखून ठेवली आहे, तींतच भूपृष्ठवर्णनाचा अंतर्भाव होतो, त्यामुळें भूगोलासाठीं स्वतंत्र पृष्ठें राखून ठेवली नाहींत.

भूपृष्ठवर्णन—हिंदुस्थानच्या निरनिराळया भागाचें व महाराष्ट्रांतील प्रसिद्ध ग्रामांचें वर्णन व निरनिराळया देशांचीं वर्णनें, हें द्यावयास मुबलक साहित्य उपलब्ध आहे. सरकारी ग्याझेटीअर्स, निरनिराळ्या इंग्रजी, मराठी व हिंदी मासिकांतून व वृत्तपत्रांतून आलेले वर्णनपर लेख, तसेंच धार्मिकदृष्टया भूपृष्ठवर्णन म्हणजे तीर्थादिकांची माहिती लिहिण्यासाठीं अनेक माहात्म्यग्रंथ हीं सर्व उपयोगितां येतील. आणि हें काम सामान्य पदवीधर सुशिक्षितांकडून होईल. निरनिराळया देशांचीं वर्णनें इंग्रजींत व फ्रेंचमध्यें पण मुख्यत्वेंकरून इंग्रजीमध्येंच जे अनेक ग्रंथ आहेत त्यांवरून तयार करवितां येतील. हिंदुस्थानांतील व हिंदुस्थानाजवळील देशांचीं जीं जुनीं नांवं आहेत त्या सर्वांचा प्रस्तुत समावेश करितां येईल. जुनीं नांवें पुष्कळदा लोकांस परिचित नसतात. उदाहरणार्थ, सयाम देश घ्या. याचा ब्रह्मी ग्रंथांतून उल्लेख द्वारावती या नांवानें केला आहे. तार्तरीस खरोष्ट्र देश हें नांव होतें. तर अशा प्रसंगीं जुन्या हिंदु नांवाची ओळख करून दिली पाहिजे.

(१२) बाह्यसंस्कृतीवरील लेखांसाठीं जी जागा राखून ठेविली आहे तिचा वटवडा येणें प्रमाणें —

(१३) बाह्यसंस्कृतीवरील लेखासाठीं १५०० पृष्ठें घालावींत असा विचार केला आहे व तीं पृष्ठें कशीं काय वांटून द्यावींत याचें पृथक्करणहि दिलें आहे. आपणास बाह्य गोष्टीविषयीं जें कौतुक आहे तें व त्या जाणण्याविषयींची आवश्यकता हीं लक्षांत घेतलीं असतां इतकीं पृष्ठें कमी नाहींत हें लक्षांत येईल.

बाह्यसंस्कृतीवरील लेखांविषयीं एक कबूलीजबाब दिला पाहिजे तो हा कीं, आपल्या देशांत पुष्कळ विषयांवर स्वतःच्या ज्ञानानें लिहिण्याला लायक असे लोकच नाहींत. हिंदुस्थानांतील भाषा वगळल्या तर ब्रह्मी, सिंहली, फारशी, इंग्रजी, फ्रेंच, जर्मन, रशियन, चिनी, जपानी, इटालियन व पोर्तुगीज इतक्या भाषा जाणणारे लोक महाराष्ट्रीयांत आढळले तथापि अरबी, हिब्रू, तिबेटी, सयामी इत्यादि संस्कृतीच्या इतिहासाच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाच्या भाषा अल्प प्रमाणानें देखील जाणणारे लोक मिळाले नाहींत, तिबेटी जाणणारा एक बंगाली गृहस्थ परिचयाचा आहे व हिब्रू व मराठी जाणणारा मनुष्य मिळणें अशक्य नाहीं अशी माझी समजूत आहे.

हिब्रू व मराठी जाणणारा मनुष्य येथील बेनी इस्रायलांत मिळणें शक्य असलें तरी, जुनी असुरभाषा, मिसरी इत्यादि भाषांची काय वाट लावावयाची ?

वरील गोष्टीविषयीं आम्हांस एवढेंच सांगावयाचें आहे कीं, अनेक भाषांच्या महाराष्ट्रांतील अज्ञानामुळें इंग्रज, फ्रेंच व जर्मन ग्रंथकाराच्या लेखांवर विश्वास ठेवून आम्हांस लिहावें लागणार. आपल्या लोकांकडून परीक्षण करवून त्यांचे लेख थोडे तरी तपासून घेण्याचें कार्य आमच्या हातून व्हावयाचें नाहीं.

**बाह्य संस्कृति** (पृ. १५००)—(अ) जाति आणि संस्कृति पृ. १४०, (आ) बाह्यांच्या शासनसंस्था आणि बाह्यांचे इतिहास पृ. ६००, (इ) बाह्य गीर्वाण व बाह्यांचें हिंदुस्थानीय गीर्वाण पृ. २५०, (ई) बाह्यांचीं कलाकौशल्यें पृ. २००, (उ) इतर अनिर्दिष्ट विषय पृ. ३१०.

(अ) **जाति आणि संस्कृति** (पृ. १४०,) चिनी संस्कृति व जाति पृ. २५, मध्यआशियांतील जाति आणि संस्कृति पृ. २७, यूरोपीय जाति आणि संस्कृति पृ. २७, दक्षिण द्वैपायन ( Oceanic ) जाति आणि संस्कृति पृ. १७, पाताळ मानव्य ( Homo Americanus) जाति आणि संस्कृति पृ. १७, सिद्दी मानव्य ( Homo Africanus) जाति आणि संस्कृति पृ. १७

**(आ) बाह्यांच्या शासनसंस्था आणि बाह्यांचे इतिहास** (पृ. ६००), प्राचीन ग्रीक, रोमन पल्हव, बाबीलोनी, मिसरी, असुरी, खाल्डिया, पेरू, मेक्सिको इत्यादि पृ. १००, ब्रिटिशसाम्राज्य पृ. ८५, अमेरिका पृ. २५, फ्रेंच पृ. ३०, जर्मन पृ. ३०, रशियन पृ. १५, इटालियन पृ. १५, स्वीस पृ. १५, तुर्की पृ. १५, डच पृ. १५, स्पॅनिश, फिरंगी, स्कॅंडिनेव्हियन, डॅनिश, ग्रीक, पृ. ३०, चिनी पृ. ३०, जपानी पृ. ३०, मध्य-अमेरिका पृ. १५, ब्राझील पृ. १५ इतर दक्षिण अमेरिका पृ. १५, यूरोपियांच्या वसाहती पृ. ३०, ख्रिस्ती संप्रदाय पृ. ४०, इस्लाम पृ. ४०, इतर पृ. १०

**(इ) बाह्य गीर्वाण आणि बाह्यांचें हिंदुस्थानीय गीर्वाण** (पृ. २३) [गीर्वाण या शब्दाचा अर्थ मागें सांगितल्याप्रमाणेंच समजावा. हिंदुस्थानासंबंधानें पाश्चात्त्य संशोधक व लेखक यांचा व हिंदुस्थानातील लोकांनीं स्वदेशासंबंधानें इंग्रजींत लिहिलेल्या लेखांचा व ग्रंथांचा समावेश आंग्लो इंडियन या सदरासाठीं ठेवलेल्या जागेंत होईल.] ब्रिटिश ३५, आंग्लोइंडियन पृ. २३, फ्रेंच पृ. २५, जर्मन पृ. २५, इटालियन पृ. १०, इतर यूरोपियन पृ. १०, फारशी (हिंदुस्थानांतील फारशी) पृ. १०, आरबी पृ. १०, चिनी पृ. २५, जपानी पृ. १५, सिलोनी पृ. १०, सयामी पृ. ५, तिबेटी पृ. ५, अमेरिकन पृ. ५, जावा, बली वगैरे पृ. ७, प्राचीन गीर्वाणें, ग्रीक, झेंदावेस्ता इ. पृ. ३०.

**(ई) कलाकौशल्यें** (पृ. २००) प्राचीन यूरोपीयन पृ. ५०, अर्वाचीन यूरोपीयन पृ. ५०, मुसुलमानी पृ. ३५, वन्य पृ. ३०, चिनी आणि जपानी पृ. ३५.

**शास्त्रें**

**(उ) इतर अनिर्दिष्ट विषय** (पृ. ३१०)

(१४) शास्त्रासंबंधीं व तदंगभूत कलासंबंधीं ५००० पृ. योजिलीं आहेत त्यांचा वटवडा येणेंप्रमाणें—

अध्यापनशास्त्र पृ १२, इतिहाससंशोधनशास्त्र पृ. २५, इतिहाससंबद्ध शास्त्रें (शिलालेख, नाणीं, जुने लेख इ. अभ्यास) पृ. १३, इंद्रियविज्ञानशास्त्र पृ ७५, कायदा (आंग्ल धर्मशासनपद्धति) पृ. १५०, कृमिशास्त्र पृ ५०, कृषिकर्मविधा पृ २००, खनिज द्रव्यें व खनिखोदन पृ १००, गणित पृ १००, जंगल-विषयक अर्थशास्त्र पृ. १००, सूक्ष्मजीवशास्त्र पृ ५०, जातिवर्णन व जातींचा इतिहास ( यांत हिंदुस्थानांतील सुमारें ३६०० व बाहेरील सुमारे ४०० जातींची माहिती येईल.) पृ.५००, ज्योतिःशास्त्र पृ १००, धंदे (निरनिराळे) पृ. ३००, धर्मशास्त्र पृ १५०, नगररचना पृ. १०, नौकाबंधन पृ. ५०, पदार्थविज्ञान-शास्त्र पृ २५०, प्राणिशास्त्र पृ. ७५, फलज्योतिष पृ. १०, भाषाशास्त्र १००, भूशास्त्र पृ १००, भौतिक भूपृष्ठवर्णन पृ ५०, मानसशास्त्र पृ. ७५, युद्धकला ( प्राचीन व ऐतिहासिक ) पृ. ५०, युद्धकला आधुनिक पृ. १००, रसायन-शास्त्र पृ. २००, वनस्पतिशास्त्र पृ. २००, वास्तुसौंदर्यशास्त्र पृ ६०, शारीर-शास्त्र पृ. ७५, शासनशास्त्र व अर्थशास्त्र पृ १००, समाजशास्त्र पृ. १००, यंत्रशिल्पशास्त्र पृ. २००, स्थापत्यशास्त्र ( Civil Engineering ). पृ. १००, लोहमार्गवाहन पृ. ५०, विद्युच्छिल्प पृ. ५०, वैद्यकशास्त्र एतद्देशीय व बाह्य. निदान व चिकित्सा पृ.४००, संगीतशास्त्र पृ. ५०, साहित्यशास्त्र पृ ५०.

### अवशिष्ट शास्त्रें (पृ. ६७०)

(१५) शास्त्रीय ज्ञानाचा व्यवहारांत उपयोग करण्यासाठीं जी यंत्रें, आऊतें, इत्यादि बनविलीं असतात, त्यांच्यासाठीं जी स्वतंत्र जागा राखून ठेविली आहे तिचा अंतर्भाव निरनिराळ्या सदरांत होतो. उदाहरणार्थ, उष्णतामापक यंत्र [ थर्मामिटर ] याचा समावेश उष्णतेवरील लेखासाठीं जी जागा सोडिली आहे तिच्यातच होईल प्रकाशलेखना [फोटोग्राफी] साठीं जी जागा राखिली आहे, तिचा समावेश प्रकाशावरील लेखासाठीं ठेवलेल्या जागेंत न करितां निरनिराळ्या धंद्यासाठीं जी जागा ठेवली आहे तिच्यात केला आहे.

(१६) निरनिराळ्या शास्त्रावर लेखक सांपडले आहेत एवढेंच नव्हे तर देशांतील व बाहेर देशांतून आपल्याकडे येऊन आतां देशांतीलच बनलेल्या कलांवर लेखक सांपडले आहेत.

कांचकाम, मद्य [गावठी व विदेशी] तयार करणें, साखर करणें, गंधीकाम, मुद्रणकला, कागद करणें, साबणगारी, सोनारकाम, लोहारकाम, विणकाम, मूर्तिकर्म, सुतारकाम, सूत काढणें, तेलें करणें, चामडीं कमावणें, पुस्तकें बांधणें, घड्याळें करणें, कल्हई [ परंपरागत व अर्वाचीन ] करणें इत्यादि अनेक प्रकारच्या विषयावर लेखक सांपडले आहेत, तथापि त्याबरोबर हेंहि कबूल केलें पाहिजे कीं, कांहीं निरनिराळे धंदे असे आहेत कीं त्यांचे वाकबगार महाराष्ट्रांत नाहींत आणि त्याविषयींचें ज्ञान आज तर अनुभविक

लेखकांकडून लिहिलें न जातां तें पुस्तकी विशेषप्रमाणें असेल. उदाहरणार्थ जुन्या तऱ्हेनें तोफा तयार करणारे कारागीर नेपाळांत जरी अजून आहेत तरी आपणांमध्यें उरले नाहींत, व नवीन प्रकारची तोफा करण्याची कला राजकीय परिस्थिति बदलल्याशिवाय देणें शक्य नाहीं. त्यामुळें या संबंधाची माहिती जवळ जवळ भाषांतरवजा होणार. भाषांतरवजा याचा अर्थ मूळग्रंथ न समजतां शब्दास शब्द ठेवून लिहिलेली असा मात्र नव्हे, तर चांगल्या शास्त्रज्ञानें मूळ ग्रंथ वाचून तो समजून घेऊन त्याच्या अनुरोधानें लिहिलेली असा समजावा.

## शास्त्रीय संज्ञा

(१७) या ग्रंथांत पाश्चात्यशास्त्रें अनेक येणार, त्यांच्यासाठीं संज्ञा काय योजावयाच्या यासंबंधानें, आमचे कांहीं निर्णय येणेंप्रमाणें झाले आहेत. (१) होतां होई तों मुख्य संज्ञा संस्कृत व मराठी भाषेंतील शब्द घेऊन बनवावयाच्या. (२) इंग्रजी, आरबी अगर फारसी संज्ञा अजीबात वगळावयाच्या असें मात्र नाहीं, तथापि ज्या परक्या भाषेंतील संज्ञा घ्यावयाच्या त्या कुणब्यांसहि ठाऊक असतील अगर बऱ्याच वर्गांत प्रचलित असून उच्चारास कठीण नसतील, तरच घ्यावयाच्या. (३) संज्ञा शोधतांना, आजपर्यंत मराठींत शास्त्रीय विषयांवर झालेलें सर्व लिखाण तपासावयाचें, कां कीं सर्वांत उपयुक्त संज्ञा त्याच पद्धतीनें मिळतील. बंगाली व तेलगू ज्ञानकोशांतील संज्ञा फारशा उपयुक्त होतील असें वाटत नाहीं. बंगाली व हिंदी ज्ञानकोश वाचतांना त्या कोशकारास संस्कृत भाषेचे संधिनियम तरी ठाऊक होते किंवा नाहीं असा संशय जागोजाग येतो. तथापि त्यांत कांहीं तरी ग्राह्यांश सांपडेलच. नागरीप्रचारणी सभेनें काढलेल्या संज्ञा, प्रो० लक्ष्मण गणेश साठे यांच्या रसायनशास्त्राच्या संज्ञा आणि प्रो. रानडे यांच्या कोशांत जर कांहीं संज्ञा सांपडल्याच तर त्या, या सर्वांचा विचार करून निराळा संज्ञामाला बनवितां येईल. यांत्रिक विषयांवर अनेक संज्ञा मुंबईच्या व इतर ठिकाणच्या मजुरांनीं बनविल्या आहेत, त्या बऱ्याच महत्त्वाच्या आणि प्रसंगीं मोठ्या मौजेच्या आहेत. त्याप्रकारच्या अनेक रा० रा० दिवाकर यशवंत फाटक यांनीं जमा केल्या आहेत. मासल्यासाठीं दोन तीन येथें देतों. ग्यूल-गाडीखातें, टेपरगायदुम, नट-नठी, बोल्ट-सूत्रधार, इ०. (४) संज्ञा बनवितांना यूरोपियन संज्ञांचें भाषांतर करावयाचें नाहीं हें उघड आहे. कारण कित्येक यूरोपियन संज्ञाच चुकलेल्या आहेत. उदाहरणार्थ ' थर्मामीटर ' शब्द घ्या. थर्मामीटर या शब्दाचें उष्णतामापक यंत्र असें भाषांतर होतें. भाषांतर बरोबर आहे. मात्र थर्मामीटरनें एकंदर उष्णता मोजली जात नाहीं तर उष्णतेचा कस मोजला जातो. एक पेलाभर गरम चहामध्यें उष्णतेचें साकल्य पेटवलेल्या

आगकाडीपेक्षां पुष्कळ अधिक आहे. पण थर्मामीटर सारख्या यंत्रांनें मोजली जाणारी पेटलेल्या काडीची उष्णता गरम चहाच्या पेल्याच्या उष्णतेपेक्षां पुष्कळ अधिक आहे. इंग्रजी शब्दास प्रतिशब्द बनवावयाचा नाहीं तर शास्त्रीय कल्पना देश्य शब्दांत व्यक्त करावयाची आहे. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे आम्हांस शास्त्रीय संज्ञासाठीं अडचण मुळींच पडणार नाहीं णि आजकालच्या देण्यावाकड्या इंग्रजी संज्ञांपेक्षां अधिक शुद्ध आम्हांस वापरतां न आल्या तर आम्ही आपलें काम चांगलें केलें नाहीं असें समजूं [ १८ या योजनालेखाचा १८ वा भाग कोणत्या विषयावरील लेखकास काय मोबदला द्यावा या संबंधाचा आहे. व तो चालकांच्या सूचनेवरून प्रसिद्धिपत्रकांतून गाळला आहे. ]

(१९) आपणापैकीं रा० रा० निळकंठराव भत्ताळकर यांनीं १५ मार्च १९१६ रोजीं ज्ञानकोशाच्या कल्पनेच्या पसंतीचें एक पत्र लिहिलें त्यांत ते लिहितात " आपण ५ वर्षांत ज्ञानकोश पुरा करण्याचें आश्वासन देता तें आपण खरें करून कसें दाखविणार, तें करण्याची योजना आपली कशी काय आहे हें आपण स्पष्टपणें चालकमंडळापुढें मांडावे व तें मांडल्यानंतर मीं प्रास्पेक्टसवर सही करीन एरव्हीं करणार नाहीं. " मी त्यांच्यापत्राप्रमाणें चालक मंडळीपैकीं कांहीं मंडळीपुढें ५ वर्षांत ग्रंथ पुरा करण्याची योजना सामान्य तऱ्हेनें वर्णन करून मांडली होती. ती योजना आतां अनुभवातीं थोडाबहुत फेरबदल करून पुन्हां आपणापुढें ठेवीत आहे.

(२०) पांच वर्षांत ग्रंथ पुरा करून छापावयाचा ही योजना पूर्ण करावयाची. त्यांत ग्रंथ तयार करण्याकडे चार वर्षे दिलीं आहेत व छापण्यासाठीं एक वर्ष ठेवलें आहे. एक वर्षांत ग्रंथ छापून काढावयाचें काम जबर आहे हें खरें.कां कीं तसें करावयाचें झाल्यास निदान चाळीस कंपाझीटर्स या कामाकडे गुंतविले पाहिजेत आणि जे छापखाने आमच्या कामासाठीं चाळीस कंपाझीटर्स गुंतवूं शकतील व त्यास लागणारा टाइप पाडीत रहातील असे छापखाने महाराष्ट्रांत फार थोडे आहेत तथापि हें अशक्य नाहीं एवढेंच सांगतों. खुद्द नागपूरमध्येंच छापखाने दिवसानुदिवस वाढत आहेत व आहेत ते सुधारत आहेत मुंबईतील एका इंग्रज छापखानदारास स्वतः भेटून हें काम आपण एका वर्षांत छापून देऊं शकाल काय असा प्रश्न केला असतां त्यांनीं कांहीं अटींवर होकाराचें उत्तर दिलें.

(२१) आतां चार वर्षांत ग्रंथ तयार होईल काय? एवढाच प्रश्न उरला. त्याचें उत्तर येणेंप्रमाणें आहे–काम करण्यास सोपे-कठीण या दृष्टीनें ग्रंथाचे पुढील भाग पडतात.(१)शास्त्रीय विषय उदाहरणार्थ गणित, रसायनशास्त्र,भूगर्भशास्त्र इ०, (२) आंग्ल वैद्यक, शेतकी, पशुवैद्यक, आर्यवैद्यक, शिल्पशास्त्र, कायदा

इत्यादि व्यावहारिक शास्त्रें. (३) हिंदुस्थानखेरीज इतर देशांचे वृत्तांत, (४) निरनिराळ्या देशांचीं वाङ्मयें, व बौद्धिक इतिहास. (५) निरनिराळ्या परमार्थ संप्रदायांचे ( उदाहरणार्थ ख्रिस्ती, मुसुलमान इत्यादि ) इतिहास, (६) समाजशास्त्र, अर्थशास्त्र, शासनशास्त्र इत्यादि ( ज्यांत वादग्रस्त विषय अनेक आहेत अशीं शास्त्रें ), (७) हिंदुस्थानचा राजकीय, वाङ्मयविषयक, बौद्धिक सांस्कृतिक इतिहास व भूगोलवर्णन: यांपैकीं प्रत्येक विषयाची विल्हेवाट येणेंप्रमाणें.

गणित–रसायनादि शास्त्रें निरनिराळ्या मंडळींस दिलीं आहेत एवढेंच नव्हे तर एकच शास्त्र तोडून निरनिराळ्या मंडळींस द्यावयाचें योजिलें आहे. रसायनशास्त्र घ्या. याचा सर्व सामान्य संपादक एक राहील, आणि त्याचें काम विषयाची विभागणी करून एक एक भाग निरनिराळ्या लोकांस वांटून देणें, त्यांकडून आलेले लेख तपासून संज्ञा (terminology) सर्वसामान्य करणें, प्रुफें तपासणें इत्यादि प्रकारचें राहील.

व्यावहारिक शास्त्रांची देखील गोष्ट तशीच आहे. शेतकी हें शास्त्र दहाबाराजणांमध्यें वाटलें गेलें असल्यामुळे कित्येकांना दहा तर कित्येकांना पंचवीस पृष्ठें असा मजकूर लिहावा लागेल आमच्या आफीसाच्या बाहेरील लेखकांस पंचवीस–तीस पृष्ठांपेक्षा जास्त मजकूर लिहावयास द्यावयाचा नाहीं असें योजिलें आहे. सर्व लेखकांशीं मोबदल्यासंबंधानें करार न झाल्यामुळें त्यांचीं नांवें दिलीं नाहींत ज्या ज्या लेखकांशीं करार करीत आहों त्या त्या लेखकास १ डिसेंबर १९१९ च्या अगोदर लेख आमच्या हातीं आला पाहिजे असें सांगत आहों पुढील एक वर्ष त्या लेखांच्या संपादकीय परीक्षणार्थ लागेल संपादकीय परीक्षणामध्यें पुढील गोष्टींचा मुख्यतः समावेश होतो: (१) आपण विषयांत जरी कितीहि कसोशीनें पाडले तरी लेख निरनिराळ्या लेखकांकडून आला असल्यामुळें पुनरुक्तीची भीति आहे. सर्व लेख एकत्र करून वाचतांना पुनरुक्ति काढावी लागेल (२) सर्व ग्रंथ एकच असल्यामुळें त्यांत संज्ञासंबंधानें एकवाक्यता ठेवावी लागेल. एक शास्त्र इतर शास्त्रांशीं संबद्ध असल्यामुळें अनेक शास्त्रांस अशा ज्या कांहीं संज्ञा आहेत, त्यांसाठीं मराठी संज्ञा निरनिराळ्या लेखकांकडून निरनिराळ्या वापरल्या जाऊं नयेत यासाठीं खबरदारी घेतली पाहिजे. ( ३ ) सर्वसामान्य संपादकीय काम म्हणजे शुद्धलेखनाच्या चुकांची दुरुस्ती वगैरे निरनिराळ्या देशांचीं वाङ्मयें व बौद्धिक इतिहास हें काम अंशेंकरून बाहेरून व अंशेंकरून आफीसमध्येंच तयार होईल. (४) अर्थशास्त्र व शासनशास्त्र यांचे अधिक विभाग पाडले जाऊन सुमारें ३५ लेखकांकडे हें काम सोंपविलें जाईल

(२२) हिंदुस्थानचा राजकीय, सांस्कृतिक, वाङ्मय विषयक, बौद्धिक इतिहास व भूगोलवर्णन हा विषय ठरीव वेळांत संपवावयास खरा खरा कठीण आहे तरी देखील हा चार वर्षांत तयार होईल असा माझा भरंवसा आहे. हा भरंवसा एक वर्ष जें प्रयोगासाठीं काम केलें त्यावरून उत्पन्न झाला आहे.

(२३) ग्रंथरचनेबरोबर सुची तयार करण्याचें काम चालू आहे. तिचा उपयोग ग्रंथांतील पुनरुक्ति व परस्परविरुद्धता हे दोष दाखविण्याकडे व ते काढून टाकण्याकडे होईल.

( २४ ) संस्कृतिविषयक जो मजकूर द्यावयाचा त्याची तात्पुरती योजना वरीन विस्तृत दिली आहे, आणि शास्त्रीय विषयासाठीं जीं पृष्ठें राखून ठेवलीं आहेत त्यांचा बटवडा दिला नाहीं. निरनिराळ्या शास्त्रासाठीं जीं पृष्ठें राखून ठेवलीं आहेत, त्याची योजना देखील अगदीं कायमची समजूं नये. कारण अधिक अनुभवानंतर व इतर लोकाकडून ज्या कांहीं सूचना मागविल्या आहेत त्या आल्यानंतर यांत फेरबदल होईलच. निरनिराळ्या शास्त्रीय विषयावरील लेखांची विषयसुचि तयार झाली नाहीं याचें मुख्य कारण हें कीं प्रत्येक शास्त्राचा सामान्य संपादक अजून नेमला गेला नाहीं प्रत्येक शास्त्राचा मुख्य संपादक विषयसूचि तयार करून मग त्या शास्त्रातील विषयाचा बटवडा निरनिराळ्या लेखकामध्यें करील ज्या आमच्या शास्त्रिय मंडळाच्या सल्ल्यानें पानाचा बटवडा निरनिराळ्या शास्त्रामध्यें केला त्यांनीं कांहीं विषयसूची तयार केल्या आहेत तथापि आजच त्या प्रसिद्ध कराव्यात असें त्यांचें मत नाहीं. याचें कारण त्यांनीं पुढें दिलेल्या पत्रांत दिलेंच आहे.

(२५) आपले यंत्रशिल्पशास्त्रावरील लेखक रा. रा. दिवाकर यशवंत फाटक, तैलयंत्रज्ञ उमरावती यांनीं सूचना केली होती कीं सर्व ज्ञानकोश एकच पुस्तक समजून सर्व विषय सरसकट न करता निरनिराळ्या शास्त्रावर निरनिराळे भाग प्रसिद्ध करावेत आणि प्रत्येक भागामध्यें माहिती अकारविल्ह्यानें द्यावी, चालकापैकीं कांहीं मंडळींस (विशेषतः रा. धुंडीराज ठेंगडी व माधवराव पाध्ये यांस ) ही कल्पना आवडल्यामुळें त्यासंबंधानें त्यांनीं या प्रश्नाचा अधिक विचार करण्यासाठीं शिफारस केली होती. ती सूचना शास्त्रीय मंडळापुढें ठेवली तेव्हां त्याचें प्रतिकूल मत आले निरनिराळ्या शास्त्राचे निरनिराळे भाग प्रसिद्ध करण्याची कल्पना आता कायमची सोडून दिली आहे. याविषयींचें त्यांचें पत्र येणेंप्रमाणें.—

वि. वि. २४।३।१७

आपणाकडून सर्व शास्त्रांची विषयसूचि तातडीनें तयार करून देण्यासंबंधानें पत्र आले होतें व त्यासंबंधानें आपणास आम्ही आपलें म्हणणें

रा. देशमुख यांच्यामार्फत तोंडी कळविलें होतें. आपण उत्तर लेखी मागतां तर तें पाठवीत आहों.

आम्हीं विशेषेंकरून रसायन, पदार्थविज्ञान, प्राणिशास्त्र, वनस्पतिशास्त्र, सूक्ष्मजीवशास्त्र व कृषिकर्मविद्या ह्या शास्त्रांची विषयसूचि करण्याचें काम हातीं घेतलें. सूची तयार करतांना एका विषयाचा अनेक शास्त्रांशीं संबंध आहे असे शेकडों विषय आल्यामुळें आम्हांस प्रत्येक शास्त्राच्या सूचीमध्यें त्याच त्याच विषयांच्या नांवांची पुनरुक्ति करणें बरें वाटलें नाहीं. एका विषयावरच पण निरनिराळे भाग लिहिले गेले पाहिजेत. तथापि विषयसूचि करतांना विषयांची पुनरुक्ति करणें टाळलें पाहिजे. एक विषय अनेक शास्त्रांसाठीं येतो ह्यांस दाखल्यासाठीं उदाहरणें येणें प्रमाणें:

| | |
|---|---|
| कॅथोरा | [पदार्थविज्ञानशास्त्र व प्रकाशलेखन]. |
| रंग [Colour] | [पदार्थविज्ञानशास्त्र व रसायनशास्त्र]. |
| रंग [Dye] | [रसायनशास्त्र, वनस्पतिशास्त्र व खनिजशास्त्र]. |
| ग्रहणें | [पदार्थविज्ञान, ज्योतिष व रसायनशास्त्र]. |
| स्पेक्ट्रॉस्कोपी | [पदार्थविज्ञान, ज्योतिष व गणितशास्त्र]. |
| नेत्र | [पदार्थविज्ञान व इंद्रियविज्ञान]. |
| वातावरण | [पदार्थविज्ञान, रसायनशास्त्र, दिनचर्याशास्त्र Meteorology]. |
| शक्ति [Energy] | [पदार्थविज्ञान, रसायनशास्त्र, सांख्यतत्त्वज्ञान] |
| द्रव्य [Matter] | [पदार्थविज्ञान, रसायनशास्त्र, वैशेषिक दर्शन इ.]. |
| सरलक्षेप [Radiation] | [पदार्थविज्ञान, ज्योतिष]. |
| सूर्य | [पदार्थविज्ञान, रसायन, ज्योतिषशास्त्र, परमार्थ-साधनशास्त्र, फल ज्योतिष इ.]. |
| पृथ्वी | [पदार्थविज्ञान, रसायन, भूगर्भशास्त्र, भूपृष्ठवर्णन, इतिहास, ज्योतिषशास्त्र]. |
| बाष्पांचें द्रवीकरण | [पदार्थविज्ञान, रसायन, उद्योगधंदे]. |
| विद्युद्गतिसाधकयंत्र (Dynamo) | पदार्थविज्ञान, यंत्रशिल्पशास्त्र, उद्योगधंदे]. |
| विद्युद्दीप [Electrical lightening] | [पदार्थविज्ञान, यंत्रशिल्प, नगरविषयक अर्थशास्त्र]. |
| एक्स किरण [X Rays] | [पदार्थविज्ञान, बाह्यवैद्यक]. |
| भरती ओहोटी | [ज्योतिष, पदार्थविज्ञान, गणितशास्त्र, नौकानयन]. |
| विमानविद्या | [पदार्थविज्ञान, यंत्रशिल्पशास्त्र]. |
| ध्वनि | [पदार्थविज्ञान व संगीतशास्त्र]. |

| | |
|---|---|
| ध्वनि | [साहित्यशास्त्र]. |
| श्रोत्रेंद्रिय | [पदार्थविज्ञान, इंद्रियविज्ञान]. |
| विद्युत्पृथक्करण [Electrolysis] | पदार्थविज्ञान, रसायन, यंत्रशिल्पशास्त्र]. |
| दूध | [पशुवैद्यक, वैद्यक, उद्योगधंदे, सूक्ष्मजीवशास्त्र, आरोग्यशास्त्र, रसायनशास्त्र, इ. ] |
| कापूस | [शेतकी, कीटकशास्त्र, वनस्पतिशास्त्र, उद्योगधंदे, इ.] |

याप्रमाणें शेकडों उदाहरणें देतां येतील.

ज्या अर्थी आम्हा चौघांपैकीं कोणीहि कोणत्याहि शास्त्राचा मुख्य संपादक होण्यास तयार नाहीं [ कां, कीं आमच्यापेक्षां शास्त्रीय ज्ञानाच्या बाबतींत अधिक योग्यतेचीं माणसें आहेत ] व ज्या अर्थी लेखांसंबंधाची जबाबदारी दुसऱ्या संपादकांवर आहे त्याअर्थी आम्हीं बनवीत असलेली विषयसूचि सध्याच आपण प्रसिद्ध करूं नये असें आमचें मत आहे. विषयलेखनाची जबाबदारी आम्हीं चुकविण्याचा प्रयत्न करतों असें मात्र आपण समजूं नये. आम्हीं बनविलेल्या विषयसूचीवर निरनिराळ्या शास्त्रांच्या संपादकांचा शिक्का बसला म्हणजे मात्र त्या प्रसिद्ध करण्यास मुळींच हरकत नाहीं.

याशिवाय आणखी एक गोष्ट म्हटली म्हणजे आम्हीं संज्ञांसंबंधानें जे नियम ठरविले व जे आपणांस मान्यहि झाले ते नियम पाळून अगोदर मुख्य संज्ञा बनविल्या पाहिजेत आणि मागाहून त्या वापरून विषयसूचि प्रसिद्ध केली पाहिजे. मराठींत शास्त्रीय विषयांवर सुमारें तीनशेंपेक्षा अधिक पुस्तकें आहेत तीं सर्व तपासून त्यांतील संज्ञा उकरून काढावयास सुमारें सहा महिने लागतील.

सध्यां मराठींत शास्त्रशुद्ध ग्रंथवर्णन [ Biblioagrphy ] नाहीं. जर कोणी निरनिराळीं शास्त्रें व मासिकांतील निरनिराळे लेख हीं सर्व एकत्र करून आणि त्यांचें तत्त्वज्ञानयुक्त वर्णन करून प्रसिद्ध केलीं असतीं तर आमचा मार्ग बराच सुकर झाला असता. सध्यां जे अनेक इंग्रजी-मराठी कोश आहेत त्यांच्याकडे अवलोकन केलें असतां खेद उत्पन्न होतो. शास्त्रीय विषयांतर्गत शब्दास प्रतिशब्द फारच थोडक्या प्रसंगीं दिले आहेत.

असो, एका विषयाचा अभ्यास अनेक शास्त्रांत समाविष्ट होतो हें

दाखविण्यास मागें जी यादी दिली तीवरून निरनिराळया शास्त्रांचे ग्रंथ करावे या विचाराची अप्रयोजकता सहज सिद्ध होईल.

आपले स्नेहांकित,
भिकाजी विनायक डेग्वेकर,
एम्. ए. एम् एस्सी. एल्एल. बी.
शंकर नागनाथ गोडबोले, एम्. एस्सी.
यशवंत बाळकृष्ण रानडे, एम्. एस्सी.
रामचंद्र त्र्यंबक देशमुख, बी. एजी.

(२६) कायद्यासंबंधाच्या विषयसूचीसंबंधाचें काम रा. भवानीशंकर नियोगी ( M. A. LL. M. ) व रा. दत्तोपंत कठाळे ( B. A. LL. M. ) यांस दिलें होतें. रा. भवानीशंकर म्हणजे जाडें प्रकरण आहे. त्यास प्रथम 'कार्य कोणत्या तत्त्वावर करावयाचें' हें चांगलें विचारपूर्वक ठरवावयाचें असतें, आणि रा. कठाळे यांस काम पूर्णत्वानें केलेलें ('तयार') पाहिजे आहे. विषय-सूचीसंबंधानें घाई करण्याचें त्यांनीं नाकारिलें व नाकारण्याचें कारण त्यांनीं लेखी सादर केलें आहे. त्यांनीं जें कार्यध्येय ठेवलें आहे व जो कार्यक्रम सुचविला आहे, तो दोघांच्याहि लोकविश्रुत विद्वत्तेस साजेलसाच आहे त्या कार्यक्रमासंबंधानें आपणास कल्पना यावी म्हणून त्यांचें पत्र आपणांपुढें ठेवीत आहे.

सा न वि. वि. २९ मार्च १९१७

ज्ञानकोशातील कायद्याच्या भागांची विषयसूची मी तयार करावी असें आपलें पत्र मला कांहीं दिवसांपूर्वी पोंचलें. रा. रा. दत्तोपंत कठाळे बी. ए. एल्. एल्. एम्. आणि इतर कायदेपंडितांबरोबर अनेक संभाषणें व वादविवाद करून शेवटीं आम्हीं असें ठरविलें आहे कीं आमची एकंदर कायद्यासंबंधानें समुच्चयात्मक कल्पना जोपर्यंत आपणास पसंत पडली नाहीं तोंपर्यंत सूचि करण्याची घाई केल्यास बरेच श्रम फुकट जातील. हिंदुस्थानांत सध्यां चालू असलेल्या इंग्रजी कायद्यासंबंधानें कोणतीच अडचण नाहीं मुख्य अडचण "हिंदु कायद्या" च्या विवरणासंबंधानेंच आहे. म्हणून "हिंदू कायदा" म्हणजे काय याबद्दल जोंपर्यंत आपलें व आमचें मतैक्य झालें नाहीं तोंपर्यंत त्याचा विषयानुक्रम तयार करणें व्यर्थ होय असें आम्हीं समजतों. तें एकदां मतैक्य झालें म्हणजे मग विषयानुक्रमणिका बनविणें कठिण नाहीं. यासंबंधानें आम्हीं आपला विचार येणेंप्रमाणें मांडतों.

( १ ) इंग्रजी न्यायकोर्टें आपल्या देशांत हिंदूंच्या ज्या कायद्याची अंमलबजावणी करतात तेवढाच हिंदु कायदा अशी त्याची आकुंचित कल्पना

करतां हिंदु लोकांचा सर्व ठिकाणीं लागू पडणारा कायदा स्पष्ट केला पाहिजे सर्व ठिकाणीं लागू पडणारा कायदा व त्याचीं सर्व अंगें दाखवयाचीं हें तत्व आम्हीं आपल्या पुढें मांडतोंच; तथापि चांगला उत्तम शास्त्री विशेषतः मीमांसक आमच्या मदतीस असल्याशिवाय आमचें कार्यध्येय साधावयाचें नाहीं अशीहि आमची समजूत आम्हीं व्यक्त करितों.

( २ ) देशांतील निरनिराळ्या शासनसंस्थाकडून अम्मलबजावणी होत असलेला हिंदूंचा कायदा हा इंग्रजी न्यायकोर्टांत चालू असलेल्या कायद्यापेक्षा जास्त विविध आणि विस्तृत असल्यामुळें ब्रिटिश न्यायकोर्टांनीं फेरबदल करण्यापूर्वी हिंदू कायद्याचें मूळस्वरूप काय होतें याचा शोध प्रथम झाला पाहिजे. व नंतर ब्रिटिश व इतर कोर्टांनीं पांडित्य करून त्याचे रूप कसें बदललें हें सांगितलें पाहिजे.

वर सांगितल्यापैकीं आमचा दुसरा मुद्दा अधिक स्पष्ट करून सांगतों. इंग्रजांहून भिन्न अशीं यूरोपीय राष्ट्रें देखील या देशांत हिंदु कायद्याची अंमलबजावणी करीत आहेत. गोंव्यातील पोर्तुगीजांच्या व पांडिचरीस फ्रेंचांच्या कोर्टांच्या निकालांत व इंग्रजी कोर्टांच्या निकालात एकाच विषयसंबंधानें कायद्यात फरक सांपडतो. महाराष्ट्रीयांचीच गोष्ट घ्याना. इंग्रजी घडणीच्या हिंदू कायद्याहून पोर्तुगीज मुलुखांत प्रचारांत असलेला हिंदु कायदा व निझाम-कोल्हापूर व सांगली यासारख्या देशी संस्थानांत उपलब्ध असलेला कायदा भिन्न आहे व त्यांतील भेदाचें परीक्षण व्हावयास पाहिजे आहे. इंग्रजांचे मांडलिक असलेल्या देशी संस्थानांतील चालू कायद्यांत व इंग्रजी राज्यांतील कायद्यांत फार महत्त्वाचा फरक नसला तरी पण साम्यभेदाचें परीक्षण व्हावयास पाहिजे. याशिवाय दुसरें असें कीं संस्थानांच्या वारसासंबंधीं हक्काचे तंटे व संस्थानाविरुद्ध केलेलीं अपीलें इंग्रजांच्या परराष्ट्रखात्यातील मोठमोठ्या अधिकाऱ्याकडे निकालाकरितां व अम्मलबजावणीकरितां येतात. 'हिंदु कायद्या' प्रमाणें त्यांचा निकाल करतांना हिंदु कायद्याचा आणि तदंतर्गत विवेचनपद्धतीचा यथाशक्ति अवलंब केला जातो. आगलमान्य पण कोर्टांबाहेरील हिंदु कायद्याचें हें उदाहरण होय. येथें आणखी हें सांगितलें पाहिजे कीं, इंग्रजी साम्राज्यांतील इतर दुय्यम प्रतीच्या शासनविभागांत--उदाहरणार्थ अंदमान व गियाना येथें- तसेंच साम्राज्याबाहेरील इतर देशांत--उदाहरणार्थ अफगाणिस्तान व तार्तरी येथें, प्रचलित असलेला हिंदू संबंधाचा कायदा विचारांत घेतला पाहिजे. ठिकठिकाणीं बरेच महत्त्वाचे फरक दिसतात. अंदमान येथें विवाहविषयक कायदा बराच बदलला आहे आणि ब्रिटिश गियानामध्यें हिंदू पद्धतीचीं लग्नेंच तेथील शासकवर्ग मान्य करीत नाहीं. उलटपक्षीं नेपाळसारख्या हिंदु राज्यांत तर स्वयंपूर्ण चालू असलेल्या

कायद्याचें स्वरूप बरेंच भिन्न आहे. ज्या प्राचीन संस्था ब्रिटिश हिंदुस्थानांत रूढ असलेल्या दिसत नाहींत त्यांचा पगडा नेपाळांत अद्याप आहे

आपणास जातीच्या पंचायतींसारख्या शासनसंस्था विचारांत घेतल्या पाहिजेत, कां कीं पुष्कळ ठिकाणीं त्यांचे निकाल उपलब्ध आहेत. संबळपूरच्या झाडिया ब्राह्मणांच्या व जोधपूरच्या अनेक मारवाडी जातींच्या पंचायतींचे निवाडे अनेक वर्षें लिहिले जात आहेत. यांपैकीं बऱ्याच निवाड्यांतून इंग्रजी कोर्टांस अगदीं अपरिचित असा पुष्कळ भाग सांपडेल असें आम्हांस वाटतें. कालांतरानें त्या सर्वांचा इंग्रजी राज्यांतील न्यायपद्धतीवर परिणाम होणार आहे. बडोदें राज्यांत तर पंचायतींचें शासन कायद्यानें नियमित करण्याचा यत्न झाला आहे व देवास [पाती२] येथेंहि तोच प्रयत्न झाला आहे. सिलोन-मधील हिंदु कायदा हिंदुस्थानच्या कायद्यापेक्षां थोडा तरी भिन्न आहेच.

हें सर्व मी व्यक्तीस सध्यां लागू असणाऱ्या हिंदु कायद्यासंबंधानें म्हणत आहे. जर प्राचीनकाळीं प्रचलित असलेल्या कायद्यासंबंधानें लिहावयाचें असलें तर फारच निराळ्या रीतीनें प्रयत्न करावयास हवा. प्राचीनकाळीं अम-लांत असलेली समाजरीति, राजशासनाचा किंवा राजशासनानें अधिकार देऊन अस्तित्वांत आणलेल्या श्रेष्ठ संस्थांच्या ( उदाहरणार्थ, व्यापारी श्रेणी, कुटुंब व जाती यांच्या ) नियमांचा अभ्यास झाला पाहिजे. तसेंच शिलालेख ताम्रपट इत्यादि राजशासनें तपासून व ऐतिहासिक वृत्तें पाहून समाजांत निग्रहानुग्रहरूपी झालेले नियम शोधून काढून धर्मशास्त्रापासून भिन्न तथापि धर्मशास्त्राच्या छायेखालींच चालणारा असा कायदा शोधून काढला पाहिजे.

ब्रिटिश राज्यांतील चालू असलेल्या कायद्याचें स्वरूप जाणून घेणाऱ्या पुष्कळशा जिज्ञासूंस या धर्तीवर तयार केलेल्या बऱ्याच विवरणाचा फारसा उपयोग होणार नाहीं हें आम्हीं जाणून आहों तरी पण कायद्यावरील लेख तत्त्वज्ञानयुक्त करावे असा आम्ही आग्रह धरतों. ज्ञानकोशांतील लेख हे कोर्टांत वकीलांच्या कारकुनांस उपयोगी पडणाऱ्या ज्ञानापेक्षां पुष्कळ खोल विचाराचे असले पाहिजेत कारण अशा लोकांस उपयोगी पडणाऱ्या कायद्याचे समुच्चय-ग्रंथ नेहमीं पाहण्यांत आहेत. पंडितवर्गासच शोभेल असें जें आपण ज्ञान-कोशाचें काम हातीं घेतलें आहे त्या कामांत शास्त्रशुद्ध ग्रंथरचना पाहिजे. सामान्य वर्गाकरितां उपयोगी माहिती घालावी, त्यास आम्ही नाहीं म्हणत नाहीं; तथापि पंडितवर्गास साजेलसें विवेचन अधिक अवश्य आहे. राजकीय व वाङ्मयात्मक इतिहासाची सूचि आधींच तयार न करण्यांत जीं आपलीं कारणें आहेत तींच कायद्याविषयींचा जो भाग कोशांत घालावयाचा आहे

त्यास लागू आहेत. हिंदु कायद्याची सूचि देण्याचें आम्ही नाकारीत असूनहि कार्यपद्धतीसंबंधानें खालील सूचना करीत आहोंत.

( १ ) श्रौत, गृह्य व धर्म यांवरील सूत्रांची आणि स्मृतींची विषयवार सूचि कोणा तरी धर्मशास्त्रपंडिताकडून करून घ्यावी.

( २ ) आपल्या धुळ्याच्या मंडळाकडून शिलालेखादि शासनांतून निघणारा कायदा काढून घ्यावा.

( ३ ) इतिहास, पुराण व राजतरंगिणीसारख्या इतर ऐतिहासिक ग्रंथांतून कायद्याच्या नियमांचें ग्रथन कोणा तरी तज्ज्ञ माणसाकडून करून घ्यावें.

( ४ ) समाजघटनेचे म्हणजे चातुर्वर्ण्यविषयक नियम, चातुर्वर्ण्यविषयक संस्कार, आणि समाजाकडून बहिष्कार व स्वीकार या संबंधाचे नियम, तत्संबंधी व्रात्यस्तोमादि विधी, आणि जातिविषयक गीर्वाणामध्यें सांपडणारा कायदा, हा सर्व कायदा मानववंशशास्त्रज्ञानें धर्मशास्त्राच्या साह्यानें शोधून काढला पाहिजे.

या पद्धतीनें जेव्हां समग्र पृथक्करण तयार होईल आणि भिन्नभिन्नराळ्या विषयांस लागू होणाऱ्या धर्मशास्त्राच्या आज्ञा व त्यांचें कायद्याशीं असणारें साम्य व भेद यांचा तपशील तयार होईल तेव्हां हिंदु कायद्याचा योग्य अभ्यास होईल.

आमची योजना आपणास पसंत पडेल अशी आशा आहे.

आपला,

**भवानीशंकर नियोगी.**

या संबंधानें आपणांस सांगितलें पाहिजे कीं रा० भवानीशंकर नियोगी यांच्या योजनेस आमची सहानुभूति आहे. एवढेंच नव्हे तर आपणांतील जबर पारखी व दुसऱ्याच्या कामाचें सूक्ष्मदर्शक यंत्रानें परीक्षण करणारे रा० मवाळकर यांनीं देखील रा० शंकरराव नियोगी यांच्या योजनेस अंतःकरणपूर्वक मान डोलावली आहे.

( २७. ) प्रो. गर्दे ( हिस्लाप ) यांच्या साह्यानें ज्ञानकोश मंडळाच्या संपादन खात्यांतील मंडळींपैकीं एक रा. रा. यशवंतराव दाते बी. ए. एल्एल्. बी. यांनीं गणित विषयाची तात्पुरती योजना बनविली आहे ती येणेंप्रमाणें.

## गणितशास्त्र

| I PURE. | १ शुद्ध. |
|---|---|
| 1 ARITHMETIC | १ अंकगणित. |
| (a) Numbers | (अ) संख्या मांडण्याची पद्धति. |
| (b) Rule of three, five &c. | (ब) त्रैराशिक, बहुराशिक वगैरे. |

| | |
|---|---|
| 2 ALGEBRA | २ बीजगणित |
| [ I ] Algebraic notation & Rules | [ १ ] बीजगणिताची लेखनपद्धति व सामान्य नियम. |
| [ 2 ] Equations | [ २ ] समीकरणें. |
| [ 3 ] Progressions | [ ३ ] श्रेढी व्यवहार. |
| [ 4 ] Continued fractions & indeterminate equations | [ ४ ] सतत भिन्न व कुट्टक. |
| [ 5 ] Permutations & Combinations | [ ५ ] प्रस्तार व संघविचार. |
| [ 6 ] Involution & Evolution | [ ६ ] घात व मूळ. |
| [ 7 ] Binomial & multinomial Theoroms | [ ७ ] द्विपद व अनेकपद-घात |
| [ 8 ] Exponential theorom | [ ८ ] घातसिद्धांत |
| [ 9 ] Maxima & Minima | [ ९ ] गरिमा व लघिमा. |
| 3 THEORY OF EQUATIONS | ३ समीकरणमीमांसा. |
| [ I ] Ordinary Theory | [ १ ] साधारण विचार. |
| [ 2 ] Approximations to roots | [ २ ] मूल सान्निध्य. |
| [ 3 ] Numerial Equations (Horner's & Newton's method ) | [ ३ ] गुण अंकावरून मूलशोधन (हॉर्नर व न्यूटन यांची रीति) |
| [ 4 ] Special theory for the quadratic, cubic & the biquadratic & their algebraic solution. | [ ४ ] वर्ग, घन, आणि वर्ग वर्गः समीकरणांसंबंधी विचार व त्यांच्या मूलशोधनाची बैजिक पद्धति. |
| 4 Imaginary & Complex numbers & their application to binomial equations. | ४ कल्प्य [ वैकल्प्य ] व संमिश्र संख्या व त्यांचा द्विपदसमीकरणांत उपयोग. |
| 5 Determinants. | ५ निर्धारक. |
| [ 1 ] Properties. | [ १ ] धर्म. |

| | |
|---|---|
| (2) Applicaton to equations & elliminations. | [ २ ] अनेक बीजसमीकरण सोडविण्यांत उपयोग. बीजनिर्मूलन पद्धति. |
| [ 3 ] Application to geometry. | [ ३ ] सशर भूमितींतील कांहीं निर्धारक. |
| 6 Logarithms. | ६ लागरिथम. |
| [ 1 ] History | [ १ ] इतिहास. |
| [ 2 ] Application. | [ २ ] उपयुक्तता ( उपयोग ) |
| 7 Geometry. | ७ भूमिति. |
| (A) Plane. | (अ) एक समपृष्ठगत. |
| [ 1 ] Line. | [ १ ] रेषा. |
| [ 2 ] Angle. | [ २ ] कोन. |
| [ 3 ] Surface. | [ ३ ] पृष्ठ |
| [ 4 ] Triangle | [ ४ ] त्रिकोण. |
| [ 5 ] Quadrilateral | [ ५ ] चतुष्कोण. |
| [ 6 ] Polygon | [ ६ ] बहुकोण. |
| [ 7 ] Curve | [ ७ ] वक्र. |
| [ 8 ] Circle | [ ८ ] वर्तुळ |
| [ 9 ] Locus | [ ९ ] बिंदुमार्ग. |
| [10] Projection &c. | [ १० ] छाया वगैरे. |
| (B) Solid. | (ब) अनेकपृष्ठांतर्गत व गोल पृष्ठगत. |
| [ 1 ] Plane | [ १ ] एक पृष्ठ |
| [ 2 ] Tetrahedron | [ २ ] चतुःपृष्ठ |
| [ 3 ] Polyhedron | [ ३ ] अनेक पृष्ठ |
| [ 4 ] Cone | [ ४ ] शंकु |
| ] 5 ] Cube | [ ५ ] घनाकृति |
| [ 6 ] Cylinder | [ ६ ] वर्तुलस्तंभ, ( वृत्तचिति ) |
| [ 7 ] Sphere | [ ७ ] गोलक |
| [ 8 ] Prism &c. | [ ८ ] समपार्श्व वगैरे |
| (C) Analytical | (क) बीजभूमिति. |
| [ 1 ] Axis | [ १ ] मूलशर. |
| [ 2 ] Co-ordinate | [ २ ] कार्यशर. |

| | |
|---|---|
| [ 3 ] Straight lines (graph) | [ ३ ] समीकरण रेषालेखन. |
| [ 4 ] Conic Sections | [ ४ ] शंकुच्छेद. |
| [ 5 ] Circle | [ ५ ] वृत्त. |
| [ 6 ] Parabola | [ ६ ] शंकुसमच्छेद वक्र. |
| [ 7 ] Hyperbola | [ ७ ] अधिच्छेद वक्र. |
| [ 8 ] Ellipse | [ ८ ] उपवृत्त. |
| [ 9 ] Focus | [ ९ ] मध्यबिंदु केंद्र. |
| [10 ] Curves (other) | [१० ] वर्क (यांची थोडक्यांत माहिती व कांहीं प्रसिद्ध वर्के ). |
| 8 Trigonometry | ८ त्रिकोणमिति. |
| [ 1 ] Elementary plane | [ १ ] समतल त्रिकोणमिति. |
| [ 2 ] Spherical | [ २ ] गोलपृष्ठगत त्रिकोणमिति |
| 9 Infinitesimal Calculus | ९ सूक्ष्मांचें गणित. |
| [ 1 ] Differenciations & their uses | [ १ ] सूक्ष्मावयवलब्धि. ( उपपत्ति व उपयोग ) |
| [ 2 ] Integrations & their uses | [ २ ] सूक्ष्मसंचयनें. ( उपपत्ति वं उपयोग ) |
| [ 3 ] Areas & lengths of curves | [ ३ ] वक्रांचें क्षेत्रफळ व दैर्घ्य. (या पद्धतीनें काढणें) |
| [ 4 ] Volume of Solids for-med by the revolution of curves | [ ४ ] वक्रपरिभ्रमणकृत घनफळ. |
| II APPLIED | शास्त्रांतर्गत व्यवहार |
| 1 MECHANICS | १ यंत्रप्रेरणाशास्त्र. |
| [ I ] Kinematics | [ १ ] गतिगणित. |
| [ 2 ] Kinetics | [ २ ] जडगतिगणित. |
| 2 HYDROMECHANICS | २ जलप्रेरणाशास्त्र. |
| 3 DYNAMICS | ३ गतिशास्त्र. |
| ( A ) Rigid Bodies | (अ) जडगतिशास्त्र |
| ( I ) Laws of motion | [ १ ] गतिनियम. |

| | |
|---|---|
| (a) In a st. line | (अ) सरळगति. |
| (b) „ circle | (ब) वृत्तकक्षागति. |
| (c) „ Parabola | (क) शंकुसमच्छेदकक्षा. |
| (d) „ Ellipse | (ड) उपवृत्तकक्षा. |
| (2) Gravity | [२] गुरुत्वाकर्षण |
| (3) Elasticity | [३] स्थितिस्थापकता |
| [B] Dynamics of a particle | (ब) बिंदुगतिशास्त्र. |
| 4 STATICS. | ४ स्थैर्यशास्त्र. |
| (I) Force | [१] शक्ति. |
| (2) Equilibrium | [२] शक्तिसमता. |
| (3) Centre of gravity | [३] गुरुत्वमध्य. |
| (4) Attraction | [४] आकर्षण. |
| (5) Friction | [५] घर्षण. |
| (6) Lever &c. | [६] तरफ, वगैरे. |
| 5 HYDROSTATICS | ५ जलस्थितिशास्त्र. |
| (I) Pressure | [१] दाब. |
| (2) Equilibrium | [२] समता ( शक्ति ). |
| III MISCELLANEOUS | ३ विविध. |
| I ASTRONOMY | १ ज्योतिषशास्त्र. |
| (I) History | [१] इतिहास. |
| (2) Stellar system and terms | [२] तारागण व अनेकविध वेध. |
| (3) Planets | [३] ग्रह. |
| (4) Ecllipse | [४] ग्रहणविचार. |
| 2 HISTORY OF MATHEMATICS | २ गणितशास्त्राचा इतिहास. |
| 3 THEORY OF PROBABILITY | ३ संभाव्यतामानविचार. |
| 4 THEORY OF NUMBERS | ४ संख्यामीमांसा. |
| 5 PERSPECTIVE | ५ यथादर्शनचित्रशास्त्र. |
| 6 INTERPOLATION | ६ मध्यपदनिश्चय. |

| | |
|---|---|
| 7 TABLES | ७ कोष्टकें व तक्ते. |
| 8 MAJIC SQUARES | ८ कूट कोष्टकें. |
| 9 KNOTS | ९ गमतीचीं चक्रें |

( २८ ) डॉ. शंकर पांडुरंग गोगटे एल्. आर. सी. पी. ॲण्ड एस्. ( एडिंबरी ) यांजकडून आंग्लवैद्यकासंबंधानें सूचना आल्या आहेत त्या येणेंप्रमाणें:—

"वि० वि० माझी "बाह्यवैद्यका" च्या विवेचनासंबंधानें योजना सर्व पूर्णपणें झाली नाहीं. बाह्यवैद्यकांत यूरोपीअन वैद्यकाखेरीज युनानी, चिनी, वैद्यकाचा अंतर्भाव होईल यासाठीं मी बाह्यसंबंधानें योजना न बनवितां केवळ यूरोपीय आणि त्यांतल्या त्यांत देखील आंग्लवैद्यकापुरता विचार केला आहे. आतांपर्यंतचा जो विचार झाला त्यापासून जें काय निष्पन्न झालें तें येणेंप्रमाणें.-

एनसायक्लोपिडिआ ब्रिटानिका व आपण हातीं घेतलेला ग्रंथ यांत बरीच तफावत रहाणार आहे. आपण आर्यवैद्यकास बरेंच महत्त्व देणार आहांत, यासाठीं आंग्लवैद्यकावर ब्रिटानिकामध्यें जो भाग आहे त्यांत गाळावा कोणता याचा मी विचार करतां मला असें वाटलें कीं, ब्रिटानिकांत वैद्यांचीं व वैद्यक संशोधकाचीं दोनशें चरित्रें आहेत त्यापैकीं बहुतेकाची आपणास आवश्यकता नाहीं. शास्त्राच्या इतिहासांत महत्त्वाचीं कार्यकर्त्या पुरुषाचीं नांवें व चरित्रें येतीलच.

पाश्चात्त्य व देशी वैद्यकास,सामान्य असें वैद्यशास्त्राचे निदान,व चिकित्सा [ औषधियोजना ] असे दोन भाग होत. शारीरशास्त्र [Anatomy] व इंद्रियविज्ञान [Physiology] हीं वैद्यशास्त्राशीं संबद्ध अशीं दोन शास्त्रें पाश्चात्त्य आयुर्वेदांत प्रमुख होत. या दोन शास्त्रांसाठीं आपण निराळी जागा राखून ठेवलीच आहे, आणि सूक्ष्मजीवशास्त्रासाठीं देखील पानें राखून ठेवलीच आहेत. सार्वजनिक आरोग्य व पशुवैद्यक वगळतां निदान व चिकित्सा म्हणजे औषधयोजना हेच दोन भाग मुख्य रहातात. सामान्य वाचकांच्या दृष्टीनें आपल्या अगर पाश्चात्यांच्या आयुर्वेदाचा मुख्य उपयुक्त भाग म्हटला म्हणजे अनेक महत्त्वाच्या रोगांचें निदान व औषधयोजना हीं मुख्य होत. अनंत रोगांपैकीं किती रोगांचीं निदानें व चिकित्सा द्याव्यात हें अजून मी ठरविलें नाहीं.कारण ही गोष्ट आपल्या देशांत कोणते रोग आहेत एवढयावरच ठरवावयाची नाहीं. "यलो फीव्हर" संबंधानें कांहीं तरी माहिती दिलीच पाहिजे असें वाटतें. आंकडेशास्त्र काढून कोणता रोग दरहजारीं किती लोकांत होतो हें पाहून देखील ठरविणें योग्य होणार नाहीं. उदा. घटसर्प फार थोड्यांस होतो म्हणून तो वगळावा असेंहि मला वाटत नाहीं. कोणता रोग लेखनार्ह आहे आणि कोणता नाहीं हें अजून ठरलें नाहीं. प्रत्येक अवयवाचें

शारीरशास्त्र त्या अवयवाशीं संबद्ध असलेल्या रोगाशीं त्याचें आणि शारीरशास्त्रलेखक आणि रोगावर लिहिणारा शस्त्रवैद्य हे भिन्न असण्याचा जरूर नाहीं रोगवर्णनानुसंधानानें तत्संबंधीचें शारीरशास्त्र लिहावें. दुसऱ्या ठिकाणीं शारीरशास्त्र देऊं नये. प्रत्येक रोगाचें विवेचन कसें करावें यासंबंधी मला जें काय वाटतें तें येथें देतों.—

प्रत्येक रोगावरील लेखाचे भाग येणेंप्रमाणें असावेत.

१ **प्रत्येक रोगाची व्याख्या**

२. **त्या रोगासंबधाचें** शारीरशास्त्र (Anatomy), व त्यानंतर त्या शरीरभागाचें इंद्रियविज्ञान (Physiology). शारीरशास्त्र वर्णन करतांना ीं आहि घावींत.

३. **रोगवर्णन**

[ अ ] **व्यथावर्णन**, अवयवाच्या रोगाची रोग्याच्या दृष्टीनें मांडणी. त्यांत होत असलेल्या व्यथेचें वर्णन करणें [ उदा. शूळ, खोकला, छातींत दुखणें, जळजळणें इ ]

[ आ ] **लक्षणविज्ञान**, उर्फ वैद्याच्या दृष्टीनें त्याच रोगाची मांडणी— बाह्यदृष्टीनें अगर यंत्राच्या साहाय्यानें त्या रोगाचें वर्णन करणें व दोन्हींचा विचार करून सर्व चिन्हांचें वर्णन करणें.

४ **रोगनिदान**, शरीरांतील एकंदर अनिष्ठ परिणामाचें वर्णन केवळ डोळ्यांनीं पाहून अगर सूक्ष्मदर्शक यंत्राच्या साहाय्यानें ठरविणें. [Pathology]

५ **सदृशभेददर्शन**, सर्व चिन्हांवरून रोग कोणता हें ओळखणें, आणि इतर रोगाशीं साम्यता व भिन्नत्व याचें वर्णन [Differential]. Diagnosis ]

६. **रोगगतिपूर्वावलोक** (Prognosis) रोग पुढें वाढेल कितपत, कमी केव्हां होईल, कसा होईल याविषयीं भविष्य वर्तविणें.

७. **चिकित्सा**, औषधोपचार व शस्त्रक्रिया [ त्या रोगासंबधाची ].

८. **रुग्णशुश्रूषा**, अथवा रोगगतिनिरोधक शास्त्र. (Prophylaxis)

एतद्देशीय आयुर्वेदाच्या दृष्टीनें जरी रोगाचें विवेचन करावयाचें झालें, तरी लेखरचनाक्रम होईल तितका या क्रमानेंच ठेवण्याविषयीं वैद्यास सूचना करावी. वैद्यांना प्रथमतः तो रोग जुन्या वाग्भटास मान्य आहे किंवा नाहीं येथून विचार करावा लागेल.

देशी वैद्यकाच्या साहाय्यानें जमविलेली माहिती अगोदर घालावी अगर पाश्चात्त्य माहिती अगोदर घालावी हा विचार आपला आहे.

स्त्रियांचे रोग, लहानमुलांचे रोग, सूतिकाशास्त्र तसेंच कानाचे, नाकाचे घशाचे व डोळ्यांचे रोग या सर्वांसंबंधानें माहिती वर सुचविलेल्या अनुक्रमानें होईल तितकी घालावी.

९. थोडीबहुत माहिती सूक्ष्मजीवशास्त्राबद्दलहि घालावी, आणि शक्य असल्यास त्याचीं रंगीत चित्रेंहि घालावीत. तीं ब्रिटानिकांत नाहींत, तरी आपणांस घालणें अवश्य आहे.

सिताबर्डी, २८। ३।१९१७ — आपला. शं. पां. गोगटे.

(२९) रा० रा० शंकरराव नियोगी यांच्या मराठी पत्राचें इंग्रजी रूपांतर ( हें येथें देत नाहीं. )

(३०) याप्रमाणें ग्रंथरचनेची आमची ठरलेली योजना व त्यासंबधानें मिळविलेल्या सूचना आपणांपुढें ठेवीत आहे. सूचनांचीं जीं पत्रें आहेत तीं प्रथम पत्र पाठविणाराशीं अनेकदा बोलणीं व वादविवाद झाल्यानंतर त्याजकडून मुद्दाम लिहविलीं आहेत. प्रस्तुत ग्रंथयोजनेची दिशा आपणांस पसंत पडेल अशी आशा आहे. या योजनेंत अनुभवानें पुढें फरक पडणार आहे.

आपला

[ ३१।३।१९१७. ] श्रीधर व्यंकटेश केतकर.

---

( परिशिष्ट, नं. २ )

## संपादनखात्याचे नियम.

### मंत्रिमंडळ.

(१) संपादकास कामांत सल्ला देण्यासाठीं एका मंत्रिमंडळाची नेमणूक संपादकाच्या सल्ल्यानें डायरेक्टरांकडून होईल, आणि त्यांपैकीं प्रत्येकाच्या परिश्रमाबद्दल मोबदला काय द्यावा हें चालक मंडळी ठरवितील.

(२) मंत्रिमंडळांतील सर्व सभासद नागपूरचेच राहतील. सल्लागारांची नेमणूक ( होतांहोईतों ) आगष्ट ( १९१७ ) नंतरच्या बैठकींत मंजुरीसाठीं डायरेक्टरांकडे पाठविली पाहिजे.

(३) मंत्रिमंडळाच्या सल्ल्याप्रमाणें मुख्य संपादकानें चाललेंच पाहिजे असें नाहीं.

(४) मंत्रिमंडळांतील सल्लागारास जो मोबदला द्यावयाचा तो ज्ञानकोश बाहेर पडेपर्यंत एकंदर कामासाठीं ठरविला जाईल.

(५) मंत्रिमंडळाच्या कामामध्यें ज्ञानकोशाच्या मजकुरांतील ( अ ) आपापल्या विषयासंबंधानें उणीव शोधणें, ( आ ) पुनरुक्ती दाखवून देणें, ( इ ) विभागसंपादकांकडून आलेल्या मजकुरास संक्षेप द्यावयाचा असला तर त्यासंबंधानें सल्ला देणें, ( ई ) ज्ञानकोशांतील संज्ञासंबंधानें एकीकरण करावयाचें असल्यास मंत्रिमंडळाच्या सभेंत सूचना करणें, ( उ ) आपापल्या विषयांसंबंधाचीं शेवटचीं मुद्रितें ( फायनल प्रुफें ) तपासणें, व ( ऊ ) छापण्यास शिफारस करणें, इत्यादि, यांचा समावेश होतो.

(६) मंत्रिमंडळांतील सभासदानें महिन्यांतून निदान एकवेळ संपादकास भेटण्यास आलेंच पाहिजे, व मंत्रिमंडळाच्या सर्व बैठकींस हजर राहणें हेंहि त्याचें कर्तव्य आहे.

(७) लिहून आलेल्या मजकुराच्या पानाची सूची कशी करावी या संबंधानें ज्ञानकोशांतील सूचीकारास नियम करून देणें हेंहि त्याचें काम आहेच.

(८) मंत्रिमंडळानें विभागसंपादकानें लिहिलेल्या मजकुराच्या खरेपणाबद्दल ढवळाढवळ करूं नये. जर तपासतांना चुका आढळल्या, तर त्या दाखवून द्याव्यात, व संपादकाच्या मार्फत विभागसंपादकाच्याकडे पाठवाव्यात. कारण मजकुराच्या सत्यतेविषयीं जबाबदार विभागसंपादकच राहतील, आणि आलेला मजकूर ठरींव जागेंत बसविण्यासाठीं काय करावें हें ठरविणें मंत्रिमंडळाचें मुख्य कर्तव्य राहील.

## विभागसंपादक व लेखक.

(९) प्रत्येक शास्त्रीय विषयासंबंधानें अगर ज्ञानकोशाच्या मोठ्या विभागासंबंधानें जे विभागसंपादक नेमावयाचे त्यांची नेमणूक ( होतांहोईतों ) ता. १ आगष्ट (१९१७)च्या आंत व्हावी, व ता. १ आगष्टनंतर होणाऱ्या पहिल्या चालक मंडळाच्या सभेंत तिजबद्दल मंजुरी घेतली जावी.

(१०) विभागसंपादकांकडून आपापल्या विषयासंबंधानें लेखकांची नेमणुकीसाठीं शिफारस ता. १ सप्टेंबरच्या आंत करण्यात यावी आणि सप्टेंबर नंतर जी पहिली चालक मंडळीची बैठक होईल, त्यांत त्यांची मंजुरी व्हावी.

(११) लेखकांस मिळावयाच्या मोबदल्यासंबंधानें प्रथम सूचना विषय-विभागसंपादकांकडून यावी आणि ती आल्यानंतर त्यावर आपला शेरा लिहून संपादकानें चालक मंडळीस सादर करावी.

(१२) विभागसंपादकांस इसार म्हणून ठरलेल्या रकमेच्या एकदशांश रक्कम त्यांच्या नेमणुकीची मंजुरी झाल्यानंतर १५ दिवसांच्या आंत पाठवावी. लेखकांकडून लेख लिहिण्यासंबंधानें कबुलायत लिहून घ्यावी व लेखकांची नेमणूक विषयसंपादकाच्या शिफारसीनें आणि मुख्य संपादकाच्या सल्ल्यानें

याचे रोग, लहानमुलांचे रोग, सूतिकाशास्त्र तसेंच कानाचे, नाकाचे ! डोळ्यांचे रोग या सर्वांसंबंधानें माहिती वर सुचविलेल्या अनुक्र-क तितकी घालावी.

. थे बहुत माहिती सूक्ष्मजीवशास्त्राबद्दलहि घालावी, आणि शक्य त्याचीं रंगीत चित्रेंहि घालावीत तीं ब्रिटानिकांत नाहींत, तरी घालणें अवश्य आहे.

तावर्डी, }
३।१९१७ } आपला.
डां. पां. गोगटे

:९) रा० रा० शंकरराव नियोगी यांच्या मराठी पत्राचें इंग्रजी हें येथें देत नाहीं )

१०) याप्रमाणें ग्रंथरचनेची आमची ठरलेली योजना व त्यासंबंधानें त्या सूचना आपणांपुढें ठेवीत आहे. सूचनांची जीं पत्रें आहेत तीं पाठविणाराशीं अनेकदां बोलणीं व वादविवाद झाल्यानंतर त्याज-म लिहविलीं आहेत प्रस्तुत ग्रंथयोजनेची दिशा आपणांस पसंत शी आशा आहे या योजनेंत अनुभवानें पुढें फरक पडणार आहे.

आपला
३१।३।१९१७. ] श्रीधर व्यंकटेश केतकर.

---

( परिशिष्ट, नं. २ )

## संपादनखात्याचे नियम.

### मंत्रिमंडळ.

१) संपादकास कामांत सल्ला देण्यासाठीं एका मंत्रिमंडळाची नेम-दकाच्या सल्ल्यानें डायरेक्टरांकडून होईल, आणि त्यांपैकीं प्रत्ये परिश्रमाबद्दल मोबदला काय द्यावा हें चालक मंडळी ठरवितील.

२) मंत्रिमंडळांतील सर्व सभासद नागपूरचेच राहतील. सल्लागा-णूक ( होतांहोईतों ) आगष्ट ( १९१७ ) नंतरच्या बैठकींत मंजु-डायरेक्टरांकडे पाठविली पाहिजे.

३) मंत्रिमंडळाच्या सल्ल्याप्रमाणें मुख्य संपादकानें वागलेंच पाहिजे हीं.

४) मंत्रिमंडळांतील सल्लागारास जो मोबदला द्यावयाचा तो ज्ञान-हेर पडेपर्यंत एकंदर कामासाठीं ठरविला जाईल.

(५) मंत्रिमंडळाच्या कामामध्ये ज्ञानकोशाच्या मजकुरातील ( अ ) आपापल्या विषयासंबंधानें उणीव शोधणें, ( आ ) पुनरुक्ती दाखवून देणें, ( इ ) विभागसंपादकाकडून आलेल्या मजकुरास संक्षेप द्यावयाचा असला तर त्यासंबंधानें सल्ला देणें, ( ई ) ज्ञानकोशातील संज्ञांसंबंधानें एकीकरण करावयाचें असल्यास मंत्रिमंडळाच्या सभेंत सूचना करणें, ( उ ) आपापल्या विषयांसंबंधाचीं शेवटचीं मुद्रितें ( फायनल प्रुफें ) तपासणें, व ( ऊ ) छापण्यास शिफारस करणें, इत्यादि, यांचा समावेश होतो.

(६) मंत्रिमंडळांतील सभासदानें महिन्यातून निदान एकवेळ संपादकास भेटण्यास आलेंच पाहिजे, व मंत्रिमंडळाच्या सर्व बैठकींस हजर राहणें हेंहि त्याचें कर्तव्य आहे

(७) लिहून आलेल्या मजकुराच्या पानाची सूची कशी करावी या संबंधानें ज्ञानकोशांतील सूचीकारास नियम करून देणें हेंहि त्याचें काम आहेच

(८) मंत्रिमंडळानें विभागसंपादकानें लिहिलेल्या मजकुराच्या खरेपणाबद्दल ढवळाढवळ करूं नये जर तपासताना चुका आढळल्या, तर त्या दाखवून द्याव्यात, व संपादकाच्या मार्फत विभागसंपादकाच्याकडे पाठवाव्यात कारण मजकुराच्या सत्यतेविषयीं जबाबदार विभागसंपादकच राहतील, आणि आलेला मजकूर ठरींव जागेंत बसविण्यासाठीं काय करावें हें ठरविणें मंत्रिमंडळाचें मुख्य कर्तव्य राहील

## विभागसंपादक व लेखक.

(९) प्रत्येक शास्त्रीय विषयासंबंधानें अगर ज्ञानकोशाच्या मोठ्या विभागासंबंधानें जे विभागसंपादक नेमावयाचे त्यांची नेमणूक ( होताहोईतों ) ता १ आगष्ट (१९१७)च्या आत व्हावी, व ता १आगष्टनंतर होणाऱ्या पहिल्या चालक मंडळाच्या सभेंत तिजबद्दल मंजुरी घेतली जावी

(१०) विभागसंपादकाकडून आपापल्या विषयासंबंधानें लेखकांची नेमणुकीसाठीं शिफारस ता १ सप्टेंबरच्या आत करण्यात यावी आणि सप्टेंबर नंतर जी पहिली चालक मंडळीची बैठक होईल, त्यात त्याची मंजुरी व्हावी.

(११) लेखकांस मिळावयाच्या मोबदल्यासंबंधानें प्रथम सूचना विषयविभागसंपादकांकडून यावी आणि ती आल्यानंतर त्यावर आपला शेरा लिहून संपादकानें चालक मंडळीस सादर करावी

(१२) विभागसंपादकांस इसार म्हणून ठरलेल्या रकमेच्या एकदशांश रक्कम त्यांच्या नेमणुकीची मंजुरी झाल्यानंतर १५ दिवसांच्या आंत पाठवावी. लेखकांकडून लेख लिहिण्यासंबंधानें कबुलायत लिहून घ्यावी व लेखकांची नेमणूक विषयसंपादकाच्या शिफारसीनें आणि मुख्य संपादकाच्या सल्लयानें

चालकमंडळानें केल्यानंतर ठरलेल्या रकमेचा दशांश लेखकाकडे पाठवावा.

(१३) प्रत्येक लेखाचा मोबदला तो लेख चालकमंडळीकडून पास झाल्यानंतर देण्यात येईल.

---

## ( परिशिष्ट नं. ३ )

# कार्यक्रमाबद्दल संपादकीय योजना.

( फक्त लेखक, विभागसंपादक व उपसंपादक यांच्या अवलोकनासाठीं )

[ता २०।७।१८]

( १ ) तारीख १ डिसेंबर १९१९ पर्यंत कच्चा ज्ञानकोश संपूर्ण तयार झालाच पाहिजे असा ठराव ( योजना २१ परिच्छेद पहा ) पक्का झाला असल्यामुळें त्या तारखेपर्यंत करावयाचीं कामें पुढें दिल्याप्रमाणें आखलीं गेलीं आहेत

( २ ) ज्ञानकोशाचा सांस्कृतिक विषय बहुतागीं ज्ञानकोशाच्या कार्यालयात होणार असून तो करण्याच्या पायऱ्या येणेंप्रमाणें आहेत. (अ) ग्राह्य विषयार्थ ग्रंथशोधन, ( आ ) ग्राह्यांशशोधन, ( इ ) ग्राह्यांशनिष्कर्षण, ( ई ) ग्राह्यांशाचें सूचीकरण, ( उ ) विषयवार वर्गीकरण

( ३ ) वरील पांच कार्यांपैकीं पहिलीं दोन कार्यें मुख्य संपादकांकडून होतील कोणकोणत्या ग्रंथांतून कायकाय मजकूर घ्यावयाचा,याची नोंद १ ता. जान्युआरी १९१९ पर्यंत तयार व्हावयाची आहे.

( ४ ) या नोंदींत खालील स्थळीं उपलब्ध असणाऱ्या ग्रंथाचा समावेश करण्यात येईल.

१ सेकंडक्लास सायंटिफिक लायब्ररी—नागपूर.

२ सेक्रेटरीएट लायब्ररी—नागपूर.

३ रॉयल एशिआटिक सोसायटीची लायब्ररी—मुंबई

४ मराठी ग्रंथसंग्रहालय—मुंबई

५ इंपीरिअल लायब्ररी—कलकत्ता.

६ रॉयल एशिआटिक सोसायटीची लायब्ररी —कलकत्ता

वरील ठिकाणीं जे ग्रंथ अनुपलब्ध परंतु महत्त्वाचे असतील ते विकत घ्यावयाचे व त्यांवरून कार्य करून घ्यावयाचें.

( ५ ) **ग्राह्यांश निष्कर्षण**—वरील ग्रंथांतील ग्राह्यांश सूचनापत्राबरहुकूम काढावयाचा आहे हें कार्य व तसेंच काढलेला ग्राह्यांश मूळग्रंथप्रमाणेंच आहे किंवा नाहीं हें तपासून पहावयाचे काम, हीं दोनहि का

नागपूर व पुणें येथील कार्यालयांतील संपादकीय कामाच्या व्यवस्थापकाकडे राहतील हीं कामें ता. १ डिसेंबर १९१९ पर्यंत पूर्ण झालीं पाहिजेत.

( ६ ) **ग्राह्यांशाचें सूचीकरण**—लिहिलेल्या मजकुराचीं सूचीपत्रें तयार करणें व तीं तपासणें यासाठीं नागपूर कार्यालयामध्यें एक स्वतंत्र अधिकारी नेमला जाऊन त्याच्या देखरेखीखालीं हें काम ता १ जान्युआरी १९२० पर्यंत पूर्ण व्हावें

( ७ ) **विषयवार वर्गीकरण**—सूचीपत्रें तयार करून तपासून झाल्यानंतर ग्रंथानुरोधनानें तयार केलेला सर्व मजकूर विषयवार लावावयाचा हें कार्य ता १ फेब्रुवारी १९२० च्या सुमारास संपावें.

( ८ ) **परायत्त म्हणजे कार्यालयाच्या बाहेर होणाऱ्या कामाविषयीं विचार**—ता. १ जानेवारी १९१९ च्या सुमारास सर्व विभागसंपादकाकडून त्या तारखेपर्यंत किती काम झालें याबद्दल विचारणा होईल ज्याचें काम मुळींच झालें नसेल अगर अतिशय थोडें झालें असून मुदतींत संपण्याचा रंग दिसत नसेल त्याजकडून तें काम काढून घेऊन दुसऱ्याकडे द्यावयाचें अगर येथेंच कार्यालयात तयार करावयाचें याविषयीं विचार होईल.

( ९ ) **ग्रंथांतरीं अनुपलब्ध माहिती**—वर दर्शविल्याखेरीज पुढें दिलेल्या प्रकारची व इतर माहिती पत्रव्यवहारानें मिळवावी लागेल, उदाहरणार्थ—आशिया, आफ्रिका, युरोप, अमेरिका वगैरे हिंदुस्थानच्या बाहेरच्या प्रदेशांत राहणाऱ्या हिंदी लोकाबद्दल व हिंदुसंस्कृतीच्या अवशेषाबद्दल व अभ्यासाबद्दल माहिती मिळवावी लागेल. या कामाची जबाबदारी नागपूर येथील संपादकीय कार्याच्या व्यवस्थापकाकडे राहील

( १० ) **स्थानिक माहिती**—उदाहरणार्थ, मुंबईची निरनिराळ्या जिन्नसांच्या व्यापारासंबंधानें, व जाती वगैरे कांहीं समाजघटकांच्या सद्यस्थितीसंबंधानें माहिती पत्रव्यवहार करून अगर तेथील प्रत्यक्ष अवलोकनानें मिळवावी लागेल या कार्याची जबाबदारी योग्य कार्यकर्ता मिळाल्यानंतर त्याच्यावर सोंपविण्यांत येईल ही माहिती ता १ डिसेंबर १९१९ ला तयार पाहिजे.

( ११ ) **संज्ञाकोश**—शास्त्रीय संज्ञांचें एकीकरण करण्याकरितां एक संज्ञाकोश तयार करावा लागेल त्याची सामुग्री अगोदर जमवून ठेवावयाची आहे व त्याकरितां एका अधिकाऱ्याची योजना या कामाकडे केली आहे त्यानें संज्ञाकोशास उपयोगी पडतील अशीं सर्व पुस्तकें शोधून काढून त्यांची किंमतीसह यादी तयार करून मुख्य संपादकाकडे ता. १ जानेवारी १९१९च्या आंत पसंतीकरितां पाठवावी सर्व पुस्तकें ता. १ जून१९१९ पर्यंत कार्यालयात

परिस्थिति असल्यामुळे इंग्लंडमध्ये. या विषयांवर तज्ज्ञ सांपडूं शकतात. यापेक्षां अधिक चांगली व्यवस्था फ्रान्स व जर्मनी या देशांत आहे त्याचाहि आम्हांस उपयोग होतो. ती सर्व मंडळी मिळून विषय वाटून घेऊन काम करूं शकतात. आपल्याकडे विषय वाटले असता ज्याच्यावर सोंपवितां येतील अशीं माणसें फारच थोडीं आहेत आणि यासाठीं हें काम आपणास करावयाचें झाल्यास पुढील पद्धतीचा स्वीकार करावा लागेल. या पद्धतीनें झालेलें काम वरील पाश्चात्य पंडितांनीं केलेल्या कामापेक्षांहि उत्तम होईल असा अनुमान आहे.

प्राचीन इतिहासावरील लेख निर्दोष होण्याकरितां ज्या साधनांची आवश्यकता आहे तीं येणेंप्रमाणें:—(१) सर्व उपलब्ध शिलालेखताम्रपटादि चिरजावि लिखाणांची यादी व सूची. या यादीमध्यें प्रत्येक लिखाणाचा काल, स्थल, गोषवारा व आंत असलेलीं विशेषनामें व त्यांत दिसून येणारीं सामाजिक, आर्थिक, राजकीय व कायद्यासंबंधाचीं विधानें नमूद केलेलीं असावींत. अशीं सर्व लिखाणें निरनिराळ्या कार्डांवर उध्दृत करून त्यांचा उपयोग करून घ्यावयास पुढें दिल्याप्रमाणें निरनिराळ्या सूच्या तयार पाहिजेत. ( अ ) व्यक्तिविशेषनामसूची, ( आ ) स्थलनामसूची, ( इ ) कालसूची, ( ई ) व ऐतिहासिक व अर्थशास्त्रीय गोष्टींविषयींची सूची ( २ ) नाण्यावरील बहुतेक याद्या उपलब्ध असल्यामुळें त्यांची सूची तयार करण्याचें कारण पडणार नाहीं परंतु या सर्व याद्या आपल्या कार्यालयांत आपल्या मालकीच्या असणें अवश्य आहे. ( ३ ) ग्रंथांतर्गत ऐतिहासिक महत्त्वाचे उल्लेख वगैरे इंडियन अँटिक्वरि व इतर पंडितग्रंथांत येऊन गेले आहेत व त्यांचे गोषवारे व सूची कार्यालयांत तयार होत आहेत तेव्हां त्यासंबंधानें विशेष सूचना करावयाची नाहीं.

या सर्व गोष्टी ता. डिसेंबर १९१९ च्या आंत व्हाव्यात, कां कीं १९२० सालीं जर ग्रंथांतर्गत मजकुराचे एकीकरण व्हावयाचें आहे तर त्यावेळेस हा पुरावा उपयोगीं पडेल अशा रीतीनें तयार पाहिजे. यास खर्च सुमारें पुढें दिल्याप्रमाणें येईल —

| | |
|---|---|
| ( १ ) पुस्तकें (सिलोन, ब्रह्मदेश वगैरे देशांवरील पुस्तकांसह) | १५०० रु |
| ( २ ) कार्डें | १५०० रु |
| ( ३ ) कार्डांकरितां कपाटें | २०० रु. |
| ( ४ ) लेखक (४ पदवीधर १ वर्षभर दरमहा ५० रु प्रमाणें) | २४०० रु |
| (५) सूचीपत्रलेखक (१पदवीधर व एक साहाय्यक ७५ रु प्रमाणें) | ९०० रु |
| ( ६ ) परीक्षक व दिग्दर्शक ( अर्धा वेळ ) | ६०० रु |
| एकूण | ७१०० रु. |

एवढी मोठी रक्कम खर्च होईल खरी, तथापि हा खर्च केल्यानें कांण- त्याहि ऐतिहासिक प्रश्नावर आमच्या लेखकवर्गास अधिक निर्भयपणे लिहितां येईल व पाश्चात्य ग्रंथकारास देखील आमचा ग्रंथ आदरपूर्वक उपयोगावा लागेल

य. रा दाते.

---

( परिशिष्ट नं. ५ )

## महाराष्ट्रापुढील धर्मशास्त्रीय प्रश्न
### आणि
## ज्ञानकोशकारांची अडचण.

[ १७ डिसेंबर १९१८ च्या केसरींतील पत्र ]

महाराष्ट्रीय ज्ञानकोशामध्यें धर्मशास्त्राचे अनेक प्रश्न येणार आहेत व त्यावर लिहितांना ज्या अडचणी उपस्थित होतात त्या वाचकवर्गापुढें मांडल्या पाहिजेत, आणि त्यासंबंधानें प्रत्येक सुशिक्षितानें विचारहि केला पाहिजे.

धर्मशास्त्रासंबधानें सामान्य जनांची कल्पना अशी असणार कीं, त्यास विधिपर अगर निषधपर स्पष्ट वाक्यें पाहिजेत धर्मशास्त्राच्या ग्रंथांतील वचनांचें पृथक्करण करून, अनेक परस्परविरोधी वचनें वाचकासमोर मांडलीं असतां त्यास कौतुक किंवा मौज वाटेल परंतु कार्याकार्यज्ञान होणार नाहीं. परस्परविरुद्ध वचनांपैकी ग्राह्य व अग्राह्य कोणतें याविषयीं ज्ञानकोशकारांनीं म्हणजे ज्ञानकोशमंडळ ज्या धर्मशास्त्रज्ञ मंडळाकडे हें काम सोंपवील त्यांनीं कार्याकार्यविषयक निर्णय दिला तर त्याची किंमत काय? आणि त्यास लोकमान्यता कशी प्राप्त होणार? परस्परविरुद्ध विधान असलीं तर त्यांची संगति कशी लावावी, त्यांतील योग्य नियम कसा ठरवावा, इत्यादि गोष्टींविषयीं धर्मशास्त्रांतच नियम आहेत. पण ते नियम पूर्णपणें पाळले आहेत कीं नाहीं हें कसें ठरणार? व जरी ते पूर्णपणें पाळले तरी विकल्पास म्हणजे स्वेच्छानिर्णयास क्षेत्र राहतेंच· आणि त्यामुळें परस्परविरुद्ध विधानांतील ग्राह्य नियम काढण्याच्या क्रियेविषयीं प्रश्न उपस्थित होतोच

धर्म याची जर मीमांसकाची व्याख्या घेतली तर आज धर्मशास्त्रावर जे अनेक ग्रंथ झाले आहेत त्यांतील बराचसा भाग धर्मशास्त्रांत येतो किंवा नाहीं हाच प्रश्न उपस्थित होणार

धर्मशास्त्रांत पुनःपुन उच्चारण केलें आहे कीं, शब्दप्रामाण्य वेदास आहे, इतर ग्रंथास नाहीं. " केवळ श्रुतिनियमांचें अवलंबन करा " किंवा

" सर्व श्रुतिनियमांचें अवलंबन करा " असें आज कोण म्हणणार आहे? श्रुतींच्या खालोखाल अधिकारानें ग्रंथ म्हटले म्हणजे कल्पसूत्र. आपस्तंब आश्व-लायनादि सूत्राचा अनुयायी जो ब्राह्मण असेल त्यास आपलें सूत्र श्रुतींच्या खालोखाल महत्त्वाचें वाटेल; परंतु त्याचें सुद्धा अवलंबन केलें असतां समा-जात दोष उत्पन्न होणार नाहीं काय? उदाहरणार्थ, अश्वलायनसूत्रीं ब्राह्म-णास म्हणजे सर्व कर्‍हाडे ब्राह्मणास आणि त्याहून अधिक कोंकणस्थ, देशस्थास "शूलगव" करणें कर्तव्य आहे! तथापि शूलगवाचा म्हणजे बैल मारण्याचा विधि, दरमहिना-पंधरा दिवसांनीं एखादा ब्राह्मण करूं लागला तर तो ब्राह्मण समाजांत राहील किंवा नाहीं याची शंकाच आहे.

कलियुगांत अमुक विधी करावयाचे नाहींत असें जरी स्मृतिवचन असलें तरी प्रत्येक स्मार्तवचनाची मान्यता वेदमूलकत्वावरच असावयाची ना? वेदांत कलियुगाचा उल्लेख आहे काय? आणि कलामध्यें निराळा धर्म असावा असा आदेश वेदांत कोठून सांपडणार?

जेथें शास्त्रवचन निश्चयात्मक नाहीं, तेथें रूढि घ्यावयाची असें कोणी म्हणेल पण आज रूढि घ्यावयाची ती कोणामधील? बहुजनसमाजाची म्हणजे शूद्रांतिशूद्रांतील रूढि घ्यावयाची कीं ब्राह्मणांची घ्यावयाची. ब्राह्मणांतल्यांत इंग्रजी शिकलेल्यांची मान्य धरावयाची, किंवा बहुतांशीं रूढीवर अवलंबून राह-णार्‍या व शास्त्राभ्यासापेक्षा कमी शिकलेल्या अशा भिक्षुकवर्गाची रूढि घ्याव-याची, कीं जे थोडे धर्मशास्त्रज्ञ समाजांत असतील त्यांची रूढि घ्यावयाची? ज्यांच्यांतील रूढि घ्यावयाची असा शिष्टवर्ग कोणता व कसा शोधावयाचा?

या तर्‍हेचे अनेक प्रश्न आमच्यापुढें येतात, आणि त्या प्रश्नांना उत्तरें देण्यास आम्हांस लोकमताची अपेक्षा भासते. लोकमत घेण्यापूर्वी लोकांस आमचा कार्यक्रम समजावून दिला पाहिजे.

ज्ञानकोशाचें कार्य पार पाडण्यासाठीं जे कार्यविभाग व कालविभाग केले आहेत ते येणेंप्रमाणें:—

ता. १ डिसेंबर १९१९ च्या आंत कच्चा ज्ञानकोश तयार करावयाचा आणि पुढील १२ महिन्यांत त्याची, छापखान्याकरितां हस्तलिखित प्रत तयार करावयाची आणि तो पुढें छापून काढावयाचा.

कच्च्या ज्ञानकोशांत धर्मशास्त्राची तयारी येणेंप्रमाणें राहील. धर्मशास्त्रा-तर्गत अनेक विषयांविषयीं माहिती व मतें यांचें पृथक्करण करून प्रथम तें सर्व विषयवार मांडून ठेवावयाचें. हें कार्य ता. १ डिसेंबर १९१९ च्या सुमा-रास तयार होईल अशी अपेक्षा आहे हें लक्षांत ठेवून खालील गोष्टींचा विचार करावा, आणि आम्हीं काय करावें यांविषयीं मत द्यावें.

आज ज्ञानकोशकारांस खालील निरनिराळ्या प्रकारचा विकल्प आहे:—

एक तर हिंदुराज्याबरोबर धर्मही गेला असें गृहीत धरून पूर्वी म्हणजे सुमारें १०० वर्षें पूर्वी हिंदु म्हणून जे लोक होते ते कोणत्या आचारांनें बद्ध होते, आणि त्यांत निरनिराळ्या काळीं कसे फरफार होत गेले, याचें केवळ ऐतिहासिक विवेचन द्यावयाचें, आणि सध्या इंग्रज जवढें हिंदूंचें धर्मशास्त्र हिंदूंनी पाळावयास लावतात तेवढेंच मान्य करावयाचें.

वरील दृष्टि जरी ठेवली तरी अशी अडचण उत्पन्न होते कीं, इंग्रजी कायदा हिंदूंचें धर्मशास्त्र हिंदूंस लागू आहे असें गृहीत धरतो; आणि आपण त्यांत कांही फेरबदल करीत नाहीं नुसता हिंदूंच्या कायद्याचा आपण अर्थ करतो असाहि बाणा इंग्रजी कायद्याचा आहेच. हिंदूंचें धर्मशास्त्र जर मृत झालें नाहीं असें म्हणावें तर आजचा धर्म ठरविणारी संस्था कोठें आहे? प्रत्येक संस्कृतीच्या कायद्यामध्यें परस्परविरुद्ध वचनें असतातच; पण संशयनिर्णायक संस्था त्यांच्यांत जिवंत असल्यामुळें अमुक स्थलीं धर्म काय आहे, याविषयीं संशय रहात नाहीं, व राहिला तरी त्याचा निर्णय करण्यास कोणापुढें जावें हें ठरलेलें असतें आणि दरवर्षीं हें संशयनिर्णयाचें काम चालून असतें तशी हिंदुधर्माला सध्यां सर्वमान्य संशयोच्छेदक संस्था आहे काय?

धर्मशास्त्र जिवंत आहे आणि आजचा धर्म विधिनिषेधपर स्पष्ट वाक्यांनी दिला पाहिजे; ही वृत्ति आपण घेतली तर पुनः पूर्वोक्त प्रश्न उपस्थित होतो कीं, आम्ही जें धर्मनिर्णायक मंडळ नेमूं त्याच्या निर्णयास महाराष्ट्रजनता काय किंमत देईल? आम्ही त्यांत विद्वान धर्मशास्त्रज्ञ आणि व्यवहारवेत्ते हे जरी अनेक घेतले तरी त्यांच्या निर्णयास अधिकार कितीसा उत्पन्न होईल? महाराष्ट्रामध्यें एखादी कायमची धर्मनिर्णायक संस्था असती तर तिचा उपयोग अशा प्रसंगीं झाला असता. शिवाय लोकांना आजचा धर्मशास्त्र सांगण्याचा अधिकार व जबाबदारी ही ज्ञानकोशमंडळानें कां घ्यावी? आंत एक उपाय आणखी आहे कीं, शंकराचार्यांच्या पीठासारख्यावरून हें काम खरोखर व्हावें व तें तसें व्हावयास पाहिजे. कां कीं, त्यांनाच हा परंपरागत अधिकार आहे. तथापि तो अधिकार आज बरींच वर्षें निद्रस्थ स्वरूपांत आहे; परंतु शंकराचार्यांच्या पीठाकडून जर आमचे धर्मशास्त्र वरील लेख तपासले गेले, आणि अनेक संशयोच्छेदक वाक्यें लिहिलीं गेलीं तर ज्ञानकोशांतर्गत धर्मशास्त्रीय भागास बरीच मान्यता मिळेल.

आमच्यापुढें आणखीहि एक अडचण आहे सरकारच्या खानेसुमारीच्या खात्यामध्यें आणि एथनॉग्रफीच्या खात्यामध्यें जातिविषयक चौकशी चालू असतां अनेक प्रकारचे घटले उपस्थित होऊन त्यांनीं जातींचें वर्गीकरण

चातुर्वर्ण्यपद्धतीनें करण्याचा नाद सोडून दिला, आणि जातींची यादी इंग्रजी अकारविल्हेनें ( Alphabetically ) करण्याचें ठरविलें याप्रमाणें पुष्कळ गुंतागुंतीच्या प्रश्नावर आम्ही कोणत्या अधिकारानें निर्णय करावा.

या पत्राच्या वाचकांपुढें आम्ही लिहिण्याचे खालील चार प्रकार ठेवीत आहोंत त्यांतून कोणत्या प्रकारचा आम्ही अवलंब करावा याविषयीं विचार करणें वाचकांकडे आहे

पहिला प्रकार—धर्मशास्त्राचें केवळ ऐतिहासिक दृष्ट्या विवेचन द्यावें, आणि सध्याचा धर्म काय आहे याविषयी पूर्ववृत्त धारण करावी

दुसरा प्रकार—आम्हांस जें धर्मग्रंथाचें साहाय्य होईल त्या साहाय्यावर भिस्त ठेवून योग्यायोग्यतेचा खुलासा निर्णय द्यावा; आणि आमच्या निर्णयास काय किंमत द्यावयाची हें महाराष्ट्रानें मागून ठरवावें

तिसरा प्रकार—महाराष्ट्रांतील सर्व हिंदु जनतेनें एकत्र होऊन एखादी धर्मनिर्णायक सभा केली आणि तिनें एका वर्षाच्या अवधींत अधुनिक धर्मविषयक नक्की लिहिण्याचें कबूल केलें तर तें काम आम्ही त्यास द्यावें.

चौथा प्रकार—महाराष्ट्रानें ठिकठिकाणीं सभा भरवून जगद्गुरूंस आमचे लेख तपासून देण्यास विनंति करावी आणि जगद्गुरूकडून ती विनंति मान्य झाली तर जगद्गुरूकडून आमचे लेख तपासून घ्यावेत

वरील चार प्रकारांपैकीं आम्ही कोणत्या उपायानें अवलंबन करावें हें या पत्राच्या वाचकांनीं ठरवावें. ज्ञानकोशाच्या वर्गणीदारांनीं आणि हिस्सेदारांनीं, म्हणजे ज्या लोकांचा पैसा आम्ही घेऊन त्यास लौकर ग्रंथ देण्याची जबाबदारी अंगिकारीत आहों त्यांनीं तर यासंबंधीं आपलें मत जरूर कळविण्याची कृपा करावी

श्रीधर व्यंकटेश केतकर.

---

(परिशिष्ट नं. ६)

## डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर, एम्. ए. पीएच्. डी. संपादक महाराष्ट्रीय ज्ञानकोश यांजकडून मुंबई-तील व्यापारी वर्गास स्नेहपूर्वक विनंती.

" महाराष्ट्रीय ज्ञानकोश " या ग्रंथांतील व्यापारी माहिती तयार करण्यासाठीं मंडळाचा प्रतिनिधि आपणाकडे येईल तेव्हां आपण माहिती देण्याची कृपा करावी.

## ज्या बाजारांची माहिती पाहिजे असे बाजार येणेप्रमाणे

१ अठ्ठेरीबझार, २ शेअरबझार, ३ रूबझार, ४ दाणाबझार, ५ अळशी बझार, ६ मसालेबझार, ७ महुवाबझार, ८ तांबे पितळबझार, ९ लोखंड-बझार, १० गोणपाटबझार, ११ काथ्याबझार, १२ सूतबझार, १३ सराफ-बझार, १४ कापडबझार, १५ औषधीबझार, १६ कागदबझार, १७ रेशीम-बझार, १८ कपडा तुकडा ( कटपीस ) बझार, १९ कोळसाबझार, २० गवत-बझार, २१ भाजी फळफळावळबझार, २२ चमडाबझार, २३ बूटबझार, २४ बिलोरीबझार, २५ घी बझार, २६ वीट फत्तर वगैरे.

## प्रत्येक बझारसंबंधानें अवश्य असलेली माहिति

(१) आपल्या बाजारात खरेदी-विक्रीची पद्धत कशी असते? मालाच्या किंमती, चालू बाजारभाव, पुढील तेजीमंदीच्या धोरणाविषयींची माहिती देणारीं पत्रकें, मासिकें वगैरे आहेत काय? हजर मालाचा सौदा अगर सट्टे याच्या खरेदी विक्रीची पद्धत ( मग ती जथाबंध असो अगर परचुरन असो ) कशी आहे? पतीवर माल देण्याची तऱ्हा कशी आहे? सौदा करण्यास रक्कम किती अनामत ठेवावी लागते.

( २ ) दोन बाजाराच्या भावातील फेरबदलाचा एकमेकाशीं संबंध कसा असतो? ( हा फेरबदल दोन पेठांच्या एकाच मालाच्या भावामधील फेर-बदल असो किंवा एकाच पेठेच्या निरनिराळया बाजारांतील भावाच्या फेर-बदलाविषयीं असो, दोहोंसंबंधानें माहिती अवश्य आहे )?

( ३ ) बाजार ज्यांच्या हातीं आहे त्याची जात काय? त्याच्या व्यव-हारांत भाषा कोणती चालते?

( ४ ) मालाच्या निरनिराळया जाती किती आहेत ?

( ५ ) हिशेबाची पद्धत कशी आहे ?

( ६ ) आपल्या बाजारांत संघ ( असोसिएशन ) आहेत काय ?

( ७ ) आपल्या बाजारांत रोकड बाजारांतील तेजीमंदीवर भाव कितपत अवलंबून असतात? केवळ स्थानिक चढाओढीवर कितपत भाव अवलंबून असतात? माल रोखण्याचा प्रयत्न केल्यास आपल्या बाजारांतील मालाच्या किंमती कितपत वाढू शकतील? गिऱ्हाइकास आपण ठरवूं त्या भावानें माल घ्यावा लागेल असें केव्हां शक्य होतें आणि केव्हां होत नाहीं?

( ८ ) आपल्या बाजारांत " प्रमाद " म्हणजे माल रोखणें शक्य होण्यासाठीं रोखणारानें केवढी खरेदी केली असते असें अनुभवानें दिसून आलें आहे. माल रोखण्याचें काम कांहीं मोठे एकएकटे व्यापारीच करतात किंवा तसे करणाऱ्या व्यापाऱ्यांचे उघड किंवा गुप्त संघ आहेत?

(९) एकपक्षीं कलकत्त्याचा, कराचीचा आणि रंगूनचा बाजार आणि दुसऱ्यापक्षीं मुंबईचा बाजार यांच्या किंमती कितपत परस्परावलंबी आहेत? त्या परस्परावलंबी नसून त्या लिव्हरपूलवर अवलंबून आहेत काय?

(१०) लिव्हरपूलवर कोणत्या मालाच्या किंमती अवलंबून आहेत? येथील बाजारांत लिव्हरपूलला प्रतिस्पर्धी यूरोपांतील दुसऱ्या पेठा नाहींत काय? नसल्यास कां नाहींत? फ्रान्स, जर्मनी, बेल्जम, हॉलंड, डेन्मार्क वगैरे देशाच्या मुंबई येथील कान्सलांनीं मुंबईहून खरेदी करण्यास आपल्या देशांतील व्यापाऱ्यांस वळविण्याचा प्रयत्न केला आहे काय? मुंबईच्या बाजारांत इतर देशांनीं खरेदी करावी म्हणून येथील व्यापाऱ्यांचे कांहीं प्रयत्न झाले आहेत काय?

(११) आपल्या बाजाराच्या माहितीसंबंधीं कोणकोणतीं बुकें आहेत?

महाराष्ट्रीय ज्ञानकोश हा दहा हजार पृष्ठांचा ( सुपररायल आक्टेव्हो आकार ) मराठींत ग्रंथ होणार आहे. म्हणजे ५०० पृष्ठांचा एक भाग असे वीस भाग होतील ग्रंथाची किंमत शंभर रुपयांपेक्षां कमी किंवा अधिक वर्गणी देण्याच्या वेळेवर अवलंबून आहे. ग्रंथ फार मोठा असल्यामुळें हजार प्रती छापून विकावयास ठेवता येणें शक्य नाहीं. व यामुळें आगाऊ वर्गणीदार होणें अवश्य आहे. अधिक माहिती रा. रा वामन सखाराम संत बी. ए. ( ओरेगान अमेरिका ) प्रतिनिधि ज्ञानकोश मंडळ मोहनबिल्डिंग यांजकडे मिळेल

---

( परिशिष्ट नं ७ )

## महाराष्ट्रीय ज्ञानकोशकाराचे महाराष्ट्रांतील नृत्याभिज्ञ स्त्रीपुरुषांस प्रश्न.

[मुंबई ९।३।१९१९]

गेलीं शेंकडों वर्षे नृत्यकलेचा व तत्संबंधीच्या शास्त्राचा र्‍हास होत आहे. व संस्कृत ग्रंथ वाचणारे पंडित व नृत्यकला जाणणारे स्त्रीपुरुष यांमध्ये संबंधाभाव झ ल्यामुळें नृत्याविषयीं सशास्त्र माहिती देणारे लोक दुर्मिळ झाले आहेत. शास्त्र व कला यांचा झालेला फारकत दोहोंसहि अपकर्षक आहे. ज्ञानकोशकारास या दोहोंचीहि जरूर आहे. नृत्यविषयक संस्कृत शास्त्रकारांचें ज्ञान आणि आजचें नृत्य या दोहोंची माहिती ग्रंथांत आली पाहिजे हें ग्रंथध्येय आहे प्रचलित नृत्याविषयीं जी माहिती ग्रंथांत घालावयाची ती कांहीं पद्धतीनें गोळा झाली पाहिजे, आणि नृत्यज्ञास असलेली माहिती आम्हांस पद्धतशीर

रीतीनें पाठविणें शक्य व्हावें यासाठीं पुढील प्रश्नमालिका तयार केली आहे. नृत्यकलेवर व्यासंग असलेली मंडळी या प्रश्नांस उत्तरें देऊं शकतील असें वाटतें. जहागिरदार, संस्थानिक इत्यादि नृत्यकलेच्या उप्या आश्रयदात्यांकडे हें पत्रक येईल त्यांनीं तें योग्य मंडळींकडे पाठविण्याची कृपा करावी.

सर्वसामान्य नृत्यकलाभिज्ञ मंडळींकडून सहज येऊं शकेल अशी माहिती म्हटली म्हणजे नाचांचीं वर्णनें व नांवें. हीं वर्णनें मेहनत घेतली असतां शास्त्रीय भाषेंत लिहितां येणें कठिण नाहीं. तथापि तशीं लिहिणें जरूर नाहीं. प्रत्येक नाचात शरीराच्या हालचाली म्हणजे अभिनय वर्णन करतांना ( अ ) अंगें, म्हणजे डोकें, हाताचे पंजे, कुशी, कंबर, पाय, मान; ( आ ) प्रत्यंगें म्हणजे खांदे, बाहू, पोट, मांड्या, पोटऱ्या, मनगट, गुडघे व हाताचे कोपरे; ( इ ) आणि उपांगें म्हणजे डोळे, पापण्या, भुवुर्के, गाल, नाक, ताड, दांत, जीभ, हनुवटी, चेहरा या तीनहि प्रकारच्या अभिनयस्थानांच्या हालचालींचें वर्णन करावें. नाचतांना केलेल्या अंगविक्षेपाचीं उर्फ अभिनयाचीं चित्रें देतां आलीं तर उत्तमच होईल.

नृत्यवर्णनाची शास्त्रीय भाषा तयार झाली आहे ती येणेंप्रमाणें.—गाणें ज्याप्रमाणें स्वरांत लिहितां येतें त्याप्रमाणें प्रत्येक नाच अभिनयांत लिहितां येतो. स्वाभाविक क्रिया करतांना जे अंगविक्षेप होतात अगर ज्या क्रिया होतात त्यापैकीं प्रत्येक अंगाच्या, प्रत्यंगाच्या व उपांगाच्या प्रत्येक निरनिराळ्या क्रियांस नांवें दिलीं गेलीं आहेत. त्यामुळें सर्व प्रकारच्या हालचाली ( अभिनय ) थोडक्यात लिहितां येतात. अनेक प्रकारचे अभिनय एकत्र होऊन नृत्य होतें.

## माहितीचे मुद्दे.

( १ ) नाचांविषयीं विचार—( अ ) कलेच्या दृष्टीनें, व ( आ ) ऐतिहासिक दृष्टीनें म्हणजे कोणता नाच कोणाकडून आला वगैरे नृत्यविषयक संशोधनास अवश्य असल्यामुळें वर्णनास घेतलेल्या नाचाचें सूक्ष्म-वर्णन दिलेलें चांगलें.

(२) नाचांचें वर्गीकरण—नाचाचें वर्गीकरण शक्य होईल तोंपर्यंत नृत्याच्या हेतू पाहून करावें. नृत्याचे हेतू सामान्यतः तीन असतातः(अ) शरीर-चापल्य व हालचालींतील मोहकपणा दाखवून प्रेक्षकांस आश्चर्यचकित करणें, ( आ ) संगीतास जोड म्हणून आपल्या पायांनीं अगर घंटांनीं नाद उत्पन्न करून, किंवा नादाला योग्य असे अंगविक्षेप करून, श्रोत्याच्या किंवा प्रेक्षकांच्या मनावर एकच उत्पन्न करणें, ( इ ) स्मरणानें पूर्वानुभूत विकार जागृत करतां येतात म्हणून, सर्वांस परिचित असलेल्या क्रियांची अगर

ऐतिहासिक, पौराणिक व नाटयविषय झालेल्या कथांची, प्रसंगांची, अगर भावांची भावविषयक स्मृति उत्पन्न करणें. या तीन हेतूंपैकीं प्रत्येक नाचाचें वर्णन करतांना जो हेतु प्रधान असेल त्या वर्गांत तो नाच घालावा.

(३) कोणत्या नाचास कोणता अंगविक्षेप अनुरूप आहे याविषयीं अनुभवानें मत लिहावें.

(४) स्मृति उत्पन्न करण्यास योग्य अशा व्यवहारांतील कोणत्या प्रसंगांची नक्कल नृत्यांत येते. कोणत्या पौराणिक प्रसंगांची आठवण देणारा अभिनय आज भावजागृति करूं शकत नाहीं भावजागृति करूं शकतील अशा कोणत्या अर्वाचीन गोष्टी नाचांत आढळतात?

(५) नृत्यविषयक धंदा करणाऱ्या स्त्रियांत आपला समाजांतील दर्जा अधिक उच्च तऱ्हेचा व्हावा म्हणून काहीं चळवळी अगर खटपटी झाल्या आहेत काय? नृत्यांगना स्त्रियांच्या धंद्यास शिस्त लावण्यासाठीं कलाहीन वारवधूंपासून पृथक्त्व स्थापन करण्यासाठीं आणि आश्रयदात्यासहि नियमांनीं बांधण्यासाठीं कांहीं संस्था आहेत काय? सुधारकांच्या बहिष्कारोपदेशक चळवळीमुळें, धंद्याची बदनामी अगर नुकसान झालें आहे काय? धंद्यातील स्त्रियास कांहीं विशिष्ट नियमांनीं अगर शिस्तीनें वागविण्याचा प्रयत्न झाला आहे काय?

(६) नृत्यांगनांचें सध्यांचें शिक्षण कसें होतें? नृत्याचार्यांत पुरुषच आहेत काय? असल्यास ते कोणत्या जातीचे असतात? त्याचें शिक्षण कसें काय असतें? नृत्याच्या शिक्षणक्रमास सुरवात केव्हां होते. नृत्य शिकणाऱ्या स्त्रिया पिढ्या नुपिढ्या तोच धंदा करणारांतच असतात अगर इतरांत असतात. नृत्याचें शिक्षण देणारांमध्यें कोणी नंदिकेश्वराचें अभिनयदर्पण किंवा भरतमुनीचें नाटयशास्त्र यासारख्या ग्रंथांशीं परिचित असतो काय?

(७) सध्यां नृत्याचीं उपकरणें ( पायांतील चाळ वगैरे ) कोणकोणतीं आहेत? त्यांच्या उपयोगासंबंधानें आजच्या व्यवहारांत कांहीं आचार अगर नियम झाले आहेत काय?

(८) नृत्यास अनुकूल असा वेष कसा सजवावा, सकाळच्या नृत्यास अमुक, संध्याकाळच्या नृत्यास अमुक, देवापुढील नृत्यास अमुक आणि लग्नमुंजींतील नृत्यप्रसंगीं तमुक वेष असावा, असें प्रसंगाच्या, दिवसाच्या भागाच्या, ऋतूंच्या व नृत्याच्या प्रकारांवरून ठरतें काय?

(९) महाराष्ट्रांतल्या महाराष्ट्रांत नृत्यविषयक भेद आहेत काय? अमुक नाच कोंकणांत अधिक, अमुक देशावर अधिक, कानडी मुलखांत अमुक नाच दिसतो तो इतरत्र दिसत नाहीं असें कांहीं आहे काय?

(१०) अनेक माणसें ज्यास जाणतात असे नाच कोणकोणते आहेत? त्यांच्या हालचालींचें व मंडळांचें वर्णन करावें.

(११) युरोपियन लोकांच्या नाचाचा परिणाम परंपरागत नाचावर कांहीं होत आहे काय?

(१२) आमचे महाराष्ट्रात जे नृत्याचे प्रकार प्रचलित आहेत ते परंपरागत महाराष्ट्रीयच आहेत की उत्तरहिंदुस्थानाकडून आले आहेत, किंवा दक्षिणेकडून आले आहेत. भिल्ल व कोळी यांसारख्या वन्य जातींकडून कांहीं नाच आले आहेत काय? पशुपक्ष्यांचें अनुकरण नृत्यांत कितपत दिसतें?

(१३) लोकांच्या नृत्यविषयक अभिरुचीविषयीं काय म्हणता येईल?

(१४) नृत्यागनांचे सामान्यतः उत्पन्न काय असतें? त्यांच्या धंद्याचे हंगाम कोणते? महाराष्ट्रीय नर्तकीस, उत्तरहिंदुस्थानातील, कानडी मुलुखांतील किंवा मुसलमान नर्तकींची स्पर्धा कितपत भोवते? महाराष्ट्राबाहेर महाराष्ट्रीय नृत्यागनांस क्षेत्र आहे काय? विचारलेल्या प्रश्नानुरूप माहिती ता. १ जुलै १९१९ च्या आंत संपादक महाराष्ट्रीय ज्ञानकोश नागपूर यांच्याकडे पाठवावी.

---

## ( परिशिष्ट नं ८ )

## महाराष्ट्रीय ज्ञानकोशकारांची सर्व जातींच्या पुढाऱ्यास नम्र विनंति

वि. वि. महाराष्ट्रीय ज्ञानकोशांत हिंदुस्थानातील अनेक जातींविषयीं माहिती येणार आहे. आणि त्यातल्यात्यात महाराष्ट्रांतील जातींविषयीं वर्णन विशेषेंकरून येणार आहे. निरनिराळ्या जातींविषयीं सेन्सस रिपोर्ट, एथ्नॉग्रॉफिक सर्व्हे, गॅझेटिअर व स्वतंत्र पुस्तकें यांतील माहिती काढण्याचा प्रयत्न मंडळाच्या संपादकीय कारखान्यांत चालूच आहे. तथापि अशी बरीचशी माहिती आहे की ती या ग्रंथांतून मुळींच उपलब्ध नसते. अशी माहिती गोळा करणें भाग आहे. ज्ञानकोशांत निरनिराळ्या जातीसंबंधानें आमचें समाजचित्र यावयाचें तें बरोबर यावें यासाठीं प्रत्येक प्रकारची खटपट आम्हीच पाहिजे. आपल्या जातीसंबंधानें चुकीची माहिती काय प्रसिद्ध झाली आहे या संबंधाची जाणीव प्रत्येक जातींतील सुशिक्षित वर्गांत असतेच. तर प्रसिद्ध झालेल्या ग्रंथांतील चुका वगैरे प्रत्येक जातींच्या पुढाऱ्यांनीं आमच्या नजरेस आणल्यास आम्ही आभारी होऊं.

निरनिराळ्या जातींच्या लेखकांनीं स्वतःच्या जातीविषयीं माहिती खालील मुद्दयांस धरून ता. १ डिसेंबर १९१८ च्या आंत पाठवावी.

१ आपल्या जातींत अजमासें एकंदर लोकसंख्या काय आहे ? जातीचें मुख्य वसतीचें ठिकाण कोणतें ? तेथें किती वस्ती आहे ?

२ आपल्या जातीस पंचायत आहे काय ? गांवोगांवीं पंचायती असल्या तरी सर्वसामान्य पंचायत आहे काय ?

३ पंचायतीचा अध्यक्ष निवडला जातो कीं तो वंशपरंपरेनें असतो ?

४ जातीचीं देवळें, चाळी, घरें, जमीनजुमला वगैरे स्थावर व जंगम मालमत्ता काय आहे ? त्यांवर सत्ता कोणाची आहे ? त्याची सरासरी किंमत काय आहे?

५ जातीचा कर कसा वसूल करतात ?

६ पंचायतीचे निवाडे लिहून ठेवण्याची पद्धत आहे काय ? असल्यास किती वर्षांचे निवाडे लिहिले गेले आहेत ?

७ पंचायतीचे निकाल अमलात आणण्याकरितां कोणतीं शासनें करणें जातीच्या स्वाधीन आहे?

८ शासनें करण्याच्या अधिकारास सरकारकडून मंजुरी मिळाली आहे काय ?

९ जातीच्या पंचायतीपुढें नित्य प्रश्न कोणते येतात आणि महत्त्वाचे नैमित्तिक प्रश्न आजपर्यंत कोणकोणते झाले ?

१० आपल्या जातीच्या सदृश तथापि तीहून भिन्न अशा कोणत्या जाती आहेत ?

११ कोणत्या जातीबरोबर अन्नोदकव्यवहार चालतो.

१२ जातीच्या पोटजाती किती ? कोणत्या पोटजातींबरोबर लग्नव्यवहार सुरू झाला आहे ?

१३ आपल्या जातीमध्यें विवाहादि संस्कार कोणते भिक्षुक करतात ?

१४ जातीचे कोणते प्रश्न जातच सोडविते व कोणत्या प्रश्नावर ब्राह्मणांचा सल्ला घेण्यात येतो आणि ब्राह्मणांनीं काढून दिलेल्या शास्त्राधारावरून कोणत्या प्रश्नाचा निकाल करण्यांत येतो ?

१५ जातीचें चातुर्वर्ण्यव्यवस्थेंत स्थान कोणतें आहे? याविषयीं जातीचें म्हणणें लोकमान्य कितपत झालें आहे ? यासंबंधाचे निवाडे केव्हां केव्हां कसे कसे झाले आहेत ?

१६ जातीसंबंधानें कागदपत्र काय आहेत ? ते कोणापाशीं आहेत ? ( त्यांच्या नकला मिळणें शक्य असल्यास त्या पाठविणें ).

१७ जातीच्या इतिहासासंबंधानें केवळ दंतकथा काय आहेत ? कागदोपत्रीं आधारावरून काय निष्पन्न झालें आहे ?

१८ गेल्या तीन चारशें वर्षांत जातीचीं स्थलांतरें कांहीं झालीं आहेत काय ? व स्थलांतरांचीं कारणें काय ?

१९ इंग्रजी राज्यापूर्वी जातीचा आचार कसा काय होता ? त्यांत फेरबदल काय होत चालला आहे ?

२० जातींत पुनर्विवाह आहे काय ? जातींतील विधवांची व निराश्रित मुलांची तरतूद जातीनें काय केली आहे ?

२१ जातींतील पुरुषांस रखेल्यांपासून झालेल्या मुलांची एखादी निराळी जात बनली आहे काय ?

२२ जातींतल्या स्त्रियांस अधर्मव्यवहारानें सजातीय पुरुषापासून झालेल्या संततीचें भवितव्य काय होतें ?

आडनांवें, गोत्रें, देवकें वगैरेंच्या याद्या, जातींतील कांहीं मोठ्या किंवा प्रसिद्ध व्यक्तींसंबंधानें सचित्र माहिती, स्त्रीपुरुषांचे पोषाख व दागिने यांच्याविषयीं बोध करणारीं चित्रें, जातीच्या फडाचें अगर पंचायतीच्या निवाड्याचे रिपोर्ट छापले असल्यास ते; ही सर्व माहिती संपादक महाराष्ट्रीय-ज्ञानकोश, धनतोली नागपूर या पत्त्यावर पाठवावी कळावें हे विज्ञापना.

आपला,

गोविंद चिंतामण तांबे (बी. ए., एल्‌एल्‌ बी.)

महाराष्ट्रीय ज्ञानकोश मंडळ, लिमिटेड, नागपूर.

---

(परिशिष्ट, नं. ९)

## वाचनालयास ग्रंथालय जोडण्यासंबंधी योजना

### महाराष्ट्रीय ज्ञानकोश मंडळ लिमिटेड, नागपूर.

### पुणें शाखा ४८१ शनवार पेठ.

सेक्रेटरी.............................................वाचनालय यांस

वि. वि. आपलें एक वाचनालय आहे. तथापि त्या वाचनालयाला आपण ग्रंथसंग्रह जोडला आहे किंवा नाहीं, हें कळत नाहीं. आपणास आपल्या वाचनालयास ग्रंथालयाचें स्वरूप देतां यावें म्हणून आम्ही खालील योजना सुचवितों. ती योजना आपणास शक्य होण्यासाठीं आम्ही शक्य ती मदत करूं. आपल्या वाचनालयाच्या हितचिंतकांपुढें विचार करण्यासाठीं आम्ही एक योजना मांडतों.

आमची अशी इच्छा आहे कीं, आपल्या वाचनालयास ग्रंथालयाचें स्वरूप यावें, त्यानें चांगल्या ग्रंथांचा संग्रह करावा. आणि लोकांस वाचनाची

अभिरुचि लावावी अभिरुचि वाढविल्यानें वाढते. परंतु कोणत्याहि गोष्टीला स्वरूप येण्यापूर्वी थोडाबहुत पैसा प्रथम खर्च करावा लागतो तो पैसा लाकांत अभिरुचि वाढल्यानंतर मग्नहि निघतो. ज्ञानकोशाची किंमत १०० रुपये यांच्या वर आहे. तो घेण्यास आपणास सामर्थ्य नाहीं, वाचनालयासाठीं अगोदर पैसा कोणी खर्च करावा इत्यादि अडचणी ज्या आपल्या मनांत येतात त्यास तोड म्हणून ही सूचना आपल्याकडे पाठविण्यांत येत आहे, तिचा आपण विचार करावा. ज्ञानकोशाचा प्रसार खेडोखेडीं व्हावा अशी ज्ञानकोश-मंडळाच्या चालकांची इच्छा आहे; आणि त्यांनीं आपलें मंडळ ही एक शिक्षणसंस्था आहे अशा दृष्टीनेंच आपलें कार्य चालविलें आहे

आपणास जी योजना सुचवीत आहों ती येणेंप्रमाणें:—

( १ ) वाचनालयाच्या हितचिंतकांनीं पुस्तकांत पांचशें रुपये घालावयाचे असा निश्चय करावा

( २ ) हे रुपये तीन वर्षांत खर्च करण्याचें ठरवावें

( ३ ) दरमहा या पांचशेपैकीं सुमारें १५ पासून २० रुपये खर्च करावे.

( ४ ) हे पैसे देण्यासाठीं एकपासून पांच हितचिंतक करावेत. एकच असल्यास चांगला; आणि त्यांनीं दिलेली रक्कम कर्जाऊ म्हणून समजण्यात यावी, आणि तीवर त्यांस दरमहा दरशेंकडा १० आणेप्रमाणें व्याज द्यावें

( ५ ) आपल्या वाचनालयाच्या वर्गणीदारांची जी कमिटी असेल त्या कमिटीनें हितचिंतक सावकारांस असें लिहून द्यावें कीं, जोपर्यंत आपली रक्कम फिटली नाहीं तोपर्यंत ग्रंथालयांतील सामानावर आपला सावकारी हक्क राहील.

( ६ ) आपण जो या प्रकारचा करार कराल तो साक्षीकरतां आमच्याकडे नोंदवावा.

( ७ ) दरमहा आपण जे पैसे पुस्तकांत खर्च कराल त्यांतील पांच रुपये ज्ञानकोशास वर्गणी म्हणून भरावी.

( ८ ) जेव्हां वर्गणीदार वाढून लायब्ररी त्यांच्याच बळावर चालेल आणि सावकाराची रक्कमहि पुरी करण्यांत येईल, तेव्हां त्या सावकारांचें सर्व रक्कम पोचल्याबद्दलचें कबुलायतपत्रक आमच्याकडे नोंदण्यास पाठवावें.

आपणांकडून अनुकूल उत्तर आलें आणि अशाच दुसऱ्या वाचनालयाकडूनहि उत्तर आलीं, तर सर्व वाचनालयांत हिशोबांच्या वह्या, वर्गणीच्या छापील पावत्या इत्यादि गोष्टी पुरविण्यास आम्ही खटपट करूं, आणि सर्व वाचनालयांस एकत्र जोडणारी, वाचनालयांस पुस्तकांचा पुरवठा करणारी, नवीन पुस्तकांची माहिती देणारी आणि पुस्तकें वाचनाकरितां उसनी देणारी अशी निराळी सरकारांत रजिस्टर केलेली संस्था काढून तिच्या हातीं

पुढील काम सोंपविण्याचा विचार होईल. तो विचार मूर्त स्वरूपास आणण्या-पूर्वी आपल्यासारख्या वाचनालयांना त्याविषयीं सल्लाहि घेण्यांत येईल. कळावें, पत्राचें उत्तर यावें, हे विज्ञापना.

आपला

श्रीधर व्यंकटेश केतकर.

मुख्य संपादक-महाराष्ट्रीय ज्ञानकोश.

---

## (परिशिष्ट नं १०)

## कार्याचें धोरण आणि पद्धति

[ १।४।१९ च्या प्रसिद्धिपत्रकांतून. ]

### कार्यपद्धति.

**ज्ञानाचें पात्रांतर**—कार्यालयाबाहेर इतर लेखकांकडे असे विषय दिलेले आहेत कीं ज्या विषयांवरील ज्ञान निश्चित असून तें पश्चात्य व देशी ग्रंथांतून मांडलें गेलें आहे. परंतु तें निराळ्या भाषांत असल्यामुळें मराठी भाषेत मांडावयाचेंच काय तें मुख्य काम आहे. या विषयांस तज्ज्ञांची जरूर विशेष असल्यामुळें तें कार्यालयांत करण्याचें न ठरवितां बाहेर तज्ज्ञांकडे सोंपविण्यांत आलें आहे. प्रसंगीं तज्ज्ञ आपापल्या व्यवसायांत गुंतलेले असल्यामुळे त्यास स्वतः लेखनाचें काम करणें इतर व्यवसाय संभाळून करितां आलें नाहीं ही गोष्ट लक्षांत आल्यामुळें जेथें जरूर भासली तेथें मंडळातर्फे त्या त्या विषयांत अभिज्ञ असा पगारी मदतनीस त्यांच्याकडे काम करण्यास दिला आहे. या योजनेमुळें तज्ज्ञांच्या ज्ञानाचा फायदा मिळून लेखन लौकर होईल या लेखाची तपासणी व अंतिम संपादन पुन्हां आफीसांत करावें लागणारच

**संज्ञाकोश**—वरील कामाखेरीज ज्ञानकोशाचें मुख्य काम नव्हे तरी ज्ञानकोशलेखनास अत्यावश्यक असें संज्ञाकोशाचें काम चालू आहे. या कामाकरितां आम्हीं प्रसिद्ध केलेल्या वाङ्मयसूचीना अत्यंत उपयोग झाला आहे. संज्ञाकोशाची आवश्यकता मराठी भाषेमध्यें अत्यंत असून पुष्कळ लेखकांनी ही उणीव अनेकपुर्वे मांडली आहे. परंतु ज्ञानकोशास संज्ञाकोशाखेरीज गत्यंतरच नसल्यामुळें वाङ्मयसूचीप्रमाणे संज्ञाकोशहि ज्ञानकोशमंडळास तयार करणें भाग आहे.

हा संज्ञाकोश तयार करतांना मुख्य गोष्ट ही लक्षांत ठेविली पाहिजे कीं, डॉक्सनीप्रमाणें प्रत्येक इंग्रजी शास्त्रीय पारिभाषिक शब्दास नवीन मराठी

शब्द पाडावयाचा नाहीं. तर आज जे भाषेमध्ये शब्द रूढ झाले असतील अथवा पूर्वीच्या लेखकांनीं जे शब्द वापरले असून अन्वर्थक व शुद्ध असतील अगर प्रचारांत येऊन गेल्यामुळें यौगिक अर्थानें नसले तरी रूढार्थानें विशिष्ट गुणधर्मवाचक बनले असतील, ते शब्द तसेच ठेवावयाचे; व जेथें मुळींच शब्द प्रचारांत नसतील तेथेंच नवीन शब्द पाडण्याच्या उपायाचा अवलंब करावयाचा. यासाठीं प्रथम मराठी भाषेमध्यें आजपर्यंत शास्त्रीय विषयांवर कोणकोणते ग्रंथ प्रसिद्ध झाले आहेत ते पाहिले पाहिजेत. या पुस्तकांची नोंद आमची वाङ्मयसूची तयार केल्यामुळें आम्हांस मिळाली. त्याजबरोबर हेंहि लक्षांत बाळगिलें पाहिजे कीं, अलीकडे वीस-पंचवीस वर्षांत मराठीमध्यें शास्त्रीय स्वतंत्र अगर भाषांतररूपी ग्रंथ फार थोडे झाले असून बरेचसें शास्त्रीय विषयांवरील वाङ्मय लहान लहान लेखरूपानें निरनिराळ्या मासिक वगैरे नियतकालिकांतून प्रसिद्ध झालें आहे. याकरितां आपणांस ज्या शास्त्रीय विषयावरील संज्ञा पहावयाच्या आहेत त्या विषयावरील वाङ्मय कोणकोणत्या नियतकालिकांत कोठें सांपडेल हें पहाणें अवश्य आहे. हें वाङ्मय दाखविण्याचेंहि काम वाङ्मयसूचीनें केलें आहे. याप्रमाणें शास्त्रीय मराठी वाङ्मय कोठें उपलब्ध आहे हें कळल्यानंतर, तें सर्व वाङ्मय जमवून त्यांतील संज्ञा निवडण्याचें काम कार्यालयांत सुरू झालेलें आहे; व तें आमच्या कार्यक्रमाप्रमाणें ता. १ डिसेंबर १९१९ रोजी पूर्ण होईल.

## ग्रंथाचें धोरण

आजपर्यंत ज्या निरनिराळ्या सूचना विचारांत घेतल्या त्यांवरून ग्रंथाचें धोरण पुढें दिल्याप्रमाणें आंखण्यांत आलें आहे.

सामान्यः— [ १ ] माहिती समजण्यास सुलभ अशा तऱ्हेनें लिहिली जावी.

[ २ ] माहिती महाराष्ट्राविषयीं सविस्तर, हिंदुस्थानची बरीचशी, आणि इतर देशांची संक्षेपानें द्यावयाची.

[ ३ ] महत्वाच्या विषयांवर चांगला अभ्यास करूं पाहणारास अधिक माहिती होण्यासाठीं, आम्हांस आधारभूत अधिक अभ्यासास उपयोगी अशा ग्रंथांची माहिती लेखांतीं द्यावयाची.

[ ४ ] लेख होतां होईतों फार लांब लिहावयाचे नाहींत. आठ पृष्ठांपेक्षां अधिक लांबीचा लेख क्वचितच यावा.

[ ५ ] चित्रें देतांना पुस्तकसौंदर्यापेक्षां विषयाच्या फोडीकडे अधिक लक्ष पुरवावें नकाशे, भूमितिविषयक आकृती, प्राणिशास्त्रावरील लेखाच्या स्पष्टीकरणासाठीं पशुपक्ष्यांचीं चित्रें अवश्य घालावीत.

[ ६ ] ज्या दिवशीं तह होईल त्या दिवसापर्यंतचा इतिहास ज्ञानकोशांत आणावयाचा, असें अगाऱ्या राजकीय, सामाजिक व आर्थिक इतिहासाचें धोरण असावें

सांस्कृतिक-सांस्कृतिक भाग म्हणजे इतिहास, वाङ्मय, कलाकौशल्यें व लोकांची बौद्धिक प्रगति दाखविणारें तत्वज्ञान, यासंबंधाच्या धोरणाचीं मुख्य अंगें येणेंप्रमाणें:--

भारतीय संस्कृतीचें म्हणजे हिंदु संस्कृतीचें आणि हिंदुस्थानीय कलाकौशल्याचें विवेचन जितकें सविस्तर देतां येईल तितकें द्यावयाचें. हिंदुस्थानांत वेदकालापासून आजच्या प्रस्थानत्रयीपर्यंतचे जे अनेक विचारसंप्रदाय झाले त्यांची माहिती सविस्तर द्यावयाची. बौद्ध, जैन, लिंगायत, महानुभाव इत्यादि संप्रदायासंबंधानें तटस्थवृत्ति धारण करून लेख लिहिले जावे. निरनिराळ्या संप्रदायाचीं मतें चुकीचीं कीं बरोबर याविषयीं विवेचन ज्ञानकोशकारास कर्तव्य नाहीं. निरनिराळ्या संप्रदाच्या मतांचें स्पष्टीकरण करावयाचें. त्याचें एकंदर भारतीय विचारौघात स्थान स्पष्ट करावयाचें. संप्रदायाच्या संकोचाविषयीं जी कारणें वाटतील तीं द्यावयाचीं. वादविवाद संप्रदायांच्या मतांच्या सत्यासत्यविवेकासाठीं करावयाचा नसून फक्त अमक्या संप्रदायाचें अमुक एक मत आहे, काय येवढ्यापुरताच आला तर येऊं द्यावयाचा.

इतिहासविषयक लेखात गतकालीन वास्तविक स्थिति जितकी ज्ञात असेल अगर तिजसंबंधानें जितकी माहिती आज संशयरहित असेल तितकीच द्यावयाची. गतकालासंबंधीचें सत्य आणि गतकालासंबंधानें समजूत यांचें पृथक्करण जितकें स्पष्ट होईल तितकें करावयाचें. ऐतिहासिक प्रश्नासंबंधानें नवीन शोध करण्याचें काम ज्ञानकोशकाराचें नाहीं. झालेला शोध, अगर शोधार्थ झालेला प्रयत्न यांचें एकीकरण करून तें सुलभतेनें वाचकांपुढें मांडावयाचें हेंच ज्ञानकोशाचें कार्य आहे.

आधुनिक सामाजिक परिस्थितीसंबंधानें जितकी माहिती जुळवून आज मांडतां येईल तितकी मांडण्याचा प्रयत्न करावा. याप्रमाणें नृत्य, व्यापार, जातींची माहिती यांविषयीं ग्रंथांत नसलेली माहिती गोळा करण्याचा थोडाबहुत प्रयत्न होत आहे [ विशेष माहिती मागविली असतां मिळेल ].

शास्त्रीय विषयांच्या लेखांचें सामान्य स्वरूप येणेंप्रमाणें:--

[ १ ] शास्त्रावर सर्वसामान्य एक लेख येऊन त्या शास्त्रांत ज्या अनेक विषयांचें विवेचन होतें, त्या विषयांवर निराळे लेख यावे. जेथें शक्य असेल तेथें सर्वसामान्य वाचकांस लागणारा मजकूर आणि विशेष उपयोगी पडणारा मजकूर यांचें पृथक्करण केलें जावें व शक्य झाल्यास ते निरनिराळ्या टाईपांत यावे.

[ २ ] नवीन पाहिलेल्या संज्ञा ज्या परकीय भाषांच्या शब्दांचें रूपांतर असतील तेथें मराठी संज्ञेच्या शेजारींच कंसात परकीय संज्ञा दिली जावी.

[ ३ ] ज्ञात वस्तूंच्या साहाय्यानें अज्ञात वस्तूंची माहिती करून द्याव-याची या अध्यापनशास्त्राच्या नियमानुसार असें ठरावयाचें कीं, शास्त्रीय विष-याची माहिती शास्त्रीय नांवाखालीं न देतां लोकपरिचित नांवाखालीं द्यावयाची; उदाहरणार्थ, माशी व विंचु या सदराखालीं प्राणिशास्त्रदृष्ट्या ज्या कुलांत अगर वंशात हे प्राणी मोडतात त्या कुलांची व वंशाची माहिती दिली जावी.

[ ४ ] शास्त्रीय संज्ञा पूर्वीच्या लेखकांनीं वापरल्या असतील त्या घ्याव-याच्या किंवा नाहीं, याचा विचार केल्याशिवाय नवीन संज्ञा वापरावयाच्या नाहींत. ज्ञानकोश पूर्वीच्या लेखकांनीं वापरलेल्या संज्ञांस बंद नाहीं; पण पूर्वीच्या लेखकांनीं वापरलेल्या संज्ञांचा विचार केल्याशिवाय नवीन संज्ञा घ्यावयाच्या नाहींत हें ध्येय समोर ठेवावें.

[ ५ ] एकाच शास्त्रावर [ उदाहरणार्थ; ज्योतिष, संगीत, नृत्य, युद्धकला, वैद्यक, गणित, रसायन इत्यादि ज्ञानविषयावर ] जर जुने भारतीय व अर्वाचीन यूरोपीय यांची विवेचनाची पद्धति भिन्न असेल तर जुनें आणि नवें या दोहोंसाहि स्थान द्यावयाचें. पण त्याची भेसळ होऊं द्यावयाची नाहीं.

[ ६ ] मंत्रशास्त्र, फलज्योतिष व अतींद्रिय ज्ञान देण्याचा बाणा बाळग-णाऱ्या "शास्त्रा" संबंधानें संपादकीय संशयवृत्ति ठेविली जाऊन, शास्त्रांचे ग्रंथ व त्यांच्या वाढीचें ऐतिहासिक विवेचन हीं दिलीं जावीं व त्या शास्त्रांच्या पुरस्कर्त्यांचा आग्रह काय आहे तो दिला जावा.

यशवंत रामकृष्ण दाते ( बी. ए. एल्एल्. बी. )
संपादकीय कार्यव्यवस्थापक.

---

( परिशिष्ट नं. ११. )

## ज्ञानकोशसंस्थेची संपत्ति व तिचें शिक्षणसंस्था व ज्ञानोत्पादक संस्था या दृष्टीनें अवलोकन.

[ १।९।२० तारखेच्या अहवालांतील उतारा ]

ज्ञानकोश करतांना अत्यंत अवश्य अशींच पुस्तकें घ्यावयाचीं असा नियम करून देखील बरींच पुस्तकें घ्यावीं लागलीं आणि त्यामुळें एक महत्त्वाचा संग्रह तयार झाला याची हिशोबी किंमत सुमारें रु. ५००० आहे. तथापि या संग्रहाचें महत्त्व तो ज्या पद्धतीनें व ज्या तत्त्वांवर तयार झाला त्यामुळें मोठें आहे. आपल्या हिताहिताच्या प्रश्नांविषयीं देशांत ज्ञानवृद्धि

व्हावीं आणि सर्व प्रकारचें ज्ञान लोकांस व्हावें हा हेतु साध्य करण्यासाठीं बद्धपरिकर झालेल्या लोकांचा हा ग्रंथसंग्रह होय.

हा ग्रंथसंग्रह करण्यासाठीं आणि ज्ञानकोश तयार करण्याची अवश्य पायरी म्हणून 'महाराष्ट्रीय वाङ्मयसूचि' तयार करावी लागली. तिच्या कांहीं प्रती उरल्या आहेत.

ज्ञानकोश म्हणजे सर्व विषयांवरील वाङ्मय होय. ज्ञानकोशकारांचें मुख्य काम म्हणजे सर्व विषयांवरील उपलब्ध ज्ञानाचें संकलन करून तें थोड-क्यांत व सुसंबद्ध रीतीनें मांडावयाचें याच्याकरितां प्रथम तयारी म्हणजे ज्ञानक्षेत्राचे अवलोकन करणें ही होय. जगांत निरनिराळ्या विषयांवरील ज्ञानाची प्रगति कोठपर्यंत झाली आहे व कोणकोणत्या विषयांवरील ज्ञान जगापुढें मांडलें गेलें आहे याचें निरीक्षण करतांना आणि त्या निरीक्षणावर ज्ञानकोशाची रूपरेषा आखतांना आपणापुढें मुख्य गोष्ट जी येते ती ही कीं, जें ज्ञान आज ज्ञानकोशरूपानें महाराष्ट्रीय वाचकवर्गापुढें मराठींत मांडावयाचें आहे त्यापैकीं किती ज्ञानाचें क्षेत्र महाराष्ट्रीय वाङ्मयानें आक्रमण केलें आहे? हें क्षेत्र कळावें म्हणून ज्ञानकोशकारांनीं प्रथम महाराष्ट्रीय वाङ्मयसूचीचें काम हातीं घेऊन तें फारच अल्पावधींत संपविलें.

या वाङ्मयसूचीवरून आपणांस असें दिसून येईल कीं एकंदर ज्ञानक्षेत्राचा फारच थोडा अंश मराठी वाङ्मयानें व्यापिला आहे. ज्ञानक्षेत्राचें परीक्षण करण्याकरितां व मराठी वाङ्मयांतून उपलब्ध होणाऱ्या माहितींत भर टाकण्याकरितां इतर भाषांतील ग्रंथांकडे नजर टाकावी लागते. प्रमुख यूरोपीय भाषांतील ग्रंथांनीं किती ज्ञानागावर प्रकाश पडला आहे हें पाहण्याकरितां ब्रिटिश म्युझियमच्या विषयवार, व यूरोपीय संस्कृत, प्राकृत, पाली, मराठी, गुजराथी इत्यादि भाषांतील कॅटलॉग मागवावे लागले.

संस्थेस स्वतःची ग्रंथशाला पूर्णपणें करतां येणें शक्य नाहीं. बरेचसे ग्रंथ फार किंमतीचे असल्यामुळें व ते मुंबई येथील रॉयल एशिआटिक सोसायटीच्या व कलकत्ता येथील इंपीरियल या लायब्ररीमध्यें मिळण्यासारखे असल्यामुळें त्यांचा तेथून आणूनच उपयोग करण्यांत आला. फक्त अवश्य तेवढेच विकत घेण्यांत आले.

ज्ञानकोशकारांस स्वतःचा—विशेषतः वैदिक वगैरे ग्रंथांचा—संग्रह बराच वाढवावा लागला. आतांपर्यंत ज्ञानकोशाचा ग्रंथसंग्रह किती वाढला आहे याची कल्पना थोडक्यांत येथें देतों.

**ज्ञानकोशग्रंथसंग्रह**—वैदिक वाङ्मयामध्यें चारही वेदांच्या संहिता, यजुर्वेदाच्या तैत्तिरीय शाखेशिवाय माध्यंदिन, काण्व, मैत्रायणसंहिता, पंडितकृत वेदार्थयत्न, शुक्ल-कृष्ण यजुर्वेदासह सर्व संहितांचीं इंग्रजी भाषांतरें, सर्व वेदांच्या

पदानुक्रमणिका व मॅक्डोनेल आणि कीथ याची वैदिकविषयसूचि इत्यादि ग्रंथ प्रथम येतात. ब्राह्मणग्रंथांमध्यें ऐतरेय, तैत्तिरीय, शतपथ, शांखायन, सामविधान, षड्विंश, दैवत, गोपथ हीं प्रमुख आहेत. आरण्यक व उपनिषद्ग्रंथामध्यें ऐतरेय व तैत्तिरीय आरण्यकें आणि ईशावास्य, केन, कठ, ऐतरेय, छांदोग्य, तैत्तिरीय, प्रश्न, बृहदारण्यक, माण्डुक्य, मुंडक, श्वेताश्वतर, गणेशाथर्वशीर्ष व नृसिंहपूर्वोत्तरतापनीय, उपनिषत्समुच्चय इत्यादिकांचा संग्रह आहे. श्रौतसूत्रांपैकीं आश्वलायन, द्राह्यायण, बौधायन शांखायन, सत्याषाढ इत्यादि सूत्रें व आधानपद्धति वगैरे ग्रंथ मिळविले आहेत, गृह्यसूत्रांत, आश्वलायन, गोभिलीय, शांखायन, पारस्कर, खादिर, सत्याषाढ, आपस्तंब, द्राह्यायण, व संस्काररत्नमाला हे ग्रंथ जमविले आहेत. वेदांगामध्यें शिक्षादिवेदषडंग, तैत्तिरीय प्रातिशाख्य-निरुक्त चरणव्यूह-बृहद्देवता इत्यादि ग्रंथ संगृहीत केले आहेत. याखेरीज वेदाभ्यासविषयक ग्रंथांमध्यें 'ओरायन', हिस्टॉरिसिटीज ऑफ आर्यन सिव्हिलिझेशन, आर्येतिहास व भूगोल, आर्यगृहस्थिति-नीति-शौर्य व उन्नति, आर्यदेश व तत्संबंधीं वृत्तान्त, आर्य लोक व त्यांचें बुद्धिवैभव, आर्य लोकांचें मूलस्थान, आर्यावर्तिक होम अँड इट्स आर्क्टिक कॉलनीज, प्रस्थानभेद इत्यादि ग्रंथ महत्त्वाचे आहेत.

स्मृति व धर्मशास्त्र या विषयावर स्मृतिसमुच्चय अष्टादशस्मृति, याज्ञवल्क्यस्मृति, स्मृतिकौस्तुभ, स्मृत्यर्थसार, गौतम, बौधायन इत्यादि धर्मसूत्रें आचारभूषण, आचारेन्दुशेखर, पितृमेधसूत्रें, द्वादशमयूख, दत्तकमीमांसा, दत्तकचंद्रिका, यतिधर्मसंग्रह, व्यवहार बाळंभट्टी इत्यादि अनेक ग्रंथ आहेत.

दर्शनें व वेदान्त या विषयावर षड्दर्शनचिंतनिका, सर्वदर्शनसंग्रह, पातंजल. योगसूत्रें, अनेक भाष्यसहित ब्रह्मसूत्र, वेदान्तसूत्रें, खण्डनखंडखाद्य, जीवन्मुक्ति विवेक, जैमिनीय न्यायमाला, त्रिस्थलीसेतु, यतीन्द्रमतदीपिका-वाक्यवृत्तिः इत्यादि सुमारें ४५ ग्रंथ आहेत.

पुराणग्रंथांमध्यें रामायण, महाभारत व भागवत हीं मूळ व भाषांतरासह असून महाभारतासंबंधीं वर्णानुक्रमणी, विषयानुक्रमणी व सोरेन्सनची नामसूची हे ग्रंथ आहेत. याखेरीज अग्निपुराण, पद्मपुराण, ब्रह्मपुराण, मत्स्यपुराण वायुपुराण, विष्णुपुराण, सौरपुराण, नृसिंहपुराण, स्वयंभूपुराण, सूतसंहिता, बृहद्ब्रह्मसंहिता, जैमिनीय अश्वमेध इत्यादि अनेक पुराणग्रंथ असून त्यांस साह्यभूत असे कुरुयुद्धांतील भारतीय राष्ट्रें, कलियुगांतील राजघराणीं, पुराणनिरीक्षण इत्यादि उपग्रंथ आहेत व जैन सांप्रदायिक आदिपुराण, उत्तरपुराण, महावीरपुराण, हरिवंशपुराण इत्यादि पुराणग्रंथ आहेत.

तांत्रिकवाङ्मयापैकीं तंत्राभिधान, षट्चक्रनिरूपण, प्रपंचसारतंत्र, कुलचूडामणितंत्र, काळीविलासतंत्र, श्रीचक्रसंभारतंत्र, राजतंत्र, महानिर्वाणतंत्र

ज्ञानार्णवतंत्र, तंत्रतत्त्व, तत्रातील सृष्ट्युत्पत्ति इत्यादि तंत्रग्रंथ आहेत.

वाङ्मयेतिहास या विषयावरील संग्रहांत-विशेषतः संस्कृत वाङ्मयाच्या इतिहासावर-प्राचीन संस्कृत वाङ्मयाचा इतिहास-मॅक्समुल्लर; भारतीय वाङ्मयाचा इतिहास—वेबर, विंटरनित्झ [ जर्मन आणि इंग्रजी ]; सिंहली वाङ्मयाचा इतिहास—गायजर; संस्कृतटेक्स्ट—म्यूर; हे ग्रंथ मुख्य आहेत.

भाषा व व्याकरण या विषयावरील ग्रंथांत कानडी वाङ्मय, अंदमानी मॅन्युअल, खासी ग्रामर, चिनी मॅन्युअल, जपानी भाषा, द्राविड भाषा-प्राकृतप्रकाश, फ्रेंच व्याकरण, मराठी-बंगाली शिक्षक, अवेस्ता व्याकरण, वैदिक व्याकरण, पाणिनीय सूत्रसूची, परिभाषेन्दुशेखर, सुबन्त व तिङ्तविचार, पिशेलचें प्राकृत व्याकरण, तुलनात्मक भाषाशास्त्र, भाषाशास्त्र-संस्कृत व्याकरणपद्धति, सौराष्ट्रव्याकरण, नवीन मराठी व्याकरण इत्यादि ग्रंथ महत्त्वाचे आहेत.

याखेरीज कृषिशास्त्र, गणित व ज्योतिःशास्त्र, पदार्थविज्ञानशास्त्र, भूस्तर-शास्त्र, रसायनशास्त्र,मानसशास्त्र इत्यादि विषयांवर मराठींत उपलब्ध असलेले शक्य ते सर्व ग्रंथ मिळविले आहेत.

भरतखंडांतील बौद्ध, जैन इत्यादि संप्रदायविषयक ग्रंथांमध्यें जैनसंप्र-दायी पुराणग्रंथांखेरीज इतर सुमारें १२ महत्त्वाचे ग्रंथ, बौद्ध वाङ्मयांपैकीं जातक कथा, बौद्धवाङ्मयेतिहास—विंटरनित्झ ( जर्मन व इंग्लिश ), बौद्धपर्व, बौद्धकला-बर्जेस, इत्यादि ग्रंथ व पारशी धर्मविषयक अवेस्ता भाषेतील गेल्ड-नेर याचा मोठा ग्रंथ, अवेस्ता कोश,झेंद अवेस्ता-डार्मेस्टेटर,गाथा,वेन्दिदाद, यश्न वगैरे यांचे गुजराथी पाठ, जे. जे. मोदीकृत पारशी संस्कारावरील पुस्तकें मुसुलमानी कुराणाचें भाषांतर, ख्रिस्ती बायबल व मिशनविषयक ग्रंथ इत्या दिकांचा संग्रह केला आहे.

त्याप्रमाणेंच निरनिराळ्या जातींच्या माहितीवरील सुमारें शंभरावर पुस्तकें जमविलीं आहेत.

इतिहास व भूवर्णन या विषयांमध्यें बाह्यदेशवर्णनात्मक ग्रंथ सुमारें ४० असून त्यांत हिरोडोटसचा ग्रंथ,मेरीव्हेलचें रोमन साम्राज्य यांसारखे महत्त्वाचे ग्रंथ आहेत. भरतखंडाच्या प्राचीन इतिहासाबद्दल व्हिन्सेंट स्मिथ, कृष्णस्वामी अय्यर, पावगीचें भारतीय साम्राज्य, रॅप्सन यांचा नाण्यावरील ग्रंथ, गुप्त व अशोककालीन शिलालेख, मुजुमदार यांचा समाजस्थितीसंबंधीं ग्रंथ इत्यादि महत्त्वाचे ग्रंथ असून, राजतरंगिणी, दिल्ली, धारचें प्राचीन वृत्त, नेपाळवर्णन, पल्लव, मध्यप्रान्त व वऱ्हाड यांमधील शिलालेख, मध्यप्रांत व वऱ्हाडचा इतिहास इत्यादि अनेक उपयुक्त ग्रंथ आहेत.

महाराष्ट्रेतिहास या विषयावर तर फारच महत्त्वाचा संग्रह जमविला आहे. यामध्यें बखरी, कागदपत्रें छापलेले ग्रंथ, राजवाडे यांचे साधनांचे खंड, निरनिराळया घराण्यांचे इतिहास, खरे, पारसनीस, यांनीं प्रसिद्ध केलेले व काव्येतिहासंग्रह, इतिहाससंग्रह, इतिहास आणि ऐतिहासिक इत्यादि नियतकालिकांत प्रसिद्ध झालेले कागदपत्र शक्य तितके जमा केलेले आहेत.

अर्थशास्त्र व व्यापारविषयक सुमारें ३० मुख्य मुख्य ग्रंथ जमविले आहेत.

संदर्भग्रंथांमध्यें प्रथम एन्सायक्लोपीडिया ब्रिटानिका, एन्सायक्लोपीडिया ऑफ रिलिजन अँड एथिक्स, सायक्लोपिडिया ऑफ इंडिया, तेलगु एन्सायक्लोपीडिया, भरतखंडाचा अर्वाचीन कोश, हे मोठे कोश असून शब्दकोशांमध्यें मोल्स्वर्थ आणि कँडी, बाबा पदमजी, रानडे यांचे इंग्रजी–मराठी व मराठी–इंग्रजी कोश, आपटे यांचे संस्कृत–इंग्रजी व इंग्रजी संस्कृत कोश, संस्कृत–प्राकृत कोश ( गोडबोले ), गीर्वाणलघुकोश, अमरकोश, हिंदीकोश, इंग्रजी–जर्मन व जर्मन–इंग्रजी कोश, सिंधीकोश, इंग्रजीकोश २, अवेस्ताकोश हे प्रमुख आहेत. त्यानंतर ब्रिटिशम्यूझियम, इंपीरियल लायब्ररी, रॉयलएशियाटिक लायब्ररी–मुंबई शाखा, व इतर अनेक कॅटलागांचा संग्रह केला आहे. १९११ च्या खानेसुमारीचे रिपोर्ट व इंपिरियल गॅझेटिअर हिंदुस्थानसरकाराकडून मिळालेले आहेत. मुंबईइलाख्याचे डिस्ट्रिक्ट गॅझेटियर रा. बेदरकर वकील उमरावती यांनीं वापरावयास दिले आहेत. याखेरीज प्रांतिक सरकारचे ॲडमिनीस्ट्रेशन रिपोर्ट दरवर्षी येत आहेत.

वरील ग्रंथाखेरीज विविध विषयांवरचे अनेक ग्रंथ कोशानें खरेदी केले आहेत. व अशा रीतीनें त्याचें ग्रंथभांडार फार उपयुक्त झालें आहे.

भुक्तोर्वरित—नतर ज्या विषयांवर विशेषत परिश्रमच आजपर्यंत न झाल्यामुळें फारसें वाङ्मय उपलब्ध नाहीं अशा विषयांची मांडणी करण्याकरितां पूर्व तयारी करावी लागली. उदाहरणार्थ ऋग्वेदांतील ऐतिहासिक व सामाजिक माहिती मिळविण्याकरितां सर्व ऋग्वेद संहितेचें पादशः पृथक्करण करावें लागलें. निरनिराळया वेदसंहितांच्या तुलना नव्यानेंच कराव्या लागल्या व ऐतिहासिक कागदपत्रांचेंहि पृथक्करण करण्याचें काम जोरानें चालू आहे. मराठी किंवा इंग्रजी भाषेंत वैदिक विषयावर चांगलेसे ग्रंथ नसल्यामुळें कांहीं जर्मन ग्रंथांचीं भाषांतरें करावीं लागलीं व हीं भाषांतरें एकदम जर्मन भाषेंतून मराठींत करणारे लेखक न मिळाल्यामुळें प्रथम जर्मनमधून इंग्रजींत व नंतर इंग्रजीमधून मराठींत याप्रमाणे काम करावें लागलें. असे बरेचसे ग्रंथ जर्मनमधून प्रथम इंग्रजींत आणून नंतर मराठींत उतरण्यांत आले. त्याप्रमाणेंच अवेस्ता जाणणारा मराठीमध्यें लेख लिहून देण्यासारखा लेखक न मिळाल्या-

मुळें तेंहि बरोबर काम आरंभापासूनच करावें लागलें व त्याची पूर्व तयारी म्हणून अवेस्ताच्या करणावें व अवेस्ताभाषेतील गाथा वगैरे कांहीं ग्रंथांचे मराठींत तर्जुमे करावे लागले.

तेव्हां याप्रमाणें अनेक प्रकारचें पूर्वतयारीच्या स्वरूपाचें साहित्य ज्ञानकोशकारांना कार्यारंभात तयार करून घ्यावें लागलें आहे. ग्रंथसंग्रहहि बराच वाढवावा लागला आहे व ज्ञानकोश छापून झाल्यानंतर या पूर्वतयारीरूपी साहित्याचा प्रत्यक्ष ज्ञानकोशांत अंतर्भाव करणें अशक्य आहे. या भुकोर्वेरितांचें पुढें काय करावयाचें व ज्ञानकोशाच्या ग्रंथसंग्रहाची पुढें नीटरग व्यवस्था कशी होईल याची तजवीज करणें हे प्रश्न ज्ञानकोशाच्या भागीदार वगैरे हितचिंतकांनीं आतांपासूनच विचारात घेण्यासारखे आहेत. [ हा संग्रह या वेळच्या सात आहे. त्यानंतर पुढें यांत अनेक पुस्तकांची भर पडत गेली आहे. ]

**भुकोर्वेरितांचें स्वरूप**—इतिहास लिहिण्यापूर्वीं अनेक तऱ्हेची सामुग्री जुळवावी लागते. जेव्हां हें काम मंदपणानें चालतें तेव्हां जो कामें करतो तो आपलें काम पुढच्यास उपयोगी पडावें म्हणून छापून ठेवतो. उदाहरणार्थ, एका विशिष्ट प्रकारचे निरनिराळ्या ग्रंथांत आलेले शब्द. एक संशोधक तेवढेंच काम करून मोकळा होतो. फावल्या वेळांत जें संशोधन होतें त्याच्या अनेक पट संशोधन माणसें एका कामांतच पूर्णपणें गढलीं असतां व्हावयाचें. शिवाय हा कच्चा माल जो संशोधक छापून काढतो तो पुढें केव्हां तरी कोणीतरी संगतवार इतिहास लिहावा या इच्छेनें छापतो. ज्ञानकोशांत संगतवार माहिती द्यावयाची, फक्त निर्णय द्यावयाचे, पाल्हाळास फार वेळ नाहीं, अशी स्थिति असल्यामुळें पुष्कळ गोष्टींत चूक टाळण्यासाठीं संपूर्ण अवलोकन अगोदर करून मग संक्षेप द्यावा लागतो. किती परिश्रम केल्यानंतर आम्हीं विशिष्ट ओळ लिहिली आहे याची कल्पना आमची पूर्व तयारी प्रत्यक्ष पाहिल्याशिवाय होणें अशक्य आहे. आणि जितक्या मानानें ते परिश्रम लोकांस दिसणार नाहींत तितक्या मानानें आमच्या विधानांवर लोकांचा विश्वास बसणार नाहीं. यासाठीं जें संशोधन अगोदर होऊन मग निर्णय ज्ञानकोशांत समाविष्ट करण्यांत येतो तें संशोधन चिकित्सकांस अवश्य अशा संशयी दृष्टीनें लोकांना तपासण्यास सुलभ जावें यासाठीं कांहीं प्रयत्नहि झाला पाहिजे. ज्ञानकोशाच्या कच्च्या मालाचें महत्त्व पंडितवर्गांत थोर आहे. याचें स्वरूप दाखविण्यासाठीं यापैकीं कांहीं मालाचें वर्णन दिलें पाहिजे.

( १ ) ऋग्वेदांतील प्रत्येक पादाचें तो पाद स्तुतिपर याचनापर किंवा ऐतिहासिक महत्त्वाचा आहे या दृष्टीनें झालेलें वर्गीकरण.

( २ ) चारहि वेदांच्या संहितांतील सर्व शब्दांचें विषयानुसार वर्गीकरण करतां यावें या हेतूनें प्रत्येक शब्दाच्या केलेल्या कार्डां १॥ लाखावर.

( ३ ) प्रत्येक जिल्ह्याचे शतकानुसार राज्यकर्ते दाखविणारें आणि स्थानिक इतिहास आणि विशिष्ट काळास पुरावा काय आहे तो दाखविणारें कोष्टक.

( ४ ) तात्पुरत्या केलेल्या शकावल्या.

( ५ ) पुराणांतील अनेक महत्त्वाच्या उल्लेखांचीं टांचणें.

हें सर्व साहित्य लोकांपुढें छापून बाहेर पडलें नाहीं तरी कोठें तरी सार्वजनिक ठिकाणीं सुरक्षित ठेवावें हें अवश्य आहे ज्ञानकोश प्रसिद्ध झाल्यानंतर संस्था मोडावी किंवा कायम ठेवावी याचा विचार करतांना या मालाचा विचार करावा.

**ज्ञानकोश विद्यापीठ**—ज्ञानकोशाचें कार्यक्षेत्र फार विस्तृत असल्यामुळें अनेक लेखक निरनिराळ्या कार्याकरितां योजलेले असतात. या सर्व लेखकांमध्यें एकसूत्रीपणा रहावा व परस्परविचारविनियम व्हावा म्हणून " ज्ञानकोश विद्यापीठ " नांवाची संस्था स्थापन करावी लागली. ज्ञानकोशांतील सर्व लेखकवर्ग या सभेचे सभासद गणले जातात. या सभेची बैठक प्रत्येक पंधरवड्यास होते त्यावेळीं सर्वांनीं एकत्र जमून एकानें कांहीं तरी विषय विवेचनास घेऊन त्याला अनुसरून इतरांनीं संभाषणात्मक वादविवाद करावयाचा व आपल्या वाचनांत प्रस्तुत विषयासंबंधीं काय माहिती आली असेल ती सांगावयाची असा कार्यक्रम असतो. या संस्थेचीं अधिवेशनें नियमितपणें आतांपर्यंत चालत आलेलीं आहेत व मुख्य कार्य पुण्यास आल्यापासून वैदिक विषयांवर १०, ऐतिहासिक विषयांवर ३, भौतिक विषयांवर २, व इतर विषयांवर ५, अशीं व्याख्यानें झालीं. या सभेच्या योगानें ज्ञानकोशाच्या निरनिराळ्या संपादकीय खात्यांत कोणकोणतें काम चाललेलें आहे. व निरनिराळे लेखक कोणकोणती नवीन माहिती तयार करीत आहेत हें सर्व लेखकांस समजतें व एकमेकांच्या ज्ञानाचा परस्परांस फायदा मिळून लेखनाच्या कामास मदत होते.

**समाजशास्त्रमंडळ**—ज्ञानकोशाकरितां अशाच तऱ्हेचें दुसरें एक कार्य ज्ञानकोशांतील मंडळीस पुढाकार घेऊन करावें लागलें; तें समाजशास्त्रमंडळाची स्थापना हें होय. या मंडळाचे डॉ. केतकर व रा. दाते हे चिटणीस असून त्यांत इतिहाससंशोधक रा. वि. का. राजवाडे, रा. द. वा. पोतदार, रा. शं रा. राजवाडे, सरदार खं. चिं. मेहेंदळे व रा. स. मा. दिवेकर हे सभासद आहेत. समाजशास्त्रीय विषयांवर मराठींत मुळींच वाङ्मय नसून इंग्रजींतहि फार थोडें आहे. तेव्हां या विषयाचा फारसा अभ्यासच इकडे झालेला नाहीं. याकरितां या मंडळामार्फत अभ्यासवर्ग तयार करणें व समाजशास्त्रीय वाङ्मयाचा मराठींत पाया घालणें या गोष्टी करावयाच्या आहेत व

ऱ्यांना ज्ञानकोशाच्या कामीं फार उपयोग होणार आहे हें निराळें सांगावयास नकोच. ही संस्था अर्थातच स्वतंत्र आहे व तिच्या सदस्यत्वाची फी रु. २५० आहे.

यशवंत रामकृष्ण दाते
संपादकीय कार्यव्यवस्थापक.

[ ज्ञानकोश विद्यापीठ आणि समाजशास्त्रमंडळ या दोन्ही संस्था दीड वर्षांवर टिकल्या नाहींत ज्ञानकोशाच्या गिऱ्हाइकीच्या वाढीसाठीं डॉ. केतकर यांस पुष्कळ फिरावें लागलें तेव्हां या दोन्ही संस्थांकडे दुर्लक्ष करावें लागलें.]

---

## ( परिशिष्ट नं. १२ )

## पाध्ये यांचे आक्षेप.

ता. २४-१०-१९२० रोजीं शेहरहोल्डरांच्या साधारण सभेंत हिशेब तपासण्यास मुकरर केलेल्या आह्मां कमेटीदारांचा रिपोर्ट खालील प्रमाणें आहे:—

१ कंपनीच्या हुकुमाप्रमाणें ता. २६ माहे सप्टेंबर सन १९२० रोजीं मंडळाच्या भागीदारांच्या सभेंत मंजूर करण्याकरितां जो जमाखर्च, पुढें मांडला गेला होता, तो तपासून रिपोर्ट करणें आमचें काम आहे. त्या जमाखर्चांत मंडळाच्या संस्थापनेपासून ता. ३१ मार्च १९२० पर्यंतचा हिशेब आलेला आहे. जमाखर्चाचे कांहीं आंकडे दरसालचे आंकडे मिळवून झालेले आहेत; व कांहीं आंकडे एप्रिल १९१९ पासून १९२० पर्यंतचे आहेत. करितां भागीदारांपुढें ठेवलेल्या पूर्ण ताळेबंदाबद्दल यथाप्रमाण रिपोर्ट करण्यापूर्वी, मागील सालच्या हिशेबवह्या, हिशेबांतील रकमांची मंजुरी अथवा गैरमंजुरी दाखविणारे डायरेक्टरांच्या सभेंतील ठराव, त्या हिशेबाच्या संबधानें ऑडिटरनें केलेले रिपोर्ट, व्हौचरच्या फायली व इतर वेळोवेळीं लागणारे कागद आह्मास देण्याविषयीं विनंति केली पण ती कंपनीच्या चालकांनीं मान्य केली नाहीं. डायरेक्टरांच्या प्रोसिडिंग संबंधीं कांहीं सुटीं टिपणें, अव्वलपासूनची खतावणी, १९१९-२० सालचा रोजनामा व व्हौचर फायली (१९-२०) येवढेच कागद आजपर्यंतच्या खटपटीनें मिळाले. हिशेब व मागील मिनीट बुकें, पत्रव्यवहार वगैरे कागद न दाखवितां प्राक्झींच्या बळावर आंकड्यांची अंत्री पास करून घेण्याविषयीं सुरवातीपासून अखेरपर्यंत मॅनेजर यांनीं जो हट्ट दाखविला, तो २४ आणि २६ तारखेच्या सभेंत भागीदारांनीं

व्यक्त केलेल्या इच्छेच्या व ठरावाच्या विरुद्ध असताहि त्यांनीं पुष्कळ अंशीं तडीस नेला आहे. हल्लीचे चेअरमन डॉ. खरे ह्यांनीं कांहीं बाबतींत औदार्य दाखविलें नसतें तर आह्मांस हल्लींचा तुटपुंजा रिपोर्टहि करता आला नसता. हिशेब पहाण्यास सुरवात केली तेव्हां पहिले दोन दिवस कंपनीचे हिशेबनवीस रा. टिळक ह्यानीं मोकळ्या मनानें हिशेब समजावण्याची व आंकडेमोड करण्याविषयींची तसदी घेतली रा० टिळक ह्यानीं हिशेब व्यवस्थित लिहिले आहेत व त्यांस दोन दिवसांनंतर त्याच्या लगतच्या वरीष्ठांपासून उलट हुकूम न मिळता,तर सर्व हिशेब त्यांच्या साह्यानें अखेरपर्यंत समजणें सुलभ झालें असतें. कंपनीनें ठेवलेल्या हिशेबांत अथवा व्हौचरफायलींमध्यें स्वरूपाची चूक नसून—म्हणजे लेखकाची चूक नसून—पद्धतीची चूक आहे. तिचा उल्लेख आह्मी पुढें करणार आहोंत. कंपनीचे कागदपत्र मोकळ्या मनानें कंपनीच्या चालकांनीं आमच्यापुढें न ठेवल्यामुळें आम्हांस हिशेब तपासण्याचें समाधान झालें नाहीं व आपल्यास समाधानकारक रिपोर्ट सादर करतां आला नाहीं, यात आमचा नाइलाज आहे.

२ कंपनीच्या कायद्यानें आखून दिलेल्या नक्षाप्रमाणें किंवा होतां होईल तों त्याचेजवळ येणाऱ्या नक्षाप्रमाणें खुलासेवार ताळेबंद ठेविला असता तर भागीदारांच्या पुढें पुष्कळ तपशील आला असता. पण हल्लींचा ताळेबंद इतका संक्षिप्त व संदिग्ध भाषेत लिहिला आहे कीं त्याचा अर्थ वाचणारास समजत नाहीं; करितां हा ताळेबंद कायद्याप्रमाणें नाहीं असा आमचा पहिला आक्षेप आहे.

उदाहरणार्थ, 'कर्ज', 'ठेव', 'तसलमात जमा', 'मिस् कोहून भाड्यासाठीं', 'तसलमात नांवे', 'व्याज दिलेलें', 'मिळालेलें व्याज', 'सादीलछपाई' वगैरे उल्लेख अर्थाचा खुलासा करणारे नाहींत. आंकड्यांवर टीपा देऊन रकमा कमी अधिक झाल्याविषयीं निराळा खुलासाहि भागीदारांपुढें मांडलेल्या ताळेबंदास जोडून दिलेला नाहीं. ताळेबंदासंबंधानें आंकड्यांचा व तपशीलांचा समज करून घेण्यासाठीं कांहीं भागीदारांनीं खतावणी व रोजखर्डा वगैरे अवश्य कागद ता. २६ । ९ । २० रोजीं मागविले होते ते कंपनीच्या ऑफिसांत नव्हते म्हणून ता. २४ ची सभा मुद्दाम भरविली होती, व त्या सभेच्या पूर्वी भागीदारांनीं काढलेल्या शंका समाधान करण्याचीं अवश्य साधनें देण्याविषयीं ठरविलें गेलें असताहि वेळींच कागदपत्र न दाखविल्यामुळें आमची हिशेब तपासणारी कमेटी मुकरर केली गेली आहे. इतकें असूनहि अशा अधिकृत कमिटीस वाटेल तो खुलासा आणि पडताळा पहाण्यास कंपनीचे कागदपत्र पाहण्यास मनाई झाली असावी हें योग्य आहे किंवा नाहीं ह्याचा भागीदारांनीं विचार करावा.

वर दिलेल्या ताळेबंदांतील शब्द आणि वाक्यें कशीं सन्दिग्ध आहेत तीं पहा—

१ 'कर्ज' रु. २५०० काढलेलें दिसतें, पण हें काढण्याची आवश्यकता, व्याजाचा दर, कोणापासून काढलें वगैरे कांहीं खुलासा ताळेबंदावरून किंवा डायरेक्टरांच्या रिपोर्टावरून कळत नाहीं.

२ 'ठेव' लोकांच्या ठेवी ठेवणें अथवा लोकास रकमा कर्जाऊ देणें, हें ज्ञानकोश मंडळाच्या कार्यक्षेत्राबाहेर आहे असें आम्हांस वाटतें. करितां एखाद्या बाईची ठेव ठेवून तिला त्यावर व्याज देणें ह्यासाठीं डायरेक्टरांनीं विशेष ठराव केले असल्यास अथवा कंपनीच्या हेतुक्षेत्रांत बदल केला असल्यास त्याचा खुलासा झाला नाहीं. ठेवीची रकम कोणाची व काय व्याजानें आहे हें अर्थात ताळेबंदावरून कळत नाहीं.

३ ' तसलमात जमा', आणि तसलमात नांवे ' ह्या शब्दावरून होणारा बोध ह्या सदराखालील हिशेबांच्या वस्तुस्थितीस धरून नाहीं. हिशेब वह्यांवरून पाहिलें असतां असें दिसतें कीं, कंपनीच्या पैशाचा उपयोग कंपनीचे मॅनेजर डॉ. केतकर, आणि त्यांच्या हाताखालील लोक ह्यांच्या कांहीं काळ तरी खाजगीकडे होत असतो.ह्यास डायरेक्टरांनीं मंजुरी दिली असल्यास ती अर्थात आम्हांस उपलब्ध नाहीं. कंपनीच्या नोकरांच्या पगारखात्याशिवाय हीं खातीं निराळीं आहेत,हें सांगण्यास नकोच. इतकेंच नव्हे तर खुद्द डॉ. केतकर ह्यांचें खाजगीचें खातें ह्याशिवाय वेगळें आहे. असें असून सर्वसामान्य तसलमात खात्यांत डॉ. केतकर ह्यांच्याकडे पडलेल्या खाजगी रकमांची जमा व नांवें आहेत. ह्या तसलमात खात्याविषयीं विशेष ध्यानांत ठेवण्याजोगी गोष्ट अशी आहे कीं, अनेक लोकांची जमा व नांवें एकाच खात्यांत तसलमात आहेत.

हा हिशेब महाजनी पद्धतीस सोडून आहे असें आमचें मत आहे. विवक्षित इसमाकडे किती येणें आहे हें या खतावणीवरून ह्या तसलमाती पद्धतीमुळें स्पष्ट होऊं शकत नाहीं.

" मिस् कोहनभाड्यासाठीं ६९७ रु. " ही रकम मिस् कोहन यांस दिली आहे असें दिसतें. पण ती त्यांना विलायतेंतील घराच्या भाड्यासाठीं अथवा इकडे येण्यासाठीं वगैरे खुलासा ताळेबंदावरून होत नाहीं. पण ती रकम त्यांना कायमची दिली किंवा कांहीं वेळांकरितां दिली व तिला डायरेक्टराची मंजुरी आहे किंवा नाहीं कळत नाहीं. बाकीच्या सन्दिग्ध सदरासंबंधानेंहि असेंच म्हणतां येईल, परंतु इतकेंच पुरे.

४ कंपनीच्या कायद्यानें घालून दिलेल्या नक्षापासून भिन्न तऱ्हेचा ताळेबंद केल्यामुळें एवढाच घोंटाळा झाला आहे असें नव्हे, स्टॉक इन ट्रेड

अथवा कंपनीच्या कारखान्यांत तयार असलेला माल हें सदर ताळेबंदांतून अजीबात गाळलें आहे. त्यामुळें चार वर्षांच्या अखेर ताळेबंदांतील अखेर तारखेपर्यंत कंपनीच्या हातीं किती किंमतीचा माल आहे हें समजण्यास साधन नाहीं. स्टॉकबुक आहे कां विचारलें असतां तें दाखविलें गेलें नाहीं.

(१) मिस कोहन त्यांच्याकडून भाषांतर झालेलीं पुस्तकें.

(२) कंपनीनें वाङ्मय सूची नांवाच्या काढलेल्या पुस्तकाच्या कॉप्या.

(३) मिस् कोहनशिवाय इतर सुप्रसिद्ध लेखकांकडून मोबदला देऊन मिळविलेले लेख.

४ आजपर्यंतचा तयार झालेला ज्ञानकोश हा स्टॉक इन ट्रेड या सदराखालीं दाखविला जाणें जरूर होतें असें आम्हास वाटतें.

ता. २४ आणि २६ च्या डॉ. केतकर यांच्या भाषणांत वारंवार अशीं विधानें येत कीं, बॅलन्सशीट आडीटरानें तपासून कायदेशीर सर्टीफिकीट दिलें आहे, त्याच्या पलीकडे जाणें शेअरहोल्डरांचें काम नव्हे आमच्या मतें ही समजूत चुकीची आहे. कंपनीस वाटेल ते हिशेब वाटेल त्या रीतीनें तपासून समाधान करून घेण्याचा अधिकार आहे व तो कसा योग्य आहे हें खालील थोड्या विवेचनावरून समजेल.

५ ऑडिटरांनीं रोजखर्डा खतावणी व व्हौचर्स ह्यांवर केलेल्या उभ्या पेनसिलीच्या खुणावरून सर्व व्हौचर्स व हिशेब तपासले पाहिजेत असें वर वर पहाणाराचा समज होतो. परंतु हा भ्रम आहे. ताळेबंदाच्या शेवटीं दिलेल्या सर्टीफिकीटावरून हिशेबाच्या संबंधीं ऑडिटरांनी निराळ्या उजराचा रिपोर्ट दिला आहे असें दिसत नाहीं करितां हिशेबांत त्यांचा कांहीं उजर नाहीं असें धरून पुढील शेरे आहेत.

व्हौचर फायलींतील व्हौचर्स ह्यांस व्हौचर्स म्हणतां येणार नाहीं. अशीं अनेक चिठोरीं आहेत. उदाहरणार्थ, रक्कम देणाऱ्यानें दिलेली ' चिठी रक्कम घेणाऱ्याची पावती होऊं शकत नाहीं, किंवा खर्च करणाऱ्यानें अमुक खर्च केला असें लिहून दिलें म्हणजे त्या चिठीस व्हौचरचें स्वरूप येत नाहीं. अशा अनेक बेतपशिली व बेकायदेशीर चिठ्या व्हौचर म्हणून पास केल्या गेल्या आहेत असें म्हणणें भाग पडतें.

ऑडिटरांपुढें कायद्याप्रमाणें ठेवणें अवश्य असलेलें डायरेक्टरांचें मिनिटबुकच ठेवलें नसल्याचा उजर न करितां त्यांनीं हिशेब कसा तपासला हें समजत नाहीं. कंपनीच्या कायद्याचें कलम ८३ व रूल ७५ टेबल ए प्रमाणें कंपनीनें पुस्तकें ठेवलेलीं नाहींत असा उजर करणें ऑडीटरांचें काम होतें. असे कांहीं खर्च आहेत कीं, जे कंपनीच्या मॅनेजरानें करणें आम्हांस वाजवी वाटत नाहीं परंतु मॅनेजरास कंपनीच्या डायरेक्टरांनीं कोणते खर्च व किती मिती

पर्यंत करण्याची परवानगी दिली आहे हें समजण्याचें साधन जें मिनीटबुक तेंच आम्हांस उपलब्ध नसल्यामुळें खर्च गैर कायदेशीर आहे म्हणतां येत नाहीं, व कायदेशीर आहे असेंहि म्हणतां येत नाहीं. पण मॅनेजरानें कोणा॰ साहि कंपनीच्या पैशातून बक्षिसें देऊन आपलें औदार्य दाखविणें विशेष मंजुरीवांचून अयोग्य आहे असें आम्हास वाटतें. शेअर-होल्डर यांच्या नज॰ रेस आणण्याजोग्या अनेक गोष्टीपैकीं एक गोष्ट अशी आहे कीं, मॅनेजरानें केलेला खर्च स्वतःच मंजूर करण्याची वहिवाट व्हौचरावरून दिसते. बोर्ड ऑफ डायरेक्टराची मंजूरी आहे किंवा नाहीं दिसत नाहीं पण ही मोठी तत्त्वाची चूक आहे हें नमूद करणें कमिटीस अवश्य वाटतें.

५ आम्ही पुढें ज्या दोन व्यवहाराबद्दल उजर करीत आहोंत त्याचा डॉ॰ केतकर ह्यांच्याशीं प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष संबंध येत असल्यामुळें कंपनीचीं प्रोसिडींग बुकें व इतर कागदपत्रें शेअरहोल्डरांपुढें न मांडण्याचा डॉ॰ केतकर ह्यांनीं धरलेला हट्ट नाजुक व अस्थानी होता असें म्हणणें भाग आहे. कागद॰ पत्र पुढें नसल्यामुळें फक्त शंका आणि संशय पुढे मांडणें कमिटीस भाग पडत आहे त्यास आमचा नाइलाज आहे.

सौ. शीलवतीबाई केतकर ह्या लग्न होण्यापूर्वी इंग्लंडहून हिंदुस्थानास येण्यास लढाईसंबंधीं प्रतिबंध गेल्यावर निघाल्या, तेव्हांपासून त्यांस अडीचशें रुपये दरमहा वेतन देण्याची सुरवात झाली व येण्याच्या भाड्याच्या खर्चा॰ चीहि तजवीज केली गेली! असें ता. ८-१०-२० च्या सेक्रेटरीच्या कार्डा॰ वरून कळतें. ही तजवीज म्हणजे ६९७ रु. त्यांस दिले गेले. ही रक्कम त्यांस कांहीं दिवसांकरितां दिली गेली आहे किंवा कसें याचा निश्चय ताळेबंदांतील वाक्यरचनेवरून होत नाहीं. ताळेबंदांत ती खर्ची रक्कम नसून आगाऊ दिसते पण कार्डावरून दुसरा अर्थ निघतो. अधिक निश्चय करण्यास साधन नाहीं. कंपनी व श्री कोहनबाई ह्यांच्यामध्यें झालेले करारमदार डॉ. केतकर ह्यांच्या मार्फत झालेले आहेत. हा पत्रव्यवहार शेअरहोल्डरांपुढें मांडीपर्यंत त्यांचें ह्या बाबतींत समाधान होणें कठीण जाईल.

आक्षेप नं. ९

ज्ञानकोशाच्या कार्यारंभापूर्वीपासून मिस कोहन यांस विन्टर॰ निट्झच्या जर्मन ग्रंथाचें भाषांतर करण्याचें डॉ.केतकर यांनीं ठरविलें असें ता. ८।१०।२० च्या रा. गो. चिं. तांबे यांच्या कार्डावरून दिसतें. परंतु मंड॰ ळानें हें ठरवीपर्यंत डॉ. केतकर यांस याविषयीं ठराव कसा करतां आला व पुढें त्यांचा मंडळाशीं कसा परिचय झाला वगैरे अनेक गोष्टींचा खुलासा लागत नाहीं. कार्डामुळें अनेक शंका उत्पन्न होतात. समाधान रा. तांबे व कंपनीच्या कागदांनीं केलें पाहिजे.

डायरेक्टरांच्या सभेच्या कारवाईची टिपणें (Notes) [ मिनट बुक नव्हे] दाखविण्याची ज्ञानकोशमंडळ ह्याचे चेअरमन यांनी मेहेरबानी केल्यामुळें त्यावरून असें दिसतें कीं, मिस कोहून यांनीं एका पौंडास १५ पानें या भावानें विंटरनिझ या जर्मन ग्रंथकाराचा संस्कृत वाङ्मयाचा इतिहास भाषांतर रूपानें लिहिला त्याची प्रथमावृत्ति करण्याचा हक्क सौ० शिलवतीबाईस कांहीं मोबदला न घेतां ता. २०-७-२० रोजीं बहाल केला आहे. भाषांतरास आलेला खर्च तरी बाईपासून परत घेणें कंपनीच्या हितदृष्टीनें रास्त झालें असतें. शिवाय अशा रीतीनें कंपनीची मालमत्ता फुकट करण्याचा डायरेक्टर ह्यांच्या अधिकारांतील गोष्ट आहे किंवा नाहीं हा प्रश्न निराळाच आहे. निदान कंपनीस कर्ज काढावें लागत आहे, अशा प्रसंगींच्या व्यवहारांतील डायरेक्टरांचें औदार्य अप्रासंगिक आहे असें या कमिटीचें मत आहे.

आक्षेप कं. १०

६ ताळेबंदाच्या सालीं संपादकीय खर्चासाठीं १४५५१ रुपये खर्च झाले आहेत. पैकीं २५२६ रुपये मिस कोहून यांच्या कामाचा मुशाहिरा आहे; व ६९७ चा प्रवासखर्च अर्थात याशिवाय आहे या रकमेच्या तपशीलापैकीं दुसरी मोठी रक्कम डॉ. केतकर यांचा पगार ३६७१ होय. यांत मॅनेजर ( डॉ. केतकर ) या नात्यानें मिळालेले १२०० रुपये धरले आहेत म्हणजे डॉ. केतकर आणि त्यांच्या सहधर्मचारिणी यास ताळेबंदाच्या सालीं ६८९४ रुपये मिळाले यांमध्यें डॉ. साहेब यांचा प्रवास व इतर खर्च आला नाहीं हा निरनिराळ्या खात्यांवर वांटून दिला असल्यामुळें कमिटीस एकत्र करितां आला नाहीं.

याप्रमाणें वार्षिक खर्चापैकीं मोठा भाग डॉ. केतकर यांस प्रत्यक्षाप्रत्यक्ष रीतीनें मिळत असतांहि प्रस्तुतच्या डायरेक्टरांनीं डॉक्टर यांस मिळत असलेला ३०० रु. चा दरमहा १२५ रुपयांनीं वाढविला आहे आणि या बढतीबद्दल भागीदारांची मंजुरी मागितली जात आहे.

( अ ) डॉ. साहेबांचा दरमहा ३०० रुपये पगार ठरला होता तो ज्ञानकोश पुरा बाहेर पडल्यापर्यंतचा ठरला होता. कंपनीच्या सुरवातीस डॉ. यांनीं कंपनीचें काम अनन्य दृष्टीनें करण्याचें कबूल केलें होतें. निदान कंपनीकडे नोकर राहून आपला वेळ आणि बुद्धि दुसऱ्या अनेक कामांकडे खर्च करण्याविषयीं डॉ. साहेबांनी परवानगी घेतली असल्याचें आम्हांस उपलब्ध कागदपत्रावरून दिसत नाहीं. दुसरीं अनेक कामें करण्याविषयीं डायरेक्टरांनीं परवानगी दिली असल्यास ती कंपनीचें मिनिटबुक नसल्यामुळें सांगतां येत नाहीं. परंतु कमिटीस असें वाटत आहे कीं, ज्ञानकोशाचें-अनन्यदृष्टीनें तो संपेपर्यंत काम करणें हें त्यांचें कर्तव्य होतें पण तें त्यांनीं केलें नाहीं असें म्हणावें लागतें. डॉ. केतकर हे खालील संस्थांचे मुख्य चालक आहेत.

१ डॉ केतकर ह्यांची बँक ही ज्ञानकोश मंडळाच्या रजीस्टर्ड आफी-साच्या वरच्या मजल्यावर आहे.

२ विद्यामंदिर हेंहि ज्ञानकोशमंडळाच्या आफीसाच्या वरील मजल्यावर आहे.

३. चातुर्वर्ण्य संस्कारपीठ हें डॉक्टर साहेबांबरोबर पुण्यास गेलें.

४. समाजशास्त्र शाळा. पुणें येथें.

५. स्त्रीकर्म सदन–सौ. शिलवतीबाईंनीं हें नुकतेंच पुण्यास काढलें असून याच्या रचनेकडे डॉ केतकर यांचे तूर्त विशेष लक्ष आहे.

सारांश, ज्ञानकोशमंडळाशिवाय डॉ. केतकरांच्या तनमनधनास व्यग्र करणारे पांच उद्योग आहेत. हें कारण डॉ. साहेब ह्यांचें वेतन वाढविण्यास योग्य नसून त्यांचें वेतन कमी करण्यास योग्य आहे, असें कमिटीचें मत आहे. डॉ. केतकर ह्यांनीं प्रसिद्ध केलेल्या अंदाजाप्रमाणें ज्ञानकोशाची प्रेसकॉपी १९२० च्या डिसेंबरांत तयार व्हावयाची होती. असें अनेक प्रसिद्धीपत्रकावरून दिसतें. परंतु ती तशी तयार न होण्याचें कारण कमिटीच्या मतें त्यांचें कार्य-बाहुल्य होय. कारणें कांहीं असोत, स्वतःच्या अंदाजाप्रमाणे ठरलेलें काम तयार न होणें हें पगार वाढण्यास योग्य कारण नाहीं.

कंपनीचें भांडवल वाढवावें लागलें याचें कारण ज्ञानकोशाचें काम डॉ. केतकर ह्यांच्या हातून अंदाजलेल्या रकमेंत उरकण्याचें दिसेना म्हणून होय. परंतु हें कारण डॉ केतकर यांचा पगार वाढविण्यास योग्य नाहीं. कंपनीचें भांडवल वाढविलें तरी कंपनीचें मुख्य काम वाढलें नाहीं. पैसे जमा करण्याचा खर्च वाढेल; परंतु त्यामुळें ज्ञानकोशाचें काम वाढलें म्हणतां यावयाचें नाहीं. ७२५ शब्दांचें एकएक पान त्याप्रमाणें १००००पानें ज्ञानकोशाचीं व्हावयाचीं; त्यांत वाढ करण्याचें डायरेक्टरांनीं ठरविलें असल्यास माहिती नाहीं.

सारांश कोणत्याहि दृष्टानें खुद्द डॉ. केतकर यांचा पगार वाढविण्यास सबळ कारण हिशेबाकडे व कामाकडे पाहतां दिसत नाहीं.

७. डॉ केतकर ह्यांनीं खुद्द नागपुरांत स्वतःच्या दोन संस्था–केतकर यांची बँक व विद्यामंदिर अशा ठेविल्या आहेत–व ½ घराचें भाडें डॉ. केत-कर देत असतात. त्यावरून त्यांचा या बाबतींत निःपक्षपातीपणा उघड दिसतो. परंतु डॉ. केतकर यांचा नागपुरांत व महाराष्ट्रांत प्रवास होतो त्याचा खर्च ते सहाहि संस्थांवर वांटून देतात असें दिसत नाहीं. ज्ञानकोशाच्या कामा-करितां ते प्रवास करितात तेव्हां ते बाकीच्या कोणत्याहि संस्थेचीं कामें करीत नाहींत, किंवा त्या संस्थेबद्दल प्रवास करितात त्यावेळीं ते ज्ञानकोशाचें काम करीत नाहींत, असा तर्क काढणें स्थितीविरुद्ध होईल असें वाटतें. करितां त्यांच्या

प्रवासाचा खर्च ह्या सर्व संस्थांवर सारखा कां वांटला जाऊं नये ह्याचा भागीदारांनीच विचार करावा.

८. ज्ञानकोशाचीं हल्लीं तीन ऑफीसें आहेत; नागपुर, मुंबई व पुणें. पैकीं पुण्यास ज्ञानकोश आफीसमध्यें कांहीं लेखक नोकर ठेवून काम चालविलें आहे असें दिसतें. पुण्याच्या मंडळीस जाण्यायेण्यास सोईचें स्थान ह्याशिवाय ज्ञानकोशास मुंबई ऑफीसची जरूरी नाहीं असें वाटतें. ऑफीसें अधिक राहिल्यास कोर्टाच्या अधिकारासंबंधीं कदाचित भानगडी उपस्थित होतील.

९. ज्ञानकोशाचीं वेळोवेळीं प्रसिद्धपत्रकें बाहेर आलीं यावरून अंतस्थ खरी माहिती नसणाऱ्या माणसाची कल्पना होण्याचा संभव आहे कीं, ज्ञानकोश हा महाराष्ट्रांतील प्रसिद्ध विद्वान मंडळाचा समुच्चयच आहे.

ज्ञानकोशमंडळाचें काम महाराष्ट्रांतील निरनिराळ्या विद्वानाच्या सल्ल्यानें आणि लेखकसाहाय्यानें चाललें आहे असा समज १९१७-१८ चा 'संपादकीय अहवाल' तसेंच ३१-३-१७, ४-१०-१७, व ११-१०-१७ च्या प्रसिद्धीपत्रकांवरून होतो. ज्या निरनिराळ्या तज्ज्ञांचें ज्ञानसाहाय्य ज्ञानकोशांत येणाऱ्या नानाविषयात मिळणार होतें त्यांचीं नांवें त्यांच्या अधिकारासह व कितावासह या पत्रकांतून वाचून महाराष्ट्रीयांचा ग्रह ज्ञानकोशाबद्दल अत्यंत अनुकूल होऊन ते शेअर घेण्यास अथवा वर्गणीदार होण्यास कान्हासरांच्या सांगण्यावरून तयार होतात. परंतु निरनिराळ्या विद्वानांकडून ज्ञानकोशास आजपर्यंत काय लेखनसाहाय्य झालें याचा आम्हीं १४५५१ रुपयांच्या संपादकीय खर्चाच्या एका सालच्या तपशिलावरून निश्चित करण्याचा प्रयत्न केला. यावरून महाराष्ट्रांतील विद्वानाच्या वांट्यास संपादकीय खर्चापैकीं फार थोडा भाग—म्हणजे तो नमूद करण्याजोगाच नाहीं—आला असावा असें दिसतें. १४५५१ पैकीं जवळजवळ ६०००रु डॉ. केतकरांच्या विद्वान दांपत्याच्या पदरीं पडले असून बाकीची रक्कम पुणें येथील आफीसांत काम करणाऱ्या १०-१२ पदवीधरांवर खर्च होत आहे. या खर्चापैकीं १०० रु. रा. यशवंतराव दाते बी. ए. एलूएल्. बी. या गृहस्थास मिळत असून बाकीच्या सुमारें १०पदवीधरांच्या वांट्यास ५०-५५ रुपयांपेक्षा अधिक मासिकवृत्ति येत नाहीं. हे पदवीधर फार नवीन; नुकतेच कॉलेजांतून बाहेर पडलेले असले पाहिजेत; नाहींपेक्षां डॉ. केतकर आणि त्यांच्या पत्नी यांच्या मासिकवृत्तीच्या मानानें त्यांस इतकी कमी वृत्ति ज्ञानकोशमंडळाच्या मुख्य चालकांनीं दिली नसती. या रीतीनें ऑफीसांत कच्च्या मंडळीकडून झालेला ज्ञानकोश अखेरपर्यंत कच्चा राहील अशी भीति वाटते. कंपनीनें ५०००० चें एक लक्ष भांडवल केलें तरी महाराष्ट्रीय विद्वान मंडळाचें भपक्याकरितां प्रथम दाखविलेलें साहाय्य ज्ञानकोशमंडळाच्या पदरांत पडूं नये, ही ज्ञानकोशाची फारच मोठी हानि झाली

आहे असें कमिटीचें मत आहे. स्टॉकबुक किंवा लेख पाहण्याची संधि न दिल्यामुळें ज्ञानकोशाचें हल्लीं होत असलेलें काम टाकाऊ आहे कीं विकाऊ आहे याविषयीं कांहीं कल्पना येत नाहीं. डॉ. यांनीं एक व्हाल्यूम येथें आणला होता पण तो लागलीच परत नेला.

१९१७--१८ चा संपादकीय अहवाल पाहता आणि हल्लीं पुणें येथील संपादकीय लेखकवर्ग पाहतां असें म्हणावयास कांहीं हरकत दिसत नाहीं कीं, हल्लींची पुणें येथील संपादकीय कचेरी नागपूर येथील संपादकीय कचेरीपेक्षा कोणत्याहि प्रकारें सरस म्हणतां यावयाची नाहीं. नागपूर येथील ऑफिसात एकंदर ३०--३१ विद्वानांचें त्यावेळीं रा. यशवंत रामकृष्ण दाते बी. ए. एल्एल्. बी. यांच्या देखरेखीखालीं साहाय्य मिळत होतें व त्याच- वेळीं प्रो. राजवाडे एम्. ए. यांच्या हाताखालीं पुण्यास ९--१० पदवीधर काम करीत होते. नागपूर येथून पुण्यास ऑफीस नेऊन तें नागपुरच्याच रा. दाते या इसमाच्या हातीं ठेविलें आहे व लेखनसाहाय्यकांची संख्या दोन्ही ऑफीसांची मिळून १०--१२ पदवीधरांवर ( ४१ पदवीधराच्या जागीं ) आली आहे, व ध्यानांत घेण्याजोगी मजा ही आहे कीं १९१७--१८सालीं काम करीत असलेल्या पदवीधरांपैकीं हल्लीं कामावर फारच थोडे पदवीधर आहेत. याचें कारण इतराच्या विद्वत्तेस डॉ. साहेब फार कमी किंमत देतात असें शोधाअंतीं कळतें.

१८. नागपूर शहराच्या डायरेक्टरांच्या देखरेखीखालीं नागपूर येथें ज्ञानकोशाच्या पार्टीपेक्षां कांहींएक कारभार नाहीं. हिशेब, कागदपत्र, काम वगैरे सर्व पुण्यास आहे असें सांगण्यांत येतें. तेव्हां अशा स्थितींत डायरेक्ट- रांस देखरेखीचें काम कसें करतां येत असेल याची वाचक शेअरहोल्डरांनीं कल्पना करावी. डॉ.रे एम्. डी. व रा. कठाळे एल्एल्. एम्. हे गृहस्थ नागपुरां- तील उद्योगव्यग्र विद्वान आहेत. व ऑफीस नागपुरांत असतें तरी त्यांस देखरेखीसाठीं फारसा वेळ देता आला नसता. मग त्यांस नागपुराहून व रा. फडके यास अकोल्याहून, ज्ञानकोशाच्या पुणें येथून होणाऱ्या कामाची देखरेख ठेवण्यास किती अडचण पडत असेल याचा आपण विचार करावा. रजिस्टर्ड आफीसांत हिशोब, मिनिटबुकें वगैरे असावीत हेंच डायरेक्टरांस अधिक सोईचें झालें असतें व त्यांची तकलीफ त्यामुळें कमी झाली असती असें कमि- टीस वाटतें. या सालच्या ताळेबंदास जोडून जो रिपोर्ट आहे त्यावरून कळतें कीं, पुण्याहून संपादकीय आफीस मुंबईस जाणार आहे. ता. २६ सप्टेंबर रोजीं मॅनेजर डॉ. केतकर यांनीं आपला या बाबतींतील बेत फिरला असल्याचें सांगितलें होतें. त्याविषयीं निश्चित बेत काय आहे हें कळण्यास कमिटीस मार्ग

नाहीं. खर्चाच्या दृष्टीनें ही महत्त्वाची बाब आहे व खर्च फार लागेल असें रिपोर्टांत म्हटलें आहे. करितां ही गोष्ट आपल्या नजरेस आणीत आहोंत.

सही—मा कृ. पाध्ये (बी. ए. बी. एल्. हा. व. नागपूर) " स. कृ. फाटक (डायरेक्टर पुलगांव मिल) " एम्. जी. लोकस (मु. आफीस इ. ज. रेजिस्ट्रेशन)

---

## स्पष्टीकरणार्थ टीप

रा. पाध्ये व त्यांचे मित्र हे चळवळ करीत होते तेव्हां त्यांचा हेतु असा होता कीं कांहीं तरी गडबड उत्पन्न करून काम बंद ठेवावें आणि दुसरी सभा बोलवावी, आणि ब्यालेन्स शीट पास करणें नापास करणें जरी शक्य नाहीं तरी तहकूब करावें; त्यानीं हिशोब पाहण्याची इच्छा दाखविली तर तुम्ही तो पहा असें म्हणून त्यावेळेच्या अध्यक्षानीं आक्षेपाना संधि दिल्यानंतर ब्यालेन्सशीट पास करण्यासाठीं दुसरी सभा बोलावली. ती सभा भरली पण पाध्ये व त्यांचे अनुयायी यास चळवळ करण्यास आणखी सवड हवी होती जी दुसरी सभा भरली त्या सभेच्या वेळेस आम्हास तेरा दिवस मिळाले ते अपुरे होते वगैरे सबबी रा पाध्ये यांनी समुच्चयानें उत्पन्न केल्या तेव्हां त्यास आणखी संधि देण्यासाठीं अध्यक्ष डॉ खरे यांनीं पुन्हा सभा तहकूब केली.

रा. पाध्ये यानी पहिल्या सभेच्या नंतर डॉ.केतकर यांच्या विरुद्ध लोकमत उत्पन्न करण्यासाठीं एक पत्र नागपूरच्या महाराष्ट्रांत छापलें. त्या पत्रास डॉ. केतकर यानीं उत्तर दिलें पण तें महाराष्ट्रकारानीं छापलें नाहीं. येणेंप्रमाणें सभा तहकूब करीत जावी आणि मधल्या काळांत डॉ. केतकर यांच्या विरुद्ध लोकमत करीत जावें, सभा तहकुबी नंतर चळवळ करून प्राक्सी मिळविण्याची खटपट करावी.असा पाध्ये मंडळीचा उपक्रम होता.सभा नागपुरास होई. डॉ. केतकर पुण्यास असत आणि त्यामुळें नागपूरच्या डॉ. केतकर विरुद्ध असलेल्या मंडळीस डॉ. केतकरांच्या विरुद्ध खोट्या गप्पा सांगून चळवळ करणें सोपें जात असे. सभातहकुबी ही कंपनीच्या निवडणुकी लढविण्याची एक शक्कल आहे ही गोष्ट अध्यक्ष डॉ. खरे यानीं ओळखली होती व त्यांनीं वर्तमानपत्राकडे कांहीं मजकुर पाठविणें मना केलें. तेव्हा रा. पाध्ये यांनीं स्वतःस चौकशी करण्यासाठीं अधिकारी नेमलें आहे असें सांगून एक भ्रामक विधानें केलेला एक रिपोर्ट तयार केला आणि तो शेअर होल्डराकडे पाठविला तोच वर दिला आहे त्यावेळेस त्याच्या विश्वासघातकी दुर्तनाम तोड म्हणून सभेचें स्थानांतर करून सभा पुण्यात बोलावली.

पाध्ये आणि मंडळी ही कंपनीच्या कारभाराची तपासणी करणारी, शेअर होल्डरांना त्याविषयीं आपलें मत कळविण्यास अधिकार दिलेली मंडळी मुळीच नव्हती. कंपनीच्या व्यवहारांत लबाडी झाली असती तर इन्स्पेक्टर नेमून रिपोर्ट करविण्यास सरकारी योजना आहे. पण तसा इन्स्पेक्टर नेमावयास कंपनीच्या शेअरहोल्डरांपैकीं निदान एकदशांश मंडळींनीं अर्ज केला पाहिजे व तो इन्स्पेक्टर सरकारनें नेमला पाहिजे. पाध्ये कमेटी तशा स्वरूपाची नव्हती तर ती तक्रार करणाऱ्या मंडळीनां काम बंद पाडून तक्रार सभेपुढें मांडण्यासाठीं अधिकार दिलेली कमेटी होती.

रा. पाध्ये यांचा डाव असा होता कीं, आपणास चौकशी करण्याकरत नेमलें आहे असें लोकांस भासवावें लोकांच्या प्राक्सी मिळाल्यास डायरेक्टर म्हणून निवडून यावें. म्हणजे पुढें आपल्या विश्वासघाताबद्दल आपणांस कोणीहि पकडणार नाहीं. रा. पाध्ये यांचा या प्रकारचा डाव असल्यामुळें तो डाव फसविण्यासाठीं मला पुणें येथें सभा बोलावून तो डाव फसविणें अवश्य होतें आणि तें मी केलें. तसें करण्यास मला एवढेंच सांपडलें कीं गेल्या सभेच्या प्रोसिडिंगमध्यें अध्यक्षांनीं दुसऱ्या सभेची वेळ ठरविली होती पण स्थान ठरविलें नव्हतें. आणि त्या गोष्टीचा फायदा घेऊन मी सभेचें स्थानांतर करूं शकलों माझ्या मनांत संशयी लोकांना पुरी संधि द्यावयाची होती पण शत्रुत्व बाळगणाऱ्या लोकांनां संधि द्यावयाची नव्हती. आणि त्यामुळें मी सभा पुण्यास भरविण्याचा हट्ट त्यावेळेस धरला असता तर तें चाललेंहि असतें. कारण सभेच्या कामाच्या दिरंगाईमुळें जादा चालक खरे व कठाळे हे दोघेहि मुदत संपल्यामुळें डायरेक्टरच्या पदापासून च्युत होत होते आणि त्यामुळें मी आणि रा. फडके असे दोघे मिळून वाटेल तिकडे सभा भरवून वाटेल तें करूं शकलों असतों पण तसें करणें म्हणजे डॉ. खरे यांचा विनाकारण अपमान होईल असें वाटलें. डॉ. खरे यांची वृत्ति अशी होती कीं कोणत्याहि मनुष्याला विनाकारण संशयाला जागा राहूं नये म्हणून विरुद्ध पक्षास पूर्ण मुभा द्यावी पण विरुद्ध पक्ष केवळ संशय उत्पन्न करून कंपनीचें नुकसान कसें करूं शकतो याची त्यास असावी तितकी जाणीव नसावी असें वाटतें.

या जुन्या वादविवादाचें आज महत्त्व उरलें नाहीं. तथापि जे या वादांत ज. ऊं ढाचेठनील त्यांनीं माझ्याविरुद्ध घेतलेले आक्षेप कोणत्या स्वरूपाचे होते, आणि ते आक्षेप घेतांना काय विधानें केलीं आहेत तें पहावयास पुरी संधि द्यावी हें मला युक्त वाटतें, म्हणून विरुद्ध पक्षाचें म्हणणें पूर्णपणें दिलें आहे. भांडणाचा विषय झालेला ताळेबंद येणेंप्रमाणें.—

## तारीख ३१ मार्च १९२० रोजचें

| भांडवल, कर्ज व ठेव. | रक्कम | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | रु | आ | पै | रु. | आ. | पै. |
| **अधिकृत भांडवल—** | | | | | | |
| १०० रु. प्र. १००० भाग | १००००० | ० | ० | | | |
| विक्रीस काढलेलें भांडवल १०० रु प्र. १००० भाग | १००००० | ० | ० | | | |
| विक्री झालेलें भांडवल १०० रु प्र ६३७ भाग | ६३७०० | ० | ० | | | |
| मागणी केलेलें भांडवल १०० रु. प्र. ५१२ भाग | ५१२०० | ० | ० | | | |
| ६० रु प्र. १२५ भाग | ७५०० | ० | ० | | | |
| जप्त केलेल्या ३ भागांचे पैसे | ४० | ० | ० | | | |
| | ५८७४० | ० | ० | | | |
| मागणीपैकीं येणें | २३५२७ | ६ | ११ | ३५२१२ | ९ | १ |
| हिस्साअर्जाबरोबरची रक्कम | | | | | | |
| १० रु. प्रमाणें २८ अर्ज | २८० | ० | ० | | | |
| ५ रु. प्रमाणें २ अर्ज | १० | ० | ० | २९० | ० | ० |
| भागावरील अनामत ठेव | | | | ४० | ० | ० |
| ज्ञानकोशाकरितां वर्गणी— | | | | | | |
| प्रकार पहिला १२१ जण | ९७९७ | ८ | ० | | | |
| प्रकार दुसरा ४३६ जण | १३०५५ | ४ | ९ | | | |
| प्रकार तिसरा २४८ जण | ४०४९ | ० | ० | २६९०१ | १२ | ९ |
| कर्ज | | | | २५०० | ० | ० |
| ठेव | | | | १२५० | ० | ० |
| तसलमात जमा | | | | ३३९ | ५ | ३ |
| एकूण... | | | | ६६५३३ | ११ | १ |

१४ जून १९२०
४८१ शनवार पुणें.

(सही) खरे आणि कंपनी
आडिटर्स.

(सही) ग. ना. टिळक, हिशेबनीस.

## मंडळाची सांपत्तिक स्थिति

| मालमत्ता, खर्च, ठेव. | रक्कम रु. | आ. | पै. | रु. | आ. | पै. |
|---|---|---|---|---|---|---|
| सामान-लांकडी सामान | ३०७ | ० | ३ | | | |
| पुस्तकें | २९८५ | ९ | ९ | | | |
| | | | | ३८९२ | १० | ० |
| प्रारंभींचा खर्च } स्टॅच्युटरी | | | | ६११ | २ | ९ |
| स्थायिकतेचा } रिपोर्टाप्रमाणें | | | | १२११ | १२ | ४ |
| १-४-१९१७ ते ३१-३-१९१८ | | | | ७७७९ | ९ | ११ |
| चा खर्च हिशेबाच्या तक्त्याप्रमाणें | | | | | | |
| १-४-१९१८ ते ३१-३-१९१९ | | | | | | |
| चा खर्च हिशोबाच्या तक्त्याप्रमाणें | | | | २१४२० | १ | १ |
| बारलोन सर्टिफिकिटें १२०० चीं | | | | ९३० | ० | ० |
| बँकेतील शिल्लक-पूना बँक | २६५ | १३ | ६ | | | |
| सेंट्रल बँक नागपूर | १०४० | ४ | ६ | १३०६ | २ | ० |
| आगाऊ-कागदासाठीं निर्णयसागरला | ४७०० | ० | ० | | | |
| मिस् कोहन भाड्यासाठीं | ६९७ | २ | ० | ५३९७ | २ | ० |
| तसलमात नांवें | | | | | | |
| जवळची शिल्लक-पुणें कचेरी | १०७८ | २ | ७ | ३७८ | ० | ५ |
| नागपूर कचेरी | ३२५ | ४ | ० | | | |
| मुंबई कचेरी | १५७ | ३ | ० | | | |
| दोघ प्रचारक | ६९८ | ६ | ३ | | | |
| नफातोटा हिशोब-नोंदणी | ११० | १३ | ७ | २२५८ | १५ | १० |
| ब्याज दिलेलें | ११८ | ४ | ६ | | | |
| टपाल | ४८३ | ९ | ० | | | |
| विक्री व प्रसिद्धी | २९६४ | १० | ६ | | | |
| संपादकीय खर्च | १४५५१ | ५ | ३ | | | |
| वाङ्मयसूचि | २९८ | ४ | ० | | | |
| कचेरी खर्च | ४५५२ | ९ | ८ | | | |
| सादील छपाई | ४६८ | ११ | ० | | | |
| कमी--किरकोळ जमा | २३५४८ | ३ | ६ | | | |
| नफातोटा खातें | १ | २ | ० | | | |
| मिळालेलें ब्याज | २०६ | ८ | ३ | | | |
| सूचि विक्री | ९६ | ६ | ६ | | | |
| | १८९४ | ० | ० | | | |
| | २२०० | ० | ९ | २१३४८ | २ | ९ |
| एकूण... | | | | ६६५३३ | ११ | १ |

नागपूर } (सही) नारायण खंडेराव फडके } ऑनररी
२०-६-२० } (सही) नारायण भास्कर खरे. } डिरेक्टर्स

## मागील पानावरील जमाखर्चाबद्दलचा आडिटर्सचा शेरा

" आम्हीं वरील हिशोबाचा तक्ता जमाखर्च व पावतीबुकें यांसह तपासून पाहिला आहे व तो बरोबर आहे अशी आमची खात्री आहे. आम्हाला जी माहिती लागली व जें स्पष्टीकरण जरूर वाटलें तें सर्व मिळालें. त्यावरून भागीदारांस आम्ही असें जाहीर करतों कीं आमच्या समजुतीप्रमाणें व जी माहिती व स्पष्टीकरणें आम्हांस मिळाली व जीं पुस्तकें आम्हांस दाखविण्यांत आलीं त्यांवरून आम्हीं असें आश्वासन देतों कीं,हा तक्ता मंडळाची या वेळची खरी स्थिति दाखवितो व हा वस्तुस्थित्यनुरूप व कायद्याप्रमाणें तयार केलेला आहे.'

खरे आणि कंपनी

ब्यालेन्सशीट नापास करण्याची शक्ति पाध्येकंपूस कधींच नव्हती कारण रा. पाध्ये यांना जरी १५ मतें होतीं तरी रा. फडके यांचीं १५ त्यांच्याविरुद्ध होऊन माझीं २५ मतें होतींच मला हाणून पाडण्यास माझ्या विरुद्ध २५ माणसें जमा करणें अवश्य होतें व पंचवीस मंडळी जमवणें देखील सोपें नसते आणि जी मंडळी जमतील ती त्यांच्या तर्फेची जमतील असेंहि नाहीं. तर डॉ. केतकर याच्या प्रामाणिकपणाविरुद्ध बभ्रा करून जो अपशकून करता येईल तेवढाच काय तो करणें विरुद्धांस शक्य होतें.

---

## ( परिशिष्ट नं. १३ )

## आक्षेपांस उत्तर.

नागपूरचे वकील रा. महादेव कृष्ण पाध्ये यानीं ज्ञानकोशाच्या अनेक हिस्सेदाराकडे कांहीं पत्रकें पाठवून त्यांसोबत,कंपनीच्या कामामध्यें गैरव्यवस्था आहे, कंपनीचे पैसे डॉ. केतकर गिळंकृत करीत आहेत, कंपनीचे डायरेक्टर आणि ऑडिटर आपलें काम बरोबर करीत नाहींत व सध्याच्या व्यवस्थेत बदल करणें अवश्य आहे, तर आम्हांला ( डायरेक्टर निवडून येण्यासाठीं ) आपली प्राक्सी द्या, अशा अर्थाचीं पत्रें पाठविलीं आहेत.

पाध्ये व इतर दोघे गृहस्थ यास कंपनीचे ( एप्रिल १९१९–२० मार्चपर्यंतचे ) हिशोब पाहण्यास परवानगी दिली होती. त्यानीं त्याचा जो अहवाल डायरेक्टराकडे पाठवावयाचा तो Private and confidential म्हणून शेअरहोल्डराकडे पाठविला व तो प्राक्सी मिळविण्याच्या हेतूनें तयार केला. या अहवालांतील बराचसा भाग अप्रस्तुत आहे, म्हणजे ताळेबंदाच्या वर्षाला धरून व ताळेबंदासंबंधानेंच तो अहवाल नाहीं. त्यातील अनेक विधानें सत्यास सोडून आहेत, व कांहीं वाचकांच्या मनात सत्यापेक्षां निराळा अर्थ यावा अशा तऱ्हेनें मांडलीं आहेत उदाहरणार्थ, मिस् कोहन ( आतां सौ० शीलवती केतकर ) यास मिळालेल्या पैशासंबंधानें विधान घ्या. एक वर्षात २५२६ रुपये त्यास मिळाले असें लिहिलें आहे तें अजीबात खोटें आहे. लंडन ऑफिसचा अनेक वर्षांचा हा एकंदर खर्च होय. लंडन ऑफीसचा हिशोब पुरा करून तें खातें बंद केल्यामुळें तो खर्च या वर्षात पडला आहे.

तसेंच कंपनीचे पैसे खासगी कामाकडे वापरतां असें त्यांनीं तसलमात यावर टीका करताना लिहिले आहे. ज्ञानकोशाच्या कामासाठीं कोणाहि ज्ञान-कोशमंडळांतील लेखकास वगैरे पैसे दिले असले म्हणजे हिशोब येण्यापूर्वी ते पैसे तसलमातखातीं त्याच्या नांवें पडतात किंवा पगाराची तारीख होण्यापूर्वी किरकोळ दिलेले पैसे तसलमातखातीं पडतात.

कंपनीचें काम चांगलें चाललें आहे असें दाखविणाऱ्या गोष्टीच कंपनीचे दोष म्हणून दाखविल्या आहेत. उदाहरणार्थ, कंपनीचें आम्ही भांडवल वाढविलें व कंपनीचें काम एक लाखांत न करतां तीन लाखांत करण्याचा आमचा सध्याचा इरादा आहे याबद्दल रा. पाध्ये यांचें अकांडतांडव वाचावें.

कंपनीला पैसा शेअरहोल्डर आणि वर्गणीदार या दोन वर्गांकडून मिळतो. शेअरहोल्डर म्हणजे वस्तुतः ग्रंथाचे ग्राहक. कंपनीचें भांडवल वाढविणें म्हणजे अधिक शेअरहोल्डर मिळविणें व अधिक ग्रंथ खपविणें होय. सध्यांच आमचे शेअरहोल्डर आणि वर्गणीदार मिळून १६००वर झाले आहेत. एक लाखाचा धंदा करावयाचा म्हणजे सोळाशेंपैकीं सहाशेंच्या वर्गण्या परत करावयाच्या ! ! पाध्ये यांस तीन लाखाचा बाऊ वाटतो. हा व्यवहार त्यांची छातीं दडपणारा आहे.हें त्यांचें म्हणणें खोटें नाहीं; पण तीन लाख अशक्यहि नाहींत. आम्ही आणखी चौदाशें पुस्तकें खपविलीं म्हणजे तीन लाखांचा व्यवहार केला असें होईल. व्यवहार मोठा केल्यानें शेअरहोल्डरांचें नुकसान कसें होतें हें समजत नाहीं. भांडवल वाढविणें म्हणजे शेअर अधिक खपविणें आणि प्रत्येक शेअरहोल्डरवरचें जोखीम कमी करणें. हिस्से खपविणें किंवा वर्गणीदार मिळविणें या पुस्तकें खपविण्याच्या दोन प्रकारांपैकीं शेअरहोल्डर वाढविणें हाच प्रकार अधिक श्रेयस्कर आहे. वर्गणीदार वाढविण्यास कंपनीची तारण रक्कम म्हणजे भांडवल अधिक वाढवावें लागतें. कारण शेअरहोल्डर हे वर्गणीदारांस तारण असतात. कंपनीला तीन हजार पुस्तकें खपवावयाचीं, म्हणजे तीन लाखांचा व्यवहार करावयाचा. हा व्यवहार करावयाचा तो कंपनीचें भांडवल पन्नास हजार असतां व्हावयाचा नाहीं. ज्या कंपनीची जबाबदारी पन्नास हजार तिच्यावर वर्गणीदाराची अडीच लाखांची जबाबदारी टाकावी कशी?तशी जबाबदारी टाकणें शेअरहोल्डरांच्या किंवा वर्गणीदाराच्या हिताचें नाहीं. ज्या कंपनीची जबाबदारी एक लाखाची तिच्यावर लाख-दीड लाखाची जबाबदारी टाकावयास हरकत नाहीं. तेव्हा केवळ वर्गणीदार वाढविण्यापेक्षा शेअरहोल्डर म्हणजे जबाबदारी घेणारे वर्गणीदार वाढविणें बरें, हें व्यवहारतत्त्व थोडासा विचार केल्यास रा. पाध्ये यांसहि समजण्यासारखें आहे.

कंपनीला एका लाखातच व्यवहार करावयाचा नसून पाच लाखापर्यंत व्यवहार करण्याची कंपनीची महत्त्वाकांक्षा होती, एक लाखापर्यंतच रक्कम

गोळा झाली तरी काम कसें करावें अशीहि एक योजना होती. एक लाखापेक्षा अधिक रकमांचा व्यवहार करण्याच्या योजनांवर रा. पाध्ये व त्यांच्या दुसऱ्या सहकाऱ्यांच्या सह्या झाल्या आहेत, व ते कागद पूर्वी छापून प्रसिद्धहि झाले आहेत. ज्ञानकोशाला सध्यां जें स्वरूप आलें आहे तें रा. पाध्ये यांच्या आवाक्याबाहेर आहे हें रा. पाध्ये यांनीं महाराष्ट्रांत छापलेल्या पत्रांत मन मोकळें करून सांगितलें हें योग्यच आहे. पण अशा प्रसंगीं ज्ञानकोशाच्या कामांत अव्यवस्था आहे म्हणून ती दुरुस्त करण्याचें ते अंगावर घेतात, आणि लोकांची प्राक्शी मागतात ही गोष्ट त्यांच्या धैर्याची आणि विनोदी स्वभावाची द्योतक आहे रा. पाध्ये यांचा एक आक्षेप असा आहे कीं, चालकांनीं विंटरनिझट्चें भाषांतर छापण्यास सौभाग्यवती केतकर यांस फुकट परवानगी दिली. मिस् कोहन यांनीं ज्ञान-कोशासाठीं भाषांतर केलें ते इंग्रजींत केलें. त्यांतील जो भाग घेण्याजोगा म्हणून वाटला तो ज्ञानकोशानें घेतला. प्रथाचें इंग्रजी भाषांतर प्रसिद्ध व्हावें म्हणून ज्ञानकोशमंडळास अनेक यूरोपीय व एतद्देशीय विद्वानांनीं पत्रें लिहिलीं. हें भाषांतर लोकांस पाहिजे आहे, पण छापण्याचा खर्च कोणी करावा हा प्रश्न पुढें येतो. ज्ञानप्रसाराच्या दृष्टीनें हें भाषांतर छापणें उपयुक्त होईल कोणास हें छापावयाचें झाल्यास ज्ञानकोशाचे चालक आनंदानें परवानगी देतील. अनेक पुस्तकप्रकाशकांकडे ज्ञानकोशमंडळानें पत्रव्यवहारहि केला. पण अजून कोणी ते पतकरीत नाहीं. रा. पाध्ये यांस जर हें भाषांतर छापावयाचें असेल तर त्यांसहि मंडळ परवानगी देईल. हें छापून पैसे मिळण्याचा संभव कमी. जर कोणी अभिमानानें किंवा प्रेमानें छापील तर तें छापलें जाईल. अशा प्रसंगीं सौ० शीलवती केतकर यांनीं तें आपल्या खासगी खर्चानें छाप-ण्याचा विचार केला होता. परवानगी मिळाली असें लिहिलें आहे तें खोटें आहे. अजून छापण्यास त्यांनां परवानगी दिली नाहीं; पण छापण्याच्या परवानगीसाठीं काय द्याल, असा जबाब डायरेक्टरांनीं त्यांस विचारला आहे. इंग्रजी भाषांतराचा महाराष्ट्राबाहेर उपयोग आहेच. हें छापण्याची जबाबदारी जर दुसरें कोणी घेईल तर ज्ञानकोशमंडळास व सौभाग्यवती शीलवती यांस आनंदच होईल, आणि रा. पाध्ये जर छापावयास घेतील तर अधिक आनंद होईल. ते छापखानदार आहेत व ते सहज छापूं शकतील.

रा. पाध्ये हे पूर्वी ज्ञानकोशाचे एक कायमचे डायरेक्टर असतां त्यांनीं छपाईचें काम घेतलें ते त्या वेळेस अध्यक्षहि होते त्यामुळें प्रसंग असा उत्पन्न होई कीं, छपाईखात्यावर देखरेख करणारास आपले अध्यक्ष म्हणून त्यांस मान द्यावा लागे, आणि छपाईदार म्हणून त्यांच्यापासून काम चोख रीतीनें काढून घेण्यासाठीं निराळ्या तऱ्हेनें वागावें लागे. या तऱ्हेनें वागतांना अनेक

प्रकारें असमाधानकारक स्थिति उत्पन्न झाली. पुढें असें दिसून आलें कीं, म्यानेजिंग डायरेक्टरखेरीज जो डायरेक्टर कंपनीशीं करार करतो तो डायरेक्टर रहात नाहीं. या नियमानें रा. पाध्ये कंपनीचे डायरेक्टर राहूं शकले नाहींत. वरील कायद्याची अंमलबजावणी करणें डॉ. केतकर यांजकडे आलें पुढें रा पाध्ये व त्यांचे दुसरे दोन सहकारी यांसहि कंपनीच्या डायरेकरांत निवडून येतां आलें नाहीं. कंपनी आपलें छपाईचें काम रा. पाध्ये यांच्या देशसेवक छापखान्याकडून करून घेत होती आणि कित्येक हजार रुपयांचें काम देशसेवक छापखान्यानें केलें. पुणें येथें मुख्य कार्याचें ऑफिस आल्यानंतर आमच्याकडून छपाईचेंहि काम रा पाध्ये यांस मिळेनासें झालें, आणि निर्णयसागर छापखान्यास काम देण्याचें आम्ही ठरविल्यामुळें रा. पाध्ये यास नाखूष होण्यास आणखी एक कारण झाले.

रा रा. पाध्ये यांनीं डॉक्टर केतकर यांचा पगार कमी करण्यासाठीं जीं कारणें दिलीं आहेत तीं देखील फार मौजेचीं आहेत तीं पुन्हां एकदां वाचून त्यांवर विचार करावा अशी आमची शिफारस आहे.

रा. पाध्ये यांस थोडेसें करमणुकीचेंहि लिहिणें लिहितां येतें असें दिसतें. त्यांच्या रिपोर्टाच्या नवव्या परिच्छेदांत रा. पाध्ये, फाटक व लोकूस ही त्रयी ज्ञानकोशाचें काम विकाऊ आहे हें ठरविण्यास परीक्षक म्हणून नेमली गेली आहे अशी आपली समजूत व्यक्त करते;आणि आम्हीं त्यांस लेख पहाण्याची संधि न दिल्यामुळें तें काम त्यांस करतां येत नाहीं म्हणून दिलगिरी प्रदर्शित करते. पाध्ये कमेटीची साक्षरता त्यांनीं पाठविलेल्या पत्रकावरून सहज व्यक्त होणार आहे. या प्रकारच्या त्रयीकडे ज्ञानकोशाच्या मजकुराची योग्यता ठरविण्याचें काम सोंपविण्यापूर्वी सर्व महाराष्ट्रास वेड लागावयास पाहिजे. एरव्हीं या प्रकारचें काम असल्या प्रकारच्या त्रयीकडे कोणी पाठवील असें वाटत नाहीं. रा लोकूस व फाटक यांनीं अहवाल वाचून सही केली असती तर बरें झालें असतें !

रा. पाध्ये इत्यादि त्रयीच्या रिपोर्टांत केलेलीं इतर विधानें इतकीं क्षुल्लक आहेत कीं, त्यांवर अधिक लिहावयाची आवश्यकता नाहीं. रा. पाध्ये किंवा त्यांचे स्नेही यांस कोणी प्राक्सी दिल्यास आमची हरकत नाहीं. पण जीं विधानें करून रा. पाध्ये प्राक्सी मागतात तीं विधानें खोटीं, भ्रामक आहेत, एवढें सांगितलें व पाध्ये यांच्या ज्ञानकोशविषयक वृत्तीचा इतिहास हिस्सेदारांस अवगत असला म्हणजे झालें. कंपनीच्या सुस्थितीविषयीं आणि भक्कमपणाविषयीं कोणासहि शंका घेण्याचें कारण नाहीं. रा. पाध्ये यांनीं लोकांकडे भ्रामक पत्रें पाठविल्यामुळें पुष्कळ लोकांस रा. पाध्ये यांनीं सुरू केलेली चौकशी

अधिक पूर्ण व्हावी अशी इच्छा असणें स्वाभाविक आहे. आमची त्यांस सहानुभूति आहे सर्व प्रकारचे कागद पहावयाचें काम करणाऱ्यास पुणें ऑफिसांत येऊन कागद पहावे लागतील. नागपूरच्या लोकांस पुण्याचे कागद दिसत नाहींत म्हणून पाध्ये कमिटीची तक्रार रास्त आहे आणि पुणें येथील शेअरहोल्डरांनीं एखादी कमिटी नेमून ऑफिसची कसून तपासणी केल्यास आम्हास आनंद आहे आणि हें शक्य होण्यासाठीं मुद्दाम पुणें येथेंच ता. १९ डिसेंबरची सभा बोलावली आहे.

रा. पाध्ये यांच्या पत्रानें गैरसमज होऊन कोणी त्याच्या किंवा इतरांच्या नावानें प्राक्सी पाठविला असल्यास तो रद्द करण्यासाठीं "सेक्रेटरी—महाराष्ट्रीय ज्ञानकोशमंडळ लिमिटेड, नागपूर" यांस ताबडतोब कळविण्याची कृपा करावी.

श्री. व्यं. केतकर.

कुमारी इडिथ व्ही. कोहन ( सौ. शीलवती केतकर ) यांचें आतापर्यंत काम झालें आहे तें येणेंप्रमाणें:—

**इंग्लंडमध्यें**—विंटरनिट्झ यांच्या 'हिस्टरी ऑफ इंडियन लिटरेचर' या जर्मन ग्रंथाचे भाषांतर भाग, २, पृ. १–४८३ आणि १–२८८.

**पुणें-ऑफिसांत** ६ महिन्यात––

१ आर. फ्रेडरिक यांनीं प्रसिद्ध केलेली बलिबेटांतील कविभाषा, संस्कृत आणि वाङ्मय याविषयीं माहिती; हिचा 'यावद्वीपसंस्कृति' या प्रकरणामध्यें समावेश केला आहे.

२ कविभाषेंतील नागरकृतागम या ग्रंथाचा डॉ. कर्ननें केलेल्या डच भाषांतरावरून सारांश. याचाहि यावद्वीपसंस्कृतीमध्यें समावेश केला आहे.

३ कांबोज, सयाम, कोचीन चीन, ब्रह्मदेश इत्यादि देशांविषयीं लासेन यानें 'इंडिश आल्टरटुम्स्कुन्डे' या ग्रंथांत दिलेल्या माहितीचा गोषवारा.

४ डॉ. गायजर यांच्या सिंहली वाङ्मयावरील ग्रंथाचा गोषवारा पृ. १–९३.

५ 'ग्रीक नाटयाचा भारतीय नाटयावर परिणाम' या इ. विंडिश यांच्या ग्रंथाचा गोषवारा.

६ लि. श्रोडर यांच्या 'मिस्टिरिअम उंड मिमस इम ऋग्वेद' या ग्रंथाचा गोषवारा, पृ. १–४८१.

७ 'म्युसी गिमे' या फ्रेंच ग्रंथमालेंतील 'प्राचीन सयाम' या ग्रंथाचा गोषवारा.

८ वेबर यांच्या 'वेदिक मीटर' या लेखाचा गोषवारा, पृ. सं. सुमारें २००.

९ जावा, बली, ससक या बेटांतील ग्रंथाच्या ह्च यादीवरून तेथील ग्रंथांची माहिती.

१० पिशेल यांच्या ' प्राकृत ग्रामर ' या ग्रंथाचें भाषांतर, पृ. १–१४४.

११ जे जॉली यांच्या ' मेडिसिन ' या ग्रंथाचें भाषांतर पृ. १–१२३.

१२ वेबर याच्या ' इंडिश स्टुडियन ' या मालेच्या ( पूर्ण ) अठरा ग्रंथांची अनुक्रमणिका व त्यांतील कांहीं विषयांवर टीपा.

१३ लासेन याच्या इंडिश ' आल्टरटुमस्कुन्डे ' या मालेच्या ( पूर्ण ) चार ग्रंथांची अनुक्रमणिका व त्यांतील कांहीं विषयांवर टीपा.

१४ ए. हिलेब्रांड्ट याच्या ' रिच्युअल लिटरेचर ' या ग्रंथाच्या कांहीं भागाचा गोषवारा.

यांपैकीं १–७ व ९ यांपैकीं बऱ्याचशा भागाचा पहिल्या विभागांत समावेश केला आहे.

यांखेरीज मुंबईच्या रॉयल एशियाटिक सोसायटीच्या लायब्ररीमध्यें कांहीं जर्मन ग्रंथांतील टीपारूपानें माहिती जमविण्याच्या कामीं स्य मदत झाली आहे; कळावें हे विनंति.

यशवंत रामकृष्ण दाते.
संपादकीय कार्यव्यवस्थापक

---

## ( परिशिष्ट नं. १४ )

## पाध्ये यांचें प्रत्युत्तर.

रा. केतकर ज्ञानकोशाचे मॅनेजर व संपादक यांनीं शेअरहोल्डरांकडे तपासकमेटीच्या रिपोर्टाचें उत्तर पाठविलें आहे. ता. १९–१२–२० रोजीं नागपूर येथें कंपनीची तहकुबसभा भरणार आहे व रा. केतकर यांनीं पुणें येथें बोलाविलेली सभा बेकायदेशीर आहे असें मंडळाचे अध्यक्ष डॉ. खरे, डायरेक्टर रा. कठाळे व सेक्रेटरी रा. गोविंद चिंतामण तांबे यांनीं त्यांस कळविलें आहे. करितां सभा नागपुरासच होईल. त्याच्या आधीं रिपोर्टास पाठविलेलें रा. केतकरांचें उत्तर कितपत समर्पक आहे हें खालील गोष्टीवरून दिसून येईल. रा. पाध्ये खाजगी रीतिनें मजवर नाखुष झाले आहेत करितां त्यांस तपास कमेटींत मुकरर करूं नये, अशी तक्रार २६-१०-२० च्या सभेंत रा. केतकरांनीं केली असती तर रा. भवाळकर किंवा दुसरा एखादा मंडळाचा इतिहास माहीत असणारा गृहस्थ दोन नवीन गृहस्थाबरोबर मुकरर केला गेला असता.

खाजगी नाखुषीबद्दलचा खुलासा रा. पाध्ये अलाहिदा करतील. कारण रिपोर्टांतील आक्षेपाशीं तिचा कांहीं संबंध नाहीं. डॉ. केतकर यांच्या उत्तरांत जो भाग कमिटीच्या रिपोर्टासंबंधाचा आहे तेवढ्यापुरतीं खालीलउत्तरें प्रयुत्तरें आहेत. हिशेबासंबंधीं वर्तमानपत्रांत चर्चा करूं नये असें डॉ. केतकर यांनीं अभिवचन घेतल्यामुळें रिपोर्टावर खाजगी ( Private and Confidential ) म्हणून लिहून, आमच्या जवळ असलेल्या थोड्या प्रती, शेअरची बहुतेक रक्कम भरलेल्या कांहीं उत्सुक गृहस्थास दिल्या गेल्या आहेत. कंपनीचे अध्यक्ष, मॅनेजर व सेक्रेटरी यांचेकडे रजिस्टर्ड ऑफिसांत आम्ही ता. १-१२-२० रोजीं हा रिपोर्ट सर्व शेअरहोल्डरांच्याकडे पाठविण्यासाठीं आणि सभेपुढें ठेवण्यासाठीं सादर केला आहे केतकर यांनीं सर्व शेअरहोल्डरास पाठविलेल्या उत्तराबरोबर हा रिपोर्ट पाठविला नाहीं ही त्यांची चूक आहे.

खालील मजकुरांत कमिटीचा आक्षेप थोडक्यात दिला आहे व त्यावर रा. केतकरांचें उत्तर दिलें आहे व उत्तर नसल्यास नाहीं म्हणून दिलें आहे व नंतर कमिटीचें प्रत्युत्तर दिलें आहे.

आक्षेप नं. १ — ज्ञानकोश स्वरूपात येण्यास पांच वर्षे पुरीं आहेत हा अदाज आऊन ह्या जागीं जसजसा भाग छापला जाईल तसतसा भाग लिहून प्रेसमध्यें पाठवावयाच्या धोरणानें वीस प्रंथांस ६ वर्षे अधिक लागतील व तोंपर्यंत संपादकीय आणि छपाई असे दोन्ही खर्च चालले पाहिजेत.

उत्तर — नाहीं.

आक्षेप नं. २ — आतापर्यंत ज्ञानकोशाचीं फक्त सातअष्टमांश कच्चीं टिपणें झालीं आहेत.

उत्तर — नाहीं.

आक्षेप नं. ३ — ताळेबंद कंपनीच्या कायद्याचे नक्षाप्रमाणें नाहीं;संदिग्ध लिहिलेला आहे.

उत्तर — कांहीं नाहीं.

आक्षेप नं. ४ — कंपनीनें आपणापाशीं २५०० रु. ची ठेव ठेविली ती कंपनीच्या हेतूस सोडून बेकायदेशीर आहे.

उत्तर — नाहीं.

आक्षेप नं. ५ — व्हौचर फायलींतील कांहीं व्हौचरांस व्हौचर म्हणतां येणार नाहीं असे आहेत.

उत्तर — कांहीं नाहीं.

आक्षेप नं. ६ — डायरेक्टरांचें मिनिटबुक नाहीं. १९२० सालचीं प्रोसिडिंग्जचीं सुट्या कागदावर टिपणें आहेत. कं. का. कलम ८३ रूल, ७५ टेबल अ प्रमाणें हा गुन्हा आहे.

उत्तर — कांहीं नाहीं.

आक्षेप नं. ७

डॉ. केतकर आणि त्यांचें कुटुंब यांच्या मुशाहिर्‍याविषयीं प्रश्न असल्यामुळें त्यांनीच प्राक्सीच्या बळावर हिशेब न दाखविण्याविषयीं मांडलेला हट्ट नाजुक होता.

उत्तर

कांहीं नाहीं.

आक्षेप नं. ८

ज्ञानकोशाच्या कार्यारंभापूर्वीपासून मिस् कोहन यांशीं भाषांतर करण्याचें ठराविलें. मंडळाच्या ठरावावांचून असें करतां येत नव्हतें.

उत्तर

कांहीं नाहीं.

आक्षेप नं. ९

ज्ञानकोशाचें काम महाराष्ट्रांतील निरनिराळ्या प्रसिद्ध विद्वानांच्या साह्यानें करावयाचें आहे असें रा. केतकर यानीं निरनिराळ्या प्रसिद्ध पत्रकांतून प्रसिद्ध केलें आहे. पण त्या विद्वानांचें साह्य कितपत मिळालें व मिळालें नसल्यास कां नाहीं ? ५०००० चे एक लाख भांडवल वाढलें तरी महाराष्ट्रीय विद्वानांचें साह्य मिळूं नये ही ज्ञानकोशाची सर्वांत मोठी हानि झाली आहे.

उत्तर

कांहीं नाहीं.

आक्षेप नं. १०

५० हजारांचें भांडवल व जवळ जवळ एवढीच रक्कम शेअर-होल्डरांच्या कडून मिळवून लाख रुपयात ज्ञानकोश मूर्त स्वरूपांत येईल, असा पहिला अंदाज बांधून त्याच कामाला आतां संपादन व छापखाना मिळून ३ लाख रु. अधिक उभे करावे लागतील, असें डायरेक्टरांचें म्हणणें आहे

उत्तर

कंपनीचें काम एक लाखांत न करतां तीन लाखांत करण्याचा इरादा आहे. हें काम चांगलें आहे पण याबद्दल रा. पाध्यांचें अकांड तांडव. आहे. पाध्ये यास तीन लाखांचा बाऊ वाटतो ! सध्याच शेअरहोल्डर व वर्गणीदार मिळून १६०० च्यावर झाले आहेत. मग साठ हजार रुपये वापस करावेत काय ? तीन लाख रुपये उभे करणें अशक्य नाहीं. आणखी १४०० बुकें खपला म्हणजे झालें.

प्रत्युत्तर

चांगलें कसें ? किती लक्ष रुपये खर्च करून ज्ञानकोश डॉ केतकर आमच्या हातीं देणार हा प्रश्न आहे. हल्लीं ६३ हजार रुपये खर्च होऊन गेले आहेत. तथापि ज्ञानकोशाची प्रेसकॉपी तयार नाहीं. व पुढील सहा वर्षांत हल्लींप्रमाणें खर्च धरला तर ३० हजारांप्रमाणें १८० हजार अधिक खर्च लागेल. यांत छपाईचा खर्च नाहीं. शिवाय सहा वर्षांत कोश शिळा होईल तें वेगळेंच. शिवाय १० वर्षांनंतर शेअरहोल्डरांनीं व्याजाचा विचार करावयाचा नाहीं तें नाहींच. आणखी १४०० बुकें संपविलीं म्हणजे तीन लाख रुपये उभे रहातील पण बुकें अस्तित्वांत आल्यावाचून ? बुकाशिवाय प्रत्येक वर्गणीदाराची रक्कम ही शेअरहोल्डरावर कर्ज आहे. शेअरहोल्डर हा ऋणको आणि वर्गणीदार धनको आहे. रिपोर्टाच्या सालीं ६३७ शेअरहोल्डर ऋणकोवर ८०५

वर्गणीदारांचें कर्ज आहे. कारण त्यांस कॉपी देणें म्हणजे ज्ञानकोश मूर्त स्वरूपांत न आल्यास त्यांच्या रकमा परत देणें भाग आहे. शेअरहोल्डरांस हे रुपये द्यावे लागतील. १६०० वर्गणीदार व शेअरहोल्डर रिपोर्टाच्या काळांत नाहींत. आमची टीका ब्यालन्सशीटपुरती आहे.

आक्षेप नं. ११ — हिशेब व कागदपत्र दाखविले नाहींत.

उत्तर — हें कबूल आहे व त्याकरितां डॉक्टर नागपूरचें रजिस्टर आफिस सोडून पुण्यास सभा बोलावीत आहेत. व पुणें येथील शेअरहोल्डरांची कमिटी नेमून तिजकडून कसून तपासणी करून आनंद (?)करण्याच्या विचारांत आहेत. जबाब पृष्ठ ४, प्यारा १०.

प्रत्युत्तर — ब्यालन्सशीट व हिशेब मंजूर करण्यास नागपुरांत सभा भरविली. नागपुरांत नेमलेल्या कमिटीस हिशेब व कागदपत्र न दाखवितां पुण्यातील नवीन मुकरर करूं घातलेल्या कमिटीस कागदपत्र दाखविण्याच्या तयारीचें कारण काय ? नागपूरच्या कमिटीकडून कसून तपासणी होणार नाहीं अशी डॉ. यांस भीति वाटते कीं काय ? रजिस्टर आफिसांत जे कागदपत्र व हिशेब आणि पुस्तकें ठेवणें अवश्य होतें तीं तेथें न ठेवतां पुण्यास ठेवल्यावर, नागपुरास नांवापुरतें कंपनीचें रजिस्टरर्ड ऑफिस कशासाठीं ठेवलें आहे ?

आक्षेप नं. १२ — कंपनीच्या पैशांचा उपयोग कांहीं काळ तरी डॉ. केतकर आणि इतर करतात. जणूं काय ज्ञानकोश खाजगी ब्याक आहे. शिवाय हा तसलमात जमाखर्च एका खात्यांत ठेवणें महाजनी पद्धतीस धरून नाहीं.

उत्तर — ज्ञानकोशाच्या कामासाठीं कोणाहि लेखकास पैसे दिले म्हणजे हिशेब येण्यापुर्वी पैसे तसलमात नांवे पडतात.

प्रत्युत्तर — उत्तर पूर्ण नसून वस्तुस्थितीस धरून नाहीं हें हिशेबवही पाहिल्यानें समजेल.

आक्षेप नं. १३ — ताळेबंदाच्या सालीं १४५५१ रुपये खर्च झाले. त्यांपैकीं २५२६ रुपये मिस् कोहन यांना मुषाहिरा व ६९७ प्रवासखर्च. शिवाय डॉक्टर व त्यांचें कुटुंब यांस ताळेबंदाच्या सालीं १४५५१ पैकीं ६८९४ रुपये मिळाले. बाकीची रक्कम महाराष्ट्रीय एडिटरांस दिली गेली. २५० रुपये महिना कोहन बाईस व त्यांच्यापेक्षा अधिक योग्यतेचे एडिटर डॉ केतकर यांस ३०० रु. महिना. रा. यशवंतराव दाते बी. ए एल्एल् बी. यांस रु. १०० महावार. इतर विद्वानास ५०–५५ रुपये. महाराष्ट्रांत विद्वानाची किंमत एडिटर काय करतात हें यावरून दिसतें.

उत्तर — सौ शीलवतीबाई केतकर यास एका वर्षांत २५२६ रु. मिळाले हें अजिबात खोटें. लंडन आफिसच्या अनेक वर्षांचा खर्च या वर्षांत पडला आहे.

प्रत्युत्तर

उत्तर अपूर्ण. हे ताळेबंदावरून कसें समजावयाचें ? मिस् कोहनबाईच्या खर्चाबद्दल रा. तांबे यांच्या सहीचें कार्ड व हल्लीं उत्तरांतील माहिती याशिवाय दुसरें माहितीचें साधन काय ?

आक्षेप नं. १४

डॉ. केतकर यांचा पगार ३०० चा ४२५ केला असून तो मंजुरी-साठीं सर्व शेअरहोल्डरांच्या पुढें आला आहे व त्यास कमिटीचीं खालीं दिलेलीं उत्तरें आहेत—

(१) रा. केतकर यांनीं अनन्य दृष्टीनें २०० रुपयांवर संपादकाचें व १०० रु. वर मॅनेजरचें काम पतकरलें होतें. पण हल्लीं ते ज्ञानकोशाशिवाय दुसरे पांच व्यवसाय करीत असतात.

(२) कंपनीचें भांडवल वाढलें तरी ज्ञानकोशाचें संपादनाचें अथवा व्यवस्थेचें काम वाढलें नाहीं.

(३) डिसेंबर १९२० अखेर ज्ञानकोशाची प्रेसकॉपी खुद्द रा. केतकर यांच्या आश्वासनाप्रमाणें व्हावयाची पण ती झाली नाहीं.

उत्तर

हीं कारणें फार मौजेचीं आहेत. तीं पुन्हा वाचून विचार करावा.

प्रत्युत्तर

वाढता पगार घेणें मौजेचें तर खरेंच; पण तें घेणारास; देणारास नव्हे. कमिटीच्या रिपोर्टांतील सविस्तर कारणें जरूर वाचून पाहावींत. जे प्रश्न गळीं उतरूं पहातात ते हंसण्यावर किंवा रागावर घालवावे हें विवाद-कौशल्य आहे. डॉ. केतकर रागावले नाहींत हा त्याच्या आत्मसंयमनाचा नमुना आहे.

आक्षेप नं. १५

विंटरनिट्झच्या ग्रंथाचें भाषांतर कंपनीच्या खर्चानें करून प्रथमावृत्तीचा हक्क कांहीं मोबदला न घेतां सौ० शीलवतीबाईस बहाल केला.

उत्तर

परवानगी मिळाली हें खोटें आहे पण छापण्याच्या परवानगी-साठीं काय द्याल असा जबाब डॉक्टरानीं त्यांस विचारला आहे.

प्रत्युत्तर

प्रोसिडिंग टिपणातील उत्तर वाचा: Extract from Scrapy notes of the preceedings of Directors, on loose sheets D. 20-7-20 "The proposal about publishing Winternitz Translation considered & resolved that the Company should not publish that work for the present; Misses Shilwati Bai Ketkar be allowed to publish the first edition, the Company reserving the rights for subsequent editions " रा केतकराचा जबाब खोटा कीं प्रोसिडिंग खोटें ?

आक्षेप नं. १६

ज्ञानकोशाचें काम टाकाऊ आहे कीं विकाऊ आहे हें समजण्यास लेख पाहण्याची मंजि दिली नाहीं. आणिलेला व्हाल्यूम परत नेला.

ज्ञानकोशाच्या मजकुराच्या परीक्षेचा योग्यता ठरविण्याचें काम कमिटीकडे सोपविलें नव्हतें. रा. फाटक आणि लोकस यांनीं अहवाल न वाचतां त्यावर सही केली.

उत्तर

आजपर्यंत खर्च झालेल्या पैशांचें चीज करणारें काम होत आहे. किंवा नाहीं हें पहाणें हिशेब तपासणारांचें एक काम आहे. कमिटी तज्ज्ञ नसली तरी तिला तज्ज्ञांचें साहाय्य घेण्यास प्रत्यवाय नव्हता. डॉ. केतकरांस २५० रु. पगार देण्यालायक महाराष्ट्रांत एकच विद्वान मिळाला आणि तो म्हणजे सौ. शीलवतीबाई आणि त्यापेक्षां अधिक विद्वान काय ते खुद्द. उभयतां दांपत्यानें सर्व विद्वत्वशोषण केल्याचा जादू डोळ्यांत भरल्यामुळें कमिटीच्या अंगीं साक्षरतेपलीकडे योग्यता न दिसणें हा त्यांचा दोष नाहीं. कमिटीची साक्षरता त्यांनीं कमिटीच्या प्रत्येक व्यक्तीच्या वांट्यास दिली असती तर रिपोर्ट न वाचतां सही केली असें विधान त्यास करवतेना.

प्रत्युत्तर

माधवराव पाध्ये
सखारामपंत फाटक
मुकुंदराव लोकस

रा. पाध्ये मंडळांचे जे आक्षेप टेक्निकल स्वरूपाचे आहेत. त्यांस उत्तर देण्याचें विशेष कारण नाहीं शास्त्रीय स्वरूपी वाद पुन्हां उकरण्यात आजच्या वाचकास महत्व नाहीं. रा. पाध्ये यांचा या वेळचा मुख्य आक्षेप मिसेस केतकर यांच्या देणगीसंबंधाचा होय. तर त्यासंबंधानें थोडासा खुलासा केला म्हणजे झालें, मिस कोहन यांस काम दिलें तें का आणि डॉ. केतकर यांनां बढती काय म्हणून दिली हे दोन प्रश्न कायते महत्वाचे आहेत त्यांस उत्तर मुख्य पुस्तकात दिलें असल्यामुळें येथें त्यावर विशेष चर्चा करण्याचें कारण नाहीं. रा. पाध्ये यांनीं यात दिलेले बरेचसे आंकडे चुकीचे आहेत. उदाहरणार्थ त्या सालातले १४५५१रुपये खर्च झाले. पैकीं ६८९४ रुपये डॉ. केतकर यांस आणि त्यांच्या कुटुंबास मिळाले हें विधान खोटें आहे. खर्च २३५४८ रुपये झाला. आणि डॉ. केतकर यांस त्याच्यापैकीं फक्त ३६०० रुपये व मिसेस केतकर यास १२५० रुपये मिळाले होते.

विंटरनिटझचे भाषांतर प्रसिद्ध करण्यासंबंधानें रा पाध्ये यानीं प्रोसिडिंग बुकांतलीं कांहीं वाक्यें छापलीं पण पुढचें एक वाक्य त्यांनीं गाळुन टाकलें तें वाक्य That Mrs Ketkar should be informed to send her formal application direct and to state what royalty she is prepared to pay हें वाक्य गाळून इतर भाग मात्र रा. पाध्ये यांनीं प्रसिद्ध केला.कांहीं दिवसांनीं तात्पुरता समेट झाल्यानंतर रा.पाध्ये यांस त्यांनीं असें Haef fruh लिहिलें तेव्हां ते म्हणाले कीं आम्हांस केस जिंकावयाची होती व त्या दृष्टीनेंच आम्ही काय केलें तें पाहिलें पाहिजे ?

---

( परिशिष्ट नं. १५. )

# ग्रंथोत्पत्तीनंतर

## ज्ञानकोशावर झालेली टीका.

## स्वतंत्र हिंदी अर्थशास्त्राची आवश्यकता.

( ले. धनंजय रा. गाडगीळ बी. ए, एम् लिट् केंब्रिज. )

ज्ञानकोशांतील अर्थशास्त्रावरील निबंधांत हिंदी अर्थशास्त्र हें एक पोट-कलम घातलें आहे, व या पोटकलमांत प्रथम हिंदी अर्थशास्त्र स्वतंत्र असण्याची जरूरी दाखवून नंतर आपल्या समाजरचनेचा, आपल्या सांस्कृतिक परंपरेचा व हल्लींच्या आपल्या राजकीय स्थितीचा आपल्या आर्थिक रचनेवर काय परिणाम होतो याचा विचार केला आहे. स्वतंत्र हिंदी अर्थशास्त्राची बिलकुल जरूरी नाहीं, किंबहुना असें स्वतंत्र अर्थशास्त्र आहे असें दर्शविण्याचा प्रयत्न करणेंच अर्थशास्त्रविषयक चुकीच्या कल्पना पसरविण्यास कारण होईल असे आमचें मत आहे. नवीन हिंदी अर्थशास्त्र जन्मास आलें कीं हिंदुस्थानची आर्थिक उन्नति लवकरच होणार हा समजहि आम्हांस चुकीचा वाटतो. ज्ञानकोशकार या नवीन शास्त्रास निर्माण करण्यास मुख्य कारण काय देतात तर हिंदी समाजाची घटना इंग्रजी समाजाचे घटनेहून भिन्न आहे. ' पाश्चात्य विद्वानांनीं ठरविलेले सिद्धांत आयते उचलून ते तंतोतंत इकडे लागू करून हिंदुस्थानची आर्थिक उन्नति करण्याच्या प्रयत्नास यश येणें तर शक्यच नाहीं. " हें खरें व अलीकडचा कोणी अर्थशास्त्रज्ञ आपले सिद्धांत चोहोंकडे " तंतोतंत " लागू पडतात असें म्हणण्याइतका वेडगळ नाहीं. पण ते चोहोंकडे सारखे लागू पडत नसले म्हणून प्रत्येक राष्ट्राचें एक निराळें अर्थशास्त्र निर्माण करावें असें कोणी प्रतिपादन करीत नाहीं. खुद्द लिस्ट सुद्धां राष्ट्रीयदृष्ट्या आर्थिक उन्नतीचा प्रयत्न करीत असतां हरएक राष्ट्राची परिस्थिति निरनिराळी असते याचा विचार करावा एवढेंच म्हणत होता. शिवाय लिस्टच्या वेळेस अर्थशास्त्राचे सिद्धांत फार अपूर्ण होते व अर्थशास्त्राचा एकंदर ओघ केवळ तात्त्विक होता हें लक्षांत ठेवलें पाहिजे.

या हिंदी अर्थशास्त्राला ज्ञानकोशकार अर्थशास्त्राचें व्यावहारिक अंग असें एके ठिकाणीं म्हणतात; आणि शिवाय " हिंदी अर्थशास्त्र तयार करण्याकरितां प्रथम हिंदी समाजाची, त्याच्या बौद्धिक परंपरेची, सांस्कृतिक इतिहासाची, वाङ्मयाची, तसेंच प्रस्तुतच्या परिस्थितीची लेखकास चांगली माहिती पाहिजे " असें त्यांचें मत आहे. ज्ञानकोशकार आपणांस आर्थिक प्रश्नांचा व्यावहारिक दृष्ट्या विचार करतांना आपली परिस्थिति–सामाजिक, भौगोलिक, सांस्कृतिक इत्यादि–यूरोपीय देशांहून भिन्न आहे हें समजून पुढें

पाऊल टाकावें असा केवळ इषारा देऊन जर रहाते तर आमचें कांहींच म्हणणें नव्हतें. पण त्यांच्या निबंधांत हरकत घेण्यास मुख्य जागा म्हणजे त्यांनीं सामाजिक रचनेला, आपल्या कलियुगाच्या कल्पना इत्यादि गोष्टींना आर्थिक प्रगतीला वळण लावण्यांत फाजील महत्व दिलें आहे व पर्यायानें कां होईना, हिंदी आर्थिक घटना म्हणजे कांहीं विशेष असें सुचविण्याचा प्रयत्न केला आहे. आपल्याकडे राष्ट्रीय भावनेच्या भलत्याच जोरामुळें 'आपणांत इतर देशांपेक्षां सर्व बाबतींत कांहीं और आहे' असें भासविण्याची प्रवृत्ति झाली आहे. अर्थशास्त्रांत या प्रवृत्तीचें उत्तम उदाहरण म्हणजे प्रो. राधाकमल मुकर्जी यांचीं लिखाणें होत. असल्या अंध राष्ट्रभक्तांच्या मालिकेंत ज्ञानकोशकारांना गोंवणें शक्य नाहीं हें आम्हीं समजून आहों; पण "हिंदी अर्थशास्त्र निर्माण करण्याची वेळ आली आहे" अशा प्रकारच्या शब्दप्रयोगामुळें या प्रवृत्तीस आणखी उत्तेजन मिळण्याचा संभव आहे. आपल्या सामाजिक परिस्थितींत व युरोपीय परिस्थितींत फरक बराच आहे हें खरें, पण हा फरक आर्थिक बाबतींत फारसा महत्त्वाचा नाहीं. आर्थिक प्रगति अथवा आर्थिक स्थित्यंतरें केवळ भौगोलिक अथवा नैसर्गिक कारणांवरच अवलंबून नसतात. पण आजच्या आपल्या परिस्थितींत आपल्या सामाजिक रचनेमुळें उत्पन्न झालेले अडथळे फारसे महत्त्वाचे नाहींत; त्यांनीं अर्थशास्त्रीय सिद्धांताच्या क्रियेंतील घर्षण फार तर थोडेसें वाढेल इतकेंच असें आमचें म्हणणें आहे. हीं विधानें सिद्ध करण्याकरितां ज्ञानकोशकारांनीं नमूद केलेल्या एक दोन मुद्दयाचा थोडासा तपशीलवार विचार करूं.

ज्ञानकोशकार जातिभेदाच्या अनिष्ट परिणामांवर विशेष जोर देतात. सुरवातीस जातिभेदामुळें आर्थिक प्रगतीस थोडेसे अडथळे येतात हें आम्हीं कबूल करतो. यापैकीं मुख्य अडथळा म्हणजे आपल्या समाजांत कलांचें अथवा शास्त्रांचें ज्ञान जितकें लवकर पसरावें तितकें पसरत नाहीं; यामुळें ज्ञानाची वाढ खुंटते व आर्थिक प्रगतीचा वेग कमी होतो. डॉ. व्होल्करनें आपल्या हिंदुस्थानांतील शेतकीच्या सुधारणेवरील रिपोर्टांत नमूद केलें आहे कीं हिंदुस्थानच्या निरनिराळ्या प्रांतांतून व जिल्ह्यांतून शेतकीच्या चांगुलपणाचें मान फार भिन्न आहे. इतकेंच नव्हे तर एकाच खेड्यांत निरनिराळ्या जाती निरनिराळ्या पद्धतीनें शेत वाहतांना आढळून येतात. कांहीं जाती बऱ्याच सुधारलेल्या पद्धतीचा अवलंब करतात पण इतर जाती या सुधारणांचा कांहींच उपयोग करून घेत नाहींत. जातिभेद नसते व सर्व जातींतून रोटीबेटीव्यवहार सुरू असता तर इतका फरक सांपडणें शक्य नव्हतें व आपलें एकंदर शेतीचें मान बरेंच वाढतें हें उघड आहे. आपल्या समाजघटनेमुळें सर्व समाजाच्या राहणीस सामान्य स्वरूप येऊं शकत नाहीं ह

ज्ञानकोशकारांचें म्हणणेंहि खरें आहे.इतकेंच कीं, हल्लींचा एकंदर कल सामान्य स्वरूप येण्याकडे आहे व जातिभेदाचा या बाबतींतला परिणाम बराच कमी होत चालला आहे. पण हीं जीं दोन उदाहरण दिलीं तीं एवढेंच दर्शवितात कीं जातिभेदामुळें आर्थिक घर्षण वाढतें व अर्थशास्त्रीय सिद्धांतांच्या क्रिया इतर समाजांत जितक्या लवकर घडून येतात तितक्या लवकर त्या हिंदुस्थानांत घडून येत नाहींत. याहून अधिक आर्थिक रचनेवर जातिभेदाचा परिणाम कांहीं होत नाहीं.

'पदार्थांची निपज करतांना श्रमविभागाच्या तत्त्वानुसार जरूर असणारें सहकार्य निरनिराळया जातींत होऊं शकत नाहीं' हें ज्ञानकोशकारांचें विधान चुकीचें दिसतें. या मुद्दयाचा विचार करतांना दोन गोष्टी नेहमीं लक्षांत धरल्या पाहिजेत. एक तर जातिभेद व राष्ट्रभेद यांचा घोटाळा होऊं देऊं नये व दुसरी ही कीं कोणत्याहि वस्तूची मोठ्या प्रमाणावर निपज होणें हें लोकांच्या सांपत्तिक स्थितीवर व त्या वस्तूकरितां असलेल्या मागणीवर अवलंबून असतें. आपलें विधान सिद्ध करण्याकरितां ज्ञानकोशकार दोन उदाहरणें देतातः एक शिंप्याच्या धंद्याचें व दुसरें खाणावळीच्या धंद्याचें. यांत गुजराथी व दक्षिणी लोकांच्या पोषाखांतील फरकामुळें तोटा होतो असें त्यांचें म्हणणें आहे. दक्षिणी व गुजराथी यांच्या पेहरावांतील फरकामुळें शिंप्याच्या धंद्यांतील श्रमविभागास खरीच अडचण होते कीं काय ही गोष्ट अलाहिदा आहे येथें मूळांतच राष्ट्रभेद व जातिभेद यांत घोंटाळा दृष्टीस पडतो. दक्षिणी व गुजराथी हे फरक जातिभेदामुळें उत्पन्न झालेले खात्रीनें नव्हत. हिंदुस्थान हें इंग्लंडसारखें एक राष्ट्र नाहीं. दहाबारा राष्ट्रांचें कडबोळें आहे. ज्यांची भाषा निराळी परंपरा निराळी त्यांचे पोषाखहि निराळे. पण यात जातिभेदाचा प्रश्न कोठून आला ? जर जातिभेदामुळें श्रमविभागास कोठें अडथळा येत असेल तर तो पागोटीं बांधण्याच्या धंद्यात. पगड्यांशिवाय बाकी साधारण गुजराथ्यांचा पोषाख एकच असतो. तीच गोष्ट खाणावळींची. मुंबईंत गुजराथी व दक्षिणी खाणावळी निराळ्या सऱ्या पण एखादी दक्षिणी खाणावळ पाहिली असतां तींत साधारण एका आर्थिक पायरीवरचे पण सर्व जातींचे असे महाराष्ट्रीय सांपडतील. बरें, या पोषाखांच्या व खाद्यपेयांच्या धंद्यांत मोठ्या प्रमाणावर निपज कितपत शक्य आहे ? प्रथमच ही गोष्ट कळून येईल कीं, या धंद्यांत वैयक्तिक आवडीनिवडीचा प्रश्न महत्त्वाचा असल्यामुळें एकाच प्रकारची अशी सार्वजनिक मागणी सहसा असत नाहीं. पाश्चिमात्य देशांस सुद्धां या धंद्यांतून मोठ्या प्रमाणावर निपज अगदीं अलीकडे होऊं लागली आहे. इंग्लंडांत हल्लीं सुद्धां आयते तयार केलेले सूट चांगल्या स्थितींतले लोक सहसा घेत नाहींत आतां दुसऱ्या दृष्टीनें या प्रश्नाकडे पहा. आयते तयार केलेले कुडते

वगैरे तयार न होणें हा आपल्या बहुजनसमाजाच्या रहाणीचा दोष आहे.साधारण शेतकरी व मजूरवर्गास धोतर, उपरणें अगर मुंडासें याकरितां लागणाऱ्या कापडाची निपज मोठया प्रमाणावर होते, व त्यांत जातिभेदाचा कोठें अडथळा येत नाहीं. मध्यम वर्गास लागणारा कपडा व धोतरें यांच्या उत्पादनांतहि जातिभेदामुळें कांहीं अडथळा येत नाहीं. खाद्यपेयाच्या धंद्याचीहि स्थिति तीच आहे आपल्याकडे टिन्ड अथवा कॅन्ड पदार्थांचा खप नाहीं याचेंहि खापर ज्ञानकोशकार जातिभेदाच्याच माथीं फोडणार कीं काय कोण जाणे! बिस्किटें वगैरेंनाहि मागणी आपल्याकडे फार कमी; मग श्रमविभागाचें तत्त्व चालण्यास वाव असणार कोठें व जातिभेद आडवा येणार कोठून? जेथें मोठया प्रमाणावर निपज शक्य आहे, तेथें जसजशी मागणी वाढते तसतशी निपज मोठया प्रमाणावर होतेहि. पिठाच्या व तांदळाच्या गिरण्या हेच दर्शवितात. तसेंच अलीकडे गुलकंद, गरम मसाला वगैरे जिनसांनाहि सार्वत्रिक मागणी उत्पन्न झाली असून त्यांची निपजहि मोठया प्रमाणांत होऊं लागली आहे. या जिनसांकरितां मागणी केवळ सांपत्तिक स्थितीवरूनच ठरत नाहीं; तर घरांतील बायकांस वेळ व इतर सोय कितपत आहे यावरहि तें अंशतः अवलंबून असतें खेड्यापाड्यांतून बायकांना निवडणें, पाखडणें; कांडणें, कुटणें इत्यादि करण्यास वेळ व तशीच जागेची सोयहि असते पण तेंच मुंबईत अशक्य. म्हणून मुंबईत आयत्या तयार केलेल्या जिनसांना मागणी फार. हा मुख्यतें नागर व अनागर राहणींतला फरक आहे. आमचा मुद्दा एवढाच कीं, जातिभेदामुळें येथें कांहीं अडथळा येत नाहीं [ या बाबींत एवढें मात्र कबूल केलें पाहिजे कीं, जातिभेदामुळें जरी नव्हे तरी खाण्यापिण्याच्या निरनिराळ्या बंधनांमुळें हिंदुसमाजाचा बराच आर्थिक तोटा होतो लंडनमध्यें हिंदी खलाशांच्या आर्थिक स्थितीची चौकशी करीत असतां शंभरावर हिंदी खलाशांची माहिती आम्हीं गोळा केली पण त्यांतील बहुतेक सगळेच मुसुलमान अगर ख्रिस्ती होते. ]

आतां चामड्याच्या धंद्याचें आणखी एक उदाहरण ज्ञानकोशकार देतात तें बरबर पाहिलें असतां बरेंच महत्त्वाचें वाटतें. जुन्या पद्धतीनें चालणाऱ्या खेडवळ धंद्यांत बहुधा कांहीं ठराविक जातीचेच लोक आढळतात हें खरें. पण या धंद्यात सुद्धा नवीन शास्त्रीय पद्धति सुरू करण्यास व मोठे कारखाने काढण्यास जातिभेदानें कांहींच अडथळा आणलेला नाहीं. मद्रास इलाख्यांत तर चामड्याच्या धंद्यांत इतर जाती पुष्कळ आढळतात [ चॅटरटन ( मद्रास ) गुथ्री; व मार्टिन (मुंबई) यांचे चामड्याच्या धंद्यावरील रिपोर्ट पहा ]. मोठ्या कातडीं कमावणाऱ्या कारखान्यांतून कामगार वर्ग सगळा चांभार जातीचा खात्रीनें नसतो. शिवाय चांभाराचा धंदा घाणेरडा म्हणूनहि बऱ्याच जणांस

तो पतकरावासा वाटत नाहीं. हिंदूंच्या अहिंसेबद्दलच्या कांहीं समजुती व चामड्याचा विटाळ या गोष्टी त्या धंद्याची स्थिति खालावण्यास अंशतः कारण भूत असतील पण जातिभेदाचा येथेंहि परिणाम तसाच आहे असें वाटत नाहीं हल्लींचा मुख्य प्रश्न प्रगतीचा व तींत तर जातिभेद आडवा येण्याचें कांहींच कारण दिसत नाही.

जातिभेदाचा अनिष्ट परिणाम असा एक दाखवितां येईल कीं,त्याच्यामुळें एकच धंदा वंशपरंपरा चालतो. पण बहुतेक सर्व देशांत--जेथें जातिभेद नाहीं तेथें सुद्धां बापाचा धंदा लेकानें पुढें चालविण्याचा प्रघात फार. आलिकडेंहि आपल्या जातीच्या परंपरागत धंद्यावर उपजीविका नीट चालूं शकत नाहीं असें आढळून आल्यास लोक दुसरे धंदे चटकन पतकरतात. खानेसुमारीच्या बऱ्याच रिपोर्टांत जाती व धंदे याचे आंकडे दिले आहेत, त्यांपासून फार बोध होण्यासारखा आहे. या आंकड्यासंबंधीं विचार केला असतां कांहीं गोष्टी उघड दिसतात. एक तर सुमारें पन्नास पाऊणशें वर्षांपूर्वी जरी जात व धंदा हीं स्थूल मानानें एकच असलीं तरी आज तशी स्थिति नाहीं. आपल्या जातीचा धंदा सोडणें हल्लीं बऱ्याचजणांनां प्राप्त झालें आहे आपल्या जातीचा धंदा सोडल्यानंतर साधारण बरी स्थिति असल्यास मनुष्य शेतकी करूं लागतो नाहीं तर त्यास मोलमजुरी करावी लागते, इतर धंदे तो सहसा करीत नाहीं. पण याचें कारण जातिभेद नसून आपल्या सर्व जुन्या धंद्यांची निकृष्ट स्थिति हें होय. सुतार, लोहार, चांभार, वगैरेंच्या जुन्या पद्धतीच्या सर्व धंद्यांस उतरती कळा लागली आहे. पण जेथें कोणताहि धंदा किफायतशीर वाटतो तेथें इतर जातीचे लोकहि त्या धंद्यात प्रवेश करतात. कांहीं प्रांतातून कोष्टयांचा व कांहीं प्रांतांतून शिंप्याचा धंदा फायदेशीर होता तेव्हां त्या धंद्यांत इतर जातींचेहि लोक सांपडत असत. तसेंच अलीकडे शहरांतून फर्निचर वगैरे जिनसांनां बरीच मागणी असल्यामुळें सुतारकामांत मिळकत बरीच होऊं लागली आहे त्या अर्थी नागर सुतार वर्गांत हल्लीं इतर जातींचा भरणा बराच आहे जुन्या पद्धतीनें काम करणाऱ्या व निकृष्ट स्थितींत असलेल्या खडबळ धंद्यांत इतर जाती शिरतील कशाला ? पण जेव्हा कांहीं सुधारणेमुळें अथवा नवीन मागणीमुळें धंद्यास ऊर्जितावस्था येते तेव्हां जातिभेदास न जुमानतां इतर जातींचे लोक देखील त्या धंद्यांत आपला शिरकाव करून घेतात [ याविषयीं विशेष माहिती निरानिराळ्या खानेसुमारीच्या रिपोर्टांत मिळेल ]. जाती व धंदे यांचे आंकडे मिळविण्यास श्रम पडतो व ते असावे तितके खात्रीलायक मिळत नाहींत म्हणून अलीकडील खानेसुमारीच्या रिपोर्टांत ते सांपडत नाहींत. पण या दोन आंकड्यांतील तफावत फार मोठी आहे ही गोष्ट निर्विवाद आहे इतकेंच नव्हे तर ही तफावत सारखी वाढत चालली आहे [ १८९१ सालच्या पंजाब व मद्रास यांच्या खानेसुमारीच्या

रिपोर्टांत आंकडे पहा ] कोणत्याहि जातींतले लोक आपल्या जातीचा धंदा सोडून इतर धंदे लवकर पहातात यावरून जातिभेदाचीं बंधनें आर्थिक बाबतींत फार सैल झालीं आहेत हें सिद्ध होतें.

ज्ञानकोशकार आणखी दोन विधानें करतात: पाहिलें विधान हें आहे. " याप्रमाणें एकाच समाजांत भिन्न भिन्न वर्ग व त्यांच्या भिन्नभिन्न गरजा यामुळें समाजांत आर्थिक उन्नति होण्याच्या मार्गांत भयंकर अडचणी येतात." आमच्या सर्वसाधारण गरजांच्या बाबतींत जातिभेदामुळें भिन्नत्व कोठें उत्पन्न होतें हें आम्हांस कळत नाहीं. पोषाख व खाण्यापिण्याचे पदार्थ या दोहोंतच जातिभेदामुळें मागणींत फरक होतो असें दाखविण्याचा ज्ञानकोशकारांनीं प्रयत्न केला आहे. या दोन्ही धंद्याच्या स्थितीचें सविस्तर विवेचन आम्ही वर केलेंच आहे. बाकी सर्व महत्त्वाच्या बाबतींत जातिभेदामुळें मागणींत कांहीं फरक होत नाहीं हें ज्ञानकोशकारानां सुद्धां कबूल करावें लागेल. आपल्या घरांची बांधणी, तीं बांधण्यास लागणारें सामानसुमान वगैरे गोष्टी आपल्या सांपत्तिक स्थितीवर अवलंबून असतात, आपल्या जातीवर नव्हे. ब्राह्मण शेतकरी झाला म्हणून तो कांहीं कुणब्याहून निराळ्या शेतकी आऊताची मागणी करीत नाहीं एक जात दिव्यांतून राकेल वापरते म्हणून दुसऱ्या जातीनें गोड्या तेलाची मागणी केल्याचें आमच्या ऐकिवांत नाहीं. कोणतीहि महत्त्वाची बाबत घ्या, सर्व जातींची मागणी साधारणपणें सारखीच, मागणी परिणामकारक होणें आपल्या सांपत्तिक स्थितीवर अवलंबून आहे. बारीक सारीक फरक असतील पण ते अगदीं क्षुल्लक बाबतींत. आतां पगड्याची धाटणी जातीजातींची निराळी, अथवा देशावरील ब्राह्मण स्वयंपाकांत गरम मसाला फार वापरतात पण सारस्वतांस मात्र ओल्या खोबऱ्याची जरूर फार, एवढ्यावरून जातिभेदामुळें आमची " आर्थिक उन्नति होण्याच्या मार्गांत भयंकर अडचणी येतात" असें ज्ञानकोशकारांस म्हणावयाचें असल्यास हरकत नाहीं. हें बरा अतिशयोक्तीचें विधान नव्हे काय? इतकीच पृच्छा आम्ही त्यांस करितों. ज्ञानकोशकारांचें दुसरें विधान म्हणजे " पदार्थांची निपज मोठ्या प्रमाणावर होणें व प्रत्येक धंद्यांत कामाची वांटणी होऊन प्रत्येक अंगांत प्रावीण्य संपादन करणें या गोष्टी जातिभेदामुळें फुट पडून विस्कळित झालेल्या हिंदु समाजांत मुळींच संभवत नाहींत " " आणि ही गोष्ट इतकी उघड आहे असें त्यांस वाटतें कीं तिच्या समर्थनार्थ ते कांहींच पुरावा देऊं इच्छीत नाहींत. पदार्थांची निपज मोठ्या प्रमाणावर केव्हां होऊं शकते याचा थोडासा विचार आम्ही मागेंच केला आहे. कोणत्याहि भागाची वांटणी करण्यास जातिभेदामुळें काय अडथळा येतो ? जुन्या काळांत जेव्हां आपणांस धंद्यांचें साधन नव्हतें तेव्हां कोणत्याहि धंद्यांत श्रमविभाग फारसा होणें शक्यच नव्हतें.

पण त्या काळची यांत्रिक सुधारणा लक्षात घेतां शक्य तितका श्रमविभाग होत असे. तसेंच जुन्या धंद्यातून हळूहळू नवीन यांत्रिक सुधारणांचा जेव्हां प्रवेश झाला तेव्हां कामाची वांटणी जास्त चांगल्या रीतीनें होत गेली [ बर्डन ( यू. पी. ) व निसिम (मुंबई) यांचे जर व कलाबुत या धंद्यावरील मोनोग्राफ पहा. तसेंच डाम्पियर ( यू पी. ) व इतर प्रांतांचे पितळ व तांब्याच्या भांड्यांच्या धंद्यावरील मोनोग्राफ पहा ]. कोणत्याहि धंद्यांत प्रावीण्य मिळविणें जातिभेदामुळें कसें अशक्य होतें ? आपले कारागीर नवीन यंत्राचा अथवा शास्त्रीय पद्धतीचा अवलंब करीत नाहींत याचें कारण जातिभेद नाहीं. हा आपल्या शिक्षणाच्या अभावाचा परिणाम आहे. वंशपरंपरा सारखा एकच धंदा चालत असल्यामुळें एक प्रकारचें प्रावीण्य मिळविण्यास जातिभेदाचा थोडासा उपयोगच होतो असें म्हणण्यास हरकत नाहीं. हिंदु समाज सामाजिकदृष्ट्या विस्कळित असेल पण तो आर्थिकदृष्ट्या विस्कळित होत नाहीं.

एकदां, जातिभेदानें आमच्या आर्थिक आपत्तींची परंपरा ओढवली आहे असें ज्ञानकोशकारांच्या मानानें घेतलें, मग काय?सर्व कांहीं जातिभेदावर लादलें जातें. हिंदुस्थानांत मोठा व्यापार नाहीं हाहि जातिभेदाचाच अपराध हें ज्ञानकोशकार कसें सिद्ध करतात तें पहा. "बुद्धि,शारीरिक श्रम व भांडवल हीं तिन्हीं एकत्र होणें मोठ्या व्यापारास आवश्यक " हा अर्थशास्त्राचा सर्वमान्य सिद्धांत प्रथम प्रतिपादितात. मग आपल्याकडे महाराष्ट्रीय ब्राह्मणाजवळ बुद्धि, मारवाड्याजवळ भांडवल व शूद्राजवळ शारीरिक बल असतें. या तीन निरनिराळ्या जाती झाल्या. त्यांचा एकमेकांशीं संबंध आमच्या समाजांत येणार कसा व मोठा व्यापार होणार कसा ! या अर्थशास्त्रास काय म्हणावें ? शारीरिक बलाचा प्रथम विचार करूं. मजूर लोक हे काम कशाकरितां करितात ? तर केवळ मजुरी मिळविण्याकरितां. ज्याप्रमाणें मजुरी मिळेल त्याप्रमाणें त्याचें काम होईल व जेथें मजूरी जास्त मिळेल तेथें जाण्याचा मजूरवर्गाचा कल राहील [ अर्थात मजूरवर्गाची चलनशक्ति पूर्ण आहे असें गृहीत धरलें आहे प्रत्येक लहानशा अडथळयाचा विचार केला असतां विवेचन फारच लांबेल ]. पण कुणबी मजूर दोन पैसे कमी घेऊन कुणबी कारखानदाराकडे काम करील असें ज्ञानकोशकारांस वाटतें काय ? आमच्या समाजांत महार व ब्राह्मण यांचा संबंध एकमेकांशीं फार कमी येतो पण पगार नीट मिळाल्यास ब्राह्मणांच्या दुकानांत चाकरी करण्यास महारांची कांहींच हरकत नसते. मारवाड्याचें उदाहरण यूरोपांतील यहुद्याप्रमाणेंच आहे. यहुद्यांचा यूरोपांतील आर्थिक रचनेवर जेवढा परिणाम होतो तेवढा आमच्याकडे मारवाड्यांच्यामुळें होईल. मारवाड्यांच्या हातांत कांहीं हिंदुस्थानांतला सर्व पैसा नाहीं. बंगालचें उदाहरण घ्या. बंगाली कायस्थ, ब्राह्मण वगैरे उच्च जातींचेच बंगालचे मोठमोठे

सधन जमीनदार आहेत, व त्या जातींतच बंगालचा बुद्धिवान व सुशिक्षित वर्ग आहे. मग येथें बुद्धि व भांडवल यांची सांगड होण्यास ज्ञानकोशकारांच्या मतें कांहींच अडचण नसावी. तरी पण बंगाल्यांत एतद्देशीय लोकांनीं चालविलेले धंदे फार कमी आहेत. आणि जे कांहीं आहेत ते गेल्या दहा पंधरा वर्षांतच निघालेले. निरनिराळ्या अर्थशास्त्रीय कल्पनांचा घोंटाळा पुन्हां खालील विधानांत दृष्टीस पडतो. " आमच्या गुजराथी बनिया व मारवाडी समाजापैकीं परदेशांत जाऊन उच्च शिक्षण मिळविणारे इसमच नाहींत. यामुळें बुद्धि व भांडवल यांचें सहकार्य दुरापास्त झालें आहे" असें कांहीं परदेशांत जाऊन आल्याशिवाय भांडवलाचा उद्योगधंद्यांच्या वाढीकरितां नीटसा उपयोगच करितां येत नाहीं ! आतां धंदे चालविण्यास अथवा सुरू करण्यास दोन प्रकारचें शिक्षण व बुद्धि यांची जरूरी आहे. मुख्य म्हणजे धंद्यामधील कार्ययोजकता. आपल्या उत्पाद्य वस्तूंच्या मागणीचा व पुरवठ्याचा विचार करणें, सर्व धंदा व्यवस्थित चालविणें, काटकसर कोठें करतां येईल याकडे सारखें लक्ष देणें, व थोडाबहुत धोका आहे असें समजूनहि योग्य ठिकाणीं भांडवल खर्ची घालण्याची तयारी असणें वगैरेस लागणारी जी बुद्धि व जें शिक्षण धंदा सुरू करण्यास अथवा चालविण्यास आवश्यक आहे तें परदेशांत जाऊन मिळत नाहीं. यास मुख्यतः हिंदुस्थानांतील धंद्यांची घटना व त्यांच्या अडचणी यांचा अनुभव लागतो. परदेशीय औद्योगिक घटना व अर्थशास्त्र यांच्या ज्ञानानें फायदा होईल पण हें ज्ञान आवश्यक नाहीं. दुसऱ्या प्रकारचें शिक्षण म्हणजे त्या धंद्यांत लागणारें शास्त्रीय पद्धतीचें औद्योगिक शिक्षण होय. हें शिक्षण मिळविण्यास परदेशांत जाणें हल्लीं जरूरीचें आहे. पण असलें शिक्षण यूरोपांत सुद्धां खुद्द भांडवलवाले स्वतः घेत नाहींत. ते केवळ पगार देऊन त्या बाबींतले तज्ज्ञ लोक नोकरीस ठेवतात आणि तसे तज्ज्ञ मारवाडी अगर गुजराथी बनिया फायदा होईल असें दिसून आल्यास आजहि नोकरीस ठेवितात. खरें पाहिल्यास मारवाडी व गुजराथी बनिया या जातींनीं आपल्या भांडवलांचा उद्योगधंद्यांची वाढ करण्याकडे जितका चांगला उपयोग केला आहे, तितका दुसऱ्या कोणत्याहि जातींनीं केला असता कीं नाहीं याबद्दल शंकाच आहे. आपल्या उद्योगधंद्यांच्या वाढीचा प्रश्न अत्यंत गुंतागुंतीचा आहे. अशिक्षित मजूरवर्ग, थोडें भांडवल व भांडवलाकरितां शेतकी, व्यापार, उद्योगधंदे यांची चढाओढ, कोळसा, लोखंड वगैरे खनिज संपत्तीची वाण अशा निरनिराळ्या मोठमोठ्या अडथळ्यांमुळें आपली औद्योगिक वाढ आज खुंटली आहे. जातिभेदाचा यावर परिणाम अत्यंत थोडा होतो आणि जातिभेद जरी आज नसते तरी या वाढीचा वेग जास्त झाला असता कीं नाहीं याची वानवाच आहे.जातिभेदाच्या

प्रश्नाचा आम्ही असा विस्तृत विचार केला. कारण कीं ज्ञानकोशकार आपल्या विवेचनांत यांला बरेंच महत्त्वाचें स्थान देतात. ज्ञानकोशकारांनीं नमूद केलेल्या प्रत्येक मुद्याचा निरनिराळा विचार आम्ही विस्तारभयास्तव येथें करीत नाहीं.

आमची सामाजिक रचना भिन्न म्हणून आमची आर्थिक रचनाहि निराळी असली पाहिजे अशी ज्ञानकोशकारांची विचारपरंपरा दिसते. पण हें खरें नाहीं. आमच्या आर्थिक रचनेसारखी रचना गेल्या शतकांत इतर बऱ्याच देशांची होती व आजहि कित्येक देशांची आहे. बरें, हल्लीं जे फेरबदल अगात होत आहेत त्यांच्या हिंदुस्थानावरील परिणामाकडे पहा. आमच्या देशाच्या गेल्या शतकातील आर्थिक उत्क्रांतिकडे लक्ष दिलें असतां असें आढळून येईल कीं या उत्क्रांतीची दिशा यूरोपियन देशांत १८ व्या व १९ व्या शतकांत झालेल्या उत्क्रांतीच्या दिशेप्रमाणेंच आहे. आर्थिक बाबींत आर्थिक गरजांच्या दडपणामुळें सामाजिक रचनेचा तेव्हांच पाडाव होतो. आपल्याकडे अलुत्याबलुत्यांची पद्धत फार जुनी आहे. यांत प्रत्येकाचें ठराविक वेतन असून त्याबद्दल त्यास ठराविक चाकरी करावी लागे. कांहीं वर्षांपूर्वी आपल्याकडे गांवच्या मेलेल्या गुरांच्या कातड्यावर चाभार अथवा धेड यांचा वंशपरंपरा हक्क चालत आला होता. पण सुमारें पंचवीस वर्षांपूर्वीं जेव्हां कातड्याच्या किंमती जगभर फार वाढल्या व मेलेल्या गुरांच्या कातड्यास चांगली किंमत येऊं लागली त्याबरोबर चाभार व धेड यांच्या पुरातन हक्कास गांवकरी लोक जुमानीत नाहींसे झाले. आमच्या आर्थिक रचनेंत विशेष असें कांहींच नाहीं.आमची आर्थिक उत्क्रांति हळू हळू होत आहे इतकेंच. बाकी सर्व बाबतींत ती इतर देशांप्रमाणेंच चालली आहे. आमच्या नागरधंद्यांच्या घटनेंतील स्थित्यंतर, आमच्या मजूरवर्गाची जमिनीपासून फारकत इत्यादि गोष्टींचा बारकाईनें विचार केला असतां या विधानांची खात्री पटेल. [प्रस्तुत लेखकाचें नुकतेंच प्रसिद्ध झालेलें इंडस्ट्रिअल एव्होल्यूशन ऑफ इंडिया पहा]. या सर्व महत्त्वाच्या बाबींत आपलें इतर देशांशीं पुरतें साम्य आहे. मग स्वतंत्र हिंदी अर्थशास्त्राची आवश्यकता कोठून उरली; हें अर्थशास्त्र निर्माण करण्याकरितां ज्ञानकोशकार आणखी एक कारण देतात. ते म्हणतात, "आजपर्यंत-शंभर दीडशें वर्षांच्या ब्रिटिश अमदानींत पुष्कळ ब्रिटिश अर्थशास्त्र शिकलेल्या विद्वानांनीं अर्थशास्त्रीय विषयांचें शिक्षण दिलें पण अद्याप हिंदुस्थानची आर्थिक स्थिति फारशी सुधारली नाहीं." आम्ही वर दाखविल्याप्रमाणें फार मोठे अडथळे वाटेंत असतां नुसत्या अर्थशास्त्राच्या शिक्षणानें आर्थिक उन्नति कशी होणार? आणि विद्वानांनीं आर्थिक स्थिति सुधारण्यास त्यांच्या हातांत कांहीं तरी सत्ता पाहिजे, ती आमच्याकडील विद्वानांना कोठें होती? शिवाय अजून अर्थशास्त्राची प्रगति फार व्हावयाची आहे. मार्शल

याच्या वेळेपावेतों इंग्रजी अर्थशास्त्राची व व्यवहाराची फारकत बरीच होती आणि गेल्या दोनतीन वर्षांतच एकॉनॉमिक .बॅरोमिटर्स् वगैरे तयार करण्याचा प्रयत्न होऊन उद्योगधंद्यास प्रत्यक्ष उपयोगी असें वळण अर्थशास्त्रास लागत आहे. ही खुद्द इंग्लंडातील गोष्ट झाली. हिंदुस्थानांतील अर्थशास्त्रीय शिक्षण इंग्लंडांतील शिक्षणाच्या बरीच वर्षे मागें रेंगाळतें ही गोष्ट प्रसिद्धच आहे. तेव्हां हिंदी अर्थशास्त्रज्ञांनीं जर आर्थिक उन्नतीस मदत केली नाहीं तर तो अर्थशास्त्राच्या अपरिपक्वतेचा व आपल्याकडील शिक्षणपद्धतीचा दोष आहे. याला उपाय म्हणजे हिंदुस्थानच्या आर्थिक इतिहासाचा तुलनात्मक दृष्टीनें अभ्यास करणें, व्यावहारिक अर्थशास्त्राकडे जास्त लक्ष देणें व यूरोपीय क्रमिक पुस्तकांतील ठराविक उदाहरणें न देतां हिंदी परिस्थितीकडे लक्ष देऊन अर्थशास्त्रीय सिद्धांत शिकविणें हा होय. प्रत्येक देशांतील परिस्थिति निराळी, म्हणून प्रत्येक देशीय अर्थशास्त्र असणें शक्य नाहीं.

एकंदर ज्ञानकोशकार सामाजिक रचनेला आर्थिक बाबतींत भलतेंच महत्त्व देतात असें आमचें मत आहे त्यांनीं हिंदी अर्थशास्त्राच्या विवेचनांत जातिभेद, दैववाद यांवर पानें खर्च केलीं पण जमीनमहसूल, उद्योगधंदे· नगरवाढ वगैरे आर्थिक दृष्ट्या ज्या खऱ्या महत्त्वाच्या गोष्टी त्यांचा बिलकुल विचार केला नाहीं. तसेंच ज्ञानकोशकारांची अर्थशास्त्राच्या कक्षेबद्दल चुकीची कल्पना दिसते. सामाजिक विषयांवरील सर्व शास्त्रें एकमेकांशीं संलग्न आहेत, व एकाचा विचार करतांना इतरांचा थोडाबहुत विचार करावा लागतो हें जरी खरें असलें तरी प्रत्येक शास्त्राची कांहींतरी आंखलेली मर्यादा असावी लागते. आणि या मर्यादेंतील विषयांचा त्या त्या शास्त्रांत विचार करावयाचा असतो. या दृष्टीनें समाजरचनेला अर्थशास्त्रांत फार गौण महत्त्व आहे. शिवाय ज्ञानकोशकारांची अशी समजूत दिसते कीं अर्थशास्त्र म्हणजे एक ठराविक सिद्धांतांचा सांठा. हे सिद्धांत यूरोपांत तयार झाले व ते आपणास लागू पडत नाहींत तेव्हां करा एक नवीन हिंदी अर्थशास्त्र निर्माण! पण खरी परिस्थिति अशी नाहीं. अर्थशास्त्राचे सिद्धांत व्यवहारांत आणतांना सर्व बाजूंनीं प्रथम योग्य विचार केला पाहिजे ही गोष्ट सर्वमान्य आहे आणि अर्थशास्त्र म्हणजे एक सिद्धांतांचा गठ्ठा व हे सिद्धांत जिकडे तिकडे सारखे लागू पडतात असेंहि कोणी म्हणत नाहीं. यासंबंधीं केंब्रिज येथें प्रसिद्ध झालेल्या अर्थशास्त्रीय विषयांवरील एका मालेच्या प्रस्तावनेंतून खालील उतारा देतों. या प्रस्तावनेंत मि. केन्स म्हणतात. "अर्थशास्त्रीय उपपत्ति" आपणांस ज्यावरून तत्काळ एखादें धोरण बसवितां येईल असे निश्चित सिद्धांत काढून देत नाहीं. अर्थशास्त्रीय उपपत्ति हें एक तत्त्व नसून ती पद्धति आहे. ती एक विशिष्ट मानसिक रचना व विचारपद्धति असून तिच्यापासून एखाद्यास विशिष्ट गोष्टींपासून

अचूक सिद्धांत काढण्यास मात्र मदत होते. आतां धंदेवाईक अर्थशास्त्रज्ञाचें मुख्य कर्तव्य म्हणजे प्रस्तुत वस्तुस्थितीचें साकल्यानें ज्ञान मिळविणें आणि त्यास अर्थशास्त्रीय तत्त्वें कुशलतेनें लागू करणें किंवा आपल्या पद्धतीचीं मूलतत्त्वें सुलभ, बिनचूक व उद्‌बोधक रीतीनें प्रतिपादन करणें हेंच राहिलें आहे."

कोणत्याहि बाजूनें विचार केला असता स्वतंत्र हिंदी अर्थशास्त्र उत्पन्न करण्याची जरूरी बिलकूल नाहीं इतकेंच नव्हे तर अशा प्रकारच्या संज्ञेनेंच फार चुकीच्या समजुती पसरण्याचा संभव आहे. उगीच अवांतर बऱ्याचशा गोष्टींचा विचार करून मुख्य अर्थशास्त्राची कक्षा विसरून चालावयाचें नाहीं. आणि हिंदी अर्थशास्त्र स्वतंत्र तयार करून आमच्या आर्थिक रचनेंत कांहीं विशेष आहे असा समज उत्पन्न करणेंहि योग्य नाहीं. व्यावहारिक दृष्टीनें अर्थशास्त्राचा विचार करणें बरोबर आहे आणि हिंदुस्थानांतील एकंदर परिस्थितीचा विचार करूनच नंतर अर्थशास्त्राचे सिद्धांत लागू करावे पण यास हिंदी अर्थशास्त्र असें स्वतंत्र शास्त्र निर्माण करण्याची जरूरी नाहीं. समाजशास्त्र, मानसशास्त्र व अर्थशास्त्र यांची खिचडी अर्थशास्त्राच्या मर्यादेंत नको. अशामुळें आधींच निकृष्ट स्थितींत असलेल्या हिंदुस्थानांतील अर्थशास्त्राच्या शिक्षणास आणखी वाईट वळण लागण्याचा संभव आहे. असले विचार ज्ञानकोशकारांसारख्या अधिकारी गृहस्थांनीं प्रदर्शित केले. त्यास विरोध करणें जरूरीचें वाटलें म्हणून हा लेख लिहीत आहों.

---

(परिशिष्ट नं. १६)

## महाराष्ट्रकाव्य व ज्ञानकोश.

(ले. दत्तात्रय केशव केळकर, बी. ए. हिंदी हायस्कूल, पांचगणी)

[केसरी १२ मे. १९२५.]

### लेखांक १ ला.

अहिल्याबाईचा पुत्र, खंडेराव दान म्हणून रौप्य आणि सुवर्ण मुद्रिकांनीं भरलेलीं पात्रेंच्या पात्रें ब्राह्मणांस अर्पण करी. पण तीं अर्पण करतांना पुष्कळ वेळां खोडसाळ युक्तीचा अवलंब करी तशाच प्रकारच्या युक्तीचा अवलंब करण्याची 'महाराष्ट्रीय ज्ञानकोश' कारांना मधून मधून लहर येत असल्याचें आढळून येतें. खंडेराव ब्राह्मणांस निमंत्रण करून त्यांच्यापुढें सुवर्णमुद्रांनीं भरलेलें तबक ठेवी व त्यांतून मनमानेल तितक्या मुद्रा उचलून घेण्यास सांग. त्या सुवर्णमुद्रांच्या लकाकीनें मुग्ध झालेला ब्राह्मणाचा हात मुद्रांना कुरवाळूं लागतो न लागतो तोंच मुद्रांच्या खालीं दडपून ठेवलेल्या जहरी इंगळ्या

त्यांशीं हस्तांदोलन करीत, त्यामुळें बिचारा ब्राह्मण धनलोभ आणि शारीरिक वेदना यांच्यामध्यें लोंबकळत राही. ज्ञानकोशकारांनीं अजर उद्योग करून महाराष्ट्र वाचकवर्गाला अजपावेतों अगम्य असलेलीं ज्ञानसंपत्तीचीं भांडारें खुलीं करून दिलीं याबद्दल महाराष्ट्र ज्ञानभिक्षु त्यांचे सदैव ऋणी राहतील. पण खुल्या केलेल्या भांडारांतील ज्ञानसंपत्ति लुटून येत असतां खंडेरावी डंका मारण्याची हौस भागवून घेण्याचा मोह कोशकारांनीं टाळला असता तर ज्ञानभिक्षूंकडून मिळणारा धन्यवादहि प्रसन्नचित्तानें मिळाला असता. पण या धन्यवादापेक्षां उपमर्दकारक मतडंखांनीं तळमळणाऱ्याच्या वेदना पाहण्यांत कोशकारांना अधिक हौस वाटत असावी. कोशकारांनीं अनेकांना तळमळावयास लावलें आहे. त्यांपैकीं मासला म्हणून अखिल महाराष्ट्र कविवर्गाची त्यांनीं कशी प्राणांतिक अवस्था करून सोडली आहे त्याकडे प्रस्तुत वाचकवर्गाचें लक्ष वेधावयाचें आहे.

## ज्ञानकोशकारांचा अभिप्राय.

महाराष्ट्रीय ज्ञानकोश विभाग अ४रा यांत काव्य या सदराखालीं एक विस्तृत लेख आला असून काव्यशास्त्र, संस्कृत काव्य, महाराष्ट्रकाव्य वगैरेंची माहिती वाचकांस पुरविली आहे. त्यांत महाराष्ट्रकाव्यासंबंधानें समालोचनात्मक थाटाचे जे विचार प्रगट केले आहेत ते वाचून महाराष्ट्र वाचक आश्चर्यमूढ झाल्याविना राहणार नाहींत. मूळ लेखांतील 'मराठी काव्य व प्राचीन कवी' या पोटमथळ्याच्या पहिल्या कालम दीड कालमांत प्राचीन मराठी काव्याची जबानी घेऊन नंतर अधिकारयुक्त वाणीनें निकाल देतांना कोशकार लिहितात कीं, "एकंदरीनें पाहतां मराठींतील काव्यवाङ्मय म्हणजे उष्टें आणि भिकार होय यांत शंका नाहीं. सुशिक्षित व शृंगारिक वाङ्मय अलीकडील मासिकांतील भीत भीत प्रसिद्ध केलेल्या पद्यांशिवाय मराठींत नाहीं.व आहे तें अगदीं कनिष्ठ प्रतीचें आहे. भावना सुशिक्षित होऊन त्याचा विकास ज्या समाजांत नाहीं त्या समाजांत खरें प्रेमवाङ्मय कोठून सापडणार ? पोवाडे देखील निर्बुद्ध अशा लोकांनींच लिहिले असल्यामुळें त्यांत कवित्व जरी मधून मधून दृष्टीस पडलें तरी तें आजच्या वाङ्मयप्रेमी वर्गावर छाप टाकील असें नाहीं व मोठमोठालीं चांगलीं काव्यें मराठींत झालींच नाहींत. इंग्रजी राज्यांतील ज्या मराठी काव्यांत कांहीं कवींचें कौशल्य दृष्टीस पडतें आणि ज्या कवीचा दम बरा जास्त टिकला आहे अशीं नांव घेण्यासारखीं काव्यें आमच्या मतें दोनच आहेतः एक चिंतामणी पेठकरांचें गंगावर्णन आणि टिळकांचें वनवासी फूल. काव्याचे विषय शोधण्यांत स्वातंत्र्य, जन्मभर काव्याचा हुव्यास, विविध प्रकारचा अनुभव या गोष्टींचा लाभ महाराष्ट्रकवितेस कधींच प्राप्त झाला नाहीं.

मराठींतील बरीचशी प्रसिद्ध झालेली अर्वाचीन कविता पंचविशीच्या आंतल्या पोरांनीं लिहिलेली आहे व त्याच मंडळींनीं प्रौढ वयांत कवितारचनेचा क्रम टाकून दिला आहे" वगैरे. पण येवढ्यानेंहि कोशकारांच्या अंतरात्म्याची खळखळ शांत न होऊन व मराठी काव्याविषयींचा तिटकारा नीट व्यक्त झालासें न वाटून कोशकार शेवटीं शेवटीं उद्गारतात कीं, "आजपर्यंत झालेलें मराठी वाङ्मय सर्व जळून गेलें तरी जगाच वाङ्मय या दृष्टीनें कांहीं एक नुकसान व्हावयाचें नाहीं ! झालें तर भाषेचा इतिहास, खुटलेल्या राष्ट्रांच्या मनःस्थितीचें व ज्ञानमर्यादेचें उदाहरण व स्त्रीशूद्राच्या धार्मिक शिक्षणासाठीं झालेल्या प्रयत्नांचा इतिहास या नात्यानेंच होईल!!" इतक्या थोड्या शब्दांत महाराष्ट्रकाव्याची इतकी मासलेवाईक निंदा अन्यत्र सांपडणें दुर्मिळ.

एका बाजूनें महाराष्ट्रकवी हे जगत्कविमंडळाच्या अग्रभागीं विराजमान होण्यास योग्य, त्यांतील प्राचीनांपैकीं बहुतकांचें काव्य भगवद्भक्तीच्या उत्कट परिमळानें दरवळलेलें अतएव केवळ असामान्य व अर्वाचीनांपैकीं 'गोविंदाग्रज' प्रभृतींचें काव्य अखिल जगतांत अव्वल दर्जाच्या ठरलेल्या वाल्मीकी, शेक्सस्पिअर, गटे वगैरे कवींच्या तोलाच तर दुसऱ्या बाजूनें महाराष्ट्रकाव्य हें परपुष्ट, निर्बल व निस्तेजपैकीं प्राचीनांचें गावढळ ठरीव सांचाचें व उद्दाम कल्पनारहित. अर्वाचीनांचें उच्छृंखल, छचोर व त्रुटित अशा दोनहि प्रकारच्या एकांतिक विचारसरणीच्या लाटा गेल्या पन्नास- साठ वर्षांत महाराष्ट्रावर येऊन गेल्या. पण आजमितीस त्या ओसरल्या असून एकंदर काव्यसाम्राज्यांत महाराष्ट्रकाव्याला कोणता दर्जा प्राप्त होण्यासारखा आहे हें चिकित्सक बुद्धीनें ठरविणें, गुणदोषांचें हंसक्षीर न्यायानें परीक्षण करून गुणांचें सशास्त्र अध्ययन करणें, अशा प्रकारची प्रवृत्ति दिवसेंदिवस बळावत आहे. महाराष्ट्रवाङ्मयाचा अभ्यास एम. ए. च्या परीक्षेपुरता मर्यादित होता तो आतां बी. ए. च्य परीक्षेत प्रविष्ट झाला आहे व कॉलेजांतील खालच्या दोन वर्गांतहि होण्याचीं चिन्हें दिसत आहेत. प्राचीन कवींवर 'मोरोपंतचरित्र व काव्यविवेचन' व अर्वाचीन कवींवर 'आधुनिक कविपंचक', 'महाराष्ट्र नाटककार, गडकरी', 'आपट्यांच्या कादंबऱ्यांचें परीक्षण' वगैरेसारखे ग्रंथ होऊं लागले आहेत. जुन्या व नव्या कवींच्या सशास्त्र अध्ययनासाठीं 'मयूरमंडळ', 'गोविंदाग्रज मंडळ' अशा संस्था अस्तित्वांत येऊं लागल्या आहेत. अशा वेळीं समग्र महाराष्ट्रकाव्य जुनें व नवें जळून खाक झालें तरी रेसभर नुकसान नाहीं अशा प्रकारचे अनुदार उद्गार काढणें हें कोशकारांसच शोभूं जाणे.

## काव्य-काव्योदयकारांचें मत.

पंधरा वर्षांपूर्वी 'काव्य--काव्योदय'कारांनीं प्राचीन कवींची हजेरी घेतली त्यावेळीं त्यांनाहि कोशकारांच्याइतकी इरसाल भाषा सुचली नाहीं.

जुन्या काव्याला परपुष्ट, प्रतिभास्वातंत्र्यरहित, खडबळ वगैरे प्रकारें नाकें मुरडून काव्य-काव्योदयकारांनीं त्याला काथाडलें होतें पण त्याला भडाग्नि देण्यास त्यांचा हात वाहीना! शिवाय सर्व महाराष्ट्रकाव्याला सरसहा अस्पृश्य समजण्यासहि ते तयार नव्हते. अर्वाचीनांकडे त्यांच्या अंतःकरणाचा ओढा होताच. पण प्राचीनांपैकीं तुकाराम, नामदेव वगैरे भक्तकवींचें काव्य त्यांचें अंतःकरण उचंबळून सोडी. काव्य--काव्योदय या निबंधांत भक्तकवीं-विषयीं दाखविलेला आदर कांहींसा चाचरत व नाखुषीनें दर्शविलेला असला तरी दहा वर्षांच्या परिशीलनानंतर वुइल्सन लेक्चर्समध्यें भक्तिकाव्याचें मुक्त-कंठ स्तुतिस्तोत्र गाण्यांत प्रोफेसरसाहेबांना कमीपणा वाटलेला नाहीं. काव्यांत भक्तिरसाची बहार अथवा परमोच्च सीमा पहावयाची असल्यास महाराष्ट्रका-व्यांनच ती पहावी उभ्या त्रिभुवनांत तिला जोड नाहीं, असे उद्गार काढ-णाऱ्याला समग्र महाराष्ट्रकाव्य अग्निसात झालेलें कसें पहावेल! पण आमच्या कोशकाराच्या घरीं सर्वच व्यवहार घाऊक, त्यात ग्राह्याग्राह्य, सरसनीरस असल्या बारकाव्या काढीत बसल्यास कोशकारांचें स्वातंत्र्य आणि वैशिष्ट्य कोठें उरलें? जुने कवी, नवे कवी, पोवाडेकार, लावणीकार, तुकाराम, मोरो-पंत, केशवसुत, गोविंदाग्रज या सर्वांना त्यांनीं एकाच जात्यांत भरडून काढलें आहे. समग्र महाराष्ट्र काव्याचें आलोडन करण्याचा ठराव पास झाल्याबरोबर कोशकारांनीं आपल्या गुरभट्यास जुन्या--नव्या सर्व काव्यग्रंथांचे गट्ठे आप-ल्यापुढें हजर करण्यास सांगितलें, व क्षणभर दहापांच पुस्तकांचे कान दुमड-ल्यावर हे घामानें डबरत होत्साते आरामखुर्चीवर देह लोटून व कपाळास आठ्या घालून डुरकले कीं 'भय्याजी सबकू आग लगाव, अब्बोंके अब्बी'!

ज्ञानकोशप्रकाशन हें सामुदायिक राष्ट्रीय कार्य आहे तेव्हां कोशाच्या संपादकमंडळाचीं व्यक्तिविषयक मतें सिद्धान्तरूपानें मांडलीं जावींत अशी मंडळाच्या भागीदाराची अपेक्षा असणें शक्य नाहीं. संपादक मंडळाच्या व्यक्तिविषयक मतांची छटा अजीबाद दृग्गोचर न होणें अशक्य आहे हें कबूल. विषयाची निवड व निरनिराळ्या विषयांच्या वाट्यास येणाऱ्या मज-कुराची मर्यादा वगैरे बाबतींत संपादकाची आवडनिवड डोकावणें अपरिहार्य आहे. पण संपादकांनीं स्वतःच्या एकांतिक व आग्रही मतांनीं कॉलमच्या कॉलम माखून काढणें हा कोशाचा दुरुपयोग होय. इतर भाषेंतील ज्ञान-कोशांत प्रमुख विषयांवर तज्ज्ञांचे लेख छापण्याचा प्रघात आहे. पण आमच्या कोशकारांना तज्ज्ञांचें साहाय्य संपादितां आलें नाहीं किंवा त्यांनीं पर्वा केली नाहीं. कोशकारांना स्वतःचीं लाडकीं मतें प्रतिपादावयाचीं असल्यास स्वतंत्र ग्रंथलेखनरूपानें तीं प्रतिपादणें हा रास्त मार्ग होय. स्वतंत्र विचार हा कितीहि ओबडधोबड भासला तरी जिवंत विचाराचा तो प्रतीक आहे. म्हणूनच तो

प्रगट करण्याचें व्यक्तिमात्राचें स्वातंत्र्य मान्य करणें अवश्य आहे. असे विचार व्यक्तींच्या नांवावर प्रसिद्ध केले जातात तोंपर्यंत त्यांचा परिणाम व्यक्ति माहात्म्यानुसार मर्यादित असतो. पण ज्ञानकोशाचा भव्य व रुबाबदार आकार, अनेक विद्वानांच्या मंथनांतून निघालेल्या रत्नांचा हा कोश अशी अपेक्षा व समजूत, यामुळें सामान्य वाचकाला कोशांतील मुक्ताफळें ब्रह्मवाक्यें वाटावीं हेंच संभवनीय. कोशकारांची ही भूमिका व त्या भूमिकेला प्राप्त होणारें आगंतुक, अवास्तव माहात्म्य हें लक्षांत घेऊन संपादक मंडळानें स्वतःच्या खासगी मतांचें इतक्या नागव्या रीतीनें वाचकापुढें आविष्करण करावें हें अप्रशस्त होय.

## पुरावा कोठें आहे ?

बरें, एकान्तिक मत प्रतिपादावयाचें तर त्याला साधकबाधक प्रमाणें दिलीं म्हणजे वाचकाला स्वतःला आपलें स्वतंत्र मत बनविण्यास वाव तरी राहतो. पण आमच्या कोशकारांची श्रुतिस्मृतिकारांच्या वर ताण ! बिचाऱ्या महाराष्ट्र कवींवर ठेवलेले आरोप पुराव्यानें सिद्ध करण्याचा त्रास न घेतां कोशकारांनीं लष्करी कोर्टांतील न्यायाधीशाप्रमाणें एकदम त्या सर्वांस—नव्यां व जुन्यांस--अग्निकाष्ठभक्षणाची शिक्षा सुनावली आहे. न्यायनिर्णयांत प्रथम आरोपींची ' हजेरी व नंतर निर्णय ' हा नेहमींचाच मार्ग. पण महाराष्ट्र कविवर्गाविषयींच्या तिटकाऱ्याचें कालकूट ओकण्यास कोशकार इतके अधीर झाले होते कीं, कवींची हजेरी घेऊन नंतर निकाल होण्याइतक्या विलंबाची कळ न सोसून आधीं निर्णय व मागून हजेरी असा विपर्यस्त प्रकार त्यांनीं अंगिकारिला आहे.

## या विसंगतीस काय म्हणावें!

पण सगळी बहार या मागून घेतलेल्या कवींच्या ' हजेरीं 'त आहे. या हजेरीचा वाचकांस परिचय करून दिला म्हणजे ' आजपर्यंत झालेलें सर्व मराठी वाङ्मय जळून खाक झालें तरी जगाचें काव्यनाश या दृष्टीनें कांहींहि नुकसान व्हावयाचें नाहीं ' या जलाल मताला मूठमाती देण्याकरितां त्याचें थडगें कोशकारांनीं स्वतः कसें खणून ठेवलें आहे हें पहावयास सापडेल. तसेंच या हजेरीची ओळख करून दिली म्हणजे कोशकारांच्या मतांतील एकांगीपणा दर्शविण्याचा निराळा खटाटोप करण्याचें कारण नाहीं. कारण कोशकारांनीं या हजेरींत विसंगति आणि वदतोव्याघात यांनीं स्वतःच्या मतास स्वतःच हरताळ फांसला आहे.

आजपर्यंत झालेलें मराठी वाङ्मय सर्व जळून खाक झालें तरी जगाचें काव्यनाश या दृष्टीनें कांहींहि नुकसान व्हावयाचें नाहीं असलें धाडसी मत बनविण्यापूर्वी कोशकारांनीं मराठी वाङ्मयाचें बरेंच परिशीलन केलें असावें

असा वाचकांनीं तर्क करण्याचें कारण नाहीं. कारण प्राचीन कवींसंबधीं माहिती महाराष्ट्र सारस्वतांतुन व अर्वाचीनसंबंधीं न. चिं. केळकर यांच्या बडोदें साहित्यसंमेलनांतुन घेतल्यानें दोनहि उष्टें आणि परभृत आहेत आणि हें उष्टें अन्न पचावें म्हणूनच वाङ्मय जाळून त्याच्या भस्माची मात्रा वर सेवन केली कीं, काय कोण जाणे! महाराष्ट्र-सारस्वतकार आणि बडोद्याच्या साहित्य-संमेलनाचे अध्यक्ष ह्या दोघांच्या लेखांत ह्या भस्माचा मागमूसहि नाहीं. मग कोशकारांनीं तें कोठून पैदा केलें! 'उष्टें', 'परभृत' वगैरे शब्द लक्षांत घेतां मूळ कल्पना 'काव्य--काव्योदय' निबंधांतून उचलली असावी. मग महाराष्ट्रसारस्वतकार व सा. सं.चे अध्यक्ष यांच्याप्रमाणें काव्य- काव्योदय-कारांचा स्पष्ट उल्लेख कां नाहीं? तसा उल्लेख असता तर दोनहि प्रकारचीं मतें कोशकारांनीं वाचकांपुढें मांडलीं असें तरी म्हणतां आलें असतें. बरें ह्याहि दृष्टीनें पाहतां 'काव्यकाव्योदयाचें' तेवढीच आठवण व्हावी आणि विविधज्ञानविस्ताराचे अंक कोशकारानीं चाळलेले अन्यत्र आढळत असतां 'काव्यकाव्योदया' वरची बा. अ. भिडे यांचा टीका कोशकारांच्या नजरेंतून निसटली असावी असें तरी कसें मानावें? पण या टीकेचा किंवा मूळ निबंधाचा उल्लेख करण्यांत काव्यकाव्योदयकारांच्या मतांची सुधारून वाढविलेली आवृत्ति हें आपलें स्वतंत्र खास लाडकें मत म्हणून प्रसिद्ध व्हावें व त्याचा आपणांस योग्य अभिमान बाळगतां यावा, असा कोश-कारांचा इरादा दिसतो. पण मराठी काव्याचा परिचय बहुधा अल्प असल्यानें एका बाजूला आजपर्यंतचें मराठी वाङ्मय सर्व जळून गेलें तरी काव्यनाश या दृष्टीनें जगाचें रेसभर नुकसान व्हावयाचें नाहीं असलें आग्रही स्वयंमन्य मत, तर दुसऱ्या बाजूला ह्या अग्निकाष्ठाची शिक्षा सुनावलेल्या कवींची स्तुति! असल्या अक्षम्य विसंगतीच्या खोड्यांत कोशकार अडकले गेले आहेत; कसे ते पाहा—

## कोशकारांचा हा अभिप्राय पहा.

अर्वाचीन कवींचें गुणवर्णने-छेः दोषवर्णन-कोशकारांना आपल्या खास मतास खुलवील अशा पद्धतीनें करतां आलें असतें पण त्यांनीं न. चिं. केळकर यांच्या भाषणाच्या गोषवाऱ्यावरच निर्वाह केला आहे, आणि त्यांतहि त्यांतील गुणवर्णनपर भाग गाळला आहे का; म्हणून पहावें तर 'भाषारचना व विषय यांचें वैचित्र्य आधुनिक कवितेंत अतिशय दिसून येतें. 'मुजुमदार, भिडे, लेले, पांगारकर, आ. रा. शे, अनंततनय यांच्या रचनेचें मोरोपंती वळण; मोगरे, चंद्रशेखर, ऊभे याची कांहींशी संस्कृतप्रचुर पण डौलदार व रमणीय श्लोकपद्धति; माधवानुज, सुमंत, नागेश व माधव यांची सफाईदार रचना; चिपळूणकर विनायक यांची सहजमधुर साकी; तुकारामाच्या थाटाचे व ओंवरी,

थाटाचे टिळकांचे अभंग; केशवसुत, ठोमरे यांची विषयानुरूप तुटक ओजस्वी व परिणामकारक नवीन वृत्तयोजना; तांबे व दत्त यांची लावणीपद्याच्या धर्तीवरील हृदयंगम कवनें; गोविंदाग्रज, रेंदाळकरांची ललितनादमधुर पण कृत्रिम भाषा आणि टेकाडे व बेहरे यांच्या वाणींतील तडफ हे सर्व विशेष आधुनिक कवितेला शोभादायक आहेत. ' आधुनिक कवितेचें स्वरूप असें वैचित्र्यपर तसेंच तें चमत्कृतिजनक व आनंददायकहि आहे ' वगैरे वाक्यांना राजरोसपणें वावरूं दिलें आहे.

आतां जुन्या कवींविषयीं अभिप्राय पहाः—जुन्या कवींत मोरोपंताविषयीं वादविवादाचीं रणें आजपर्यंत पुष्कळ माजलीं असल्याकारणानें त्या कवीविषयीं कोशकारांचा अभिप्राय प्रतिकूल असावा असा तर्क केल्यास पुढील वाक्यें वाचावीं " मोरोपंतांना त्यांच्या आर्यांच्या सर्व काव्याचा भरपूर उपयोग घेतां आल्यामुळें त्याचें काव्य ठाकठिकीचें बठलें आहे त्याची कविता म्हणजे एखाद्या राजाच्या सर्वांगसुंदर, नाजुक, बहुमोल अलंकारादि आभरणांनीं युक्त व बहुविध कलाकुशल प्रौढ वयाची तरुणी होय. शब्दगौरव, भाषेची प्रौढ रसानुकूलता, भरपूर अलंकार, कालव्यक्तिप्रसंगाला अनुसरून वर्णनें, मुख्य सूत्र न सोडतां थोडक्यांत पुष्कळ अर्थ आणणें हें त्याच्या काव्याचे विशेष होते.' मराठी काव्याच्या निंदकानें केलेलें हे वर्णन वाचकांनीं लक्षांत धरावें. इतर कवींविषयींचे अभिप्रायहि नमूद करण्यासारखे आहेत. " अमृतरायाची कविता चटकदार व मनोहर असून त्याचा कटाव जर उत्तम हरिदासाच्या तोंडून ऐकला तर श्रोते तन्मय होऊन जातात ". वामनाचीं पौराणिक आख्यानें रसभरित व स्वभावोक्तिपूर्ण असून वाणी जोरदार, ओजस्वी व प्रौढ आहे '. ' श्रीधर व एकनाथ यांनीं ओवीबद्ध काव्यांत चमत्कारित्व व मनोहारित्व आणलें आहे. ' ' जनाबाईचे अभंग लडिवाळपणाचे असून त्यांत वात्सल्यरस बराच आढळतो '. ' ज्ञानेश्वरी ग्रंथ सरस दृष्टांत व भाषेचें मधुर स्वरूप यांहींकरून इतका खुलविला आहे कीं तो वाचीत असतां वाचकाची आपोआप ग्रंथाशीं तन्मयता होते " वगैरे वगैरे. वरील वाक्यांत कोशकारांच्या मतें उत्तम काव्याचे गुण कोणते व ते प्राचीन कवींत कसे आढळतात यांचें दिग्दर्शन होत आहे. पण मुक्तेश्वराविषयींचा अभिप्राय तर यांहीपेक्षां स्पष्ट आहे. " कवीचें काम लोकशिक्षणविषयक किंवा मनोरंजक कथा अथवा विचार-सृष्टींतील विषयाशीं तादात्म्य पावून स्वयंस्फूर्तीनें गौरवून सांगण्याचें असतें. या दृष्टीनें मुक्तेश्वर हा उत्तम कवि होऊन गेला. " अर्वाचीन व प्राचीन कवींविषयीं वरील स्तुतिपूर्ण अभिप्राय आणि आजपर्यंतचें मराठी वाङ्मय सर्व जळून गेलें तरी काव्यनाश या दृष्टीनें जगाचें कांहींहि नुकसान नाहीं असलें बेताल मत या विसंगतीचें कोडें पाहून कोशकार निरर्गळ बरळत आहेत

कां काव्यावरील लेखाचे दोन जनक असून ते एकमेकांविरुद्ध सूर उगवीत आहेत हें कांहींच कळत नाहींसें होतें. कै. गोविंदाग्रजांनीं पुण्याच्या खाणा-वळींत जेवणें, सदर्न मराठा रेल्वेंतून प्रवास करणें, खांडेलकरांच्या पदांचा अर्थ लावणें अशा अभिनव शिक्षा सुचविल्या होत्या त्यावेळीं ज्ञानकोशाचा हा भाग प्रसिद्ध असता तर कोशकारांचें महाराष्ट्र कवींविषयींचें मत शोधून काढणें हा प्रकार त्यांत गोंवून कोशकारांच्या निंदाव्यंजक मताचा समाचार घेतला असता. गोविंदाग्रज आज हयात नाहींत, पण पुणें येथें लवकरच भरणाऱ्या साहित्यसंमेलनाकरितां जमणारे साहित्यसेवक कोशकारांनां आपल्या कर्तव्याची जाणीव करून देण्यास विसरणार नाहींत अशी अपेक्षा करणें अस्थानीं होणार नाहीं.

ज्ञानकोशासारख्या अवाढव्य जिगजिगीच्या व अविरतोद्योगसाध्य अशा ग्रंथप्रकाशनानें कोशकारांनीं महाराष्ट्र जनतेची केलेली अपूर्व सेवा लक्षांत घेता वरील सारखे विचार प्रगट करणें भाग पडावें हें दुर्दैव. पण कोशकारांनीं मतस्वातंत्र्याची तार फाजील ताणली नसती तर वाचकांच्या धन्यवादांतहि बेसूर निघण्याचें कारण नव्हतें. महाराष्ट्रकाव्याविषयीं जे विचार कोशकारांनीं प्रगट केले आहेत ते सद्धेतूनेंच केले असले पाहिजेत. राष्ट्राच्या दैन्यावस्थेंत स्वतःच्या दोषांची जेवढी तीव्र जाणीव असेल तेवढी पथ्यकारकच या सद्भाव-नेनें कोशकार जालीम उपाय योजण्यास प्रवृत्त झाले असावेत. पण निद्रिस्थ जनतेला जागें करण्याकरितां समग्र महाराष्ट्रकाव्याची चिता पेटवून त्यांतील जळते निखारे तिच्या अंगावर फेकणें हा आततायीपणा होय.

असो, कोशकारांनीं स्वतःच्या मताच्या चिंधड्या विसंगतीच्या कात्रीनें स्वतःच उडविल्या असल्यामुळें त्यांच्या मताची चर्चा करण्याचें प्रयोजन नाहीं. पण कोशकाराच्याइतकी जलाल नसली तरी सौम्य प्रमाणांत महाराष्ट्र काव्याची हेटाळणी करणारे लोक थोडे नाहींत, ह्या हेटाळणीचे विषय झालेले कांहीं दोष वास्तविक आहेत,पण कांहीं गैरसमजावर अधिष्ठित आहेत. म्हणून कोशकारांचें निंदाप्रचुर मत हें उपलक्षण मानून गैरसमजावर अधिष्ठित झालेल्या कांहीं दोषांची पुढील लेखांत चर्चा करूं. [ही चर्चा पुढें कधीं झालीच नाहीं. सं. ज्ञानकोश]

## (परिशिष्ट नं. १७)

## जर्मन शब्दांचे उच्चार.

[केसरी २६।५।२५]

(ले.—स. बा. हुदलीकर, इंदूर)

आजकाल जर्मन तत्त्वज्ञान, जर्मन राष्ट्रांतील राजकीय चळवळी व त्याच प्रमाणें जर्मन शिक्षणपद्धति वगैरे विषयांकडे आम्हां महाराष्ट्रीयांचें थोडें फार

लक्ष लागलें असल्यामुळे कित्येक मासिक पुस्तकांतून व वृत्तपत्रांतून कांहीं जर्मन नावांचे विलक्षण तऱ्हेनें केलेले उच्चार वाचण्यांत येतात व ते वाचून मनापासून हसूं येतें. हे उच्चार कधीं इंग्रजी पद्धतीचे तर कधीं अगदीं खोटे असतात. म्हणून सर्वसाधारण जर्मन शब्दांच्या उच्चारांचे ठोकळ नियम घालून महाराष्ट्र वाचकांच्यापुढें ठेवावेत म्हणजे निदान साऱ्या वृत्तपत्रांतून दर-एक शब्दाचा एकाच प्रकारचा उच्चार केलेला आढळून येईल व वाचकाचा विनाकारण घोंटाळा होणार नाहीं या विचारांनीं प्रेरित होऊन हा लेख लिहिला आहे.

अत्यंत अल्प प्रयासानें बरोबर उच्चार करणें अगदीं शक्य आहे हें हा पुढील लेख वाचून तेव्हांच ध्यानांत येईल. पण या गोष्टीकडे अद्याप ज्ञान-कोशकारांचेंहि लक्ष गेलेलें दिसत नाहीं. त्यांच्या संपादकमंडळांत एक जर्मन भाषा जाणणारी विदुषी आहे हें आम्हांस माहीत आहे असें असूनहि ज्ञानकोशाच्या आजपर्यंत प्रसिद्ध झालेल्या १२ भागांतून जेथें जर्मन प्रांतांचा किंवा शब्दाचा उच्चार करण्यांत आलेला आहे. तेथें तेथें त्या विदुषीच्या ज्ञानाचा या विद्वान संपादकमंडळानें मुळींच फायदा करून घेण्याचा प्रयत्न केलेला आढळून येत नाहीं. एवढेंच नाहीं तर अशा रीतीनें शुद्धीकरण ज्ञानकोशासारख्या नेहमीं उपयोगांत आणल्या जाणाऱ्या संदर्भग्रंथांतून अवश्य हवें होतें असें जेव्हां आम्ही मुख्य संपादकांच्या नजरेस आणलें तेव्हां त्यांनीं हंसून " उच्चारांत काय आहे ! ते वाटेल तसे करून अर्थ समजला म्हणजे झालें " असें आपलें मत जोरानें प्रतिपादन केलें. मला वाटतें, भाषेचा अर्थ समजणें जितकें आवश्यक आहे तितकेंच शब्दाचा उच्चार बरोबर करतां येणें हेंहि आवश्यक आहे. आपल्याला सत्यान्वेषण करावयाचें असून लहानसहान गोष्टींत सुद्धां टापटीप व सुव्यवस्था हवी आहे व या गोष्टी बाह्यतः जरी क्षुल्लक दिसल्या तरी त्यांची हेळसांड होऊं नये असें आम्हांस वाटतें.

उदाहरणार्थ—ज्ञानकोश भाग बारावा, पान २०२ 'गोएटे' हा शब्द पहावा. या महान् विख्यात कवीच्या नांवाच्या इतक्या क्रूरपणानें चिंधड्या केलेल्या पाहून कालिदास कवीला " क्यालीड्यास," बाणाला "ब्यान्", दंडीला "ड्यांडी" किंवा गोखले यांना गोखेल म्हटलें म्हणजे आपल्या कानाची जी दशा होते तीच आमच्याहि कानांची "जोहाना, वुल्फगंग, व्हान, गोएटे" असें वाचलें म्हणजे होते. या वरील नांवांचा उच्चार "योहान, वोल्फगांग, फॉन, गेंइटे" असा आहे. आतां हे उच्चार कसे करावेत हें मी पुढें सांगणार आहे. तूर्त आणखी कांहीं उदाहरणें देऊं. ता. ५ मेच्या केसरींत हिंडेंबुर्ग असा जागोजाग उच्चार करण्यांत आलेला आढळला. त्याचा उच्चार हिंडेनबुर्ग

असा आहे. पुष्कळ वृत्तपत्रांतून झीटंग असें लिहिलेलें आढळतें. त्याचा उच्चार 'झायटुंग" असा आहे. त्याचप्रमाणें "वायमार" ह्या ऐवजीं वीमर वगैरे विलक्षण उच्चार आम्हांस आढळले आहेत.

असो. आतां आपण जर्मन शब्दांच्या उच्चारांच्या कांहीं ठोकळ नियमांविषयीं विचार करूं. जर्मन भाषेच्या मुळाक्षरांचा उच्चार अगदीं नियमित व अनन्य असा असतो. तो असा—

| A | B | C | D | E | F | G | H | I | J | K | L | M | N |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| आ | बे | त्से | डे | ए | एफ | गे | हा | इ | याट | का | एल् | एम् | एन् |

| O | P | Q | R | S | T | U | V | W | X | y | Z |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ओ | पे | कू | एर्र | एस् | टे | ऊ | फॉ | व्हे | इक्स | इप्सिलोन | छड् |

म्हणजे स्वरांचा उच्चार आ, ए, इ, ओ, उ, ई (मुख्य), व व्यंजनाचे ब, त्स, ड, फ, ग, ह, य, क,ल, म क, र, स, ट, फ, व्ह, क्स, ई, छ, असे उच्चार आहेत.

स्वर-वर्णांचा कधीं कधीं मिलाफ होत असतो तेव्हां त्यांचे उच्चार पुढीलप्रमाणें होतात. ie = ई, ei = आय्, au = आउ, a(ae) = कानाप्रमाणें दीर्घ ए. o (oe)याचा तोंडाचें बोळकें करून ए असा दीर्घ उच्चार करावा म्हणजे कांहींसा ऱ्यो असा उच्चार होईल. ai = ऐ. eu = ऑय व ee चा दीर्घ ए असे उच्चार आहेत. आतां या नियमाप्रमाणें उच्चार केले असतां जर्मन शब्दाचा अगदीं एक ठरावीक असा उच्चार केलेला आढळून येईल इंग्रजीप्रमाणें put = पुट् व cut कट् असे u चे वेगवेगळे उच्चार नाहींत हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

Zeitung = झायटुंग, झीटंग नव्हे.
Goham = योहान्, ज्ञानकोशाचा जोहान नव्हे.
wolfgang = वोल्फगांग, वुल्फगंग नव्हे.
Von = फॉन, व्हान नव्हे.
Goethe = गॅएटे, ( ? ), गोएटे नव्हे.
weimar = वायमार, वीमर नव्हे.
Strassburg = स्ट्रासबुर्ग, स्ट्रसबर्ग नव्हे.
Heidelberg = हायडेलबर्ग, हीडलबर्ग नव्हे.
Oppenheim = ओप्पेनहायम, आपनहीम नव्हे.
Faust = फाउस्ट, फॉस्ट नव्हे.
Herman Jakobi = हेरमान याकोबी, हरमॅन ज्याकोबी नव्हे.

अशा तऱ्हेचीं कैक उदाहरणें दाखवितां येतील. तरी पण वेळप्रसंगीं ज्ञानकोशांतील इतर बऱ्याच चुकांचा ज्या वेळीं विचार करण्यांत येईल त्या वेळीं जर्मन उच्चारांविषयीं अधिक लिहिणें साहजिकच प्राप्त होणार आहे.

आतां जर्मनमध्यें आणखी थोडेसे व लिहिण्यास अमळ कठीण असे कांहीं उच्चार आहेत ते असेः एखाद्या शब्दाच्या शेवटीं जर e असेल तर त्याचा उच्चार अ व र्‍हस्व ए यांच्या दरम्यान असतो. असे Blume याचा उच्चार ब्लूम असा होईल; म्हणजे जसें आपण "करण" गातल्या शेवटल्या अनुस्वाराव्यतिरिक्त "ण" उच्चार करूं त्याप्रमाणें Deutschland याचा उच्चार वरील पद्धतीनें डॉयटचलांड असा होईल. पण त्याचा उच्चार चुकीनें "डयूशलॅन्ड" असा कोणी लिहितात. जर्मन भाषेमध्यें शब्दांतील प्रत्येक अक्षराचा उच्चार केलेला आढळून येईल, कोणतेंहि अक्षर लुप्त नसतें. उदाहरणार्थ Pslam याचा प्स्लाम असा उच्चार होतो. Pchychologie याचा प्सिशोलोगी, Halb याचा हाल्ब, Knie चा क्नी (इंग्रजी नी). आजच्या या अल्पशा लेखांत मुख्यतः शब्दाचे उच्चार बरोबर कसे करावेत एवढेंच सांगितलें, व त्याचा थोडा जरी उपयोग झाला तरी बरीच प्रगति झाल्याचें आढळून येईल कानास दोष न लावता अज्ञानामुळें व योग्य खटपट न केली गेल्यामुळें आपण उगाच चुका करीत असतों एवढेंच सांगण्याचा लेखकाचा हेतु आहे.

---

(परिशिष्ट नं. १८).

## ज्ञानकोशांतील

# परकीय शब्दांचे उच्चार

(ले.—डॉ श्रीधर व्यंकटेश केतकर, पुणें.)

केसरीच्या ता. २६ । ५ । २५ च्या अंकांत रा. हुदलीकर यांनीं जर्मन नांवांचें मातृकांतर करण्यांत केलेल्या अशुद्धतेबद्दल आम्हांस दोष दिला आहे. त्यांची टीका कांहीं अंशीं बरोबर आहे. कां कीं, कांहीं चुका नजरचुकीनें झाल्या आहेत, पण कांहीं प्रसंगीं नजरचुकीचा दोष नसून जें होऊं दिलें तें कांहीं तत्त्वांमुळें मुद्दाम होऊं दिलें आहे. तर ज्या कारणांमुळें जर्मन शब्दांचें मातृकांतर करतांनां जर्मन विशेष नामांचे जर्मन उच्चार देण्याला आम्हीं महत्त्व दिलें नाहीं तीं कारणें आम्हांस स्पष्ट केलीं पाहिजेत.

आम्हांस हा प्रश्न सोडवितांना केवळ जर्मन शब्दांकडे लक्ष देऊन कार्यपद्धति निश्चित करणें अशक्य होतें. सर्व देशांस व भाषांस लागू पडेल अशी पद्धति ठरवावयाची होती, व यासाठीं एकंदर परकीय शब्दांच्या उच्चारांविषयीं कांहीं सामान्य धोरण ठरवावें लागलें आणि तेंच धोरण जर्मन शब्दांस लावावें लागलें.

परकीय शब्दांचा उपयोग आपल्याकडे करतांना अनेक गोष्टी होत असतात. कांहीं वेळेस आपण ज्या देशाविषयीं लिहितों त्या देशाविषयीं भौगोलिक शब्द घेतांना त्याचें देश्य नाव न घेतां इंग्रजी रूपांतर घेतों. उदाहरणार्थ "नेपल्स" ला तेथील लोक "नापोली" म्हणतात. व्हिएन्नाला ऑस्ट्रियन लोक "वीन" म्हणतात. अशा प्रसंगीं आपण या शब्दांचा जो उच्चार घेतो तो देश्य नसून इंग्रज लोकांनीं रूढ केला आहे तो घेतो ही गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे. व्हिएन्ना व नेपल्स यामध्ये केवळ उच्चारांतर नाहीं तर मातृकाभिन्नत्वहि आहे,पण"पारीस" सारख्या शब्दांची गोष्ट निराळी आहे. "पारीस" शब्दासाठीं इंग्रज व फ्रेंच लोक तीच मातृकामाला ऊर्फ स्पेलिंग वापरतात, पण उच्चार मात्र भिन्न करतात. विशेषनामाचें मातृकांतर करतांना आम्हीं ज्या गोष्टी लक्षांत घेतल्या त्या येणेंप्रमाणें:—

परकीय भौगोलिक आणि वैयक्तिक नावें लिहितांना दोन पद्धती वापरल्या जातात. एक पद्धति म्हटली म्हणजे तें नाव जसें स्वभाषेत लिहिलें जातें तसें लिहिणें. आणि दुसरी म्हणजे तें नांव त्या भाषेंत जसें लिहिलें जातें तसें लिहिणें या दोन पद्धति सर्व अभिजात राष्ट्रांत वापरल्या जात आहेत. या पद्धतींपैकीं दुसरी पद्धति वापरणें जगांतील सर्व राष्ट्रांप्रमाणें महाराष्ट्रास अशक्य आहे. आम्हांसहि तें शक्य नाहीं. आमच्या आफीसचें भाषासाहाय्य इंग्रजी फ्रेंच, जर्मन, डच, इटालियन व स्पॅनिश एवढ्याच युरोपीय भाषांपुरतें, व हिंदी गुजराथी व कानडी एवढ्याच भारतीय भाषांपुरतें होतें. रशियनसारख्या महत्त्वाच्या पाश्चात्य भाषा व अरबी, तुर्की, चिनीसारख्या आशियांतील भाषा यांच्या ज्ञात्यांचें साहाय्य आम्हांस मुळींच नाहीं. यामुळें आम्हांस प्रत्येक देशांतील स्थानाचा आणि व्यक्तीच्या नांवाचा उच्चार त्या त्या देशांतील भाषांच्याप्रमाणें करणें शक्य झालें नसतें, व त्यांत दुसऱ्याहि अनेक शास्त्रीय अडचणी उपस्थित होतात असें दिसून आलें.

लिहिण्याचा मुख्य उपयोग वाचकांस तें समजणें हा होय आणि त्या दृष्टीनें आम्हांस आंग्लानुसारी शब्दयोजना करावी लागली. भाषाशुद्धता म्हणून ज्या गोष्टीस सामान्य सुशिक्षितांकडून महत्त्व दिलें जातें त्यापैकीं बऱ्याचशा गोष्टींस शुद्ध किंवा अशुद्ध म्हणण्यास शिष्टसंप्रदायापलीकडे कारण नाहीं. जो परिपाठ मूळ स्वरूपाशीं अधिक सदृश तो अधिक शुद्ध असेंहि कोणी शुद्ध सूज्ञ वैय्याकरणी आज म्हणणार नाहीं. जो शब्द परकीय आहे त्याचें सामान्य जनतेच्या मुखांत जें रूप बसलें असेल तें वापरण्याची प्रवृत्ति अयोग्य होणार नाहीं. पुष्कळशीं इंग्रजी शब्दांचीं मूळ रूपें न घेतां अपभ्रष्ट ऊर्फ लोकाचार संस्कृत रूपें घेण्याची चाल आज देशी भाषांत सर्वत्र आहे. उदाहरणार्थ-इस्पितळ, मोटार, हपीस इ. हे शब्द लिहिणारास कोणी अशुद्ध लिहिणारा

असें म्हणणार नाहीं. फारशींतून मराठींत आलेल्या अपभ्रंशास तर आमच्या भाषेंत इतकें शिष्टस्थान मिळालें आहे कीं, शाईच्या ऐवजीं सियाही ( काळें ) व सिपाई याच्या ऐवजीं शिपायीहि अशीं रूपें लिहिलीं तर तीस 'भाषाशुद्धि' कोणी म्हणणार नाहीं.

आतां आपणांस असें पहावयाचें आहे कीं, परकीय शब्दांनीं कोणतीं रूपें मराठींत प्रचलित झालीं आहेत, होत आहेत व होतील. याविषयीं असा नियम सांगता येईल कीं, सर्व परकीय शब्दांस आपण आंग्लोच्चाराचीं रूपें देत असतों. महाराष्ट्रांतील एकंदर जनसमूहामध्यें फ्रेंच, जर्मन, स्पॅनिश व रशियन या भाषांपेक्षा इंग्रजी भाषेचाच प्रचार अधिक रहाणार आणि यासाठीं आपण जर आंग्लोच्चारांच्या अनुरोधानें शब्द ठरविले तर ते अधिक योग्य व लोकांस अधिक सुगम होईल उदाहरणार्थ, इंग्रजींत ज्या नांवाचा उच्चार हेनरी असा होतो, त्या नांवाचा उच्चार फ्रान्समध्यें "आरी" असा होतो आम्ही फ्रेंच इतिहास लिहितांना "आरी" असा शब्दोपयोग केला तर "आरी" म्हणजे हेनरीच आहे हें कितीजणांस समजेल? फ्रेंच इतिहास देतांना "आरी" असा हेनरीचा उच्चार लिहीत गेल्यास कदाचित् हुदलीकरहि आम्हांस प्रकृष्ट पांडित्याचा दोष देतील.

इंग्रजी उच्चारास प्राधान्य देण्याचा जो प्रघात महाराष्ट्रीय लेखकांमध्यें पडला आहे त्याचा अतिक्रम करणें आम्हांस अवश्य वाटत नाहीं ही आंग्लो-च्चारास प्राधान्य द्यावयाची पद्धति आपण केवळ यूरोपीय भाषांपुरतीच वापरतों असें नाहीं. हिंदुस्थानांतील शहरांचीं नांवें लिहितांना आपण तेंच करतों. बेंगळूर व मंगळूर यांस आपण बंगलोर मंगलोर लिहूं लागलों नाहीं काय? कोकोनाडाच्या ऐवजीं काकीनाडा असें लिहिलें व त्याखालीं लेख दिला तर तो लेख कोणाच्या दृष्टीस पडेल? उत्तर सिलोनमधील प्रसिद्ध शहर जाफना यास तामिळ लोक "यप्पनम्" असें नांव देतात पण, तें कोणास समजेल बरें? जाफनाच्या ऐवजीं "यावा" किंवा "यव" असा डच किंवा संस्कृत उच्चार लिहूं लागलों तर कितीजणांस तें समजेल? एवंच आपणास आज तरी आपले परदेशी शब्दांचे उच्चार आंग्लोच्चारानुसारी करणें भाग आहे.

पूर्वोक्त विवेचनांत आलेलीं तत्त्वें येणेंप्रमाणें: परकीय शब्द घेतांना त्यास स्वकीय संस्कार करण्याचें स्वातंत्र्य प्रत्येक भाषेस असतें, आणि ज्या देशांतील लोक ज्या प्रकारच्या विशेष नामांचा उच्चार करतात त्या प्रकारचा उच्चार करणें जगांतील कोणत्याहि राष्ट्रास शक्य नाहीं व प्रत्येक राष्ट्र परकीय विशेषनामांचे उच्चार आपल्याच पद्धतीनें करील.

इंग्रजी भाषेंतील स्पेलिंग पाहून आंग्लांच्या पद्धतीप्रमाणें उच्चार ठरविण्याची पद्धति महाराष्ट्रांत प्रचलित झाली आहे. व ती सर्व देशांतील विशेष नामांस सारखीच लावली जात आहे.

मराठींत जे शब्द नवीन येणार त्यांचे उच्चार महाराष्ट्रीय वाचकवर्ग स्वाभाविकपणें जे करतील तेच ज्ञानकोशाचे उच्चार होत; हें प्रचलित धोरण महाराष्ट्रीय ज्ञानकोशानें स्वीकारलें आहे. परकीय नामांस प्रथम इंग्रजी संस्कार होऊन नंतर मराठी संस्कार होणार व त्यामुळें परकी नामांची विशिष्ट उच्चारपद्धति महाराष्ट्रांत चालू होणार. ही गोष्ट आपणांस स्पष्ट दिसत असल्यामुळें जर्मन, फ्रेंच इत्यादि भाषांतील विशेषनामांचीं देश्य रूपें प्रचलित केलीं नाहींत

---

## (परिशिष्ट नं. १९)

## केसरीकारांची ज्ञानकोशविषयक वृत्ति

( ले. सं. ज्ञानकोश )

आमच्या ज्ञानकोशमंडळावर केसरी पत्राची कृपा त्याच्या प्रारंभापासून होती तो कांहीं अंशीं लो. टिळकाच्या मृत्यूनतर कमी झाली ज्ञानकोशाच्या प्रारंभीं त्याच्या निरनिराळ्या प्रकाशिताचा गोषवारा देऊन ज्ञानकोशमंडळास केसरीनें प्रारंभीं चांगलेंच साहाय्य केलें. महाराष्ट्रीय जनतेंत इतर कोणत्याहि पत्रापेक्षां अधिक विस्तार या दृष्टीनें केसरीचें महत्त्व मोठें आहे. लोकमान्य जिवंत असते तर केसरीमार्फत ज्ञानकोशाची आणि त्यांतील अनेक विषयांची मार्मिक तपासणी किंवा लक्ष्य ओढण्याइतकी पहाणी बरीच झाली असती. ज्ञानकोश तयार करण्यास हात घालतांना ज्ञानकोशकारांची एक मोठी इच्छा होती कीं जुन्या पिढींतील विद्वानांनीं-उदाहरणार्थ, रा. टिळक व महाजनी यांसारख्या लोकांनीं-ही कृति पहावी, व त्यांनीं यशस्वितेबद्दल अभिनंदन करावें. पण ही इच्छा पुरी होण्याचा संभव नाहीं. ज्यांच्या अनुकूल अभिप्रायाचें किंवा शाबासकीचें विशेष महत्त्व ज्ञानकोशकारास वाटत होतें अशांपैकीं रा. टिळक व महाजनी हे दिवंगत झाले आहेत, आणि सर डॉ. भांडारकर यांना ही कृति पाहण्याचीहि शक्ति उरली नाहीं. ज्यांनीं आपलें अभिनंदन करावें अशी विशेष इच्छा असते त्यांच्याकडून अभिनंदन होण्याच्या असंभवामुळें कर्तृत्वाचेंहि महत्त्व वाटेनासें होतें. आणि आज इतर मंडळींनीं स्तुति केली तरी किंवा निंदा केली तरी त्या दोहोंचें महत्त्व त्यांच्या टीकेच्या योग्यतेप्रमाणें लहान किंवा थोर असलें तरी त्यापासून होणारा आनंद किंवा दुःख हीं बरींचशीं मर्यादित होतात.

आज लोकस्तुतीचें, लोकनिंदेचें, किंवा लोकाकडून अलक्ष झालें तरी, याचें महत्त्व कर्त्यास वैयक्तिक आनंद किंवा दुःख याचें उत्पादक खास नाहीं. ज्या मानानें लोकांची स्तुति, निंदा किंवा उपेक्षा याचा परिणाम ग्राहकांवर होईल त्या मानानेंच त्याचें महत्त्व आहे. ज्या कांहीं भारतीय गोष्टींवर ज्ञानकोशांत लेख येत आहेत त्या गोष्टींवर गंभीर तऱ्हेनें अभिप्राय देण्यास पुष्कळ

परिश्रम केला पाहिजे अशी स्थिति आहे, आणि आपल्याकडे परिश्रम करून अभिप्राय देण्यास स्वास्थ्याची आणि साधनांची अनुकूलता आहे व या दोहोंचा उपयोग करण्याची पूर्वागत शिक्षणसंपत्ति आहे असा वर्ग आमच्या देशबंधूंमध्यें अत्यंत थोडा असल्यामुळें ज्या टीका ज्ञानकोशावर प्रसिद्ध होतात त्यांचें वैज्ञानिक दृष्टीनें महत्त्व वाटणें कठिण आहे. त्यांचें महत्त्व वाटावयाचें तें त्यांचा लोकांचें लक्ष ओढण्याकडे उपयोग या दृष्टीनेंच वाटणार. रा. टिळकांच्या हयातींत जी केसरींत टीका आली असती तिचें महत्त्व सध्याच्या स्थितींत नाहीं, व लोकांचें आमच्या प्रयत्नापैकीं कांहीं भागाकडे तरी लक्ष ओढलें गेलें हें बरें झालें एवढ्याच दृष्टीनें आम्हीं तिकडे पहात असतों.

अनेक वर्षांच्या परिचयामुळें व संपादकाच्या अमेरिकेस जाण्यास जे गृहस्थ कारण झाले त्यांत लोकमान्य प्रामुख्यानें असल्यामुळें ज्ञानकोशाच्या मुख्य संपादकांविषयीं लो. टिळकांस प्रेमबुद्धि वाटत होती, व हें कार्य आम्हीं हातीं घेतल्यामुळें त्यांस अभिमानहि वाटत होता. व १९१६ सालीं जाने वारींत ही योजना जेव्हां त्यांच्यापुढें मांडली तेव्हां त्यांनीं प्रथम जरी,हें कार्य तडीस जाण्यास फारच कठिण आहे, तर हें इतक्यांत हातीं येऊं नका असा सल्ला प्रथम दिला, तथापि काम करण्याचा विचार नक्की झाला आहे असें जेव्हां त्यांस सांगितलें तेव्हां त्यांनीं तीन प्रकारें मदत करण्याचें आश्वासन दिलें ते तीन प्रकार म्हणजे केसरींतून या कार्याकडे लक्ष ओढणें, जी मंडळी भेटतील त्यांच्यापाशीं गोष्टी काढणें आणि वेदांतर्गत सूक्तांचा कालानुक्रम, या विषयावर लिहिणें, यांपैकीं केसरीमार्फत आमच्या प्रयत्नाकडे लक्ष ओढण्याची क्रिया केसरी चांगल्या तऱ्हेनें करीत होतें. वेदांतर्गत सूक्तांचा कालानुक्रम या विषयावर त्यांत लिहावयाचें होतें तथापि १९१७ सालीं त्यांनीं असें कळविलें कीं त्यांचें लिहिण्याचें अभिवचन इंग्लंडाहून आल्यानंतर खरें समजावें, तोंपर्यंत तें तहकूब समजावें. इंग्लंडाहून आल्यानंतर थोडक्याच दिवसांनीं त्यांचा अंत झाला. त्यामुळें हें साहाय्य लोकमान्यांकडून मिळालें नाहीं; व पुढें केसरीमार्फत आमच्या प्रयत्नाकडे लक्ष ओढण्याची क्रिया फारच कमी व झाल्यास नाखुषीनें व अंग चोरून होऊं लागली.

लो टिळकांच्या निधनानंतर केसरीची ज्ञानकोशविषयक वृत्ति पालटली. त्या सुमारासच नवीन सुधारणामुळें पुणें शहरास एक स्वतंत्र प्रतिनिधि पाठविण्याचा हक्क मिळाला होता. तेव्हां कांग्रेस डेमोक्रॅटिक पक्षातर्फे रा. केळकर व डॉ. केतकर या दोघांचीं नांवें उमेदवार म्हणून प्रसिद्ध करण्यांत आलीं होतीं, व त्या दोहोंपैकीं पक्षातर्फे नक्की निवडणूक कोणाची करावयाची हेंहि लो. टिळकांच्या निधनापर्यंत निश्चित झालें नव्हतें. तथापि त्या काळापासून

किंवा लो. टिळकांच्या मृत्यूपासून केसरीच्या ज्ञानकोशविषयक वृत्तींत फेरबदल झाला असें म्हणण्यास हरकत नाहीं. ज्ञानकोशाचा उल्लेखच होतां होईतों केसरींतून कमी व्हावा अशी केसरीची प्रवृत्ति होऊं लागली. केसरीकारांनीं धैर्यानें उभें राहून कांहीं विषय घेऊन त्यांत ज्ञानकोशकारांशीं दोन हात केले असें कधीं झालें नाहीं. झालें असतें तर त्याबद्दल ज्ञानकोशकारांस कधींच विषाद वाटला नसता. पण केसरीची प्रवृत्ति ज्ञानकोशाची जाहिरात केसरी-मार्फत होतांहोईतों कमी व्हावी अशी होती. जे केसरीकार "संक्रांतीचा तिळगुळ" यासारख्या पुस्तकावर ( रा अच्युतराव कोल्हटकर यांच्याशीं भांडणाऐवजीं दोस्ती होती अशा दिवसांत ) स्तुतिपूर्ण अग्रलेख लिहीत आणि दुसऱ्या अनेक पुस्तकावर लेखमाला लिहीत त्याच केसरीकारांकडे ज्ञानकोशाचे भाग पाठविले गेले तरी त्याच्यावर अभिप्राय लिहिण्यास प्रवृत्त होत ना. तो न लिहिण्याचें कारण केवळ शास्त्रीय लेखांशीं व लेखनपद्धतीशीं अपरिचय असें केवळ म्हणता येणार नाहीं. पहिला भाग प्रसिद्ध झाल्यानंतर सुमारें दीड वर्षानें केसरींत अभिप्राय आला, आणि तो देखील जेव्हां केसरींत ज्ञान-कोशावर अभिप्राय कसा नाहीं, अशा तऱ्हेची चर्चा लोकांत सुरू झाली तेव्हां आला. ज्ञानकोशाच्या भागावर अभिप्राय जरी दिला नाहीं तरी तावडतोब पुस्तकाची पोंच म्हणून तरी प्रसिद्ध व्हावी, पण तसलीहि कृपा आमच्यावर केसरीकारांनीं केली नाहीं ज्ञानकोशकारांनीं मात्र रा. केळकर यांस एक वेळ कार्यालयात मुद्दाम निमंत्रण करून कार्य कसें चाललें हें प्रत्यक्ष दाखविलें होतें.

जेव्हां ज्ञानकोशमंडळाच्या वार्षिक सभा नागपुरास न करतां पुण्यास करण्याचा उपक्रम सुरू करण्यात आला. तेव्हां त्या योजनेविरुद्ध नागपूरच्या चळवळ करणाऱ्या मंडळींस केसरीकारांनीं भीतभीत हातभार लावला. त्यांचा प्रयत्न कांहीं आरोप न ठेवता संशय उत्पन्न करण्याचा होता. केसरीच्या संपाद-कांनीं ज्ञानकोशमंडळाचा अपमान करण्याचे इतर प्रसंगहि वाया घालविले नाहींत जेव्हां केसरीच्या संपादकांस बडोदें येथील साहित्यसंमेलनाचें अध्यक्ष केलें होतें तेव्हां जरी श्रीमंत संपतरावांनीं मोठ्या आग्रहानें स्वतः आमंत्रण केलें होतें तरी कांहीं कौटुंबिक कारणामुळें ज्ञानकोशाच्या संपादकांस जातां आलें नाहीं. अशा संधीस ज्ञानकोशाची उपेक्षा करण्याचा प्रयत्न रा. केळकर यांनी केलाच. त्यांच्या अध्यक्ष या नात्यानें झालेल्या भाषणांत ज्ञानकोशास पुऱ्या पांच ओळीहि दिल्या नसून वाङ्मयसूचीस अगीवात फाटा दिला आहे. ज्ञानकोशमंडळाचे मुद्दाम पाठविलेले प्रतिनिधि रा. दाते यांस विषयनियामक मंडळींतून वगळण्याचा अयशस्वी प्रयत्नहि झालाच व त्याच प्रसंगीं श्री. सया-जीराव गायकवाड यांनीं साहित्यसंमेलनाच्या सभासदांस आमंत्रण केलें त्यावे-ळेस रा. दाते यांस वगळण्याची खटपट झाली. पण श्री. संपतराव हे रा. दाते यांस

अगोदरच घेऊन गेले आणि त्यामुळे तोहि प्रयत्न फुकट गेला. तसेंच संमेल-नामध्यें कांहीं वाङ्मयसंस्थांची माहिती सांगण्याची त्यांच्या चालकांस संधि देण्यांत आली. त्यावेळी अध्यक्षांस मुद्दाम चिठी पाठवून ज्ञानकोशमंडळाची सोय लावावी लागली. ज्ञानकोशाच्या मुख्य संपादकांनीं किंवा त्यांच्या कुटुंबानें जर कोठें व्याख्यान दिलें तर त्याचा उपहासात्मक सारांश देण्याची पद्धति तर केसरींत कायमचीच पडलेली आहे. केसरीत पुष्कळ टीका करून उत्तरास स्थान न देण्याची क्रिया देखील केसरीकर्ते करीतच आहेत. एवंच केसरी-कारांची ज्ञानकोशविषयीं प्रवृत्ति अशी सांगतां येईल कीं उघडपणें विरोध न करता, किंवा चांगली म्हणून सर्वसंमत असलेल्या वृत्तीस विरोध वाचकाच्या नजरेस येऊं न देता ज्ञानकोशाची उपेक्षा जितकी करता येईल तितकी करावी, ज्या योगानें ज्ञानकोशास मदत होईल असें केसरीनें करूं नये.

केसरी पत्र ज्ञानकोशाचें मित्र असतें तर सरकारनें ज्ञानकोश घेण्याचें लांबणीवर टाकण्याची युक्ति करून आश्रय न देण्याचें धोरण अंगिकारलें आहे त्यावर टीका करण्याचें केसरीकारांनी कमी केलें नसतें. निदान आमच्या हितापाठीं न होईना पण ज्या सरकारची केसरीकार शोभा करूं पहातात त्या सरकारची शोभा करण्यासाठीं म्हणून तरी केसरीकारांनीं सरकारची हजेरी घेतली असती. पण हा प्रसंग केसरीकारांनीं ज्ञानकोशविषयक विरोधबुद्धीमुळे मुद्दाम दबविला. कारण त्यामुळें ज्ञानकोशाची प्रसिद्धि होईल ती होऊं देण्या-पेक्षा या मुद्यावर मुग्धच राहिलेलें काय वाईट?

आता ज्ञानकोशाची २००० ची आवृत्ति बहुतेक खपत आली आहे २७०० वर ग्राहक झाले आहेत ज्ञानकोश हा बाहेर पडणार आणि उरलेली गिऱ्हाइकी मिळण्यास अडचण पडणार नाहीं अशी जेव्हां केसरीकारांची खात्री झाली तेव्हां मात्र त्यांनीं ज्ञानकोशाकडे लक्ष देण्यास सुरवात केली. पण असें करण्यातहि त्यांनीं कौशल्य दाखविलें आहे. प्रतिपक्षाच्या मुख्य मुद्याकडे दुर्लक्ष करणें व लहान सहान मुद्दा घेऊन टर उडविण्याचा प्रयत्न करणें, वितंड वाद करणे, आरोप प्रत्यक्ष न करता गर्भित करणें या तऱ्हेच्या युक्त्या अनेक वर्तमानपत्रकार वापरतात. पण या युक्त्यांमध्यें वाढ करण्याची क्रिया फारशी कोणी करीत नाहीं, पण ती केसरीकारांनीं केली याबद्दल तिच्याविरुद्ध जरी आम्हीं प्रतिकार करतों तरी युक्तीच्या शोधाबद्दल तारीफ केल्यावांचून रहावत नाहीं. ती युक्ति अशी एखादी विरुद्ध लेखमाला सुरू करावी आणि तिचे हप्ते पुष्कळसे उशीरानें देत जावे, व ती अपूर्ण सोडावी. असें केल्यानें दोन फायदे होतात: ज्याच्यावर टीका होते तो मनुष्य लेख संपल्यावर उत्तर देऊं अशी वाट पहातो. अशांत कांहीं महिने गेले म्हणजे टीकेचा विषय असलेला मनुष्य ती गोष्टहि विसरून जातो, त्यामुळें वाचकांच्या मनावर

परिणाम असा होतो की,पहा; या टीकेला त्या मनुष्याकडून उत्तर येणील आशे नाहीं; टीका बरोबर लागू पडली. म्हणजे मोठीशी विचारपूर्वक टीकाहि करा वयास नको आणि आपल्या विषयाची टिमकीहि पुन्हां वाजविण्याचें संधि आहेच. आम्हांस असें वाटतें की ही पद्धत सुचण्यास केसरीकारांस "न चारि हिंसा विजयश्च हस्ते" ही कालिदासोक्ति गमक झाली असावी. असो, कांहीं झालें तरी हें कबूल केलें पाहिजे की बलवान प्रतिस्पर्ध्याशीं वागण्याची एक आणखी युक्ति दाखवून वादनीतिशास्त्राची केसरीकारांनीं वाढ केली, यांत संशय नाहीं, आणि याबद्दल केसरीकाराच्या संशोधनशक्तीबद्दलहि आम्हांस विश्वास वाटूं लागला आहे.

केसरीकाराचें भाग्य कांहीं बाबतींत मोठें स्पृहणीय आहे. त्यांच्या पत्राचा प्रसार त्यांच्या पूर्वसंपादकांच्या कार्यामुळें मोठा झाला असल्या त्यास प्रतिपक्षासंबंधानें एखादा खोटी गोष्ट प्रगुत करण्यांत यश हें ठेवलेलेंच प्रतिपक्षाचें उत्तर प्रसिद्ध करूं नये, त्यानें अन्यत्र प्रसिद्ध केलें तरी हरकत नाहीं आपण केलेला आरोप पसरेल पण आरोपाचें निराकरण फारसें पसरणार नाहीं या संधीचा फायदा केसरीकार थोडा थोडका घेत नाहींत. केसरीच्या हिताची आणखी एक गोष्ट ज्या वेळेस केसरीच्या उत्पादकानें आपनामकरण केलें त्याच वेळेस झाली. सिंहाच्या अर्थाचें नांव असलें म्हणजे फायदा होतो, दुसऱ्याची काव घाटेल तेव्हां करता येतें आणि स्वतःच बोलण्यास गर्जना म्हणता येतें प्रतिपक्षानें चीत करून केसरीकारांस निरुत्तर केलें म्हणजे "ब्रूहि सिंहो मया जितः" असें म्हणून आपल्या निरुत्तराचें समर्थन करता येतें.

केसरींत आजपर्यंत जे मुद्दे येऊन गेले त्याचा विचार पुढें करूं

## केसरीकार व ज्ञानकोशकार

### ( एका खोडसाळ टीकेस उत्तर )

'विविधज्ञानविस्तार'... 'विद्यासेवक' मासिकाच्या गेल्या(वर्ष १,अंक १०)अंकांत ज्ञानकोश संपादक(डॉ. श्री. व्यं. केतकर) यांनी 'केसरीकारांची ज्ञानकोशविषयक वृत्ति' या मथळ्याखालीं एक अत्यंत खोडसाळ असा लेख लिहिला आहे. या लेखाचा अनुचितपणा लक्षांत येण्याला वाचकांनीं तो स्वतःच संपूर्ण वाचयास पाहिजे. परंतु केसरीवर केलेल्या आक्षेपांस उत्तर देण्याला जरूर तेवढाच विभाग जमेस धरून आम्हांस या लेखाचा निर्वाह करावयाचा आहे.

ज्ञानकोशकारांचा मुख्य आक्षेप असा कीं, केसरीनें त्यांच्या ज्ञानकोश ग्रंथाची उपेक्षा केली! डॉ केतकर यांना आपल्या ग्रंथाचें महत्त्व व मानानें प्रचंड वाटतें त्या मानानें अर्थात् उपेक्षाहि दुःसह्य वाटणार. आमची या उपेक्षेचा आक्षेप सर्वस्वी निर्मूल आहे. शिवाय त्यांनीं या उपेक्षे

ही अनेक कारणें किंवा लक्षणें दिलीं आहेत तीं पाहिलीं म्हणजे तर या टीकेच्या बाळबोळपणाविषयीं जितकें हंसूं येतें तितकाच तिच्या जोडसाळ-पणाचा तिटकाराहि येतो.

## कृतघ्न भिक्षुक !

हल्लींच्या केसरीकारांनीं ज्ञानकोशाची उपेक्षा केली हें भासविण्याला टिळकांनीं त्या ग्रंथाची विशेष आस्था बाळगिली ही विरोधगम्य भूमिका सहजच उपयोगी पडणारी आहे. हल्लींच्या केसरीकारांनीं ज्ञानकोशाची कितीहि स्तुति केली तरी तिची किंमत ज्ञानकोशकारांना वाटत नाहीं हें त्यांनीं या लेखांत परोपरीनें सांगितलेलें आहे. अशी स्थिति खरोच असती तर उपेक्षेचा रागहि येण्याचें कारण नव्हतें. पण इकडे मनांतून आपल्या कार्याचा परामर्ष तर घेतला जावा अशी इच्छा व अपेक्षा, आणि फिरून तो परामर्ष घेतला गेला तरी त्याची आपणास किंमत वाटत नाहीं असें तुच्छताबुद्धीचें प्रदर्शन, हीं परस्पर कशीं सुसंगत आहेत हें ज्ञानकोशकारच जाणोत! पण या विसंगतीनें त्यांनीं ' पोटभर जेवून उठतांना अन्नाला नांवें ठेवणाऱ्या ' कृतघ्न भिक्षुकांचेंच अनुकरण केलेलें आहे. " टिळक व महाजनी हे ज्ञानकोशकारांची पाठ थोपटण्यास आज हयात नाहींत, आणि डॉ. भांडारकर जिवंत आहेत पण ते प्रकृतीनें निरुपयोगी, असे झाल्यानें योग्य माणसाच्या अभिनंदनाच्या असंभवामुळें आपणास आपल्या कर्तृत्वाचेंहि महत्त्व वाटेनासें झालें आहे " असे निराशेचे उद्गार डॉ केतकर यांनीं दिमाखानें काढले आहेत. जणूं काय महाराष्ट्रांत टिळक, महाजनी, भांडारकर यांच्या जोडीला बसण्याला स्वतः डॉ. केतकर हेच काय ते एकटे चौथे विद्वान व बाकी सर्व शून्यांधकार ! पण या मानभावी निराशेच्या रडण्यानें डॉ. केतकरांनीं योजिलेल्या प्रतिष्ठेचें घर त्यांना सहज मिळेल असें मात्र त्यांनीं समजूं नये. कुठें टिळक–भांडारकर व कुठें केतकर !

डॉ. केतकर लिहितात कीं, " अनेक वर्षांच्या परिचयामुळें त्यांच्या अमेरिकेस जाण्याला जे गृहस्थ कारणीभूत झाले त्यांत लोकमान्य प्रामुख्यानें असल्यामुळें ज्ञानकोशाच्या मुख्य संपादकाविषयीं टिळकांना प्रेमबुद्धि व अभिमान वाटत होता. " टिळकांच्या निकट परिचयाच्या लोकांनाहि हें शुभ वर्तमान अपूर्वच वाटेल ! अमेरिकेला धाडण्याला हाच एक मोहरा योग्य असें म्हणून टिळकांनीं डॉ. केतकरांची निवडणूक केली असें आमच्या तरी ऐकिवांत नाहीं. एरवीं अमेरिकेंत जाणारे पुष्कळ तरुण लोक चालीप्रमाणें टिळकांचा आशीर्वाद घेऊन जात असत ही सामान्य गोष्ट आम्हांस माहीत आहे. पण लोकमान्यांचें विशेष प्रेम व ममत्व स्वतःला नसतें चिकटवून घेण्यांत डॉ. केतकरांचा हेतु एवढाच दिसतो कीं, या प्रेमामुळें टिळक होते-

तोंपर्यंत त्यांनी ज्ञानकोशाचा विशेष परामर्ष घेतला व त्यांच्या मरणानंतर केळकरांनी तसा परामर्ष घेतला नाहीं हें सकारण म्हणून वाचकांस भासवावें. पण केसरीद्वारां परामर्ष घेणें हाच त्याचा मुख्य मुद्दा असल्यास त्यांना विचारात घेण्यासारखी अशी एक गोष्ट डॉ. केतकर यांच्या लक्षांत आली नाहीं ती ही कीं, ज्ञानकोशाची कल्पना निघण्यापूर्वी फार पूर्वीपासून आतांपर्यंत केळकर हेच प्रायः केसरीचे संपादक आहेत. टिळकांच्या हयतींत केसरीमध्यें ज्ञानकोशासंबंधी मजकुराला जो वाव मिळाला तोहि केळकरांनींच दिलेला होता! केळकरांची इच्छा नसतां तो वाव देण्यास टिळकांनीं केळकरांना भाग पाडलें असला कांहीं पुरावा डॉ. केतकर यांजपाशीं असल्यास त्यांनीं तो जरूर प्रसिद्ध करावा.

## खरी मदत केळकरांचीच

पण या बाबतींत वस्तुस्थिति काय आहे हें एकदाच सांगून टाकलेलें बरें. टिळकांच्या हयातींत ज्ञानकोशासंबंधीं मजकूर केसरींत चार वेळां आला, त्या तारखा येणेंप्रमाणें: (१) १९-६-१७; (२) १८-१२-१७; (३) १-१०-१८; (४) १७-१२-१८. हे चारहि लेख डॉ. केतकर यांच्या सहीचे आहेत व ते ज्ञानकोश योजनेच्या प्रसिद्ध्यर्थ आहेत. हें सांगावयाचें कारण इतकेंच कीं, टिळकांनीं ज्ञानकोशाचा पुष्कळ परामर्ष घेतला या केतकरांच्या विधानावरून स्वतः टिळकांनीं याविषयीं केसरींत अनेक लेख लिहिले असा वाचकांस भ्रम होतो तो दूर व्हावा. त्यांतूनहि एक गोष्ट विशेष सांगण्याची ती ही कीं, टिळकांच्या हयातींत जे केतकरांचे ४ लेख प्रसिद्ध झाले म्हणून वर सांगितलें त्यांतले नं. ३ व ४ हे तर टिळक विलायतेस गेल्यावरच प्रसिद्ध झाले. अर्थात् ते लेख तरी टिळकांच्या भिडेमुळें घातलेले नाहींत तर स्वतः संपादकाच्या सहानुभूतीनें! ज्ञानकोशाचा हा काळच असा होता कीं, प्रत्यक्ष ग्रंथ असा अद्याप प्रसिद्धच व्हावयाचा होता, यामुळें भागीदारांना काय काम चालू आहे याचीच फक्त माहिती मिळणें जरूर होतें; व ती माहिती देण्याला डॉ. केतकर यांना भरपूर वाव टिळक असतांना त्यांच्या आग्रहाशिवाय व ते नसतांना संपादकांच्या स्वयंस्फूर्त सहानुभूतीनें दिला गेला. उपेक्षा किंवा आबाळ केली गेली नाहीं.

"सूचि" हा पहिला ग्रंथ प्रसिद्ध झाला तेव्हां केळकर हे विलायतेंत होते. ते परत आल्यावर व टिळकांच्या मृत्यूनंतरहि ज्ञानकोशाचे भाग अभिप्रायाला पाठविण्यांत येऊं लागल्यानंतर, अर्थात कमजास्त उशीरानें, कांहींचें परीक्षणहि करण्यांत आलें. हे भाग प्रसिद्ध होण्यांत व केसरीकडे अभिप्रायार्थ पाठविण्यांत जितके मागेंमागें झालें व अव्यवस्था घडली तितकी अव्यवस्था

परीक्षणांत खास वगळलीं नाहीं. सन १९२२ सालीं ज्ञानकोशमंडळापैकीं कर्वे यांचें एक चर्चात्मक पत्र आलें तेंहि केसरींत छापलें होतें. १९२३ सालीं "वेदविद्या" या विभागग्रंथाचें सविस्तर परीक्षण देण्यांत आलें. तसेंच १९२४ सालीं 'बुद्धपूर्वजग' या विभागाचें परीक्षण व फिरून त्याच वर्षांत 'विद्यासेवक' नामक जें मासिक पुस्तक ज्ञानकोशानें सुरू केलें त्याच्या स्वागताच्या निमित्तानें, स्वतः ज्ञानकोशाचा गौरवपूर्ण व अभिनंदपर उल्लेख आला होता. चालू सालीं प्रसिद्ध झालेल्या काहीं विभागाची पोंच दिलेली आहे. पण प्रसिद्ध झाले असे कित्येक विभाग केसरीकडे अद्यापि अभिप्रायाला आलेलेच नाहींत. अर्थात परीक्षण यथावकाश काहीं झालें व पुढें काहीं होणार आहे. पण ग्रंथच न आले तर परीक्षण तरी कसें व्हावें? बरें-ज्ञानकोशासंबंधीं केसरींतील परामार्षांचे गौरवपूर्ण उल्लेख केवळ औपचारिक असते तर डॉ. केतकर यांना कुरकुर करण्यास कदाचित जागा असती. परंतु तसें घडलेलें नाहीं, व त्याचा प्रत्यक्ष पुरावा म्हणून आम्ही दोनतीन उतारे खालीं देतों.

## पदरांत पुराव्याचें माप घ्या

'वेदविद्ये' च्या विभागाचें परीक्षणांत केसरीनें दोन सवादोन कॉलम खर्ची घातले आहेत. त्यांतील एक उल्लेख असा आहे "अशा रीतीचें विवेचन पाश्चात्य किंवा भारतीय विद्वानांनीं कोठें केलेलें नाहीं ग्रंथकारांनीं मांडलेले सिद्धांत अगदीं नवे, फार महत्त्वाचे, आणि मतभेद व वाद उत्पन्न करणारे आहेत. तथापि त्या योगानें वाचकांच्या चिकित्सक बुद्धीला चालन मिळणार असल्यामुळें तज्ज्ञांनीं व संशोधकांनीं तिकडे अवश्य लक्ष पुरवावें एवढें आम्ही सुचवितों."

सन १९२४ सालीं 'बुद्धपूर्वजग' या विभागाचें परीक्षण करतांना खालील वाक्य लिहिलेलें वाचकास आढळेल.- "एकंदरींत बुद्धपूर्व जग हा ग्रंथ मराठी भाषांत अपूर्व झाला आहे."

याच सालीं 'विद्यासेवका' चें केसरीनें जें स्वागत केलें त्यांतील खालील उतारा डॉ. केतकर यांस आम्ही सादर करतोः—

"महाराष्ट्रीय ज्ञानकोश प्रकाशित करण्याचें महत्त्वाचें कार्य ज्ञानकोशमंडळानें चालविलें आहेच. ज्ञानकोशाच्या निरनिराळ्या विषयांवर त्यांतील दोष दाखविणाऱ्या प्रतिकूल टीका होतील त्यांस उत्तर देणें, आणि शुद्ध भौतिक शास्त्रें व यंत्रकला वगळून बाकीचीं शास्त्रें, विद्या व कला यांवर स्वतंत्र लेख लिहिणें, या उद्देशानें ज्ञानकोशमंडळाच्या संपादकवर्गानेंच 'विद्यासेवक' चालू महिन्यापासून सुरू केलें आहे. विद्यासेवकाकडून महाराष्ट्राची सेवा त्याच्या नावास साजण्यासारखी होईल अशी उमेद बाळगण्यास हरकत नाहीं" (केसरी ३०-९-२४).

ज्ञानकोशाला केळकर यांनीं साहित्यसंमेलनाचे अध्यक्ष या नात्यानें केलेल्या भाषणांत, अवघ्या ५ । ४ ओळीच दिल्या अशी तक्रार केतकरांनीं केली आहे. पण त्या ५ । ४ ओळींत किती उत्साहपूर्ण स्तुति व उत्तेजन आहे, त्यांत 'अंगचोरपणा' मुळींच कसा नाहीं, हें वाचकांस कळावें म्हणून मुद्दाम त्या पांच ओळी खाली देत आहे. 'डॉ. केतकर यांच्या प्रस्तावना खंडातील 'हिंदुस्थान आणि जग' हा ग्रंथहि जुन्या इतिहासाच्या दृष्टीनें वाखाणण्यासारखा आहे. केतकर यांचा ज्ञानकोश प्रसिद्ध झालेल्या योजने-प्रमाणें संपूर्ण झाल्यास मराठी भाषेची ती बिनमोल सेवा घडून येणार आहे."

असले उतारे देण्याचें एरवी कारण नव्हतें, पण पुराव्याचें माप पदरांत घालणें जरूर झालें. कारण टिळकांच्या मृत्यूनंतर ज्ञानकोशाकडे "लोकांचें लक्ष ओढण्याची क्रिया फारच कमी झाली व झाल्यास नाखुषीनें व अंग चोरून होऊं लागली" असा निराधार बाष्कळ आरोप डॉ. केतकर यांनीं केसरीकारांवर केला आहे. केसरीकाराच्या मनात ज्ञानकोशाविषयीं वैर असतें तर वरील उताऱ्यात लिहिलेले गौरवपर शब्द त्यांजकडून कधींच लिहिले गेले नसते. त्यांनीं तसें लिहिण्याला भाग पाडण्यास त्यांच्या मानगुटीवर तेव्हां कोणता समंध बसला होता? असो; आमचे हे वरील उतारे व डॉ. केतकर यांच्या आक्षेपाची द्वाड भाषा एकत्र वाचल्यास 'कृतघ्न भिक्षुका'ची जी उपमा आम्ही त्यांस प्रारंभीच दिली आहे ती किती समर्पक आहे हें वाचकांस कळून येईल.

## व्यक्तिविषयक आरोप

पण डॉ. केतकर यांच्या टीकेला व्यक्तिविषयक भावनांची मूळ स्फूर्ति असल्यामुळेंच त्यांच्या हातून असले निर्मूल आक्षेप आणण्यांत आले. कसे ते पहा. "लो. टिळकांच्या निधानानंतर केसरीची ज्ञानकोशविषयक वृत्ति पालटली," असें विधान डॉ. केतकर यांनीं केलें आहे; व लगेच त्यापुढें त्यांच्या मतें त्याला घडलेलें कारणहि दिलें आहे! तें असें कीं, "कॉंग्रेस डेमोक्रॅटिक पक्षातर्फे केळकर व डॉ. केतकर या दोघांचीं नांवें १९२० सालीं पुणें शहरातर्फे मुंबई—कौन्सिलच्या निवडणुकींत उमेदवार म्हणून प्रसिद्ध करण्यांत आलीं होतीं व त्यांपैकीं या पक्षातर्फे नक्की निवडणूक कोणाची व्हावयाची हेंहि टिळकांच्या निधनापर्यंत ठरलें नव्हतें." डॉ. केतकर म्हण-तात, "त्या काळापासून केसरीच्या ज्ञानकोशविषयक वृत्तींत फेरबदल झाला. व कोशाचा उल्लेख होतां होईतों केसरींतून कमी व्हावा अशी प्रवृत्ति होऊं लागली." वरील विधानांत डॉ. केतकर यांनां काय सुचवावयाचें आहे तें अगदीं उघड आहे. कॉंग्रेस डेमोक्रॅटिक पक्षातर्फे कौन्सिलांतील पुणें शहराच्या

आगेकरिता ते एक उमदवार म्हणून स्वत: पुढें आले होते ही गोष्ट खरी आणि त्यांचेंच काय पण या पक्षातर्फे कोणत्याहि मतदारसंघात जो जो कोणी उमेदवार म्हणून उभा राहिला त्याचें त्याचें नाव केसरीमध्यें उमेद-वारांच्या यादींत प्रसिद्ध झालें होतें पण केळकरांच्या ऐवजीं डॉ. केतकरांना उमेदवार म्हणून कायम करण्याची टिळकांची इच्छा असल्याची जी गर्भित सूचना केतकरांनीं केली आहे ती सर्वस्वी असत्यमूलक आहे. पुण्यातलें एखादें पोरहि या सूचनेला हंसेल!

या बाबतींत एक गोष्ट आम्हांस पक्की आठवते ती अशी कीं डॉ. केत-कर यांनीं मात्र या सुमारास एक धाडसी व बढाईखोर पत्र लिहून टिळकांकडे धाडलें त्यांत त्यांनीं असें लिहिलें होतें कीं, 'मी केळकरांना निवडणुकींत लीलेनें सहज चारीमुंडे चीत करीन असा माझा आत्मविश्वास आहे याकरितां उमेदवार म्हणून न राहण्याविषयीं केळकरांना सल्ला द्या व मला उमेदवार निवडा' परंतु केतकरांनीं टिळकांना असलें पत्र लिहिलें यावरून टिळकांच्या मनांत केळकरांऐवजीं केतकरांना उमेदवार म्हणून निश्चित करण्याचें आलें होतें असें सिद्ध कसें होणार? आम्हांला एवढेंच स्मरतें कीं, या पत्राचा उघड उपहास करून टिळकांनीं तें पत्र केळकरांचेच स्वाधीन केलें! तें कसेंहि असो, केतकरांनीं दिलेल्या माहितींत अशी कोणतीच गोष्ट नाहीं कीं जीमुळें ज्ञान-कोशावर अप्रसिद्धीचें दडपण घालण्याइतकें केतकरांचें वैर केळकरांनीं मनांत बाळगावें! केतकरांच्या उमेदवारीची किंमत केळकर केव्हांहि पुर्णपणें जाणून होते. बरें, पुढें असहकारितेमुळें केळकरांनीं उमेदवारीचा राजीनामा दिला, तेव्हां, आणि निदान यंदा फिरून स्वराज्यपक्षानें आपले उमेदवार निवड-णुकीस उभे केले तेव्हां हे बढाईखोर केतकर कां दडून बसले? केळकरांना 'सहज चारीमुंडे चीत' करण्याची ज्यांना खात्री त्यांना आपटे—भोपटकरांच्या चढाओढींत पुष्कळच फायदा झाला असता पण आम्ही चुकलों! ते टिळक-व ते केतकर अशीच कायती जोडी जगांत होऊन गेली! रंडक्या महाराष्ट्रांत टिळकांच्या मृत्यूनंतर, आपल्या बरोबरीचा पुरस्कर्ता नाहींसा झाल्यामुळें, डॉ. केतकरांनीं निवडणुकीवर तुच्छतेनें सहजच पाठ फिरविली असावी!

## बडोद्यास काय घडलें

असलाच दुसरा एक व्यक्तिविषयक बाष्कळ आक्षेप, केळकरांच्या उपेक्षेचें निदर्शक म्हणून, डॉ. केतकर यांनीं गंभीरपणें पुढें आणलेला आहे! ते म्हणतात 'ज्ञानकोशाच्या संपादकमंडळाचा अपमान व उपेक्षा करण्याचा संधि केळकरांनीं वेळोवेळीं साधली!" आणि याला पुरावा काय तर म्हणे ज्ञानकोशाचे प्रतिनिधि म्हणून दाते हे बडोद्याला साहित्यसमेलनास (१९२१ नोव्हेंबर) गेले असतां त्यांना विषयनियामक मंडळांतून वगळण्याची खटपट झाली, व संमेलनाच्या सभासदांना सयाजीराव महाराजांनीं आमंत्रण केलें त्यांतूनहि ते वगळले जात होते। जणू काय या गोष्टी संमेलनाचे अध्यक्ष केळकर यांनींच मुद्दाम घडवून आणल्या! कशास काय, संबंध! पण ही गोष्ट केळकरांनीं केली असें केतकर कोणत्याहि माहितीवरून म्हणत असले तरी ते निखालस निखालस खोटें आहे असें आम्ही म्हणतों दाते यांना अशा रीतीनें

वगळण्यात केळकरांना स्वत च अस काय साधावयाचे होते हे केतकरांनी नुसते दर्शविले असते तरी बरे होते केळकर स्वत अध्यक्ष असल्यामुळे विषय-नियामक मंडळातील व राजवाड्यातील त्यांची जागा तरी सुरक्षित होती ना! दाते ती अडवू शकत नव्हते. मग केळकरांनी दाते यांच्या आड का यावे? याचा खुलासा केतकर करतील तर बरे होईल कदाचित असा संभव आहे की, ज्ञानकोशमंडळ पुण्यास नुकतेच स्थापन झाले असून दाते यांचा त्यावेळी संमेलनाच्या चालकांना व्यक्तिश असावी तितकी माहिती नसेल, तसेच ते ज्ञानकोशाचे ‘ प्रतिनिधि ’ या नात्याने गेले म्हणून काय झाले? खुद्द ज्ञान-कोशाचेहि महत्त्व ग्रंथाच्या द्वारे लोकांच्या मनात बिंबावे तितके त्यावेळी बिंबलेले नसेल

ते कसेंहि असो, तो विषय आमचा नाही. दाते यांची परामर्षाची अपेक्षा निष्फळ झाली असल्यास केतकरांनी तो बाद बडोदे-संमेलनाच्या अधिकृत चालकाशी मांडावा. आम्ही इतकेंच सांगतो की, केळकरांचा या गोष्टींत काडाइतकाहि संबंध नाही उलट अध्यक्ष केळकर यांच्यापर्यंत जी गोष्ट गेली तींत दाते यांची दाद केळकरांनीच लावली अशी पुढच्याच वाक्यात डॉ केतकर यांनी स्वत च कबुली दिली आहे! कारण ते म्हणतात “ संमे-लनात वाङ्मयसंस्थांची माहिती सांगण्याची त्यांच्या चालकास संधि देण्यात आली. त्यावेळी अध्यक्षास ( केळकरास ) मुद्दाम चिठ्ठी पाठवून ज्ञानकोश-मंडळाची सोय लावावी लागली ” दाते यांना सोय लावावी लागली असेल पण ती सोय केळकरांकडे चिठ्ठी जाताच त्यांनी लावून दिली यावरून केळ-करांना ज्ञानकोशाची उपेक्षा करण्याची इच्छा नव्हता हेच सिद्ध होत नाही काय? या गोष्टी एरवी किती किरकोळ आहेत हे वाचकांच्या लेव्हाच लक्षात येईल पण डॉ केतकर यांनी केवळ केळकर यांजवर दोषारोप करण्याकरिता इतकी क्षुद्र दृष्टि चालविली म्हणूनच उत्तरादाखल असल्या क्षुद्र गोष्टींत आम्हासहि शिरावे लागते

## जोडप्याच्या उपहासाचे पाप

याहीपुढची पायरी म्हणजे डॉ. केतकरांनी असा एक आरोप केला आहे आहे की, ते स्वत किंवा त्यांचे कुटुंब यांनी जर कोठे व्याख्यान दिले तर त्याचा उपहासात्मक सारांश केसरीत देण्याची ‘ पद्धत कायमची ’ पडलेली आहे जणुं काय केसरीला या जोडप्याचा उपहास करण्याखेरीज दुसरा उद्योगच नाही! पण आम्ही डॉ केतकर यांना असे उघड आव्हान करतो की, त्यांना सत्याची काही चाड असेल तर, या ‘ कायमपद्धती ’तील गोष्ट किती वेळा व कोणकोणत्या बाबतीत कसकशी घडली याची त्यांनी उदाहरणे द्यावी, नाही तर आपला खोटा आरोप निमूटपणे परत घ्यावा. या वादात डॉ. केतकर यांनी आपल्या कुटुंबाचाहि उल्लेख केला ही गोष्ट मात्र अश्लाध्य आहे. ती बिचारी तुमच्या आमच्या वादात कशाला? आपला उपहास झाला अशी तक्रार करणारी माणसे पुष्कळ वेळा आपल्या उपहासास स्वत च कारणीभूत होतात ही गोष्ट तरी डॉ. केतकर वरील उदाहरणे देतील तर आपोआप सिद्धहि होईल. ज्ञानकोशमंडळ म्हणजे स्वतः डॉक्टर केतकर,

त्यांचें कुटुंब, त्याचे दुय्यम संपादक, अशा सर्व गोतावळ्याचा घोळ घालून या सर्वांचा अपमान केसरीकार संपादक व व्यक्ति या दोनहि नात्यांनीं करण्याची संधि दवडीत नाहींत असलें विधान करणें म्हणजे धाष्टर्याची व बेजबाबदारीची कमालच होय ! केळकर यास एक वेळ ज्ञानकोशकारांनीं मुद्दाम कचेरींत निमंत्रण केलें होतें असें केतकर मोठ्या आढ्यतेने सांगतात पण केळकरांनींहि ज्ञानकोशाचा केसरींतून ७-८ वेळ तरी परामर्ष घेतला हा प्रत्युपकार कांहीं कमी नाहीं

## आपली आपण उपेक्षा करी

डॉ. केतकर यांचा दुसरा असा आक्षेप कीं, "ज्ञानकोशमंडळाची कचेरी नागपुराहून पुण्यास आणिली गेली तेव्हां त्याविरुद्ध चळवळ करणाऱ्या मंडळींना केसरीकारांनीं भीत भीत हातभार लावला !" यांतील खरी गोष्ट इतकीच आहे कीं ज्ञानकोशाची मूळ घटना नागपुरास झाली, डॉ. केतकर यास पहिले साहाय्यक व आश्रयदाते नागपुरास मिळाले.अशा स्थितींत नागपूरच्या आठ-दहा प्रमख प्रमुख गृहस्थांनीं नागपुराहून कचेरी पुण्यास आणण्याविरुद्ध महत्त्वाचीं कारणें देऊन एक पत्र केसरीकडे पाठविलें व तें केसरीने छापलें स्वतंत्र रीतीनें या वादांत केसरी मुळींच पडला नाहीं. तसें त्यास पडावयाचें असतें तर डॉ. केतकर यांपेक्षा नागपूरच्या स्नेहीमंडळींचीच बाजू उचलून धरण्याला केसरीकारांना स्वाभाविक अधिक कारण होतें, पण तसें त्यांनीं केलें नाहीं, आणि या सर्व सरळ प्रकाराला, आपल्या विरोधकांना भीत भीत हातभार लावला,असें केतकर म्हणतात तेव्हां तें त्यांच्या दूषित मनास शोभेसेंच आहे याहून अधिक काय म्हणावें !

दुसरा एक चिल्लर आक्षेप केवळ अकरणरूपी असाहि आणला आहे, तो असा कीं " मुंबई सरकारानें ज्ञानकोशाला आश्रय देण्याचें लांबणीवर टाकलें ह्या गोष्टीवर केसरीकारांनीं टीका केली नाहीं." पण ज्ञानकोशाला ह्या बाबतींत आलेलें सरकारी उत्तर म्हणजे कांहीं बादशाही जाहीरनामा नव्हे कीं, तो सर्व जगाला कळेल इतर चार लोकांप्रमाणें आपलें गाऱ्हाणें ज्ञानकोशकारांनीं केळकराकडे साधार कळविलें असतें व टीकेची अपेक्षा दर्शविली असती तर ती गोष्ट सहज घडली असती. पण यावर केतकर म्हणतात कीं, " हा टीकेचा प्रसंग केसरीकारांनीं ज्ञानकोशविषयक विरोधबुद्धीमुळें मुद्दाम दवडला. ज्ञानकोशाची प्रसिद्धि होईल ती होऊं देण्यापेक्षा या मुद्दयावर मुग्धच राहिलेलें काय वाईट ! आम्ही म्हणतों कीं, हा आक्षेप म्हणजे अधमपणाच्या आरोपाची कमालच होय.

## विक्षिप्तपणा कोण चालूं देणार.

ज्ञानकोशातील कित्येक विषयावर व विधानावर आक्षेप घेणारे एकदोन लेख केसरींत प्रसिद्ध झाले आहेत हें खरें पण असल्या महत्त्वाच्या ग्रंथात भरमसाट विधानें करून डॉ. केतकर यांनीं आपल्या बेसुमार बेताल मनाचे

नर्गे प्रदर्शन मांडल्यास त्यावर टीका होणारच. केतकर ज्ञानकोशाचे संपादक झाले म्हणून शुद्ध ज्ञानाचा व बिनचूक मतांचा मक्ता त्याना मिळालेला नाहीं. आणि लोकांच्या खर्चानें ते आपलीं विक्षिप्त मतें एका टोंकाला नेऊन भिडवूं लागले तर लोकांनीं तीं काय म्हणून निमुटपणें ऐकून घ्यावीं ? श्रीयुत नानासाहेब पावगी यांचा ज्ञानकोशावरील टीकालेख फार लांब म्हणून आम्हास तो पुरा करता आला नाहीं. तसेंच काव्य विषयावरील श्रीयुत दत्तात्रेय केशव केळकर यांचा टीकालेख समर्पक, एवढेंच नव्हे तर आम्हास सर्वस्वीं मान्य, म्हणूनच आम्ही तो छापला. लेखणीच्या एका घोटाला परेल इतकेंच थेंबें तेजाब शिंपडून सगळें जुनें-नवें मराठी काव्यवाङ्मय दग्ध करूं पाहणाऱ्या या ऋषिमन्य तामसी व्रात्य टीकाकाराला आपलें स्तोम कोण कसें माजवूं देईल ? आपल्या टीकाकाराशीं दोन हात करण्याचें धैर्य डॉ. केतकर यांना खरें असतें तर या दोनहि लेखांना त्यांनीं आजवर उत्तर दिलें असतें. पण त्यांनीं मौन धरणें हेंहि ' ब्रूहि सिंहो मया जित ' या वाक्यानें स्वत च्या निरुत्तरांचेच समर्थन नव्हे काय ? टीकाविषयक लेखांना डॉ. केतकरांनीं उत्तरें देण्याकरिता लेख आम्हाकडे पाठविले व आम्ही ते छापले नाहींत असें किती वेळा घडलें हे डॉ. केतकर उदाहरणें देऊन सागतील तर बरें होईल. प्रतिकूल टीकेच्या चिखलानें ज्ञानकोशाचें तोंड खराब झालें असें त्याना वाटत असल्यास आपल्या प्रतिटीकेच्या पदरानें त्यांनीं ते वेळींच पुसून काढावयास पाहिजे होतें. बरें, उलट टीका होऊन देखाल स्वत. जर त्याना निरुत्तर बसवतें तर केसरीनें त्याची उपेक्षा केल्यास तरी का रागवावें ?

आरतूनपरतून डॉ. केतकर यांनीं केसरीकारास असा टोमणा मारण्याचा प्रयत्न केला आहे कीं, केसरीनें ज्ञानकोशाचा परामर्ष घेतल्यापासून जी प्रसिद्धि लाभेल तिच्यावरच आज आपली मुख्य नजर आहे, इतर रीतीनें केसरीच्या अभिप्रायाची किंमत आपणास वाटत नाहीं ! अशा टीकेला आम्हासहि उत्तर आहे कारण ज्या अनुकूल अभिप्रायाची ज्ञानकोशाकाराना किंमत वाटत नाहीं तो यापुढें आम्हीहि पण देऊं इच्छित नाहीं. म्हणून त्याना यापुढील ग्रंथ केसरीकडे अभिप्रायाला मुळींच न पाठविलेले बरें. केसरी पत्राचा प्रसार ' पूर्वसंपादका ' च्या म्हणजे टिळकांच्या कार्यामुळें मोठा झाला ही गोष्ट खरी असली तरी, तिने केळकरास भोसकावें म्हणून तीहि केतकरांनीं तशी मुद्दाम लिहिली आहे. अर्थात केसरीच्या प्रचंड वाचकसंख्येचें काहींच श्रेय केळकर यांजकडे नाहीं असेंहि ध्वनित करण्याचें धाष्टय डॉ. केतकर यांनीं केलें आहे. पण टिळकांच्या मृत्यूनंतर पाच वर्षांनीहि अवशिष्ट राहिलेल्या केसरीच्या प्रसाराचा फायदा घेण्याचा लोभ डॉ. केतकर याना अजूनहि सुटत नाहीं. या एका गोष्टीवरूनच या अवशिष्ट अशाहि प्रसाराचें प्रचंडत्व किती आहे हें

सहजच कळून येतें ज्ञानकोशाची तीन हजाराची आवृत्ति खपत आली असें डॉ. केतकर दिमाखानें सांगतात त्याचें कितीसें श्रेय केसरीनें वेळोवेळीं घेतलेल्या त्याच्या परामर्षाला असेल हें कोणी सांगावें ? " ज्ञानकोशाला उरलेली गिऱ्हाइकी मिळण्यास अडचण पडणार नाहीं अशी केसरीकारांची खात्री झाल्यावरच त्यांनीं ज्ञानकोशाकडे लक्ष देण्यास सुरवात केली आहे, " असें डॉ.केतकर लिहितात ! पण आम्ही इतकेंच सांगतों कीं या खासगी माहितीची आम्हास पूर्वी जरूर नव्हती व पुढेंहि ती नाहीं. ग्रंथाकडे ग्रंथ या दृष्टीनेंच केसरी पाहणार. केसरीद्वारें मिळणाऱ्या प्रसिद्धीची ज्ञानकोशकर्त्यांना किंमत वाटत नसल्यास त्यांनीं केसरीकडे आपले ग्रंथ आणि आपल्या जाहिरातीदेखील यापुढें पाठविण्याचें कारण नाहीं ज्ञानकोशाशिवाय लिहिण्याला इतर विषय व जाहिरातीच्या रकान्याचे इतर आश्रयदाते सुदैवानें केसरीला पुष्कळच आहेत

## ' नाठाळाच्या काठी देऊं माथा '

डॉ. केतकर याच्या टीकेला वरील लांबलचक उत्तर आम्ही खरोखर मोठ्या खेदपूर्ण मनानें दिलें आहे. कारण कित्येक प्रतिष्ठितंमन्य ग्रंथकाराची वृत्ति, वाकड्या पापडानें मर्जी जाणाऱ्या विहिणींच्या मिजासीइतकी नाजूक झालेली आढळते. नवीन होणारे चांगले ग्रंथ हे मराठी भाषेच्या उत्कर्षाला कारणीभूत आहेत अशा बुद्धीनें केसरीकार होईल तितक्या दक्षतेनें ग्रंथपरीक्षणाचें काम करीत असतात हे काम एवढें व्यापक आहे कीं, त्यात क्वचित कोणास अन्याय होत नसेल असें आम्हीं म्हणत नाहीं पण ईश्वरानें हातीं दिलेल्या प्रसिद्धिसाधनाचा उपयोग वाङ्मयभक्तांना व वाचक वर्गाला होईल तितका देण्याच्या सद्बुद्धीनें आम्ही वागत असता,डॉ. केतकर याच्यासारखी क्षुद्र बुद्धीची आणि असमपणाचे आरोप करणारी टीका कोणी केली म्हणजे तिचा राग केसरीकारास आल्यास त्यास कोणा नांवें ठेवील असें वाटत नाहीं. ग्रंथपरीक्षणाचे बाबतींत आमचेकडून बुद्धिपुरस्सर अन्याय असा कोणास होत नाहीं, व चुकून तो झाल्यास तो दुरुस्त करण्याचीहि आमची इच्छा असते.पण सरळपणानें वागल्यास केसरीची मदत वाटेल तेवढी मिळण्यासारखी असता ती न घेता कोणी विनाकारण हत्यार उपसून उठेल, तर त्याच्याविरुद्ध उपसण्याला स्वत: केसरीकाराजवळहि त्यांचें हत्यार नेहमीं तयार असतें हें कोणी विसरूं नये, एवढें दर्शविण्याकरिताच डॉ. केतकर याना हें विस्तृत उत्तर आम्हीं दिलें आहे

---

## " ज्ञानकोशकारांचें केसरीकारांस प्रत्युत्तर "

[ हें पत्र केसरीकाराकडे प्रसिद्धीसाठीं पाठविलें होतें तें त्यांनीं छापण्याचें नाकारल्यामुळें विद्यासेवकांत प्रसिद्ध होत आहे विद्या सेवक वर्ष १ अं. ११ ]

जूनच्या विद्यासेवकात जे केसरीकारांवर आक्षेप घेतले आहेत त्यास केसरीच्या २३।६।२५ च्या अंकात उत्तर देण्याचा प्रयत्न केला आहे.

## उत्तराची भाषा

लेखाखालीं सही नाहीं. तथापि " पोटभर जेऊन अन्नाला नांवं ठेव-णाऱ्या " भिक्षुकाची व " वाकड्या पापडानें मर्जी जाणाऱ्या विहिणीची " उपमा देणारा लेखक कोण असावा हें केसरीच्या वाचकास सहज समजणार आहे

केसरीकार आपलें व्यवहारतत्त्व स्पष्ट करण्यासाठीं लिहितात कीं, " नवीन होणारे चांगले ग्रंथ हे मराठी भाषेच्या उत्कर्पास कारणीभूत आहेत अशा बुद्धीनें केसरीकार होईल तितक्या दक्षतेनें ग्रंथपरीक्षणाचें काम करीत असतात हें काम एवढें व्यापक आहे कीं, क्वचित कोणास अन्याय होत नसेल असें आम्ही म्हणत नाहीं. तथापि डॉ. केतकर यांची टीका क्षुद्रबुद्धीची आहे डॉ केतकर ' प्रतिष्ठितंमन्य ' ग्रंथकार आहेत आम्ही त्यांचा परामर्ष योग्य तऱ्हेनें घेत असतां आम्ही घेत नाहीं असा आरोप करणारे डॉ. केतकर ' कृतघ्न भिक्षुक ' आहेत. डॉ. केतकर यांचे ' आपणास आतां कर्तृत्वाचेंहि महत्त्व वाटत नाहींसें झालं आहे ' हे उद्गार दिमाखाचे आहेत, हे मानभावी निराशेचें रडणें आहे. लोकमान्यांचे महत्त्व आणि त्यांचेंप्रेम डॉ केतकर यांनीं स्वतःला नसतें चिकटवून लावून घेतलें आहे केळकराच्याऐवजीं डॉ केतकरांना उमेदवार म्हणून कायम करण्याची लो. टिळकांची इच्छा होती. असें डॉ. केतकर गर्भित करतात, पण हें खोटें आहे डॉ. केतकरांनीं लो. टिळकांच्याकडे एक धाडसी आणि बढाईखोर पत्र धाडलें, आणि त्या पत्रांत मी केळकरांना लीलेनें ' चारीमुंडे चीत ' करीन असा आपला आत्मविश्वास व्यक्त केला हें पत्र लो टिळकांनीं केळकरांना दिलें बडोद्यास ज्ञानकोशमंड-ळाच्या प्रतिनिधीस विषयनियामक कमिटींत घेतलं नाहीं, वगैरे गोष्टी बुद्ध्या झाल्या नाहींत ज्ञानकोशातील विधानांवर आक्षेप घेणारे जे लेख केसरींत प्रसिद्ध झाले, ते विक्षिप्तपणा चालू देऊं नये म्हणून झाले डॉ. केतकरांच्या व्याख्यानाचे उपहासात्मक सारांश देण्याची कायम पद्धति डॉ केतकरांनीं सत्याची चाड असेल तर सिद्ध करून दाखवावी. " इत्यादि विधानें केलीं आहेत.

केसरीकारांनीं हा लेख संतापून लिहिला आहे असें दिसतें त्यामुळें त्यांत जीं त्यांनीं अनेक असत्यें लिहिलीं आहेत तीं लबाडी करण्याच्या हेतूनें लिहिलीं आहेत असें म्हणतां येत नाहीं डॉ केतकरांचें लोकमान्यांस पाठ-विलेलें काल्पनिक पत्र वगळलं तर उरलेलीं असत्यें हा त्यांच्या गैरसावधपणाचा भाग दिसतो. केसरीकारांनीं अनेक ठिकाणीं शब्दविपर्यास करून टीका केली आहे, आणि मूळाचाच विपर्यास करणारास जोरदार टीका सहज करतां येते, त्यामुळें त्या टीकेची भाषा जोरदार आणि मनोरम झाली आहे. या उत्तरांत रा केसरीकारांनीं डॉ. केतकरांचें ' बढाईखोर, स्तुतीची तहान न भागणारे, उद्धट, व खोटे आरोप दुष्टाव्यानें करणारे ' असें चित्र रंगविण्याचा प्रयत्न केला आहे. या केसरीकाराच्या पद्धतीमुळें आमच्या विधानांचें समर्थन करणें याशिवाय केसरीकारांनीं केलेल्या खोट्या आरोपांचें निराकरण करणें अशीं दोन कार्यें या उत्तरांत करावीं लागत आहेत असो

आता प्रत्येक मुद्याकडे लक्ष देण्याचा उपक्रम केला पाहिजे, व यासाठीं केसरीकाराचाच अनुक्रम घेतों

टिळकांशी बरोबरी सांगण्याचा आरोप

(१) आजच्या लोकांच्या व आजच्या केसरीकाराच्या मताची आम्हांस किंमत नाहीं, असें म्हटल्याचें केसरीकार दाखवितात, ते खोटें आहे आमचें वाक्य आहे तें असें " आज इतर मंडळींनीं स्तुति केली तरी त्या दोहोंचें महत्त्व त्यांच्या टीकेच्या महत्त्वाप्रमाणें लहान किंवा थोर असलें तरी त्यापासून ( वैय्यक्तिक ) आनंद किंवा दुःख हीं बरींच मर्यादित होतात " अर्थात लोकांच्या मतास किंमत नाहीं असें यात म्हटलें नाहीं, तर लो टिळक, महाजनी यासारख्या वडील म्हणून समजल्या जाणाऱ्या व्यक्तींकडून शाबासकी मिळाल्यास त्याचा विशेष आनंद वाटतो असें म्हटलें आहे व असें म्हणण्यात लो टिळक, भांडारकर यांच्या बरोबरीचे आम्ही विद्वान आहोंत असें म्हटल्यासारखें होतें काय ?

टिळकांचे ममत्व खोटे चिकटविले काय ?

( २ ) लो टिळक यांचा व आमचा अनेक वर्षांचा परिचय होता व आमच्या अमेरिकेस जाण्यास लो. टिळकांनीं उत्तेजन दिलें यावर केसरीकार उपहासात्मक विधानें करतात व केतकर केवळ लोकमान्यांचा आशीर्वाद घेऊन गेले असतील पण यापलीकडे काहीं नाहीं, असेंहि ते भासवितात व खोटें ममत्व चिकटविल्याचा आरोप करतात लोकमान्यांचा व आमचा अनेक वर्षांचा परिचय होता ही गोष्ट सध्याच्या केसरीकारास ठाऊक नसलो, म्हणजे जण काय ती असत्यच होय इ स १९०४ सालापासून लोकमान्यांचा व डॉ केतकर यांचा परिचय आहे, म्हणजे तो 'अनेक' वर्षांचा आहे रा केतकर ज्या वेळेस हिंदुस्थान सोडून अमेरिकेला गेले तेव्हां त्यास लोकमान्यांनीं प्रोत्साहन कोणत्या तऱ्हेचें दिलें ? पैशाची मदत सुद्धा द्यावयास लोकमान्य तयार झाले किंवा नाहींत व पुढें ती मदत रा केतकर यांनीं का नाकारली, व रा केतकरास अमेरिकेस जाण्यासंबंधीं रा टिळक यांनीं जे प्रोत्साहन दिलें त्यामुळें रा टिळकास रा केतकराच्या घरातल्या मंडळींचा रागहि सहन करावा लागला किंवा नाहीं, या गोष्टी त्या वेळच्या काहीं लो. टिळकांच्याच वयाच्या व अत्यंत प्रसिद्ध मंडळीस ठाऊक आहेत ही गोष्ट असलेल्या मंडळीपैकीं पुण्यातल्याच एखाद्या व्यक्तीचा उल्लेख करावयाचा झाल्यास रा वासुदेवराव जोशी, चित्रशाळेचे मालक यांचा करता येईल.

केळकरावर टिळकांचा विश्वास कितपत होता ?

केसरीकारांना टिळकांच्या केतकरास प्रोत्साहनासंबंधींची माहिती शुभवर्तमानाप्रमाणे भासली यावरून डॉ केतकराच्या विधानाचें असत्यत्व सिद्ध न होता १९०४, १९०५ व १९०६ या सालात रा टिळक सध्याच्या केसरीकारास विश्वासात घेत होते एवढें स्पष्ट होतें. डॉ केतकर य त्यांविषयीं लो. टिळक यास अभिमान वाटत होता किंवा नव्हता यासंबंधीं लोकमान्याचे शब्द जर प्रमाण असतील तर एवढें सांगता येईल का असले शब्द त्यांनीं अनेक मंडळीसमक्ष व अनेकदा उद्गारिलेले आहेत.

## मालकाच्या की नोकराच्या इच्छेस महत्व?

( ३ ) लोकमान्यानीं केसरीमार्फत साहाय्याचें अभिवचन दिलें असें आम्हीं लिहिलें आहे तें खोटें धरून लोकमान्यांच्या हयातींत जें केसरीचें साहाय्य ज्ञानकोशकारांस मिळालें तें लो. टिळकांच्या इच्छेमुळें नसून रा. केळकराच्याच इच्छेमुळें मिळालें असें केसरीकार भासवितात आणि रा. केळकरास ती मदत देण्यास भाग पाडलें असा पुरावा आमच्यापाशीं मागतात ! यास उत्तर एवढेंच कीं लोकमान्य आपल्या मदतनिसाचे सार्वजनिकपणें कान उपटीत होते अशी पद्धत होती हें केसरीकारानीं सिद्ध करून दिलें पाहिजे नाहीं तर मालक आपल्या कारकुनास काय सांगतो हें तिऱ्हाइतास कसें कळणार ? शिवाय लो. टिळक यांचें अभिवचन ज्ञानकोशाची केसरींतून योग्य जाहिरात आम्हीं करूं असें असता व लोकमान्याच्या हयातींत तें होतहि असता रा. केळकरानीं केवळ लोकमान्याच्या इच्छेपाठीं केलें कीं स्वतः होऊन केलें ही चौकशी करण्याचें आम्हास कारण काय ? लोकमान्यांचीं अभिवचनें आम्हीं धाब्यावर बसवीत होतों असा पुरावा जर रा. केळकर पुढें आणतील तरच रा. केळकरांना लोकमान्यानीं कोणती गोष्ट करावयास लावली हें सिद्ध करण्याची आवश्यकता उत्पन्न होईल. तथापि हेंहि कबूल केलें पाहिजे कीं ज्ञानकोशास मदत करण्याचें सत्कार्य लो. टिळकांच्या हयातींत रा. केळकर म्हणतात त्याप्रमाणें त्यांनी स्वतःच्या इच्छेनेंहि केलें असावें. ज्ञानकोशासारख्या कार्यास मदत करावी अशी रा. केळकर यांचे मनात अन्य किंतु नसल्यास स्वाभाविकपणें इच्छा असणार याविषयीं खुद्द ज्ञानकोशकारांची खात्री आहे.

## टिळकांची मदत फुगवली काय ?

( ४ ) " केतकरांच्या विधानावरून स्वतः टिळकानीं याविषयीं केसरींत अनेक लेख लिहिले असा वाचकास भ्रम होतो तो दूर व्हावा " म्हणून " हे चाराहि लेख डॉ. केतकर यांच्याच सहीचे आहेत " असा पुरावा केसरीकार पुढें आणतात. डॉ. केतकर यांनीं भ्रामक विधान केलें नाहीं असें केसरीनें घेतलेल्या टीकेस लेखातील वाक्यावरूनच सिद्ध होईल; तीं वाक्यें येणंप्रमाणें:—

" ज्ञानकोशाच्या प्रारंभीं त्याच्या निरनिराळ्या प्रकाशितांचा गोषवारा देवून ज्ञानकोशमंडळास केसरीनें चांगलेंच साहाय्य केलें ", " लोकमान्य जिवंत असते तर केसरीमार्फत ज्ञानकोशाची आणि त्यांतील अनेक विषयांची, मार्मिक तपासणी किंवा लक्ष ओढण्याइतकी पहाणी बरीच झाली असती. " यावरून भ्रामक विधानें केसरीकारांनीं केलीं आहेत कीं ज्ञानकोशकारानीं केलीं आहेत हें सहज समजून येईल.

## हास्यकारक समर्थन

( ५ ) बडोद्याच्या व्याख्यानांत रा. केळकरांनीं वाङ्मयाचा आढावा न करण्याचें कारण सूची ज्यावेळेस प्रसिद्ध झाली त्यावेळस रा. केळकर विलायतेंत होते असें मौजेचें स्पष्टीकरण केसरीकारानीं केलें आहे.

## उपेक्षेचे घटक स्वाभाविक उल्लेखाची अपुरी संख्या

( ६ ) पुराव्याचें माप पदरांत घ्या म्हणून केसरीकारानीं कांहीं अभिप्रायाचे उतारे दिले आहेत व त्यातील प्रशंसावाक्यें ही ज्ञानकोशाची उपेक्षा केली या विधानास विरूद्ध म्हणून मांडलीं आहेत परंतु तेवढा पुरावा पुरेसा नाहीं. कां कीं, प्रसिद्ध झालेल्या १३ भागापैकीं ९ भाग आक्टोबर १९२४ पूर्वीच केसरीकाराकडे गेले. त्या ९ भागांची पोंच जितक्या वेळा यावयास पाहिजे होती तितक्या वेळा आली नाहीं. अभिप्राय पुष्कळदां पोंचेनंतर दिला जातो; या नियमाप्रमाणें आणखी बऱ्याच वेळां तरी उल्लेख यावयास पाहिजे होता, तो तसा आला नाहीं, शिवाय स्तुतिवाक्यें जीं केसरींत आलीं त्याविषयीं एवढेंच म्हणता येईल कीं जो ग्रंथ अत्यंत परिश्रमपूर्वक तयार झाला आहे व ज्याचा बराचसा भाग तज्ज्ञाकरितांच आहे व जो इतर पत्रकारानीं व संशोधकानीं नावाजला आहे त्याच्याविरुद्ध लिहावयास बरेचसें स्वास्थ्य व बराचसा परिश्रम करावा लागतो व तो तसा केल्याखेरीज विरूद्ध लिहिणें ही सोपी गोष्ट होत नाहीं.

## तारतम्यांत बिघाड

उपेक्षेचा मुख्य आरोप हा केवळ आमच्या पुस्तकाविषयीं किरकोळ अभिप्रायानीं असिद्ध होणार नाहीं वाङ्मयक्षेत्रामध्यें जीं पुस्तकें अवतरतात त्यांत ज्ञानकोशास इतर ग्रंथाच्या मानानें व त्याच्या योग्यतेप्रमाणें योग्य तें महत्त्व मिळालें आहे काय ? इतर ग्रंथाना केसरीकाराकडून जें प्रामुख्य देण्यांत आलें त्या मानानें ज्ञानकोशाकडे लक्ष दिलें किंवा नाहीं; या प्रश्नाचा निर्णय तारतम्यविषयक वृत्त पाहून होईल. अच्युतरावांचा संक्रांतीचा तिळगुळ, रा. वझे यांचें भावी हिंदी स्वराज्य ( दोन अग्रलेख ) व राधामाधवविलासचंपू इत्यादि पुस्तकें जर अग्रलेखाचा मान केसरीकाराच्या 'समतोल' दृष्टीनें मिळवूं शकतात, तर ज्ञानकोश मंडळ हें कधींहि अग्रलेखास पात्र होऊं नये काय ? कधीं कधीं तारतम्यांत बिघाड केल्यानें अपमान करण्याची जी संधि मिळते ती केवळ अपेक्षेनें मिळत नाहीं व बडोद्यास हेंच तत्त्व अवलंबिलें गेलें असावें. वर्तमानपत्रास आहेर करतांना एखाद्या फाटक्या वर्तमानपत्रावर स्तुतीचा वर्षाव करून केसरीची सामान्य स्तुति केली तर तें केसरीस कसें आवडेल! बडोद्यास जेव्हां ज्ञानकोशमंडळाची सोय अध्यक्षानीं लाविली असें केसरीकार अभिमानानें सांगतात त्यावेळेस अग्रपूजेचा मान मयूरमंडळास देण्यांत आला आणि या कृतीमध्यें अध्यक्षच जबाबदार होते, कां कीं, हा प्रश्न विषयनियामक कमिटींत मुळींच निघाला नव्हता व अध्यक्षानींच हा स्वेच्छेनें उपक्रम करून मयूरमंडळास अग्रस्थान दिलें. हें मंडळ ज्ञानकोशांतील एका लेखकानें त्यावेळीं नुकतेंच काढलेलें होतें तर तें मंडळ ही वाङ्मयसंस्थांतील अग्रगण्य संस्था आहे असें भासवून ज्ञानकोशमंडळास अजिबात विसरण्याइतकें क्षुद्र ठरविण्याचा प्रयत्न नव्हता काय ? कदाचित हाहि विस्मृतीचाच दोष असेल!

### लबाडीचे पत्र; लोकमान्यांच्या हेतूसंबंधाने पांघारलेले अज्ञान

( ७ ) कौन्सिल उमेदवारीसंबंधानें लेखांश केसरीकारांनीं अगदींच विपर्यस्त लिहिला आहे. डॉ केतकर यांनीं लोकमान्यांस, मी रा. केळकर यांस "चारी मुंडे चीत करीन" असें पत्र लिहिलें नव्हतें तर रा. केळकर यांस दुसऱ्या कोणत्या तरी जागेसाठीं उमेदवार करावें असें सुचविणारें पत्र लिहिलें होतें. त्यानंतर एकदा लोकमान्य म्हणाले कीं, " मी ( लोकमान्य ) स्वतः कोठेंच उमेदवार म्हणून उभें न राहता सर्व प्रातात हिंडून सर्व प्रांतातील लोकपक्षातील एकसूत्रता ठेवण्याचें काम करावें असें माझ्या मनात येतें " व तशी योजना झाल्यास वरच्या कौन्सिलासाठीं रा. केळकरास घालूं व तुम्हांस अवश्य संधि देऊं इतपत डॉ केतकर व लोकमान्य यांचें संभाषण झालें होतें ही योजना रा केळकरासहि ठाऊक असावी असें वाटतें

### स्वतः विरुद्ध अधिक पुरावा देण्याचा अजागळपणा

( ८ ) रा केळकरास " चारी मुंडे चीत करीन " असें जें केवळ काल्पनिक पत्र केसरीकारानीं उत्पन्न केलें तें करताना खोटीं विधानें करणाऱ्या पण तीं विधानें साधक आहेत कीं बाधक आहेत हें न पाहणाऱ्या बगल्यावकीलाप्रमाणें केसरीकार अगदींच घसरले हें लिहिताना केसरीकारानीं रा. केळकरास तरी विचारावयास पाहिजे होतें. या काल्पनिक पत्रानें रा. केळकरांची 'केस' त्यानीं अगदीं खराब करून टाकली. या पत्रानें केसरीकाराच्या वर्तनाची सहेतुकता सिद्ध केली यानें असें सिद्ध होईल कीं, रा. नरसोपंतास चीड येईल असे वर्तन डॉ. केतकराकडून घडलें व डॉ. केतकराकडून द्वाड वर्तन झाल्यामुळें रा. केळकरांस राग आला, आणि त्यामुळें रा केळकराकडून ज्ञानकोशाविरुद्ध वर्तन घडलें खुद्द केळकरांचीच अशी शोभा केसरीकार करतात हें पाहून ज्ञानकोशकारास कृतघ्न भिक्षुक, वांकड्या पापडानें मर्जी जाणारी विहीण इत्यादि विशेषणें लावून जर केसरीकारानीं दुखविलें तर त्याबद्दलचे दुःख खरोखरच कमी होतें. हें खोटें पत्र उपस्थित करतेवेळेस स्वतःचें समर्थन करण्यापेक्षा दुसऱ्याचा उपहास करण्याची इच्छा अधिक प्रबल नव्हती काय ? याबरोबर हेंहि सांगितलें पाहिजे कीं, " चारी मुंडे चीत " ही शब्दमाला केसरीकाराच्या परिचयाची असली तरी ज्ञानकोशकाराच्या परिचयाची नाहीं

### चला कबूल करूं

( ९ ) " बडोद्यास काय घडलें " याविषयीं जो एकंदर खुलासा केसरींत आहे त्याविषयीं एवढेंच म्हणता येईल कीं खुद्द नरसोपंत जर असें म्हणत असतील कीं ज्ञानकोशाच्या उपेक्षेची इच्छा नव्हती तर ते सभ्य गृहस्थाचे

शब्द म्हणून मान्य करण्यास हरकत नाहीं. अध्यक्षाचें काम सदोष केलें एवढें तरी शिल्लक राहीलच. पण त्या प्रश्नास येथें महत्त्व देण्याचें कारण नाहीं.

## चुकीचे रिपोर्ट

( १० ) भाषणाचा चुकीचा सारांश केसरींत प्रसिद्ध होतो हें केसरीकार सप्रमाण सिद्ध करण्यास सांगतात. केसरींतील रिपोर्ट चुकीचा आहे हें आज ज्या साधनांनीं ठरवावयाचें तीं साधनें म्हणजे आमचीच आठवण व टिपणें. तीं खरीं मानून त्याबरोबर आपल्या रिपोर्टाची तुलना होऊं द्यावयास केसरीकार तयार आहेत काय ? तसें करणें म्हणजे केसरीकारानीं प्रतिपक्षाला फारच फायदा देणे आहे

## दोस्तांना मदत करण्याची इच्छा

( ११ ) नागपूरच्या उपद्यापी मंडळींस केसरीकारानीं जें साहाय्य केलें त्याविषयीं केसरीकाराचा मांडणी अगदीं चुकीची आहे. एवढेंच नव्हे तर ती मांडणी करताना आपली मनोवृत्ति व्यक्त करून केसरीकारानीं विरुद्ध पक्षाच्या हातीं विनाकारण हत्यार दिलें आहे. " नागपूरच्या स्नेही मंडळींचाच बाजू उचलून धरण्याला केसरीकारास अधिक कारण होतें, " असें केसरीकार म्हणतात, याचा अर्थ काय ? नागपूरच्या काहीं मंडळींनीं केसरीकारास जेवावयास बोलाविलें किंवा त्याच्या गळ्यांत हार घातले अशा तऱ्हेचें कारण होतें कीं, ज्ञानकोशाच्या संपादनास व प्रसिद्धीकरणास नागपूरच्या कांहीं विशिष्ट गृहस्थांची बाजू उचलल्यानें अधिक साहाय्य झालें असतें अशा पद्धतीचें कारण होतें, हें केसरीकारांनीं स्पष्ट केलें नाहीं. ज्ञानकोशाचें संपादकीय खातें व हिशोबखातें हीं नागपुराहून पुण्यास नागपूरच्या डायरेक्टराच्या इच्छेनेच आणलीं असता आपलें छपाईचें नुकसान झालें अशा भावनेनें एका छापखानदारानें कांहीं नागपूरच्या गृहस्थाची सहानुभूति मिळवून विरोध केला, अशा प्रसंगीं केसरीकारांस ज्ञानकोशाच्या कोणत्या हितासाठीं नागपुरकर मित्रांस मदत करावयाची होती ? यातील इंगीत डॉ. केतकर यानीं पुण्यास येऊंच नये अशी केसरीकाराची इच्छा होती हें आहे काय ? खरोखर पाहतां केसरीकाराच्या नागपूरकर मित्राची तक्रार नागपुराहून ऑफिस हालविण्याबद्दल नसून शेअर होल्डरांची बैठक पुण्यास बोलावण्याबद्दल होती, व पुण्याच्या सभेस जाऊं नये असा त्यांत इशारा होता, तें पत्र केसरीकारांनीं ती बैठक आटोपल्यानंतर प्रसिद्ध केलें.

## रा. केळकरांची डॉ. केतकरांस भीति

( १२ ) डॉ. केतकर हे कौन्सिलसाठीं पुन्हा उमेदवार का उभे राहिले नाहींत म्हणून केसरीकार पृच्छा करतात ही पृच्छा प्रस्तुत वादांत अनवश्यक आहे तथापि प्रश्न उपस्थित झाला म्हणजे त्याचें स्पष्टीकरण केलें पाहिजे तें हें कीं, डॉ. केतकर यास असें आढळून आलें कीं, ज्ञानकोशाच्या कामामध्यें

दुसरें कोणतेंहि काम हातीं घेतलें तरी अंतराय उत्पन्न होणार आणि दोन कामें एकाच वेळेत करतां येणार नाहींत ही गोष्ट पहिल्या प्रसंगींच लक्षात आली. केवळ केळकरांच्या भीतीमुळें जर डॉ केतकरांस उभें रहावयाचें नसतें तर जेव्हां केळकरांनीं अस्वस्थतेमुळें उमेदवारी सोडून दिली तेव्हा, आतां संधि बरी आहे म्हणून डॉ. केतकर यांस कै. गुप्ते यांच्याविरुद्ध उभें राहतां आलें नसतें काय ?

## उत्तर देऊ नका असे सांगून उत्तर आलें नाही म्हणून ओरड

( १३ ) केसरीकारांनीं रा पावगीस व रा. केळकरास उत्तर का दिलें नाहीं म्हणून पृच्छा केली आहे पण त्याचा दोष आमच्याकडे नसून केसरीकाराकडेच आहे. त्यानीं ( १ ) विरुद्ध लेख अपूर्ण ठेविले, ( २ ) त्या लेखांत पुरावा उत्तर भागात येणार म्हणून आश्वासन होतें. ( ३ ) लेखाक पुष्कळ उशीरा छापले ( ४ ) लेख अपूर्ण ठेवणार हें कळविलें नाहीं, ( ५ ) लेख पुरा झाल्यानंतर उत्तर देऊं अशा अर्थाचें आमचें पत्र छापलें नाहीं ( तें पत्र पुढें विद्यासेवकात व ज्ञानप्रकाशांत छापावें लागलें ) ( ६ ) व आमच्या टीकेवर ज्ञानकोशकार तुच्छ समजून उत्तर देत नाहींत असा आरोप ज्ञानकोशकारावर केला ( ७ ) व इतर सर्व आरोप अमान्य करून आपण प्रतिकूल टीका आपल्या पत्रांत येऊं दिली हा स्वतःचा आरोप उत्पन्न करून त्याचें समर्थन करतात, व त्या प्रतिकूल टीकेमुळें ज्ञानकोशकार चिडले आहेत असें दाखविण्याचा प्रयत्न करतात

## ज्ञानकोशांतील दोषांसबंधाने संपादकीय वृत्ति

येथें एवढें सांगितलें पाहिजे कीं, विरुद्ध टीका प्रसिद्ध करणें ही आमच्यावर कृपाच आहे असें आम्हीं अनेक कारणांमुळें समजतो. ज्ञानकोश हा निर्दोष ग्रंथ असें ज्ञानकोशकार कधींहि म्हणणार नाहींत ज्ञानकोशातील दोषांची जाणीव इतर लोकांपेक्षां खुद्द ज्ञानकोशकारासच अधिक असणार आणि ज्या ग्रंथास अनेक व्यक्तींचा हात लागतो त्या ग्रंथातील मताविषयीं स्वाभाविकपणें वैयक्तिक अभिमान कमी होत जातो विरुद्ध टीका जरी कोणी केली तरी तिचें आम्हीं मोठ्या आनंदानें स्वागत करतों. व अशा करिताच विद्यासेवकाची योजना झाली केसरीकारांनीं ज्ञानकोशकाराच्या ठायीं गर्वाच जो आरोप केला आहे तो कांहीं अंशीं खरा आहे त्या गर्वामुळेंच असें वाटतें कीं, ज्ञानकोश संपूर्ण तयार करणें हेंच काम इतकें मोठें आहे कीं, त्यात दिसून येणाऱ्या कांहीं दोषांमुळें त्याचें महत्त्व फारसें कमी होणार नाहीं, आणि त्यामुळें विरुद्ध टीकाकारानें एखाद्या विधानांत वस्तुदोष दाखविला तर तो स्वीकारून त्याप्रमाणें त्याची नोंद करण्यास बिलकूल दिक्कत वाटत नाहीं आम्हीं असें समजूं कीं आमचेंच काम त्यानें केलें. या दृष्टीनेंच विद्यासेवकात ज्ञानकोशांतील विधानाविरुद्ध व मताविरुद्ध लेख घेण्यात आले आहेत.

## पावगी व काव्यपरीक्षक केळकर.

( १४ ) रा पावगी व केळकर यांच्या लेखांस एकाच परिच्छेदांत उत्तर देऊन टाकतों. पावगींनीं ज्ञानकोशांतील एकहि विधान पद्धतशीर

खोडून काढलें नाहीं. कोणत्या विधानांनी त्यांच्या मनाला दुःख झालें हें त्यांनीं कळविलें आहे. व आमच्या कांहीं आधारासहित दिलेल्या विधानांना निराधार म्हटलें आहे. तसेंच रा केळकर यांच्या लेखांत त्यांनीं मराठी विशिष्ट कवींची स्तुति करणें आणि एकंदर मराठी काव्यास तें नष्ट झालें तरी हरकत नाहीं ही विसंगतता दाखवून हा लेख दोन परस्परांविरुद्ध चालणाऱ्या लेखण्यांनीं लिहिला असें ध्वनित केलें आहे खरोखरच त्यांत विरुद्धता कांहींच नाहीं मराठी काव्याचें दोन दृष्टींनीं परीक्षण केलें आहे. एक दृष्टि म्हटली म्हणजे विशिष्ट कवीचा किंवा कृतीचा गुणदोष पहाण्याचा आणि दुसरी दृष्टि म्हटली म्हणजे एकंदर जागतिक काव्यवाङ्मयात मराठी काव्यवाङ्मयाचें महत्त्व मोजण्याची पहिल्या दृष्टीनें मोरोपंत आणि मुक्तेश्वर हे रसाळ कवी म्हणून त्यांची पाठ थोपटावी लागेल व जागतिक वाङ्मयांत स्थान या दृष्टीनं त्यांची किंमत कांहींच नाहीं म्हणून सांगावें लागेल. उदाहरणार्थ, वाल्मिकी रामायणाची किंवा होमरची किंवा शहानाम्याची किंवा अनेक तामिळ चरित्र-काव्यग्रंथांची गोष्ट तशी नाहीं ते ग्रंथ नष्ट झाले तर जगाचें मोठें नुकसान आहे. त्या पात्रतेस आज मराठी काव्यवाङ्मय दुर्दैवानें पात्र झालें नाहीं. याबद्दल एकंदर जगांतील वाङ्मयाचें विहंगमावलोकन करण्याचा प्रसंग ज्यावर येणार त्यास महाराष्ट्राच्या त्या कमीपणाबद्दल वाईटच वाटणार; अर्थात हा कमीपणा जितका स्पष्टपणें नजरेस येईल तितकें चांगलें या हेतूनें रा. दत्तोपंत केळकरांनीं अवतरण केलेली स्पष्ट भाषा वापरली आहे. केसरीकार म्हणतात त्याप्रमाणें ' मराठी वाङ्मयास आग लावा ' असें म्हटलें नाहीं. का कीं आपणास वाङ्मयाकडे केवळ जगाच्या दृष्टीनें पहावयाचें असतें ! ' जाळा ' असें म्हटलें नसून केवळ " जळालें तर जगाचें नुकसान नाहीं " असें म्हटलें आहे.

## केळकरांविषयीं व्यक्तिविषयक भावना.

डॉ. केतकर यास रा. केळकर यांच्याविषयीं केसरीकारास पत्ता लागलेल्या "क्षुद्र" ,"व्यक्तिविषयक भावना" असण्याचें कारणच नाहीं. रा. केळकर व डॉ. केतकर हे निरनिराळ्या धंद्यांतले लोक आहेत. आणि केळकर हे राजकारणांत आहेत. डॉ. केतकर आज तरी राजकारणांत नाहींत. आमच्यावर मेहरबानी कमी केली अशा अर्थाचा आरोप, ज्या मनुष्याविषयीं " क्षुद्र " " व्यक्तिविषयक भावना " आहेत, अशा मनुष्याविरुद्ध कोण करणार.

## जनतेपुढें तक्रार करण्याचा हक्क.

ज्ञानकोशानें जनतेची सेवा बरोबर केली नाहीं तर तक्रार करण्याचा जसा रा. केळकरास हक्क आहे तसाच जनतेची किंवा जनतेंत उत्पन्न झालेल्या संस्थांची केसरीनें सेवा चांगली केली नाहीं म्हणून तक्रार करण्याचा हक्क ज्ञानकोशकारासहि आहे. ज्ञानकोशकारांनीं डॉ. केतकर व रा केळकर हे एकमेकांविरुद्ध उमेदवार होते त्यावेळेपासून केसरीच्या वृत्तींत बदल झाला काय, असा संशय जो व्यक्त केला तो बडोद्याचें उदाहरण, भाग प्रसिद्ध झाल्यानंतर व केसरीकडे अभिप्रायाला भाग गेल्यानंतर पोंच लवकर द्यावयाची नाहीं, अभिप्राय आला तर उशीरा व आमच्याकडून आग्रहाचीं पत्रें गेल्यानंतर बऱ्याच काळानें आला, या गोष्टी केसरीकारास खोडून काढतां येणार

नाहींत. फार तर केसरीकार उशीराचें किंवा बडोद्याच्या प्रकरणाचें स्पष्टीकरण निराळें देऊं शकतील बडोद्यास ज्ञानकोशाची उपेक्षा झाली याचें कारण रा. दाते यांची मंडळींशीं व्यक्तिशः ओळख नव्हती इत्यादि गोष्टी त्यास कारण झाल्या असतील व त्यांत रा. केळकरांचा संबंध मुळींच नव्हता यासारखी गोष्ट रा. केळकरासारख्या सभ्य गृहस्थानें प्रतिज्ञापूर्वक, किंवा त्याच्या तर्फेनें केसरीकारानीं सांगितली तर तें स्पष्टीकरण स्वीकारण्यास आमची हरकत नाहीं.

## मुंबई सरकारची वर्तणूक केसरीकारांस कळविली नाही.

ज्ञानकोशास मुंबई सरकारनें गिऱ्हाईक होण्याचें दोनदा नाकारलें. एकदा डॉ. परांजप्याच्या व दुसऱ्यादा ना. जाधव यांच्या दिवाणगिरींत या गोष्टी घडल्या आणि त्या दोन्ही प्रसंगीं आम्हांस उत्तर आलें त्यावेळीं वार्षिक रिपोर्ट तयार होत होता तेव्हां त्यांतच त्याचा उल्लेख करून व असहकारितेविरुद्ध आक्षेप घेणाऱ्या व राष्ट्रीय वाङ्मयाविषयीं होणाऱ्या प्रयत्नाशीं असहकारिता करणाऱ्या मुंबई सरकारविषयीं आम्हांस काय वाटलें हें सांगितलें होतें आणि त्या रिपोर्टाची प्रत महाराष्ट्रांतील प्रमुख वर्तमानपत्राकडे पाठविला होती कांहीं पत्रानीं व मासिकांनी तींतून मोठाले उतारेहि प्रसिद्ध केले होते यावेळेस 'केसरी' सरकाराचा समाचार घेईल अशी आमची अपेक्षा होती, ती पुरी झाली नाहीं. केसरीकाराविषयीं न्यायबुद्धि ठेवून हेंहि सांगितलें पाहिजे कीं, यांविषयीं केवळ केसरीकारानींच उदासीनता दाखविली असें नाहीं तर महाराष्ट्रांतील अनेक प्रमुख पत्रांनींहि दाखविली

मुंबई सरकारच्या दुसऱ्या नकाराच्या प्रसंगीं ज्ञानकोशविषयक प्रश्न कौन्सिलमध्यें रा. जयकर व रा. बोले यांच्याकडून विचारविले होते व विद्यासेवकांतहि त्यासंबंधीं मजकूर प्रसिद्ध केला होता प्रस्तुत वादाचें व त्याच्या इच्छित शेवटाचें स्वरूपच जरासें विलक्षण आहे. झालेल्या बऱ्याच गोष्टी दोघांसहि मंजूर आहेत. स्पष्टीकरणासंबंधानें मात्र फरक आहे.

## आमचें म्हणणे खोटें ठरो हीच इच्छा.

ज्ञानकोशासविरोधक किंवा उपेक्षादर्शक कांहीं क्रिया झाल्या त्या कांहीं केसरीच्या अनिष्ट प्रवृत्तीच्या दर्शक होत्या काय ? किंवा त्यांत कांहीं विरोध भावना होती काय ? याचा निर्णय व्हावयाचा आहे आणि त्यात आम्हीं एक बाजू मांडली आहे आणि त्या बाजूवर आक्षेप केसरीकारांनीं मांडले आहेत. वरील प्रश्नांतील सत्य जर आमच्या मांडणीच्या विरुद्ध असलें, म्हणजे केसरीकाराची वृत्ति दूषित नव्हती, आम्हींच आपली चुकीची कल्पना करून घेतली हेंच सत्य असलें तर तो आमच्या इष्ट कार्याचा मोठा विजय होय. आमचें म्हणणें जर खरें असलें कीं, केसरीकार दूषितदृष्टि होऊन आमच्याशीं वागत आहेत, तर ती मोठी आपत्तीची गोष्ट होय.

## आमचा धंदा

'आम्हांस आतां केसरीसारख्या उपयुक्त प्रसिद्धिसाधनाची मदत नको आहे' असें जें केसरीकारानीं स्वतःस भासवून इतरांस भासविण्याचा प्रयत्न

केला आहे तो चुकीचा आहे. आम्ही धंदा करण्यास बसलों आहोंत, प्रसिद्धि-साधनाशीं वैर करण्यासाठीं नव्हे. केसरी, लोकमान्य, ज्ञानप्रकाश, महाराष्ट्र, नवाकाळ, मनोरंजन, किर्लोस्करखबर इत्यादि जीं अनेक प्रसिद्धिसाधनें महाराष्ट्रांत आहेत त्या सर्वांचाच आम्हांस उपयोग आहे आणि या सर्वांमार्फत आम्हांस जनतेशीं पोंचावयाचें असतें जेव्हां जनतेपर्यंत पोंचण्यास विशिष्ट पत्राच्या मालकाची, किंवा चालकाची वृत्ति अनिष्ट होईल तेव्हां ती दूर करणें आणि त्यानीं स्वतः दूर केली नाहीं तर वर्तमानपत्रकार, मासिककार किंवा प्रकाशक यांचे आश्रयदाते जी जनता, तिजकडे तक्रार नेणें या गोष्टी स्वाभाविकपणें करणें भाग पडतें. केसरीकार म्हणतात कीं, ज्ञानकोशकारानीं आमच्याकडे अभिप्रायासाठीं ज्ञानकोशाचे भाग किंवा जाहिरात देखील वाटल्यास पाठवूं नये. इतका त्रागा का बरें ? वर्तमानपत्राच्या धंद्यात आज इतकीं वर्षे काढून विरुद्ध टीकेसंबंधानें इतकी नाजुक प्रकृति का असावी ? आम्ही ज्या पत्राविरुद्ध कारणपरत्वें लिहूं त्या पत्रात देखील जाहिरात देऊं आणि आमचे विरुद्ध जे कोणी एखादें पुस्तक लिहितील त्या पुस्तकाचीहि जाहिरात आमच्या पत्रात छापूं, आणि केसरीच्या विद्वान संपादकानीं तीच वृत्ति आपल्याहि व्यवहारात ठेवावी अशी आमची त्यास प्रेमाची शिफारस आहे.

## पुरवणी—केसरीकाराकडे न पाठविलेली

### ज्ञानकोश श्रेयाच्या वाटेकरीपणाचा केसरीकारांनी सांगितलेला हक्क.

ज्ञानकोशाच्या प्रसाराचें श्रेय केसरीकार केसरीनें ज्ञानकोशाच्या घेतलेल्या परामर्शाला देतात ( केसरी २३ । ६ । २५, पृष्ठ ७, रकाना ५, ओळी ५–७ ), हें पाहून आम्हांस अत्यंत आनंद होतो ज्ञानकोशाच्या श्रेयाचे वांटेकरी आम्हीं आहोंत म्हणून अहमहमिका जितकी सुरू होते तितकी ती ज्ञानकोशाचें महत्त्व वाढविते. मागें नागपुरास तर काहीं मंडळींनीं ज्ञानकोशाचें श्रेय स्वतःस घेऊन कौन्सिलासाठीं व युनव्हर्सिटीच्या कोर्टासाठीं उमेदवारी करण्यासाठीं ज्या पत्रिका प्रसिद्ध केल्या त्यातहि नमूद केलें होतें. आम्ही तर ज्ञानकोशाच्या प्रसिद्धिचें श्रेय महाराष्ट्रांतील सुशिक्षित जनतेच्या अंतःकरण-पूर्वक सहकार्यास देतों. व त्यातील काहीं श्रेय केसरी, लोकमान्य, मनोरंजन इत्यादि पत्रकारांस आनंदानें देतों; तथापि 'आमच्या पशानें ज्ञानकोश चालला आहे ' अशी समजूत केसरीकार पसरवूं पहातात तिचा निषेध करतों. तसली समजूत उपस्थित करतानां केसरीकार तत्त्ववेत्तेहि बनतात. केसरीकार एक मोठा तात्त्विक प्रश्न म्हणून उपस्थित करीत आहेत. त्याच्या मतें डॉ. केतकर आपलीं मतें लोकाच्या खर्चानें प्रसिद्ध करीत आहेत. मग लोकानीं तरी का गप्प बसावें म्हणून आत्मकृत्यसमर्थनाची पृच्छा करीत आहेत. त्यात जर तें असें गर्भित करीत असतील कीं केसरीकाराच्या पैशावर ज्ञानकोश चालला आहे म्हणून केसरीकारास त्यावर टीका करण्यास अखत्यार आहे, तर हें स्पष्ट केलें पाहिजे कीं केसरीकार ज्ञानकोशाचे शेअरहोल्डर किंवा वर्गणीदार नाहींत. तथापि त्यास टीका करण्याचा हक्क ज्या कारणामुळे येतो म्हणून ते सांगतात तें जरी खोटें असलें तरी केसरीकाराचा किंवा कोणत्याहि लेखकाचा टीक

करण्याचा हक्क आम्ही मुळीच अमान्य करीत नाहीं. या सार्वजनिक कार्याकडे ते जितकें लक्ष अधिक देतील तितकें चांगलेंच आहे.

डॉ. केतकर लोकांच्या पैशानें आपलीं मतें पसरवितात या आक्षेपासंबंधीं आम्हीं सध्यां एवढेंच सांगतों कीं, या विषयाचें तात्त्विक दृष्टीनें अधिक विवेचन अवश्य आहे व तें उपदेशपर व मनोरंजक होईल हा संपादकीय नीतिशास्त्राचा भाग आहे या विषयासंबधानें केसरीकारांसारख्या सुशिक्षित पत्रकारानें आणखी तात्त्विक विवेचन करावें. तें वाटल्यास कायद्याच्या दृष्टीनें करावें किंवा युरोपातील व अमेरिकेंतील चालू पद्धतीच्या दृष्टीनें करावें किंवा युरोपातील व अमेरिकेंतील चालू पद्धतीच्या दृष्टीनें करावें यासंबधाचा नीतिशास्त्रविषयक लेख आमच्याकडे जरी पाठविला तरी मोठ्या आनंदानें छापूं

डॉ. केतकर यांस मुद्दाम, बढाईखोर, कृतघ्न ठरविण्यासाठीं केसरीकारानीं काल्पनिक पत्र उपस्थित केलीं आहेत. पण असें करताना केळकरांविरुद्ध पुरावा तयार केला आहे तसेंच ज्ञानकोशसाहाय्याचे श्रेय टिळकांकडून काढून तें केळकरांस देताना कै. लोकमान्याना ते जिवंत असताहि केळकर त्याच्याशीं वरचढपणानें वागत, अशी केळकर व लोकमान्य यातील परस्परसंबंधाची विनाकारण मांडणी केली आहे केसरीकार म्हणतात 'अर्थात ते लेख ( ज्ञानकोशविषयक) तरी टिळकाच्या " भिडे " मुळें घातलेले नाहीत. पुढें केसरीकार आणखी सागतात " ती माहिती ( ज्ञानकोशाचें काम काय चालू आहे ही ) देण्याला डॉ केतकर याना भरपूर वाव " टिळक असताना त्याच्या आग्रहाशिवाय व ते नसताना संपादकाच्या सहानुभूतीनें दिला गेला " इत्यादि.

यावरून केसरीकार काय सागू इच्छितात हें दिसतेंच आहे. विशिष्ट गोष्ट केसरींत येऊं द्यावयाची असें टिळकाच्या मनात असलें म्हणजे लोकमान्यांस हुकूम करून चालत नव्हते तर त्याना आपली " भीड " खर्च करावी लागत होती, व 'आग्रह' करावा लागत होता केसरी ऑफिसातील नोकरशाहीच्या उद्दामपणाबद्दल व स्वामिद्रोहाबद्दल यापेक्षा अधिक प्रमाण काय पाहिजे? ही लोकमान्याच्या दौर्बल्याविषयीं आणि स्वत:च्या वरचढपणाविषयीं केलेलीं विधानें खरी असतील काय? असो, केसरीकारास एवढा अहेर पुरा आहेसें वाटते.

---

# ज्ञानकोश आणि ज्ञातिविषयक लेख

## देवरुखेप्रकरण

ज्ञानकोशा मध्यें जे लेख प्रसिद्ध झाले त्यामुळें अनेक ज्ञातींचें मन दुखावलें गेलें हें सांगितलेंच आहे. अशा ज्ञातींत देवरुखे येतात तर त्याच्याप्रकरणाकडे प्रथम लक्ष देतों.

ज्ञानकोशाची वृत्ति चित्पावनांखेरीज इतर जातींचें उणें बाहेर काढावें अशा तऱ्हेची आहे असें सांगण्याचा कांहीं पत्रकार प्रयत्न करीत आहेत, आणि आपल्या विधानाच्या समर्थनार्थ जेव्हां एखादी जात ज्ञानकोशातील लेखाविरुद्ध आपली नापसंति व्यक्त करिते तेव्हां त्या गोष्टीस प्राधान्य देऊन जातिविषयक वैमनस्यें वाढविण्याचा प्रयत्न ज्ञानकोशकारांनीं केला अशा तऱ्हेची समजूत करून देत आहेत. कांही सभावित पत्रें जेव्हां निजामानें ज्ञानकोशास आपल्या राज्यात बदी केली तेव्हां त्याच्याविरुद्ध लिहीत तर नाहीतच पण त्या बदीची बातमीहि आपल्या पत्रांत देत नाहीत; पण जेव्हां एखादी जात आम्हांला क्षत्रिय म्हटलें नाही किंवा आमच्या श्री रामचद्र किंवा श्रीकृष्ण याशी वांशिक सबध ज्ञानकोशकार कबूल करीत नाहीत म्हणून निषेध करीत असेल तेव्हा त्याच्या निषेधाची बातमी आपल्या पत्रांत अर्धीमुर्धी देऊन ज्ञानकोशकारावर दुरभिमानाचा आक्षेप उत्पन्न व्हावा असा प्रयत्न करीत आहेत. या तऱ्हेचे आक्षेप कसे निरर्थक आहेत हें पुढील लेखात दाखविण्याचा इरादा आहे.

ज्ञानकोशामुळें जातिविषयक वाङ्मय बरेंच उत्पन्न झालें. व अनेक जातींस एक तऱ्हेची शिस्त लागली. उदा. ज्या जातींना पचायती होत्या व ज्यांत पंचायतींचे निवाडे लिहून ठेवण्याची चाल नव्हती त्या जातीत पचायतींचे निवाडे लिहून ठेवण्याची चाल सुरू झाली, असें अनेक जातींकडून आम्हास कळलें आहे. आम्ही विचारलेल्या प्रश्नामध्यें पचायतीचे निवाडे लिहून ठेवण्याची चाल तुमच्यात आहे काय असा प्रश्न करीत होतों. त्या प्रश्नामुळें जेव्हा जातीची ज्ञानकोशास माहिती पुरविण्यास सभा भरे तेव्हां निवाडे लिहून ठेवावेत असें काही मंडळीकडून मांडण्यांत येई. व एका जातीत तर यामुळें निश्चयात्मक सुधारणाहि झाली. ज्या जातीमध्यें व्यभिचाराच्या दडाबद्दल खटले पचायतीपुढें येत त्या जातीमध्यें जेव्हां निवाडे लिहून ठेवण्याची पद्धत सुरू झाली तेव्हा तसले खटले येऊ नयेत किंवा त्यावरील निकाल कागदावर लिहिले जाऊं नयेत म्हणून खटपट सुरू झाली. व जी मडळी पूर्वीं असल्या तऱ्हेचा आरोप निमूटपणें सहन करीत तीच मडळी असें लिहून ठेवाल तर खटला करीन असा धाक देऊं लागली. त्यामुळें असले खटलेहि न घेण्याकडे प्रवृत्ति झाली. व कित्येक वेळ असें झालें की बारीक सारीक गोष्टीबद्दल दंड करण्याची प्रवृत्ति कांही जातीत होती त्या प्रवृत्तीसहि आळा बसला. जोंपर्यंत लिहिलें जात नव्हतें तोंपर्यंत मडळी क्षुद्र आरोप करीत व त्याबद्दल दडहि वसूल करीत. तथापि जेव्हां निवाडे लिहिण्याची प्रवृत्ति झाली तेव्हां आपल्या पचायतीत आपण इतक्या क्षुद्र गोष्टींची चर्चा करतों असें कागदावर पडणें पचांसच आवडेनासें झालें. व पचायतीचा उपयोग फक्त जातीचें शिक्षण वाढविण्याकडे करावा अशा तऱ्हेचें त्या जातींत लोकमत बनूं लागलें. असो.

ज्ञानकोशाच्या चौकशीमुळें प्रत्येक ज्ञातीत खळबळ उडालेली आहे आणि प्रत्येक जात आपल्या अंत:स्थितीकडे अधिक पाहूं लागली हा आमच्या दृष्टीनें

तका मोठा फायदा झाला आहे की त्या फायद्यामुळे संपादकास मोठें समाधान टतें. आणि आपण आपल्या लिहिण्यामुळे किंवा आपल्या चुकांनी जरी एखाद्य तीच्या सदस्यास दुखविलें असेल तरी आपण त्या जातीची कांही तरी सेवाच ली अशी भावना होऊन एक तऱ्हेचा आनंदच वाटत आहे.

आतां अनेक जातींच्या विषयीं जो मजकूर आला तो जातिमत्सरासारख्या वनामी प्रेरित होऊन आला की त्या जातीच्या कल्याणाच्या दृष्टीनें आला या षयीं विचार करण्याकरितां साहित्य पुरविण्याचें काम आम्ही करणार आहों. विषयीं निर्णय वाचकांवरच सोंपवितो. आणि आमच्याकडे साहित्य कसें जम गलें आणि त्यांतून आम्ही काय घेतलें एवढेंच मांडतो.

प्रथम येथें एवढें सांगितलें पाहिजे कीं प्रत्येक जातीस आपली हकीकत म्हास कळविण्यास आम्ही जाहीर रीतीनें केसरीपत्रांतून आमंत्रण केलें होतें. व हिती पाठविण्यासाठीं तेवीस सूचक प्रश्नहि लिहिले होते. शिवाय त्या पत्राचें हा मुद्रण करून अनेक जातींच्या संस्थांकडे ते पाठविले होते. आणि त्या ांच्या सहाय्यानें आमच्या आफिसांत गॅझेटियर, एथ्नालॉजिकल सर्व्हे, सेन्सस पोर्ट इत्यादि साधनांतून जमविलेली माहिती दुरुस्त करण्यांत येत असे. सर्वच ती आपल्या संबंधानें जे जे पाठवीत तें तें ग्रहण करण्याचा आमचा इरादा हता. कां कीं, पुष्कळशा जाती आपलीच माहिती न देतां आपल्या हकीकतींत जारच्या जातीवरहि शिंतोडे टाकीत असत. आणि आपल्या जातीची तारीफ मार करीत. व इतिहास लिहितांना वाटेल त्याशीं संबंध जुळवून देत. ज्यांनीं जें ठविलें तें सर्व ग्रहण करणें म्हणजे संपादकांनीं आपली कांहींच बुद्धि न चालविणें य. उदा. माळी जातीची माहिती पाठवितांना त्या जातीच्या एका सद्गृहस्थानीं क बाड लिहून आमच्याकडे पाठविलें. त्यांत कृष्ण हा जातीचा माळीच होता, कीं, त्यास वनमाली म्हणत, सूर्य हाहि माळीच होता, कां कीं, त्यास अंशु- ली म्हणत इत्यादि विधानें होतीं. सुतार, सोनार इत्यादि जातींचा विश्वकर्म्याशीं डलेला संबंध सांगणारीं आणि त्या आधारावर आम्ही ब्राम्हण आहोंत म्हणून गणारीं पत्रें अनेक होतीं. आमचा भोजन व्यवहार फक्त ब्राम्हणाबरोबर होता तेंहि अनेक जाती लिहीत असत. अशा तऱ्हेच्या आलल्या माहितीवर संशयात्मक ेप देणें भागच पडे. ज्ञानकोश न वाचतां ज्ञानकोशमंडळ हीं एक चित्पावनांची ठी आहे आणि ती इतर जातींची निंदा करीत असते व सारस्वतांची निंदा शेष केली आहे व त्यांचें ब्राह्मण्य नाकारलें आहे असें सांगत सुटणारे एक गिर- वांत खटपटे सारस्वत बॅरिस्टर आहेत. वर्तमानपत्रांत असलीं विधानें न करतां जगी तऱ्हेनें असल्या विधानांचा प्रसार करणें ही गोष्ट अत्यंत भ्याडपणाची हे असें आम्ही त्या सारस्वत बॅरिस्टरास सुचवितों. लोकांस एवढेंच सांगाव- चें आहे कीं सारस्वतांच्या ब्राह्मण्याबद्दल संशय घेणारा ज्ञानकोशांत मजकूर मुळींच लेला नाहीं. त्यास न आवडणारा दुसरा कांहीं मजकूर आला आहे असें मात्र

दिसते. त्या शिवाय महाराष्ट्रसारस्वत इतके क्षुब्ध झाले नसते. तो मजकूर ' कुडाळदेशकर ब्राह्मण ' या लेखात आहे. पण त्यात बरेच ऐतिहासिक प्रश्न आहेत. त्या प्रश्नाचा खल करण्याचें काम इतिहासज्ञाचें आहे त्यावरून सारस्वत ज्ञातीच्या विरुद्ध संपादकाची वृत्ति होती असे कोणासहि म्हणता यावयाचे नाही.

देवरुखे मंडळीचें ज्ञानकोशाविरुद्ध जें मत झालें ते विशेषें करून कोंकण देशस्थाविषयी ज्ञानकोशात मजकूर दिला नाही त्यामुळे झालें आहे. आम्ही त्यास महाराष्ट्रीय ब्राम्हणातून वगळतों असा त्याचा एवढ्याच कारणावरून समज होऊन त्या समजाने संताप उत्पन्न झाला. आणि तसा समज होण्यास आम्ही कारण झालों याच्याबद्दल आम्हास अत्यंत खेद होतो. देवरुखे मंडळीस आम्ही एवढेच सांगू इच्छितो 'की आम्ही देवरुखे महाराष्ट्रीय ब्राह्मण नाही' असा जर त्यांनी ठराव केला तर आम्हासच त्यांच्या बद्दल फार संताप येईल, इतके आम्ही त्यास महाराष्ट्रीय ब्राह्मणातले समजतो.

आम्ही आता देवरुखे ज्ञातीविषयी ज्ञानकोशात काय लिहिलें हे पुढे मांडतो. अशिंत लेखाचे पुन्हा प्रसिद्धीकरण आम्ही करतो तें देवरुखे मंडळीस दुखविण्याकरिता नव्हे. आमच्या मते देवरुखे मंडळीस दुखविण्यासारखें यात काहीएक नाही. तथापि त्या ज्ञातीच्या मंडळीचीं मने दुखवली असे त्यानंतर झालेल्या चळवळीवरून दिसून येते.

जव्हा आपला दुसऱ्याचे मन दुखविण्याचा हेतु नसताना आपल्या कृतीनें इतर मंडळी चिडली असत तव्हा आपल्या कृतीचें परीक्षण पुन्हा करणे इष्ट असते. तथापि आमच्या लेखावरून देवरुखे मंडळीस रागावण्यासारखे काही विशेष आहे काय आणि चित्पावनाखेरीज इतर ज्ञातीची निंदा करण्याचा हेतु त्यात दिसून येत आहे काय याविषयी वाचकास स्वतंत्रपणे निर्णय करता यावा यासाठी म्हणजे प्रतिवादी पक्षकार या नात्यानं वाचकाच्या न्यायासनापुढे तो संबंध लेख आम्ही मांडतो.

**देवरुखे** हे ब्राम्हण मुख्यत्वे कुलाबा व रत्नागिरी जिल्ह्यात ( फुणगुसच्या खाडीच्या दोन्ही काठावर ९० गावात ) आढळतात रत्नागिरी जिल्ह्यात संगमेश्वर तालुक्यातील देवरुख गावावरून ते आपल्यास देवरुखे म्हणवितात. त्यांचे म्हणणें की, आपण मूळचे देशस्थ, परंतु देवरुखभागात रहावयास गेल्यामुळें देवरुखे हें नाव प्राप्त झाले. विल्सन म्हणतो की, अथर्ववेदाच्या देवर्षिशाखेचा हा वर्ग असावा. महाराष्ट्र ब्राह्मणात त्याचा दर्जा कमी लेखला जातो, त्यांच्या पंक्तीस बसल्यास संकट कोसळतात असा समज आहे. त्यामुळें पुष्कळ कऱ्हाडे-देशस्थ-चित्पावनब्राह्मण त्यांच्या पंक्तीस बसत नाहीत. ( से रि. १९११, बॉंबे, भा. २ पृ. २४५ ). यांच्या धार्मिक व सामाजिक चालीरीती देशस्थ ब्राह्मणाहून फारशा निराळ्या नाहीत. यांच्यापैकी पुष्कळजण शेतकरी असून, अगदी थोडे लोक व्यापार व सरकारी नोकरीत शिरले आहेत

शके १६४६ ( स. १७२४ ) मध्यें सोपार ( जिल्हा ठाणे ) येथील ब्राह्मणानी देवरुखे हे पंक्तिपावन ब्राह्मण नाहीत असा निकाल दिला होता ( भा. . म. वा. इति. १८३६ ). सध्या मुंबईतील बहुतेक खाणावळी देवरुख्यांनी चालविल्या आहेत व त्यांत सर्व तऱ्हेचे ब्राह्मण जेवतात; कोकणातहि बहुतेक लोक त्याच्याशी रोटीव्यवहार करतात

वरील निर्णयपत्रात देवरुख्याना देवराष्ट्रीय म्हटलें आहे. स्कन्दपुराणातहि त्यांना देवराष्ट्रीय म्हणून ते देवराष्ट्रातून आलेले व अपांक्त म्हटलें आहे." अन्येपि देवराष्ट्रीया देवराष्ट्रादुपागताः। अपांक्तेया अयाज्याश्च गिरिकाननवासिनः ॥" पद्मपुराणात सुद्धा यांना पंक्तिदूषक देवराष्ट्रब्राह्मण म्हणून संबोधिलें आहे

शके २७२ ( स. ३५० ) च्या अलाहाबादच्या समुद्रगुप्ताच्या शिलालेखात देवराष्ट्र देशाचा उल्लेख आढळतो. दक्षिणापथातील जे जे राजे त्यानें जिंकिले त्या देशाच्या नामावलीत देवराष्ट्राचे नाव आहे तसेच तेथील कुबेर नावाच्या राजाचाहि उल्लेख आहे नागपुर ते म्हैसूरपर्यंतच्या प्रदेशात मध्येच हे देवराष्ट्र होतें. सह्याद्रीच्या किनाऱ्याचा टापू त्या राष्ट्रात मोडत असे

कृष्णानदीच्या काठी कऱ्हाडा( सातारा जिल्हा )जवळ कुंडलच्या पूर्वेस २–३ कोसावर हल्ली देवराष्ट्र नावाचें एक खेडें आहे त्याच्या आसपास प्राचीन अवशेष, लेणीं, देवळें फार आहेत येथें कुबेरेश्वर व समुद्रेश्वर याची देवळेंहि आहेत. हेच पूर्वीच्या देवराष्ट्राच्या राजधानीचें शहर, हें राज्य सातारा ते कोल्हापूर व अरबीसमुद्र ते पंढरपूर या भागावर पसरलें असावे व शके २७२ त तेथें कुबेर राजा होता. त्याच्या आश्रयाने देवराष्ट्र या प्रांतात जे ब्राह्मण रहात असत ते देवराष्ट्र–देवराष्ट्रीय–देवरुखे ब्राह्मण होत असे के राजवाडे म्हणतात.

शातवाहनाचें राज्य ( ३२८ ) नष्ट झाल्यावर त्याचे मांडलिक तगरेश्वर याचाहि ऱ्हास होऊन देवराष्ट्र येथील राजानी महाराष्ट्रात डोके वर उचलल असावे. त्याना पुढे ( ३५० ) समुद्रगुप्तानें मांडलिक केले नंतर ते ४७८ पर्यंत काही काळ मांडलिक बनले असावेत. या २५० वर्षांच्या ( २३०–४८० ) कालात महाराष्ट्रांत अनेक लहानमोठे राजे व राज्ये उदयास आलीं. त्यापैकीच देवराष्ट्राचें एक राज्य होय. हे राज्य ४७८ त चालुक्याच्या अंकित झाले असावे व पुढें थोड्याच कालानें नष्ट झाले असावे. त्यावेळी कुबेर राजाचे आश्रित हे देवराष्ट्रीय ब्राह्मण राजाश्रयाभावी त्या ( देवराष्ट्र ) प्रांतातून निघून संगमेश्वर व फुणगूसच्या आसपास येऊन कायमचे राहिले असाव. हा टापू त्यावेळी चालुक्याच्या अमलापासून दूर होता. यावेळी तेथे दुसरे ( चित्पावन ) ब्राह्मण होतेच. त्यांच्यामध्यें परचक्राच्या भयाने हे देवराष्ट्रीय येऊन गिरिगव्हरात लपून राहिले. या घाटावरील भिन्नाचाराच्या व भिन्न व्यवहाराच्या ब्राह्मणापासून यज्ञयाग करणारे चित्पावन ब्राह्मण अर्थातच अलिप्त राहिले.

देवराष्ट्र याचा अपभ्रंश देवरष्ठ होतो; देवऋषि याचा अपभ्रंश देवरुखे किंवा देवरखे. संगमेश्वराजवळ देवरुखे हें एक गावहि आहे. सारांश ही जात प्रादेशिक आहे, याशिवाय इतर महाराष्ट्रीय ब्राह्मण व यांच्यांत विशेष फरक नाही.

हे स्वतःस देवर्षिब्राह्मण म्हणवून पंचद्राविडान्तर्गत महाराष्ट्र ब्राह्मण असल्याचें सांगतात. मुंबई इलाख्यांत यांची लो. सं. सुमार ५ हजार असून याशिवाय माळवा, ग्वाल्हेर, कर्नाटक इकडे २ हजारांपर्यंत लोक आहेत. ठाणे जिल्ह्यांत उंबरगाव पेठ्यांतहि यांची वस्ती बरीच आहे

कुलाबा जिल्ह्यांत दहिवली येथील विठ्ठलदेवाचें एक संस्थान या जातीच्या पंचायतीच्या मालकीचें आहे. गरीब विद्यार्थ्यांकरितां अलीकडे यांनी कांही फंड काढले आहेत पूर्वी यांच्यांत पंचायती होत्या, सांप्रत नाहींत. यांच्यांत पोटजाती नाहींत, हे आपणांस ऋग्वेदीय देशस्थांची पोटजात म्हणवितात आणि देशस्थांशीं आपला लग्नव्यवहार २५० वर्षांपासून असल्याचें सांगतात. यांचा धर्मविधी देवरुखे भिक्षुकाकरवीच बहुशः होतो. हे अपांक्त नाहींत याबद्दल निरनिराळ्या ठिकाणच्या धर्मसभेचीं व अधिकाऱ्यांचीं आज्ञापत्रें ( नकला ) पाहण्यांत येतात.

शतप्रश्नकल्पलता या पुस्तकांत ( अ. १, प्र ९ ) यांच्या उत्पत्तीबद्दल एक दंतकथा आहे तीच सर्वत्र आढळते. यांचें म्हणणें कीं, कोल्हापूरप्रांतांतून शृगाल राजाच्या (१) छळामुळें आम्ही कोंकणांत गेलों पुढें परशुराम कोंकणांत आल्यानंतर त्याच्या वडिलांच्या श्राद्धास या ब्राह्मणांना क्षण दिला असतां हे गेले नाहींत म्हणून मग त्यानें चित्पावनांना निर्माण केलें व देवर्षि ब्राह्मणांना शाप दिला.

यांचीं व देशस्थांचीं गोत्रें ( बरींचशीं ) एकच आहेत. तसेंच दोघांच्या कुलस्वामींमध्येंहि बरेंच साम्य आहे ऋग्वेदी आश्वलायन व यजुर्वेदी तैत्तिरीय शाखान्तर्गत हिरण्यकेशी अशा दोन शाखा यांच्यामध्यें आहेत. तुळजापूर व कोल्हापूर येथील देवी, जेजुरीचा खंडोबा हे यांचे मुख्य देव आहेत.

यांचीं कांहीं आडनांवें.—कोंडे, कानडे, काम्बळकर, कोबजे ( कागजे ) कारकर, कवटेकर, कुळकर्णी, खटावकर, खरवतकर, आरेकर, आंबेडकर, चाफेकर, ( दोन गोत्रांचे ), चांदे, जुवेकर, जकाते, जोशी, ढापरे, डांगे, ताले, टाकसाळे, तेरे, तेरेदेसाई, डबळकर, गाधळेकर, चौगुले, निमकर, नवरंगे, निबंधे, धनुर्धर, पेडवळे, पिंपुटकर, बोमे, ( भोमे ), भोळे, भडसावळे, वाढे, बाठे पागारकर, मांगरे, देवळे, महाजन, मराठे, मादुसकर, मुठ्ठल, मुळे, मुसळे, रोडे, शितूत, साले, सावले. याशिवाय कर्नाटक, प्रांतांत, गेलेल्या, लोकांचीं आडनांवें:—थळहट्टी, बनहट्टी, कलघटगे, वगैरे.

के विष्णु परशुराम पंडित यांनीं 'पंचद्राविडान्तर्गत महाराष्ट्र ब्राह्मणांतील देवरुख्यांविषयीं शास्त्रसंमतविचार' नामक एक पुस्तक लिहिलें आहे (१८७४) त्यांत देवरुख्यांना देशस्थ म्हटलें आहे.

मुसुलमानी अमलांत कुळकर्ण, देसाईपण, करोडगिरी वगैरे अधिकार यांना मिळाल्यानें पुन्हा हे देशावर अहमदनगर, बेळगाव, धारवाडाकडे गेले. मराठी

राज्यात हे जकाते, कारकून झाल्यानें गुजराथ, माळवा, सातारा, पुणें या भागात पसरले, महादजी शिंद्याच्या लष्करात अमझारवाले जहागीरदार होते. नागो देवचक्के हाहि एक पयस्थ त्यात होता. [ सेन्सस रिपोर्ट १९११ मुंबई, भा.इ.स. अहवाल शक १८३८, रत्नागिरी ग्याझे, सोलापूर ग्याझे, भांडारकर–हिस्टरी ऑफ दि डेक्कन, विल्सन–इंडियन कास्ट्स; हरिवंश;सह्याद्रीखंड; रा.भि. मो.मादुमकर यांची माहिती.]

या लेखावर आक्षेप काय उत्पन्न झाले ते आतां देऊं.

ज्ञानकोशातील पर्वाच्या अंकात दिलेला लेख बऱ्याच जणांना स्वयंस्फूर्तीनें आक्षेपार्ह वाटला ही गोष्ट खरी आहे अशी आमची खात्री झाली आहे. रा. तेंडेसाई यांनी प्रथमतः या लेखाचे पुनर्मुद्रण करून सुमारें २५० मंडळीकडे तो लेख स्वतःचें मत व्यक्त न करता त्याचे मत मिळविण्यासाठी पाठविला आणि तेव्हापासून चळवळीस प्रारंभ झाला.

या चळवळीचें स्वरूप, त्यावर झालेल्या सभा, कोर्टापुढें ज्ञानकोशकारास खेचण्याची भाषा व त्यानंतर ज्ञानकोशकारानाच आपलें म्हणणें सांगण्यासाठी झालेला प्रयत्न व त्यासाठी " स्पेशल कमिटीची स्थापना " आणि त्या स्थापनेनंतर कमिटीत उत्पन्न झालेलें द्वैत म्हणजे तीमध्यें एकमेकाचे मसुदे एकमेकास पसंत न पडणे व त्यामुळें उत्पन्न झालेल्या दोन परिषदा या सर्व गोष्टी या प्रकरणाची अलीकडील वाढ दाखविनात. साधारण वाचक या चळवळीच्या वृत्ताकडे लक्षपूर्वक पहातच नाही. त्याला असें वाटते की, ज्या अर्थी देवरुख मंडळीत इतकी चळवळ झाली त्या अर्थी ज्ञानकोशकारांनी काही तरी भयंकर लिहिलें असलें पाहिजे.

आम्ही या चळवळीचा साद्यंत इतिहास न देता आमच्यावर काय आक्षेप उत्पन्न झाले तेवढेंच सांगतों.

---

## पिंपुटकरांचे आक्षेप

( चितळेभट्ट प्रकरण या पुस्तकावरून )

## ' द ' अक्षरांतील ज्ञातिलेखांचें परीक्षण

आता ज्ञानकोशाकडे वळू. ज्ञानकोशकारानी 'द' या सदरात ' देवरुखे ' या मथळ्याखाली मोठा मौजेचा असा एक लेख प्रसिद्ध केला आहे. या लेखाच्या पचागतनातील मुख्य देवता अगर केंद्र अगर इंग्रजीत ' बॅकबोन ' किंवा ' न्युक्लीअस ' या शब्दानें जें व्यक्त होतें तें म्हणजे सोपारे गावच्या इसमाच्या एका पत्राची बिन सहीची नक्कल व त्यावर मल्लीनाथी चढवून इतिहाससंशोधक राजवाडे यानी छापलेला लेख होय. पण ज्ञानकोशकारानी त्याच्यापेक्षा और एक मजा केलेली आहे. भिल्ल, कोळी, आफ्रिकेतील किंवा दूर सरहद्दीवर असलेल्या काही विचित्र अशा विशिष्ट जाती यांचें कित्येक ठिकाणी कुतूहलाने वर्णन केलेलें आढळून येते. नुकतेंच काही महिन्यापूर्वी ' मॉडर्न रिव्ह्यु ' नावाच्या एका इंग्रजी मासिक पुस्त-

कांत नागालोकाचे वर्णन आले आहे. त्यात संपादकांनी त्यांचे स्त्रीपुरुष व त्यांनी धारण केलेली हाडांची व शिंगांची आभूषणें यांचे फोटो नावीन्याच्या औत्सुक्यानें दिलेले आहेत, त्याची आठवण होते. ज्ञानकोशकारांनी 'द' या अक्षराखाली हिंदुस्थानचा इतिहास या विभागांत त्यांना देणे शक्य झाली इतकी कांही विशिष्ट जातींची वर्णनें दिली आहेत. त्या जाती ह्या:—दनु, दरद, दरवेशी, दर्जी, दसनामी, दहाईत, दागट, दास, दुबळे, देवांग, देवार, दैवज्ञ. याच जातींच्या मालिकेंत ज्ञानकोशकारांनी 'देवरुखे' याहि जातीचा समावेश करून तिचें वर्णन दिलेलें आहे. इतिहाससंशोधक राजवाडे यांच्या लेखाबरोबरच ज्ञानकोशकारांनी विपरीत भासणाऱ्या आणखी वाईट गोष्टी मिळविल्या आहेत. हा मजकूर एखाद्या चवथी इयत्तेंतल्या मुलानें लिहिला आहे की काय असें वाटूं लागतें. किंवा एखाद्या फाटक्यातुटक्या पाद्र्यानें आमच्या इकडल्या कांही बारक्यासारक्या गोष्टींसंबंधी अमेरिकेंत किंवा इंग्लंडांत वर्णन करून सांगावें तसलाच हा प्रकार आहे की काय असा भास होतो. एवंच ज्ञानकोशकारांनी संशोधकाच्याहि आणखी पुढें दोन पावलें जाऊन देवरुखे समाजाचें स्वरूप चीड व संताप येण्यासारखें विद्रुप व हिडिस करून दाखविलें आहे. आमच्या मतें 'देवरुखे' समाजाचा हा राजरोस अपमान व धडधडीत उपमर्द होय.

आम्ही वर नमूद केलेल्या जातींचे ज्ञानकोशांतील वर्णन या नमुन्याचें आहे. (१) दनु:—ब्रह्मदेश व शानसंस्थानें यामधील प्रदेशांत रहाणारे मिश्र शान ब्रह्मी लोक. हे थोडथोडे बौद्धलोकांसारखेहि आहेत. (२) दरद:—गिलजित भोंवतालच्या प्रदेशांत काश्मीर व हिंदुकूश यामध्यें दरद लोक रहातात, संस्कृत ग्रंथांतून ज्यांना पिशाची लोक म्हटलें आहे त्यांचेच हे वंशज असावेत असें ग्रीयर्सनचे म्हणणें आहे. संस्कृत ग्रंथकार 'दरदाः' असा उल्लेख करितात. आजचे बहुतेक दरद मुसलमान आहेत. मुसलमानी दरदांत कित्येक हिंदु चाली सांपडतात. या लोकांत पुरुष व बायका एका ठिकाणीं जेवावयास बसतात. लग्न जमविण्याचे वेळीं मुलाचा बाप मुलीच्या बापाकडे जाऊन १॥ फूट लांब चाकू, ४ वार कापड आणि एक भोपळा (कमंडलु) भर दारू नजर करतो. मुलीच्या बापानें तिचा स्वीकार केल्यास वाङ्निश्चय झाला असें समजतात. हे प्रेतयात्रेच्या वेळीं प्रेताभोंवतीं बसून द्राक्षें वगैरे खातात आणि मद्य पितात.मरणानंतर तीन दिवसांनी तूपभाकर वाटतात. प्रेत जमिनींत पुरतात. दरदांना गाईचा मोठा तिटकारा आहे. इ० इ० (३) दरवेशी:—हा पर्शियन शब्द असून त्याचा अर्थ भिक्षेकरी आहे. हे मुसलमान व कांहीं ख्रिश्चन जातीचे असून काम न करतां भिक्षावृत्तीवर चरितार्थ चालविणें हा त्यांचा धंदा असतो. (४) दर्जी:—शिवणकाम करणारी जात. यांच्यांत कांहीं ब्राह्मणसंततीपैकीं आहेत ही संतति सर्वांत उच्च म्हटली जाते. यांच्यांत चमरिया म्हणून एक चांभाराची संतति आहे. पंचमहालांतील दर्जी लोकांचा दर्जा भेड लोकांहून खालचा आहे. सुरत प्रांतांतील दर्जी कधीं कधीं भारवाह लोकांचे

उपाध्याय असतात. पुनर्विवाह व घटस्फोट या दोन्ही चाली यामध्य आहेत. कुंभार व व लोहार याच्या हातचें जेवण हे जेवतात. हिंगलाज देवीची पूजा करितात. या लोकांपैकी पांचषष्ठांश लोक शिप्याचा व रगाऱ्याचा धदा करतात इ० इ० ( ५ ) दहाईत:—याचे व खगाराचे पर्वज एकच होते अशी एक दतकथा आहे. सहा रुपये, साखर, हळद, तिळाचें तेल इतकें वराच्या बापानें वधूस दिले पाहिजे. व्यभिचारात धरलेल्या स्त्रीस पहिल्यादा क्षमा करितात पण पुन: केल्यास बहिष्कार घालतात. नवऱ्यास सोडन कोणी स्त्री राहू लागली तर त्यानें नवऱ्याचा खर्च भरून दिला पाहिजे. जर कुणवी वगैरे माणसानें दहाइत बाईबरोबर व्यभिचार केला तर त्याला जातीत सामील करून घेतात हे स्थानिक हिंदु देवाची पुजा करितात. इ० इ० ( ६ ) दागट:—महाराष्ट्रातील एक जात. हल्ली सिंगणापर गाव ज्या ठिकाणी आहे तेथें दाट झाडी असे व त्या वेळी या जगलात दागट लोकाची वस्ति असे. या जातीत जाधव भोंसले यासारखी आडनावें आहेत. काही ठिकाणी दागटाना अस्पृश्य समजले जातें सध्या या लोकाचा मुख्य धदा लावण्या पोंवाडे म्हणण्याचा आहे. पुष्कळसे मोलमजुरी करून रहातात. ( ७ ) दास:—विशेषत: कर्नाटकात आणि कोल्हापुर सस्थानात याची वस्ति बरीच आहे. हा एक भिकारी वर्ग असून हिंदु आणि लिंगायत धर्माच्या हलक्या दर्जाच्या जातीत याची गणना होते. म्हैसूरमध्यें हे भिक्षुकीहि करतात, व स्वत:जवळ शख, घटा वगैरे बाळगतात. भिक्षावृत्तीशिवाय दास लोक गाणे बजावणें आणि नाटकी खेळ करून पोट भरतात. दासस्त्रिया बहुधा वेश्याचा धदा करितात. काही स्त्रिया वशपरपरा देवाच्या देवळातून रहातात. देवळे झाडसारवण्याचे काम याच्याकडे सोपविल्लें असतें. तथापि देवळाच्या गाभाऱ्यात जाण्यास याना मज्जाव असतो. ( ८ ) दुबळे:—भडोच सुरत व ठाणें जिल्ह्यात मुख्यत्वेंकरून आढळतात. कोळ्याप्रमाणेंच या जातीत इतर लोकाचे मिश्रण आहे. बहुधा शेतकरी मजुर व घरगुती नोकर पुनर्विवाह, घटस्फोट, दिराशी लग्न अन्य हिंदु, भत पिशाचाशिवाय हनुमान, शिकोत्री, आगाशी इ० देवताची पूजा करतात, ब्राह्मणाना मान देतात. विवाह सस्कार व नामसस्कार त्याच्याकडून करवितात. इ०

( ९ ) देवाग:—हे कोष्टी असून सुती व रेशमी कपडे विणतात. आतेबहीण व मामेबहीण याच्याशी लग्न बहुधा करता येतें कर्नाटकात मुलाचा बाप मुलीबद्दल ३० रुपये देतो. पुनर्विवाहाची चाल. पचाची समति असल्यास घटस्फोटहि करता येतो. खडोबा, बहिरोबा, जोतीबा, नरसोबा याची पजा करितात. याचे उपाध्याय देशस्थ ब्राह्मण आहेत. याच्यात काही जगमपथी आहेत. विवाहादि सस्कार याच्या जातीचे उपाध्याय करितात ( १० ) देवार:—गाणारे व भिक्षा मागणारे द्रवीड जातीचे. वधू प्रौढ असल्यास गर्भाधान निराळें करावे लागत नाही. नवऱ्याजवळून पळून दुसऱ्याबरोबर राहू लागल्यास विधवाविवाहाच्या दुप्पट दड द्यावा लागतो. न परवडेल तर १० रुपयासकट परत नवऱ्याकडे त्यानें पाठवावी.

हे लोक प्रेते पुरतात. ब्राह्मणाच्या हातचें जेवीत नाहींत. पण गोंडाच्या हातचें खातात. हे लोक डुकरें पाळतात. सन काढणें, वानरें शिकविणें, अस्वलें व वाघ पाळणें, शिसें व कथलाचे दागिने विकणें हे धंदे करतात. इ० ( ११ ) दैवज्ञः—सुवर्णकाराची एक जात. प्रत्येक तालुक्यातून एक दोन देवळें व जमीन उत्पन्ने. या जातीमध्यें विवाहादि संस्कार बहुतेक स्वज्ञातीय उपाध्यायाकडून न मिळाल्यास इतर ब्राह्मणाकडून करविण्यात येतात. ही जात आपल्याला ब्राह्मण म्हणविते. ज्ञातीसंबंधी उपलब्ध असलेली बहुतेक माहिती, आज्ञापत्रें, निवाडे वगैरे के. वे. शा. सं. नारायण रावजी शास्त्री क्षीरसागर यांनी “ विश्वब्रह्मकुलोत्साह ” या ग्रंथांत संकलित केलेली आहे. विधवाविवाहाची चाल केव्हांहि प्रचलित नाही. रखेल्या स्त्रियापासून अगर अधर्म व्यवहारापासून झालेल्या संततीची गणना ज्ञातीत होत नसून तिची स्वतंत्रहि जात बनलेली पहाण्यात नाही. ‘ दैवज्ञ समाजोन्नति परिषद ’ सारख्या संस्था व “ दैवज्ञ प्रबोधिनी ” एक पाक्षिकहि यांच्यांत आहे. इ० इ० या व त्यांच्यांत भर म्हणजे ‘ देवरुखे ’ इतक्याच काय त्या जाती ज्ञानकोशाच्या पंधराव्या विभागांत दिलेल्या आहेत. याहून जास्ती नाहीत.

इतर जातींची ही दिलेली वर्णनें वाचून झाली म्हणजे लागलीच कोशांतील ‘ देवरुखे ’ या मथळ्याखाली दिलेला मजकूर वाचून पहावा म्हणजे आम्ही जी वर विधानें केलेली आहेत त्यांची सत्यता व त्यांतील मर्म ही सहज कोणालाहि पटण्यासारखीं आहेत. याच विभागांत शोधून पहातां ‘ देशस्थ ’ हा मथळा सापडलाच नाही. चित्पावन ऊर्फ कोकणस्थ, देशस्थ, कऱ्हाडे यांचीहि वर्णनें दिली असती म्हणजे त्यांचीहि वर्णनें कशी दिली आहेत तें ताडून पहातां आलें असतें. पण मग ज्ञानकोशकारांनी तसें कां केलें नाही हे काय सांगावें? की त्यांच्या मतें हे महाराष्ट्रीय ब्राह्मणच नव्हेत ?

निदान प्रत्येक जिल्ह्याच्या मुख्य ठिकाणी तरी देवरुखे समाजांतील सज्जन, शहाणे व सुशिक्षित असे कमीत कमी चारदोन लोक सहज आहेत. ज्या ज्ञानकोशकारांनी आपला इतका ज्ञानाचा कोश बनविण्याकरितां अनेक ठिकाणाहून अनेक प्रकारांनी माहिती मिळविली त्यांना या लोकांची गांठ घेऊन हा ‘ देवरुखे ’ मथळ्याखालील लेख प्रथम दाखवून, त्यांचा अभिप्राय घेऊन मग छापतां आला नसता काय ? हें करणें त्यांना काय अशक्य होतें ? की जाणून बुजून त्यांनी हें कृत्य मुद्दाम केलें ? मागाहून आम्हाला असें कळलें की पुण्यातील श्रीयुत भिकाजी मोरेश्वर मादुस्कर हे त्यांच्याकडे स्वतः गेले होते. त्यांनी आपले जवळचे सर्व कागदपत्र ज्ञानकोशाच्या संपादकांना दाखविले. त्यांच्याशी या विषयाची चर्चाहि केली. पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाही असेंच शेवटीं सिद्ध झालें. केवळ “ हे ( देवरुखे ) अपांक्त नाहीत याबद्दल निरनिराळ्या ठिकाणच्या धर्मसभेची व अधिकाऱ्यांची आज्ञापत्रें ( नकला ) पाहण्यांत येतात ” एवढेंच वाक्य कौंसांत ‘ नकला ’ हा शब्द घालून अगदी मोघमपणें छापून व दोन्ही हात आपल्या

कानांवर ठेवून ज्ञानकोशकार मोकळे झाले आहेत; संशोधक राजवाडे यांना सोपारे येथे सापडलेले पत्र हेंहि नकलच. किंबहुना नकलेची नकल. पुनः त्यावर सह्या कोणाच्याच नाहीत. तेव्हा यातील सर्व हकीकत निवेदन करून, त्यातील श्लोकच्या श्लोक आपल्या कोशात उद्धारून घेऊन त्यांवरील रा. राजवाडे यांचें जें एक लांबलचक चर्‍हाट लावीत बसले आहेत, तें त्याना टाळता आलें नसतें काय? तें राहिलें त्याची मर्जी! पण हें राजवाडयाचें चर्‍हाट संपल्यानंतर तरी शके १५०५ मध्यें श्रीक्षेत्र काशी येथील प्रसिद्ध मुक्तिमंडपात सर्व जातीतील विद्वानांनी निर्णय लाविलेल्या सह्यानिशी असलेल्या निर्णयपत्रातील अर्थात् मादुस्कर यांनीं दिलेल्या पत्रातील आणखी पाच चार ओळी त्याना देता आल्या नसत्या काय? "सभासदि विचारू केला जो अनंत भट्टि देवर्षि ब्राह्मणासावानें द्वेषु केला तो शास्त्रविरुद्ध याकारणें चिपळुणे, कर्‍हाडे, देवर्षि, महाराष्ट्र हे समस्त ब्राह्मण समान वैदिक कर्मी व अन्नसंबंधी समस्ताशी अधिकार ऐसा निश्चय जाहला याहि ब्राह्मणि परस्पर द्वेषु करू नये. देवर्षि ब्राह्मणास आम्हास पूर्वी अन्नसंबध होता मध्यें अनंतभट्टि नाही म्हणितलें होतें. तुम्ही सकळ करितसा कोणी अन्नसंबध न म्हणति त्याशी विश्वेश्वराची आण जे अति पाषांड मत्त करिती" ही रा. मादुस्कर यानी दिलेल्या पत्रातील दोन वाक्यें रा. राजवाडे याच्या मजकुराप्रमाणेंच दिली असती तर काय बिघडलें असतें? ही वाक्यें तर प्रत्यक्ष श्री काशीक्षेत्रातील प्रसिद्ध मुक्तिमंडपात शक १५०५ मध्यें झालेल्या निर्णयपत्रातील होत. त्यावेळी चिपोळणे, कर्‍हाडे, महाराष्ट्र, गुर्जर, तैलंगुक वगैरे अनेक जातीचे प्रमुख हजर होते त्याचप्रमाणें "अथ देवर्षीविप्राणा काश्या श्री मुक्तिमंडपे। यतिमिश्रविपश्चिद्भिः सद्ब्राह्मण्य विविच्यते ॥ १ ॥ तत्र तावत्पूज्यपाद परमहंस परिव्राजक महाराष्ट्र कर्णाटक कोंकणतैलंगद्रविडादि सकल ज्ञातीय विद्वद्गृहस्थनिचयसमत्या वेदशास्त्रलोकनो विमृश्य देवर्षिब्राह्मणा वेदशास्त्रपुराणेतिहासेभ्योधिगतपरमार्थाः। क्रतुयजनयाजनशीलाः पंक्तिपावनाः शरीरान्वयार्हा अत्युत्तमब्राह्मण्यशालिनः ॥ शिष्टानुष्ठितशरीरान्वयार्हाश्चेति सिद्धांतितम् ॥ वयच ते ब्रुवाणा दोषमत्रार्थे ( दोषम् अत्रार्थे ) विद्वद्भिः परिशोधिते। विश्वेशद्रोहिणो ब्रह्मघातिनश्च भवति ते। इतिदिग् ॥" या शेवटच्या शपथेसह या पाचचार ओळी छापता आल्या नसत्या काय? मग? शाई संपली की कागद संपलें? काय झालें तरी काय? याच्यावर ज्या अनेक ७५ विद्वानाच्या सह्या आहेत, त्यात "संमतार्थो गागाभट्टस्य अस्मिन्नर्थे संमत साम्राज्य पंडितस्य" या प्रमाणें श्री शिवाजी महाराजांना राज्याभिषेक करणाऱ्या प्रत्यक्ष प्रसिद्ध पंडित गागाभट्ट व दिल्लीदरबारातील साम्राज्यपंडित याचीही सही आहे.

बरें, असो; ज्ञानकोशाचा पुष्कळसा मजकूर रा. चितळेभट्टप्रकरणाचें समर्थन करणाऱ्या, राजवाडे यांच्याच लेखाचा अनुवाद आहे. त्याचा यथास्थित ऊहापोह व विवेचन पूर्वी केलेंच असल्यामुळें त्याची येथें पुनरुक्ति करण्याचें मुळींच कारण नाही. पण त्याशिवाय ज्ञानकोशकारांनी दुसरी जी कांही माहिती गोळा

केली आहे तिचाहि तिच्या मानानें सत्कारपूर्वक विचार करणें जरूर आहे. इ. सन १९११ सालच्या सेन्सस रिपोर्टमधीलहि काही वाक्यें ज्ञानकोशकारानी दिलेली आहेत. पण सेन्सस रिपोर्ट व ग्याझेटिअर्स यांतील मजकूर गोळा करणाऱ्या गृहस्थावर चितळेभटपक्षाच्या कोठें अवशेष राहिलेल्या लोकाचा परिणाम घडलेला आहे असे म्हणावें लागतें. कारण असें जर न म्हणावें तर त्याना दुसरी बाजू का दिसली नाही ? खरी वस्तुस्थिति काय आहे ती द्यावयाची म्हटलें तर त्यानी दुसरे बाजूची माहिती का मिळवू नये ? आतापर्यंतच्या इतिहासावरून असेंहि दिसून येतें की अशा सर्वमान्य ग्रंथातून त्याला इष्ट असलेली माहिती साहजिकपणा दाखवून नमूद करून अगर करवून ठेवण्यात चितळेभट्टाचा एखादा अनुयायी असेना, पण तो मोठा दक्ष असतो. निदान ज्ञानकोशकारानी तरी असे करणे मोठी लाजिरवाणी गोष्ट होय. कारण त्याना तर दुसरी बाजू पुराव्यानिशी माइन दाखवून व समजावूनहि सागितली होती. असें असूनहि त्यानी दुसरी बाजू योग्य स्वरूपात माडू नये याला काय म्हणावें ? किंवा त्याना जो मजकूर घालून ठेवावा असें वाटलें तो त्यानी मुद्दाम घालून ठेविला ? काय म्हणावें तरी काय ? एखादा युरोपियन साहेबहि आमच्या इकडल्या तिकडल्या गोष्टीविषयी काही लिहीत असतो, पण ती त्याची धाटणी निराळी. देवरुखे ब्राह्मणात ऋग्वेद व यजुर्वेद हेच दोन वेद असून आज शतकेंच्या शतके किंबहुना हजारों वर्षे याच दोन वेदाचें ते अध्ययन करीत आले आहेत. अथर्ववेदाचा त्याना गध देखील नाही. पण असे असुन ज्ञानकोशकार विल्सन साहेबाचें मत मोठया आवडीने छापून ठेवीत आहेत. कोणी काही म्हटलें तरी आपल्याजवळ सारासार विचार पाहिजेच की नाही ? विल्सन म्हणतो की, अथर्ववेदाच्या देवर्षि शाखेचा हा वर्ग असावा. असो; त्याच्या इच्छेस येईल तें म्हणून टाकण्यास त्या बिचाऱ्याला तरी मुभा का नसावी ?

'ते आपल्यास म्हणतात अगर म्हणवितात" 'त्याचे म्हणणे की,' 'असे असावें', 'सागतात,' 'म्हणतात' 'पुष्कळ' 'बहुतेक' 'बहुश:' 'मुख्य' असल्या मराठी भाषेतील शब्दानी व शब्दप्रयोगानी ज्ञानकोशकारावर व रा. राजवाडयावर फार, नव्हे अनत उपकार करून ठेविले आहेत असें कोणी म्हटल्यास ती अतिशयोक्ति होऊ शकणार नाही. या शब्दाच्या आड जरी ते उभे राहिले आहेत तरी त्याचें अंतरग सहजच उघडें पडत आहे. वरील शब्दानी युक्त अशी वाक्यें स्वतत्रपणें वाचून पहावीतच. त्याशिवाय त्यातील खरा रसस्वाद प्राप्त होणें शक्य नाही. आणखी एक दोन गमती सागतो. "देशस्थाशी आपला लग्न व्यवहार २५० वर्षांपासून असल्याचे सागतात" असे एक वाक्य आहे. म्हणजे काय ? पूर्वी कधी नव्हता व हल्ली सरसकट आहे असे ज्ञानकोशकार लिहितात. "याच्यात पोटजाती नाहीत" म्हणजे काय ?" 'देवरुख' हे युरोप आफ्रिकेंतून नुकतीच येथें येऊन तळ देऊन राहिलेली एखादी पाहुणी अशी स्वतत्रच जात अगर समाज आहे की काय ? ज्ञानकोशकाराची तरी काय कल्पना झाली आहे ?

त्याच्या पुढचें दुसरें वाक्य " हे आपणास ऋग्वेदीय देशस्थाची पोटजात म्हणवि-तात " पण हें ऐकावयास ज्ञानकोशकार कोठें गेले होते । लिहावयास काय पाहिजे तें लिहून छापतां येतें. कि एकदा वहावत सुटलें म्हणजे काय पाहिजे तें लिहून टाकावयाचें ? प्रत्येक ठिकाणी सारासार विचार म्हणून काही असतोच की नाही? " हे आपणास ऋग्वेदीय देशस्थाची पोट जात म्हणवितात " या वाक्यानतर आणखी काही वाक्यें लिहिल्यानतर ज्ञानकोशकार म्हणतात " हे ऋग्वेदी आश्वलायन व यजुर्वेदी तैत्तिरीय शाखांतर्गत हिरण्यकेशी अशा दोन शाखा याच्यामध्यें आहेत. " या देवरुख्यामध्यें दोन्ही वेदाच्या शाखेचे लोक आहेत हें जर सिद्ध आहे तर ज्ञानकोशकारानी ' हे आपणास ऋग्वेदीय देश-स्थाची पोटजात म्हणवितात' असें वाक्य दिलें आहे त्याचा अर्थ कसा लावावयाचा? किंवा " हे आपणास म्हणवितात " यातील " म्हणवितात " या क्रियापदाचा येथें उपयोग केला असल्यामुळें कोशकार सुटत आहेत? पण कोशकारापाशी याप्र-माणे म्हणावयास तरी कोण गेला होता हें कळू शकेल काय ? निदान ज्ञानकोश-कारानी तरी या वाक्याची सगति कशी लाविली असेल ती त्याची त्यांनाच ठाऊक ? असो, या सर्व गोष्टी ज्ञानकोशाच्या ज्ञानभाडारातच शोभात.

ज्ञानकोशकारानी ' शतप्रश्नकल्पलते ' करिता एक स्वतत्र प्यारा राखून ठेवून अध्यायप्रश्नानिशीवार तिच्यांतील त्यांना देवरुखे याच्या दंतकथेचा जो मुद्दा सागून ठेवावयाचा होता तो त्यांनी अगदी स्पष्ट नमूद करून ठेविला. त्याचबरोबर कै. पडित विष्णुशास्त्री यानी लिहिलेल्या ग्रथाचा उल्लेख करणेंहि त्याना भाग पडले आहे. पण त्या ग्रथाचें नुसतें सपर्ण नावहि त्याच्यानें छापवलें नाही " पचद्रविडा-तर्गत महाराष्ट्र ब्राह्मणातील देवरुख्याविषयी शास्त्रसमत विचार " एवढेंच नाव दिलें आहे. पण त्याच्यापुढें " आणि त्याजविषयी खोटया प्रवादाचें खडन " हे त्या ग्रथाचें नाव सपूर्ण दिलें असते तर माजर आडवें का गेले असतें ? " त्यात देवरुख्याना देशस्थ म्हटले आहे " एवढेंच त्या ग्रथाविषयीं नमद करून ठेविलें आहे. पण त्यातच पडित विष्णुशास्त्री यानी या ' कल्पलते 'चा कर्ता अगदी सामान्य प्रतीचा, अव्युत्पन्न, इतिहासानभिज्ञ, वृथाजात्याभिमानी व दुरभिमानी कोणी तरी माध्व पुराणिक होता हे सिद्ध केलें आहे. तसेंच त्याच कल्पलतेंतील नायक देवरुख्याविषयींच्या द्वेषाचा आद्य प्रवर्तक जो चितळेभट्ट त्याच्या कृतीचा पूर्ण निषेध केला आहे. इतकेंच नव्हे, तर श्रीमद्भागवतातील व मनुस्मृतीतील वगैरे धर्मशास्त्रार्थीप्रमाणें उलट हा चितळेभट्टच दुराग्रही तामसी, महापापी व अधमाधम व अत्यत मोठा गुन्हेगार कसा ठरतो व हें त्याचें आचरण कितीं निंद्य आहे हें साधार सप्रमाण सिद्ध केलें आहे. इतकेंच नव्हे तर इतर महाराष्ट्रीय ब्राह्मणापेक्षा देवरुखे याचा दर्जा कोणत्याहि प्रकारे यत्किंचितहि कमी नाही असें सिद्ध केलें आहे. एवढा हा चार सहा ओळीचा मजकूर जर रा. राजवाडे याच्या मजकुरापुढे नमूद करून ठेविला असता तर त्यात काय बिघडलें असतें ? " शतप्रश्नकल्पतेमध्यें

यांच्या ( देवरुख्यांच्या ) उत्पत्तीबद्दल एक कथा आहे; तीच सर्वत्र आढळते " या त्यांच्या हृदयवाक्यावर या मजकुरानें कायमचें विरजण पडेल अशी ज्ञानकोशकारांना भीति वाटली की काय ? कीं या गोष्टी त्याना उमगल्याच नाहीत ? " यांचें ( देवरुख्याचें ) म्हणणें की... . .मग परशुरामानें चित्पावनाना निर्माण केलें व देवर्षि ब्राह्मणांना शाप दिला " असे ' कल्पलते ' च्या घ्याख्यानच ज्ञानकोशकाराचें एक वाक्य आहे. पण हें वाक्य कोणाचे ? कोणत्या देवरुखे इसमानें हा त्याना शोध लावून दिला ?

सह्याद्रिखडात परशुरामानें शाप दिल्याची एक कथा आहे. पण हा शाप कोणाला दिला आहे ? देवर्षींना मुळीच दिलेला नाही. परशुरामानें परशुरामक्षेत्र निर्माण केलें. त्यानतर त्यानें चित्पावन ब्राह्मण उत्पन्न केलें. शिवाय दुसरीकडूनहि त्यानें काही ब्राह्मण आपल्या क्षेत्रात आणून ठेविलें. यांना सोडून परत जातांना परशुरामानें त्यांना सागितलें की " तुमच्यावर जेव्हा एखादें सकट येईल त्यावेळी मला हाक मारा म्हणजे मी येईन. " पण या ब्राह्मणांचा या वचनावर विश्वास न बसून परीक्षा पहाण्याकरितां उगाच खोटेपणानें धावा केला. हा धावा ऐकून परशुराम तेथें आला आणि पहातों तों निराळाच प्रकार ! यावर परशुरामाला क्रोध आला आणि त्यानें उत्पन्न केलेल्या व येथें आणून ठेविलेल्या ब्राह्मणाना शाप दिला. असा हा शापाचा खरा प्रकार व खरा प्रसग सह्याद्रिखडात वर्णिला आहे परशुरामानें कोणकोणत्या ब्राह्मणाना शाप दिला त्या ब्राह्मणाची यादी दिली आहे पण त्यात देवर्षि ब्राह्मणाचा कोणत्याहि प्रकारचा उल्लेख अगर सबध आलेला नाही. उलट त्याच्या वडिलाच्या श्राद्धास देवर्षि ब्राह्मणाना क्षण दिला असता ते गेले नाहीत. व अत्यत पवित्र ब्राह्मण क्षणाला बसू इच्छित नाहीत ही परपरा अद्यापहि चालू आहे हे निराळें सागावयास नकोच. नतर परशुरामानें चित्पावनाना उत्पन्न केलें, पण तो या देवर्षि ब्राह्मणाना शाप देऊ शकला नाही असेंच म्हणणें भाग पडेल.यावरून हेंहि सिद्ध होत आहे की,परशुरामानें हे चित्पावन ब्राह्मण उत्पन्न करण्यापूर्वीच सह्याद्रीमध्यें देवर्षींचा निवास होता.

पुराणातून व सस्कृतात देवरुखे याना देवर्षि म्हटलें आहे. त्याचप्रमाणें परंपरागत चालत आलेल्या ज्ञानाला व समजुतीला अनुसरून थेट श्रीकाशीक्षेत्रापर्यंत याना देवर्षीच म्हणत आलेले आहेत. तर मग असे असता देवरुखे हे देवराष्ट्रातून कोंकणात सुमारें शके ४५० च्या सुमारास आलें असे जें रा. रा. राजवाडे म्हणतात त्याचा अन्वयार्थ कसा लावावयाचा ? सोपारें येथील चिटोऱ्याचा धागा धरून रा. राजवाडे या तर्कज्ञानात शिरत आहेत. पण या चिटोऱ्यातील श्लोक व ' देवर्षि ऊर्फ देवरुखे याचा अर्थाअर्थी कोणत्याच प्रकारचा सबध येत नाही हे सिद्ध झाल्यावर रा. राजवाडे याच्या मताला मुळीच जागा उरत नाही हें सिद्धच होत आहे. त्याचप्रमाणें ज्ञानकोशात एक वाक्य आहे तें असें. " यांचें ( म्हणजे कोणत्या इसमाचें ? ) म्हणणें की, या ब्राह्मणांना क्षण दिला असतां हे गेले नाहींत म्हणून

मग त्यानें ( परशुरामानें ) चित्पावनांना निर्माण केलें, व देवर्षि ब्राह्मणांना शाप दिला " तेव्हा या वाक्यालाहि सह्याद्रिखडात मुळीच आधार मिळू शकत नाही व त्यामुळें तें अगदीच विसगत आहे असें म्हणणें भाग आहे.

रा. राजवाडे यानी आपल्या लेखात जो आवाज काढला आहे त्याचाच प्रतिध्वनि ज्ञानकोशकारानी आपल्या कोशात उमटविलेला आहे. रा. राजवाडे म्हणतात " सध्यां मुबईतील बहुतेक खानावळी देवरुख्यानी चालविलेल्या आहेत व त्यात सर्व तऱ्हेचे ब्राह्मण जेवतात तेव्हा मुबईटापूत पक्तिपावनत्वाचा प्रश्न राहिलेला नाही. " म्हणजे काय ? मुबई बाहेरच्या टापूत सध्या हा प्रश्न आढळून येतो की काय ? मुबईचा टापू हा कोंकणच्या लगत असल्याकारणानें तेथें काही देवरुख्याच्या खानावळी असणें साहाजिकच आहे. पण खुद्द मुंबईत अगर मुबईबाहेर पुण्यासासारख्या शहरात ज्या खाणावळी अगर जेंवणाच्या अन्य मोठमोठया सस्था आहेत त्या बहुतेक चित्पावन ऊर्फ कोंकणस्थ याच्याच आहेत, थोडया बहुत देशस्थाच्या आहेत त्यांतहि पुष्कळ ' देवरुखे ' जेवीत असतात. पण तेथें हा प्रश्न आमच्या सशोधकाना आढळून येतो काय ? शिवाय घाटावर देशातदेखील अनेक खेडयापाडया- अगर सातारा, नाशिक, धुळे, जळगाव असल्या शहरात पुष्कळ देवरुखे आहेत तेथून तरी या प्रश्नाचा वास आमच्या सशोधकाना येत आहे काय ? आमचे सशोधक पुढें म्हणतात ": कोंकणातहि ( मागील वाक्यातील ' सध्या ' ) बहुतेक लोक ह्या जातीशी अन्नव्यवहार करितात " म्हणजे पूर्वी करीत नव्हते की काय ? किंवा हल्ली चितळेभट्टाच्या अवशेष राहिलेल्या पक्षातील उरलेला दहा हजारात एकदा करीत नसेल तर तो आमच्या संशोधकाच्या मतें शहाणा की समजस ? याच्यापुढें सशोधकाचें दुसरें वाक्य असें. " तेव्हा पक्तिपावनत्वाच्या प्रश्नात आता काही म्हणण्यासारखें तथ्य राहिलें नाही. " म्हणजे पूर्वी तरी हा प्रश्न सशोधकाच्या ' तथ्याने ' अगदी थबथबलेला होता की काय ? बरें; आता एक या प्रश्नात म्हणण्यासारखें तथ्य राहिलें नसेल; पण समजा की चितळेभट्टाचा एखादा छोटासा अवतार आज पुनः अवतरला तर त्याच्या बावटयाखाली आपल्या गणासह येऊन उभें रहाण्यास सशोधक व त्याचीच ' री ' ओढणारी ज्ञानकोशसपादक मडळी तयार होईल काय ?

" गरीब विद्यार्थ्यांकरिता अलीकडे यानी काही फड काढले आहेत " ही एक गोष्ट कोशात नमूद करून ठेविलेली आहे. पण यात कोणतें स्वारस्य कोशकारांना वाटलें ? फड काढणें, सभा काढणें, अगर सस्था काढणें म्हणजे सघटनेचाच एक प्रकार आहे. भोंवतालच्या लोकाची उपाधी अगर जुलूमवजा त्रास होऊ लागला म्हणजे त्याला प्रत्याघात अगर प्रतिक्रिया अथवा स्वसरक्षण म्हणून अशा संस्था निघत असतात. ब्राह्मण ब्राह्मणेतर हा वाद उपस्थित होऊन ब्राह्मणानां जेव्हा आंच लागू लागली तेव्हां ब्राह्मण्यसरक्षक परिषद अस्तित्वात नाही काय आली ? पुण्यास ब्राह्मण विद्यार्थी साहाय्यक मडळ पुणें, अशी एक सस्था सुमारें सन

१९१२–१३ साली अस्तित्वात आली होती. तेथेच ऋग्वेदी देशस्थांच्या गरीब विद्यार्थ्यांना साह्य करण्याकरिता अशीच एक नुकतीच संस्था स्थापन झालेली आहे. अशी एक ना दोन किती तरी उदाहरणें दाखवून देता येतील. हल्ली हिंदुसंघटना-विषयीं आम्ही फार आतुर झालों आहों. सारांश, असल्या संघटनांच्या म्हणून ज्या ज्या संस्था निघतात त्यांची पूर्वपीठिका अगर त्याविषयी सर्वसामान्य नियम अशाच प्रकारचा असतो. पुण्यास नुकतीच गेल्या जानेवारीत ब्राह्मणांचें संघटन करण्याच्या उद्देशानें एक महाराष्ट्र–ब्राह्मण–सभा म्हणून निघालेली आहे त्याचा • तरी अर्थ काय ? हाच.

" कुलाबा जिल्ह्यांत दाहिवली येथील विठ्ठलदेवाचें एक संस्थान या जातीच्या पंचायतीच्या मालकीचें आहे. गरीब विद्यार्थ्यांकरिता अलीकडे यांनी कांही फंड काढले आहेत. पूर्वी यांच्यांत पंचायती होत्या, सांप्रत नाहीत. यांच्यांत पोटजाती नाहीत. हे आपणास ऋग्वेदीय देशस्थांची पोटजात म्हणवितात. आणि देशस्थांशी आपला लग्नव्यवहार २५० वर्षांपासून असल्याचें सांगतात यांचा धर्मविधि देवरुखे भिक्षुकांकरवीच बहुशः होतो. हे अपांक्त नाहीत याबद्दल निरनिराळ्या ठिकाणच्या धर्मसभेची व अधिकाऱ्यांची आज्ञापत्रें ( नकला ) पहाण्यांत येतात. तसेंच देशस्थ व देवरुखे या दोघांच्या कुलस्वामीमध्येंहि बरेंच साम्य आहे. तुळजापुर व कोल्हापुर येथील देवी, जेजुरीचा खंडोबा हे यांचे मुख्य देव आहेत. " अशी अनेक वाक्यें ज्ञानकोशकारांनी लिहिलेली आहेत. म्हणजे पण याचा अर्थ काय ? आणि हेतु तरी काय ? म्हणजे ही अगदी कांही तरी आपली एक जात आहे काय ? म्हणजे हिच्यांत उच्च ज्ञान नाही, उच्च उपासना नाही, उच्च कर्मं नाहीत असें ? गणपति, शंकर, विठोबा, राम, श्रीदत्त वगैरे देवतांची किती तरी मंदिरें आपल्या उपास्याच्या भक्तिप्रेमामुळें या लोकांनी उभारलेली आहेत. यांची काय वार्ता ज्ञानकोशकारांना लागलीच नसेल ? नाही म्हणावें तर इतर गोष्टी यांना कशा आढळल्या ? व त्या विपरीत स्वरूपांत देता आल्या ? की चांगल्या वार्ता मुद्दाम लावूनच घेतल्या नस_तील ? की लागल्या असून सुद्धा दिल्या नसतील ? यांचा मुख्य देव जेजूरीचा खंडोबा आहे असें ज्ञानकोशकार उल्लेखितात. पण या देवतेची कितीशी देवळें देवरु-ख्यांनी बांधलेली ज्ञानकोशकारांना आढळली आहेत ? अगर जेजूरी येथील देवतेस किर्तीशा देणग्या भाविक देवरुख्यांनी दिलेल्या ज्ञानकोशकारास आढळल्या आहेत ? किंवा कितीशा देवरुख्यांनी येथील यात्रा केलेल्या आहेत ? म्हणूनच आम्ही म्हणतों की हा मजकूर लिहून झाल्यावर त्यांना छापावयाचाच होता तर देवरुखे समाजांतील एकदोन, सज्जन, शहाण्या व सुशिक्षित गृहस्थांना दाखवून मग तरी छापावयास पाहिजे होता. याकरिताच, आम्ही या लेखाच्या आरंभी दास, दांगट, दुबळे, देवांग, दैवज्ञ वगैरेंच्या वर्णनाचे मासले दाखविले आहेत. त्या वर्णनाबरोबरच हें वरील प्रमाणें दिलेलें ' देवरुखे ' यांचें वर्णनहि वाचून पहावें म्हणजे 'ज्ञानकोशकारा'विषयी लिहितांना प्रारंभी जो आम्ही एवढा उपोद्घात केला आहे त्यांतील मर्म काय

आहे हे ध्यानीं येईल. शेवटचा प्यारा त्याना लिहावयाचा होता तर तो पूर्ण करतांना अंताजी दामोदर शितुत की ज्याचें वजन व महत्त्व शिद्याच्या दरबारांत इतकें वाढलें की त्यानी त्याला आपल्या नांवाचें नाणेंहि पाडूं दिलें; इतकेंच नव्हे, तर हा अतुशाही रुपया अजूनहि प्रचारात चालू असल्याचें ऐकतों. त्या अंताजीपताचें नाव ज्ञानकोशकाराना दिसलेंच नाही ? अशा एक की दोन किती गोष्टी सांगाव्यात ? त्याच्या लेखांतील प्रत्येक वाक्य, त्यांतील शब्द, त्यांची जुळवणी यावरून ज्ञानकोशकारांचे अतरग उघडें होत आहे. असो; आतां कोठवर लिहावें ? एवढया ऊहापोहावरून व विवेचनावरून संशोधक राजवाडे व ज्ञानकोशकार याचा रोखझोंक, कल कसा झुकतो आहे हें सहज कळून येण्यासारखें आहे. परमेश्वर त्याचें भलें करो ! ! ! ( चितळे भट प्रकरण ).

---

आमच्यावर जे आक्षेप घेतले गेले ते कितपत योग्य आहेत हें दाखविण्यासाठी पिपुटकरानी तारीफ केलेल्या मादुसकरानी पुरविलेल्या माहितीकडे लक्ष दिले पाहिजे.

महाराष्ट्रीय ज्ञानकोशकारांनी सर्व ज्ञातीच्या पुढाऱ्यास केलेल्या विनंतीस अनुसरून देवरुखे जातींतील रा. मादुसकर याजकडून पुढील माहिती आली होती, व तिच्या आधारावरच ज्ञानकोशातील लेख तयार केला होता ती याठिकाणी प्रश्नानुक्रमानें देत आहों:—

## रा. मांदुसकरांनीं ज्ञानकोशाला पुरविलेली माहिती.

१ (अ) सन १८९१ सालच्या खानेसुमारीप्रमाणे पुरुष ३६८५+स्त्रिया ३३९९ मिळून केवळ मुंबई इलाख्यात ७०८४ एकूण लोकसंख्या. या शिवाय माळवा (इंदूर, ग्वालेर संस्थानें), कर्नाटक वगैरे प्रांतात सुमारें २००० मिळून सुमारें ९।१० हजार वस्ती सन १८९१ साली होती:—

खानेसुमारीचे रिपोर्टात 'देवरुषी' म्हणून एक वर्ग दाखल केलेला आहे; त्याची लोकसंख्याहि सुमाराने वरील आकड्याइतकीच आहे. तो वर्ग आमचे समाजांतील आहे किंवा वेगळा आहे हें मला निश्चित माहीत नाही.

( ब ) जातीचें मुख्य वसतिस्थान, रत्नागिरी जिल्ह्यांत फुणगूसचे खाडीचे दोन्ही तीरावर,(रत्नागिरी, चिपळूण, संगमेश्वर ह्या तीन तालुक्यात)सुमारें ९० गावें आहे. व एकदर लोकसंख्येचा जवळ जवळ निम्मे भाग सांप्रत या गांवी आहे.

तसेंच उबरगाव, जिल्हा ठाणे येथें, आजूबाजूची सात गावे येथें आमचे देवरुखे लोकाची वसती आहे. तेथील लोकसख्या सुमोर १५००-२००० असावी.

२ पूर्वी कोकणप्राती गावोंगावी पचायती होत्या असें सागतात, पण साप्रत कोठेंहि नाहीत. सर्वसामान्य पचायत अर्थात नाही.

३ पूर्वीच्या पचायतीचे अध्यक्ष विवाक्षित घराण्यातलेच निवडीत. प्रसग विशेषी अगदी तिऱ्हाईत अध्यक्ष निवडीत असे वृद्ध लोक सागतात. इतर ब्राम्हण जातीच्या पचानीही निवाडे दिलेले आहेत.

४ जातीची अशी विवाक्षित देवळे नाहीत. जातीतील गृहस्थानी बाधलेली, उत्सव वगैरे ज्ञातीतलेच गृहस्थ करीत आहेत अशी देवळे आहेत. त्यास सरकारी व इतर खाजगी गृहस्थाकडून देणग्या वगैरे आहेत. त्याची वहिवाट देऊळ बाधणाराचे वशाकडे आहे. काही ठिकाणी अशा मिळकतीची व्यवस्था लोकनियुक्त मडळीचे हाती आहे उ. दहीवली, तालुके कर्जत, जिल्हा कुलाबा येथील श्री विठ्ठल देवाची मिळकत लोकनियुक्त सभेचे हाती आहे. अशा मिळकतीची किमत अजमासें १०।१५ हजार रुपये पर्यंत होईल.

जातीचे मालकीची घरे, चाळी वगैरे नाहीत.

५ जातीचा विवाक्षित कर नाही. पण काही गावात लग्नकार्यात ऐपतीप्रमाणें कमीतकमी १। रु. पासून २५ रु. पर्यंत सार्वजनिक कामाकडे घेतात. या पैशातून गावातील देवळें, धर्मशाळा याची दुरुस्ती व अनाथप्रेतसस्कार करण्याची वहिवाट आहे.

अलीकडे उबरगाव प्राती अशा कार्यात नारळफड म्हणून वसूल करतात. त्याचा उपयोग गरीब विद्यार्थी ( अर्थात जातींतले ) यास मदत देण्याचे कामी करतात.

६ पूर्वी पचायती होत्या तेव्हा त्याचे निवाडे लिहून ठेवण्याची वहिवाट होती. असे निवाडे रत्नागिरी जिल्ह्यातल्या काही गावी विशेषतः राई, जाबरूण, नरवण या गावी काही आढळले. गेल्या ५० वर्षातले लिहिल्याचे आढळले नाहीत त्या पूर्वीचे आहेत.

७ पचायतीचे नियम अमलात आणण्यासाठी अन्नोदकव्यवहार बद ठेवण्याची चाल होती.

८ सरकारी मजुरी मिळालेली नव्हती अ र अशी मजुरी मिळविण्याचे कारणहि पडत नसावेसें दिसतें.

९ मागील पचायतीचे निकाल पाहता देवादिकास दिलेल्या सार्वजनिक पैशाचा अपहार केल्यावरून, शूद्रादिकाशी अन्नोदकव्यवहार केल्यावरून, अतिशूद्रादिक स्त्रियाशी पापमूलक सबध केल्यावरून, शासन करण्यासाठी पचायतीपुढे प्रश्न येत; व पच उभय पक्षाच्या लेखी कैफीयती, साक्षी पुरावा पाहून निकाल देत.

सार्वजनिक पैशाच्या अपहाराबद्दल, सर्व नुकसानभरपाईशिवाय काही ठरीव दड, अगर ठरीव कालमर्यादेपर्यंत, ठरीव हप्ते दड घेत.

इतर गुन्ह्यास सक्षौर प्रायश्चित अगर जातिबहिष्कृति ही शासनें असत. याशिवाय क्षुल्लक गुन्ह्याबद्दल अमुक देवावर अमुक अभिषेक करावा अशा प्रकारेंहि शासनें करीत असल्याचे दिसते.

आजपर्यंतच्या प्रश्नापैकी बहुतेक सार्वजनिक मिळकतीचा अपहार, गावकीनें ठरविलेले देवादिकाचे सबधी नियम मोडणे हेच प्रश्न पचायतीपुढे आलेले दिसतात. क्वचित् शूद्रादिकाच्या हातचे अन्नोदक ग्रहण केल्याबद्दल तक्रारी, व फारच तुरळक ( फक्त एकदाच ) अतिशूद्रादिकाशी अनीतिसबध वगैरेबद्दल दिसतात.

१० देशस्थ ( ऋग्वेदीय व यजुर्वेदीय ) कोकणस्थ (चित्पावन),कऱ्हाड वगैरे.

११ या वरील सर्व जातीशी अन्नोदकव्यवहार होतो.

१२ आमच्या जातीच्या पोटजाती नाहीत. पण आमची देवरुखे जातच ऋग्वेदीय देशस्थाची पोटजात आहे असे दिसते व तसे मानण्याची कित्येकाची प्रवृत्ति आहे.

ऋग्वेदीय देशस्थाशी कमीतकमी २६० वर्षापासून तों आतापर्यंत बरेच शरीरसबध झालेले आहेत. तुरळक कऱ्हाडे, व कोंकणस्थ ( चित्पावन ) याच्याशी झाल्याचे दाखले आहेत. सोबत पाठविलेल्या कागदात ( येथे छापले नाहीत ) हवा तेतका पुरावा आहे )

१३ आमच्या जातीत होता होईतो आमच्या देवरुखे जातीचेच भिक्षुक विवाहादि सस्कार करतात त्याचे अभावी, देशस्थ ( ऋग्वेदीय ), कऱ्हाडे अगर कोंकणस्थ ( चित्पावन ) भिक्षुकहि विवाहादि सस्कार करतात.

१४ देशस्थ, कोंकणस्थ व कऱ्हाडे या जातीतल्या प्रमाणेच या प्रश्नातल्या मुद्यांचा निकाल होतो.

१५ चातुर्वर्ण्यव्यवस्थेत जातीचें स्थान (पचद्राविडान्तर्गत महाराष्ट्र ब्राह्मणापैकी ) षट्कर्माधिकारी ब्राह्मण हे आहे,व हेच ज्ञातीचे म्हणणे आहे.पण रत्नागिरी प्रान्तस्थ चित्पावनास हे मात्र म्हणणे मान्य नसावें असे सोबतच्या ( येथें छापली नाहीत ) निरनिराळ्या काळच्या पत्रावरून दिसते.

वास्तव त्या प्रातातल्या चित्पावन व त्याचेच कक्षेतले कऱ्हाडे याशिवाय सर्व आर्यावर्तात त्या सर्व ज्ञातीना आमचेच मत सर्वमान्य असल्याचे त्या त्या काळच्या समत पत्रावरून व राजाचे हुकमावरून दिसते. या बाबत (१) शके १५०५ सालचे श्रीक्षेत्र काशी येथील ब्राम्हण सभेचे पत्र ( मराठी ). या पत्रात उल्लेखिलेले ताम्रपट मात्र माझ्या पाहाण्यात नाहीत. (२) शके १५७९ सालचे श्रीक्षेत्र काशी येथील मुक्तिमडपसभेचे समपत्र (सस्कृत) ७५ सह्यानिशी. (३) शके १६०५ सालचें काशीतलें ब्राम्हणभोजन सबधी पत्र

सह्यानिशी. (४) शके १६४९ सालचें पत्र. यात पैठण, द्वारका, त्र्यंबक, रामेश्वर मथुरा, काशी वगैरे ठिकाणच्या महाराष्ट्र ब्राम्हणाची समतें आहेत. याशिवाय यात आणखीहि काही क्षेत्रस्थाचे निरनिराळ्या काळचे निवाड्याचे उल्लेख आहेत. ( ५ ) शके १६९६ सालचे गागाभट्ट व्यास पैठणकर याचें पत्र . ( ६ ) सुमारें वीस वर्षांपूर्वी सातारा येथें श्रीमच्छकराचार्य सकेश्वर मठ याचे अध्यक्षतेखाली देशस्थ, कोंकणस्थ, कऱ्हाडे, देवरुखे या महाराष्ट्र ब्राह्मणात बेटी व्यवहार होण्यास हरकत नाही अशा अर्थाचा झालेला ठराव. त्यास अनुसरून सन १९१४ साली लिमये ( चित्पावन ) व देवधेकर ( देवरुखे ) याचा झालेला विवाह ( ता. १२-५-१४ चा केसरी पहा. ) यासबधी केसरी लिहितो " अभिनदनीय विवाह—येथील रहिवासी रावसाहेब वासुदेव सदाशिव बापट, माजी कमिशनर बडोदें, याची भाची ( रा. हरि चितामण लिमये रहाणार गोळप यांची कन्या ) आणि रा. नारायण दामोदर देवधेकर बी. ए. राहणार उबरगाव याचा विवाह काल रोजी पुण्यास रा. सा. बापट याचे हस्ते झाला. रा देवधेकर हे देवरुखे व लिमये हे कोंकणस्थ असल्यामुळें सदर विवाह हें पोटजातीतील विवाहाचें एक उदाहरण होय. म्हणूनच आम्ही त्यास अभिनदनीय म्हटलें आहे. ब्राह्मणान्तर्गत पोटभेदातील विवाह पूर्णपणें सशास्त्र असून फक्त रूढीमुळे ते आजवर निषिद्ध मानण्यात आले आहेत. अर्थात् ते फिरून प्रचारात आणण्यातच सामाजिक हित आहे. "

१६ जातीचे प्रकरणी कागद श्रीक्षेत्र काशी वगैरे सर्व क्षेत्री क्षेत्रोपाध्याकडे आहेत असे कळते. तुरळक तुरळक कोठें कोठें जुन्या घराण्यातून आढळतात. रत्नागिरी जिल्ह्यात, नरवण जावरूण, निवेंडी वगैरे गावी असे कागद आहेत. श्रीकाशी येथें क्षेत्रोपाध्याय वे. शा. स. रामडोहोकर रामघाट, याचें घरी दप्तर आहे असें वे. शा. सिताराम भटजी रामडोहोकर कळवितात. तसेंच उज्जनी येथे रा. शितूत याकडे व बडनरे ( शिंदेशाही ) येथें रा. करोडे याचेकडे दप्तर असल्याचें कळतें. उबरगावी श्री. महादेवराव पाटील पिपुटकर याचेकडे बरेंच मोठें दप्तर आहे असें ते म्हणतात. मी समक्ष पाहिलें नाही.

१७ जातीच्या इतिहासासबधी दतकथा विशेषशा नाहीत फक्त 'शतप्रश्नकल्पलता' नामक पुस्तकात अध्याय १ प्रश्न ९ यात देवरुखे याचे उत्पत्तीबद्दल एक कथा सागितली आहे. त्या कथेस अनुसरूनच एक दतकथा प्रचलित आहे व तिचाच उल्लेख आहे. ती दतकथा साराशरूपानें अशी:—रत्नागिरीजवळ निवेंडी नामक गावाजवळ ( बसणी ) एक चित्पावन ब्राह्मण तळे खणण्याचे काम करीत होता. त्याचा नियम असा की त्यामार्गे जो कोणी जाईल त्याने एक पाटी माती तळ्याबाहेर टाकावी. काही दिवसानी देवरुख प्रांताकडील काही ब्राह्मण मडळी तेथे आली त्यास सदर चित्पावनाने तळ्याबाहेर माती खणून टाकण्यास सागितले. त्यानी ते शूद्रकर्म म्हणून नाकारलें. त्यावरून त्या चित्पावनानें त्यास शाप दिला की " जे कोणी तुमचे पक्तीस जेवतील त्यास सहा महिने दारिद्र्य येईल. " याच दतकथेचा अनुवाद

थोड्या फार फरकानें सर्वत्र आढळतो. याच आधारावर रत्नागिरी प्रातस्थ चित्पावन व देवरुखे याचा आज कित्येक वर्षे वाद आहे व एकमेक एकमेकास अपाक्त लेखीत आहेत !

अन्येपि देवराष्ट्रीया देवराष्ट्रादुपागताः ।
अपाक्तेया अयाज्याश्च गिरिकातारवासिनः ॥
उदीच्याः कान्यकुब्जाश्च नागराश्चित्तपावनाः ।
पयोष्णीतीरसस्थाश्च सर्वे ते पक्तिदूषका. ॥

हा श्लोक सह्याद्रिखडात आहे ( तो मूळचा तेथील आहे की प्रक्षिप्त आहे याबद्दल वाद आहे ). यातले देवराष्ट्रीय हेच देवरुखे असेंही कित्येकानी वादात ध्वनित केलें व देवरुख्यास दूर सारण्याचा प्रयत्न केलेला कागदपत्रावरून दिसतो पण " देवरुखे " हा " देवर्षि " या शब्दाचा अपभ्रश आहे हें उघड आहे. " देवराष्ट्राः " व " देवर्षयः " हे भिन्न आहेत असें नागरखडातल्या उताऱ्यावरून व इतर कागदपत्रावरून दिसते.

करवीर क्षेत्रापासून समुद्रापर्यतच्या प्रदेशातल्या अनेक नामापूर्वी ' देव ' हा शब्द लावलेला आहे, उदाहरणार्थः देवगड, देवडोंगर, देवनदी वगैरे. त्या प्रमाणेच त्या प्रातात राहणारे कोणी ' ऋषि ' नामक ब्राह्मणास ' देवर्षि ' हे नाव पडलें असावें व तेच देवरुख्याचे मूळ पूर्वज होत. या करवीर क्षेत्रात व त्यातच असलेल्या सह्याद्रीच्या भागी ऋषि लोकाची वस्ती होती याबाबत

"तत्क्षेत्रे ( करवीर क्षेत्रे ) ऋषयः सर्वे ब्राह्मणा वेदपारगाः ।
तेषा दर्शनमात्रेण सर्वपापक्षयोभवेत् ॥
ततः सह्याद्रि शिखरमदूरे दृष्टवान् मुनिः ।
दिव्यौषधि तपोनिष्ठैर्मत्रसिद्धै महार्षिभिः ॥(हरिवश पुराण अध्याय ४०)
क्रमादागत्य चाद्राक्षत्सिह्य पर्वतमुत्तमम् ।
नानागमतपोनिष्ठैर्मंत्रासिद्धैर्महार्षिभिः ॥ ( परशुरामक्षेत्रोत्पत्ति सह्याद्रिखड )

इत्यादि पुराणातरीचे उतारे अनेक आहेत. तसेच देवर्षि हे फार प्राचीन काळचे म्हणजे ज्यावेळी आर्यलोकात जाती प्रचारात आल्या नव्हत्या त्यावेळचे लोक होत असे ' लोकहितवादी ' आपल्या ऐतिहासिक गोष्टीत म्हणतात. ( ऐ. गोष्टी भा. ३ नासिकवृत्त छा. छा. पृ. ३८ )

डॉ. विल्सन आपल्या ' इडियन कास्टस ' यातही देवरुखे हे प्राचीन देवर्षींचे अवशेष असावेत असें म्हणतो.

यावरून ' देवरुखे ' म्हणजेच ' देवर्षि " किंवा करवीर क्षेत्रातले ऋषि होत. हेच ऋषि पुढें करवीरच्या शृगाल राजाच्या छळानें तेथून निघून परशुराम क्षेत्रात ( कोंकणांत ) येऊन राहिले. हे " वेदवेदागपारगाः ", " दिव्यौषधितपो-

निष्ठाः " होते. असें हरिवंशपुराण व सह्याद्रिखंड वगैरे ग्रंथात उल्लेखिलें आहे. पुढें परशुराम कोंकणात आल्यावर त्याने आपल्या पितृश्राद्ध तिथीस " श्राद्धार्थ चैव यज्ञार्थ मंत्रिताः सर्व ब्राह्मणाः ॥ नागताऋषयः सर्वे कुद्धोऽभूद्भार्गवो मुनिः " असा सह्याद्रिखंडात चित्पावनाच्या उत्पत्तिप्रकरणी उल्लेख आहे. यातील ' ऋषि ' कर वीर प्रांतातून या प्रांती आलेलेच ऋषि–देवर्षि होत. तें परशुरामाकडे श्राद्धार्थ गेले नाहीत म्हणूनच रागाने त्यानें ' चित्पावन ' नवीन निर्माण केले. या गोष्टीच्या तात्पर्यार्थाकडे लक्ष देता ऋषि–देवर्षि कोंकणचे मूळ रहिवासी व चित्पावन मागाहून तेथें आलेले वसाहतवाले होत व त्यामुळेंच या जातीत हर्षामर्ष व तटे उत्पन्न झाले असावेत. व तेच निरनिराळे काळी पुढें चालले आहेत-

तेव्हा देवरुखे हे मूळचे ' देशस्थ ' असून ते कोल्हापूरमार्गे कोंकणात गेले असावेत. हे अन्य पुराव्यानीही सिद्ध होतें

( १ ) देवरुख्याची बरीच--नव्हे सर्वच उपनामे–गोत्रें देशस्थात (ऋग्वेदीय) आहेत.

( २ ) कुलस्वामी–बरेच देशस्थाचे कुलस्वामीशी समान आहेत. उदा. तुळजापूर–भवानी, कोल्हापूर–अंबाबाई व एकवीरा, जेजूरी–खंडोबा, रत्नेश्वर, तृण बिंदेश्वर, कोटेश्वर, सोमेश्वर हे सर्व देशावरच आहेत व अनेक देशस्थाचे हेच कुल स्वामी आहे.

( ३ ) वर्ण, भाषा, चालीरीति–देशस्थाशी मिळत्या आहेत.

( ४ ) २६० वर्षांपासून आतापर्यंत देशस्थाशी शरीरसंबंध होत आले आहेत. ( कै. विष्णु परशुरामशास्त्री पंडित यानी " पंचद्राविडान्तर्गत महाराष्ट्र ब्राह्मणातील देवरुख्याविषयी शास्त्रसंमत विचार " नामक पुस्तक सन १८७१ साली लिहिले आहे, त्याची एक प्रत माझे संग्रही आहे त्याचीच नक्कल या सोबत आहे. [ येथे छापली नाही. ] त्या पुस्तकातही देवरुखे हे मूळचे देशस्थ असून ते कोल्हापूर मार्गेच रत्नागिरी प्रांतात गेलें असेंच सिद्ध केलें आहे. )

१८ गेल्या तीन चारशें वर्षांत विशेषत. ब्राह्मणी राज्यात ( आदिल शाही व निजामशाही ) सरकारी नोकऱ्या, कुलकर्णीपण, देसाई पण पतक रून कित्येक लोक पुनः देशावर धारवाड बेळगाव जिल्ह्यात आहे.

पुढे मराठेशाहीत, गुजराथ, माळवा, सातारा, पुणें उंबरगाव वगैरे भागात देवरुखे लोक कारकून, जकाते, वैदिक, शास्त्री वगैरे नात्यानें जाऊन राहिले. महादजी शिंद्याचे पथकात अमझारवाले हे एक सरदार होते त्यास जहागीर होती. तसेंच त्याचेच पथकात नागो देवचक्के हे एक देवरुखे सर दार अहमदाबादेजवळ इंग्रजाबरोबर लढले. या कारणानी सर्वत्र पसरले.

१९ इंग्रजी राज्यापूर्वी देवरुख्याचा आचार इतर महाराष्ट्र ब्राह्मणा प्रमाणेच होता. त्याचे प्रमाणेच आता त्यात फरक होत आहे.

२० जातीत पुनर्विवाह नाहीत. जातीतल्या विधवाची व निराश्रित मुलाची व्यवस्था इतर महाराष्ट्र ब्राह्मणांप्रमाणेंच काही विशेष प्रकारे लावलेली नाही.

२१ अशी जात बनलेली नाही.

२२ अशा प्रकारचे उदाहरणच घडलेले नाही.

आडनावें, गोत्रें व कुलस्वामी याच्या याद्या सोबत आहेत. [येथें छापल्या नाहीत]

जातीतील प्रसिद्ध स्त्री पुरुषाची चित्रें मिळणें शक्य नाही.

स्त्री–पुरुषाचे दागदागिने व पोषाख इतर महाराष्ट्र ब्राह्मणाप्रमाणेच असल्यामुळें याबद्दल जास्त माहिती देणेची जरूरी नाही.

जातीचा असा फड नाही तरी जातीतील गरीब विद्यार्थ्यास मदत देण्याचें कामी आजपर्यंत अनेक सस्था निघाल्या होत्या

साप्रत " विद्यामृतपोषक सस्था शाखा न. १ व २ " व " विद्यार्थी सहायक मडळ " अशा दोन सस्था आज आहेत त्याचे वार्षिक रिपोर्ट प्रसिद्ध होत असतात. पैकी " विद्यामृत पोषक सस्थेचे १९१६ व १९१७ सालचे रिपोर्ट, व ' विद्यार्थी सहायक मडळी ' चा १९१६ चा रिपोर्ट पाठविला आहे [ येथे छापला नाही. ]

---

## समारोप

आम्हास ज्ञानकोशाचे पुरवणीविभाग तयार करावयाचे आहेत, आणि ज्ञानकोशात ज्या उणीवा असतील त्या भरून काढण्यासाठीच हे विभाग आहेत. ज्याना काही मजकूर हवा असेल तो त्यानी आम्हास कळवावा आणि विस्मृतीमुळे किंवा गैर माहितीमुळें जे दोष उत्पन्न झाले असतील ते दूर व्हावेत, ही आमची इच्छा असल्यामुळें देवरुखे मडळीना आम्ही असें कळविलें की तुमच्या म्हणण्याप्रमाणे जर तुम्हास माडणी करावयाची असेल तर आम्ही तुम्हास सवड देऊ. खरोखर असें दिसून येईल की आमच्या मूळच्या लेखात देवरुखे मडळीना राग येण्यासारखे काही एक नाहीं. तथापि तो लेख प्रसिद्ध झाल्यानतर लोकाना त्यात आपला अपमान झाला असें वाटू लागले तेव्हा केवळ त्याच्या समजुतीसाठी त्याचें म्हणणे जसें येईल तसें त्याच्या अधिकाऱ्याच्या नावावर व जबाबदारीवर छापण्याचें आम्ही अभिवचन दिलें.

आमच्या अभिवचनापूर्वीच ठाणें, मुबई या दोन ठिकाणी ज्ञानकोशासाठी मजकूर तयार करण्यासाठी मडळें स्थापन झाली. आणि ती दोन्ही मडळें पुढें एकत्र झाली आणि त्याच्या सयुक्त मंडळास आम्ही हें अभिवचन दिलें. तेव्हा असें वाटलें की आपलें काम आटोपलें; पण तेवढ्यानें पुरें झालें नाही. मजकूर तयार करण्यासाठी

जी सभासदाची कमेटी नेमण्यात आली तिच्यामध्यें तीव्र मतभेद उत्पन्न झाला आणि तयार केलेला मजकूर अध्यक्षाना आपले निर्णायक मत वापरून पास करून घ्यावा लागला. तेव्हा अल्पसख्याक पक्षाने आम्हास असे कळविलें की तयार झालेला मजकूर आम्हास मान्य नाही. यामुळें आम्ही बहुसख्याक पक्षास असे कळविलें की त्याची बहुसख्या या कमेटीत अल्प फरकानें असल्यामुळें मजकूर जितका जास्त लोकाना मान्य होईल तितका चागला आणि तसें होण्यासारखें असेल तर प्रयत्न करावा. आपल्या पक्षाला अधिक लोकबळ मिळावें म्हणून ज्यानी मसुदा तयार केला होता त्यानी आपल्या पक्षाला लोकाचें पाठबळ अधिक मिळावें म्हणून खटपट करणे अवश्य होतें आणि त्यानी त्याप्रमाणे खटपटहि केली. त्या खटपटीचे दृश्य स्वरूप दहिवलीची परिषद होय. ज्ञानकोशाची जाहिरात करण्यासाठी आम्ही देवरुखे मडळीना मुद्दाम तटे वाढवीत आहोत म्हणून मुबईच्या एका पत्रानें जो आमच्यावर आरोप केला तोही खरा नाही.

दहिवलीच्या परिषदेंत मुबईकर अल्पसख्याक वर्गाचा भाग घेण्याचा विचार होता असे दिसतें. आणि अल्पसख्याक पक्षानें काही पत्रकें दहिवलीसच काढली आहेत. त्या पक्षास चोहोंकडून आलेल्या समाजात आपल्या म्हणण्यास जोर येईल अशी खात्री नव्हती त्यामुळें ती मडळी त्या परिषदेपासून अलिप्त राहिली आणि त्यानी दुसरी एक परिषद मुबईस भरविली. असें आम्हास दिसत आहे तथापि अल्पसख्याक पक्षानें चळवळ बरीच केली आणि आपल्या पाठीमागें लोकबळ हेंच मिळाविलें यात शका नाही.

दोन परिषदा झाल्या त्या परिषदाचे बल भिन्न आहे तरी बेंरच आहे. अशा प्रसगी आम्हास असें वाटलें की जर या दोन्ही परिषदाच्या चालकाची एकी होऊन मसुदा आला तर चागले. आणि यासाठी मसुदा करून पाठविण्याची सधि आम्ही त्यास दिली. तथापि जर दोन्ही पक्षाची एकी झाली नाही तर काय करावें हा प्रश्न उपस्थित होतो. आम्हाला एकच मार्ग शिल्लक उरतो तो म्हटला म्हणजे दोन्ही परिषदा भरण्यापूर्वी ठाणें व मुबई येथील सभाच्या सयुक्त मडळा-कडून जसें तयार झालें असेल त्याचा स्वीकार करणें, किंवा दोन्ही पक्षाचें म्हणणें पाहून एका पक्षानें पाठविलेला मजकर मुख्य म्हणून स्वीकारणे व दुसऱ्या पक्षानें सुचविलेल्या फरकाचा टीपात निर्देश करून मोकळें होणें. या परिस्थितीत सपादकीय निश्चय झाला तो येणेंप्रमाणें:—

दोन्ही परिषदाच्या प्रतिनिधींची तडजोड होऊन दोघास समत असलेला असा मसुदा आला तर त्याचा स्वीकार करण्यात येईल. जर तसा झाला नाही तर

दाहिवली परिषदेच्या प्रतिनिधींचा मसुदा मान्य करण्यात येईल. आणि अल्पसंख्या-काची परिषद जी मुबईस भरली तिच्या इच्छेस मान देण्यासाठी जे माहितीच्या स्वरूपाचे आक्षेप आहेत त्या आक्षेपास टीपेमध्यें स्थान दिले जाईल. या संपादकीय निश्चयाची प्रत दोन्ही पक्षाच्या प्रतिनिधींकडे पाठवावी.

या पूर्वोक्त विवेचनावरून असें दिसून येईल की या ज्ञातीच्या बाबतीत आमचा दुराग्रह कोणताच नव्हता, आणि आम्ही केलेली विधाने त्या ज्ञातीनें पाठविलेल्या माहित्यावरूनच केली होती.

---

## गोवर्धन ब्राह्मणप्रकरण

ज्ञानकोशकारानी आपणास अन्याय केला म्हणून ज्या हिंदु ज्ञातीने सपाटुन चळ-वळ केली, अशी ज्ञाति म्हटली म्हणजे गोवर्धन ब्राह्मणाची होय. त्यानी जी टीका केली त्या टीकेला आम्ही उत्तरहि दिले आहे.मुख्य गोष्ट अशी आहे की आमच्या-वर तुटून पडणारे गोवर्धन ब्राह्मण ज्ञातीतील खटपट करणारे ( रा. देवराव नाईक इत्यादि मंडळी ) आपले मित्र कोण आहेत हें ओळखीनासे झाले आहेत. गोवर्धन ब्राह्मणासंबधाने विचार करता स्वतःची वृत्ति पहिल्यापासून अनुकूल नव्हती हे आम्हास सरळपणे मांडलें पाहिजे. आम्हास प्रथम असें वाटले की नागपूरकडे विदुर किंवा कृष्णपक्षी लोक ( ब्राह्मणाची कुणबिणीपासून झालेली प्रजा ) आज आपणास पाराशर "ब्राह्मण" म्हणवून घेत आहेत त्याप्रमाणेच विधवाची व्यभिचारामुळें झालेली संतति "गोळक" हें लोकपरिचित नाव झुगारून देऊन "गोवर्धन ब्राह्मण" म्हणवून घेऊ लागली असावी. गोवर्धन हे गोळक म्हणजे व्यभिचारसंतति आहेत अशी केवळ आमचीच समजूत आहे असें नाही तर खुद्द गोवर्धनाचीहि तशी समजूत होती व अजूनही असेल. त्यानी जे आपल्या तर्फेचे पुरावे दिले आहेत किंवा पुस्तकें लिहिली आहेत त्यात व्यभिचारोत्पन्न मनुष्य, आईबाप ब्राम्हण असल्यास ब्राह्मणच होतो अशा अर्थाचें लिहिलें आहे आणि कित्येकास गोवर्धन हें नाव पसंत नाही असे दाखविणारे लेखहि आहेत. आज आमचा हा गोवर्धनाच्या व्यभिचारोत्पत्तीचा समज दूर झाला आहे आणि कोंकणस्थ देशस्थाप्रमाणें गोवर्धन ही एक महाराष्ट्रीय ब्राह्मणातील पोटजात आहे असें आमचें मत झालें आहे.

यासंबधानें ज्ञानकोशात जो लेख लिहिला होता तो लेख त्या ज्ञातीचें म्हणणें ऐकून आणि मुद्दाम चौकशी करून लिहिला होता. त्यासंबधानें जी चौकशी झाली ती. प्रथम ११।२।२२ रोजी झाली त्याप्रसंगी गोवर्धनापैकी खालील मंडळी हजर होती.

१ रा. राजाराम केशव ऋषी, २ रा. देवराव विष्णु नाईक, ३ रा. त्रिबक विष्णु धर्माधिकारी, ४ रा. पाडुरग भास्कर शास्त्री,५ रा.शिवराम रामचद्र बिवलकर, ६ रा. हरी विष्णु, ७ रा. गणेश नारायण पानसरे, ८ रा. शकर गोपाळ वड, णगेकर, ९ रा. विनायक रामचद्र मरवी, १० रा. श्रीपाद केशव महाजन, ११ रा. श्रीधर गणेश जोशी, १२ रा. सिताराम जोशी, १३ रा. भगवत भाऊ जोशी, १४ रा. दत्तात्रेय कृष्ण व्यवहारे, १५ रा. महादेव नारायण देव, १६ रा.शकर बाळकृष्ण पिंगळे, १७ रा विठ्ठल महादेव टापरे, १९ रा. नामदेव केशव कुवर, १९ रा. केशव नरहरी घवी, २० रा. हरी गणेश कुलकणी, २१ रा. रामचद्र बळवत कावळे परळी, २२ रा. गजानन गोपाळ देव, २३ रा. पाडुरग चितामण, २४ रा. पुरुषोत्तम रगनाथ टापरे, २५ रा केशव भिकाजी चावरे, २६ रा. महादेव रामचद्र मुरळे २७ रा. दिनकर रामकृष्ण लकडे, २८ रा गगाधर रावजी पिंगळे, २९ रा. श्रीनिवास बनहट्टी, ३० रा. दामोदर वासुदेव पाध्ये,३१ रा. हरी बहिरव मडावले, ३२ रा. आबाजी बाळकृष्ण अगटे, ३३ रा. बापू गोविंद आखरे, ३४ रा. राजाराम आप्पाजी मडावले, ३५ रा. गोविंद बाळकृष्ण मिरासदार, ३६ रा. पाडुरग रावजी जोशी, ३७ रा रगनाथ नरहर रोंघे,.३८ रा. दत्तात्रेय पाडुरग जोशी, ३९ रा. रामकृष्ण पाडुरग कुलकर्णी, ४० रा. महादेव विष्णु ढवळे, ४१ रा. गणेश पाडुरग खिरासे. इ. दोन बैठकी झाल्या. दुसऱ्या बैठकीस ही काही मडळी हजर होती. पण त्या वेळचे सह्याचे कागद सापडले नसल्यामुळें दिले नाहीत.

गोवर्धनाची बाजू चागल्या तऱ्हेने माडण्याचें श्रेय रा, मडावले वकील व रा. पाध्येशास्त्री व रा. देवराव नाईक याच्याकडे आहे. आणि आमच्या मतात जो फरक घडून आला याचें कारण जो पुरावा होता तो तर आहेच पण या तीन गृहस्थाची माडणी देखील तितकीच कारण आहे.

ज्ञातिनिर्णयासाठी जी कमेटी नेमली होती तिनें जो कच्चा मसुदा तयार केला तो आफिसात आहे कच्च्या मसुद्याचा पक्का मसुदा प्रसिद्धीसाठी कधीच झाला नाही. आणि गोवर्धनासबधी जो मजकूर ज्ञानकोशात लिहिला गेला तो त्या कच्या मसुद्यावरूनच लिहिला गेला. तो मसुदा पुढे दिला आहे.

ज्ञातीच्या प्रश्नावर निकाल द्यावयाचा म्हणजे अगोदर पुढें आलेला पुरावा आणि नतर निकाल असा अनुक्रम असावा लागतो. जेव्हा आमच्या निकालाचेंच परीक्षण होत असेल तेव्हा तो निकाल प्रथम देऊन नतर तो निकाल देण्यासाठी पुढें आलेला पुरावा देणे हा क्रम उत्पन्न होतो, म्हणून तो येथें अगिकारितों.

# गोवर्धन ज्ञातिनिर्णय

" गोळक " व " गोवर्धन ब्राह्मण " या नावानें जी ज्ञाति ओळखली जाते तिच्याविषयीचा मुख्य ऐतिहासिक प्रश्न म्हटला म्हणजे हा की, ही ज्ञाति मूळचीच ब्राह्मण आहे की, व्यभिचारोत्पन्न एका ज्ञातीनें आपणास गोवर्धन हें नाव वर्णविषयक महत्त्वाकांक्षेने लावून घेतलें आहे एवढाच कायतो प्रश्न पुढे आहे.

कुड आणि गोळक या नावाने धर्मशास्त्रात उल्लेखिलेले जे वर्ग आहेत त्यास ब्राह्मण म्हणावें किंवा म्हणू नये, त्याची गणना कोणात करावी हा प्रश्न आमच्या-पुढें नाही. आणि यासाठी कुड किंवा गोळक या जारज वर्गास देखील ब्राह्मणाचे अधिकार दिले आहेत असे सिद्ध करण्यासाठी गोवर्धनानी मांडलेला वादविवाद आमच्या विचारक्षेत्राबाहेरचा असल्यामुळें तो आम्ही पूर्णपणें उपेक्षितों. आम्हास पहावयाचें तें हें की,

( १ ) गोवर्धन ब्राह्मणाच्या अस्तित्वाबद्दलचा आधार कितपत जुना आहे.

( २ ) ज्या ज्या काळी त्याचा उल्लेख सनदातून केला जातो त्याकाळी त्याचा अतर्भाव ब्राह्मणात होत होता काय.

आमच्यापुढे जी अनेक पत्रे व सनदा आल्या त्यात शालिवाहन शके १६८१ सालचे पत्र जुने आहे, याहून जुन्या पत्राचें अस्सल आमच्यापुढे आलें नाही. त्यात लक्ष्मण नरहर भट उपाध्ये यास गोवर्धन म्हणून धर्माधिकार दिलेले आहेत म्हणजे बाळाजी बाजीरावाच्या कारकीर्दींत गोवर्धन हें नाव रूढ होते, त्यास ब्राह्मण म्हणत होते आणि त्यास धर्माधिकार होते एवढे निश्चित होते. आदिलशाहीतील सनद आणि त्या सनदेवर पेशवाईतील ठराव ही दोन्ही अस्सल आमच्यापुढें न आल्या-मुळें जमेस धरली नाहीत पण तो पुरावा खरा असणे अशक्य नाही.

गोवर्धन हा शब्द महाराष्ट्राच्या बऱ्याच भागास लावीत असत ही गोष्ट निश्चित आहे. तसेंच गोवर्धन आज अनेक जातीचे व ठिकाणचे उपाध्येपण व जोशीपण करतात ही गोष्टहि निश्चित आहे. आगळे ज्ञातीकडून ज्ञानकोशमंडळास आलेल्या माहितींत ही गोष्ट नमूद केली आहे. आज ब्राह्मणाचे सर्व कर्माधिकार गोवर्धनास आहेत शिवाय उत्तर कोंकणातील माध्यंदिनाच्या प्रसिद्ध सनदात त्यानीं आपली वृत्ति गोवर्धनापासून बिबामार्फत घेतली असा पुरावा आहे. यावरून गोव-र्धन ही ब्राह्मणाची जुनी स्वतंत्र जात असावी असें दिसतें.

गोवर्धनानी पुढें मांडलेल्या पुराव्यात असें सांगितलें आहे की. ते अधर्म-संतति नाहीत. असते तर त्याची आडनावें इतर ब्राह्मणातली असती पण त्याची

आडनावे इतर ब्राह्मणातली नाहीत. प्रस्तुत विधान अयथार्थ आहे. गोवर्धनातहि बिवलकर, मडलिक; फाटक, खरे, साठ्ये वगैरे कोंकणस्थात असलेली आडनावे आहेत. भालेराव, दास्तानें, डागे वगैरे देशस्थातील आडनावे आहेत.तथापि गोवर्धनातील विश्वाते, शूल, टापरे, कथे इ. आडनावे बरीचशी किंबहुना निम्याहून अधिक आडनावें अगदी स्वतंत्र आहेत यात शंका नाही. निराळ्या आडनावाच्या पुराव्यावरून काही निर्णय करता येईल तर हा की, ही जात इतर ब्राह्मण जातीपासून अगदी पृथक् आहे. सदृश आडनावावरून निर्णय दोन प्रकारचे निघतील, ते हे की कोंकणस्थ ब्राह्मण देशस्थ व कऱ्हाडे ब्राह्मण प्रभु, मराठे यात अनेक आडनावे ज्या कारणामुळें सामान्य असतील त्याच कारणामुळें काही आडनावें देशस्थादि ब्राम्हणात व गोवर्धनात एक असतील. दुसरा असा संभव आहे की अन्य जातीतील माणसें गोवर्धनात शिरली असतील व त्यास कारण शिरलेल्या व्यक्तींचा जन्म विधवेपासून झाला असावा, या खेरीज अन्य कारणेंहि असणे अशक्य नाही. भिन्न ब्राम्हण जातीतील माणसें गोवर्धनात शिरली असल्यास व विधवासंततीहि गोवर्धनानी स्वीकारली असल्यास जातीची काही काळपर्यंत ज्ञातिनियमनाविषयक नीति मात्र स्पष्ट होईल, तेवढयावरून जातीच्या स्वतंत्र अस्तित्वास किंवा ब्राम्हणजातित्वास बाध येत नाही.

गोवर्धनाशी इतर ब्राह्मण आज उघडपणे अन्नव्यवहार करीत नाहीत असें पुढें आक्षेपकांनी आणले आहे व गोवर्धनानीहि ही गोष्ट मान्य केली आहे आणि ही गोष्ट ब्राम्हण्यास बाध आणू शकत नाही; असें अनेक ब्राम्हणामध्यें असलेला अन्नोदक व्यवहाराचा अभाव पुराव्यादाखल मांडून दाखविलें आहे. गोवर्धनानी याचे कारण व्यावहारिक स्पर्धा असावी असे मांडले आहे, ते अशक्य नाही. ऋग्वेदी गंगातीरवासी गोवर्धन यानी पुढे जी कैफियत मांडली आहे, त्यात उत्तरकोंकणातील यजुर्वेदी गोवर्धन आमच्यातील नाहीत असें म्हटलें आहे. व सनदी गोवर्धन ते आम्ही आहोंत असें म्हटलें आहे. सनदी गोवर्धन ती कोणती घराणी हा प्रश्न आमच्यापुढें नसल्यामुळें त्याच्या कैफियतीचा आम्हास सध्या विचार कर्तव्य नाही.

ज्याअर्थी गोवर्धनात ऋग्वेदी व यजुर्वेदी असे दोन्ही भेद आहेत त्याअर्थी गोवर्धनाचा वर्ग विशिष्टवेदानुयायी न धरता कोंकणस्थाप्रमाणें प्रादेशिक म्हणण्यास हरकत नाही.

वरील कारणामुळें गोवर्धनाचा उल्लेख ज्ञानकोशात गोळक या सदराखाली न करता गोवर्धन या सदराखाली करावा, आणि कोंकणस्थ–देशस्थाप्रमाणें त्याचा अंतर्भाव महाराष्ट्रीय ब्राम्हणांत प्रादेशिक जात म्हणून करावा अशी आम्ही ज्ञानकोशसंपादकास शिफारस करतों.

वरील निर्णयातील वाक्यें आमच्या ज्ञानकोशातील लेखात आली आहेत व त्यावरच टीकेचा मारा नेमला आहे. आमच्या विरुद्ध घेतलेले आक्षेप येणेंप्रमाणें आहेत.

(१) आम्ही गोळक हा अपमानास्पद शब्द वापरला.

(२) आम्ही गोवर्धनाच्या ज्ञातीमध्ये व्यभिचारोत्पन्न किंवा पुनर्विवाहाची संतति गेली असेल अशी कल्पना उत्पन्न करून दिली

(३) आणि त्यास इतर ब्राह्मणाच्या आडनावाचे अस्तित्त्व हा पुरावा असणें शक्य आहे हें कबूल केले

या तिन्ही विधानाना उत्तर असें आहे की गोळक हा शब्द आम्हीच वापरला असें नाही तर हा शब्द त्याच्याच लेखकानी व ग्रथकारानी वापरला आहे आणि गोळक याच्या ऐवजी " गोलोक " असे नाव रूढ करण्याचा प्रयत्न देखील कित्येकानी केला आहे.

या जातीसबधी गॅझेटिअर, सेन्सस रिपोर्ट वगैरेमध्ये जी माहिती आम्हास मिळाली त्या माहितीत गोवर्धन या ज्ञातीबद्दल बहुतेक ठिकाणी ' गोळक ' म्हणून पर्यायनाम दिलेले आढळलें. एवढेच नव्हे तर या ज्ञातीतीलच बडोदे येथील एक गृहस्थ रा हणमत रघुनाथ जोशी यानी पाठविलेल्या ' स्वशाखीय बाधवास विनति' या नावाच्या पुस्तकात ( पृ. १८, १९, २६, २७ इत्यादि ) व ता. २१ माहे मे सन १८८७ रोजी प्रसिद्ध केलेल्या एका जाहिरातीत जो एका खटल्याचा निकाल दिलेला आहे त्यात ( ' गोळक ब्राह्मणाचे बेअदबीचे खटल्याचा निकाल ' व ' विष्णु अनत भटजी वैद्य, समस्त गोळक ब्रम्हवृदाचे उपाध्ये व धर्माधिकारी याचे आज्ञेवरून ' वगैरे तऱ्हेचे ) या ज्ञातीसबधी ज्ञातीतील गृहस्थानी गोळक ब्राह्मण असे उल्लेख केलेले आढळले

आता याप्रसगी ज्ञानकोशकारास दोन्ही बाजू वाचकापुढें ठेऊन निर्णय वाचकावरच सोंपवून मोकळें होता आले असतें परतु या प्रश्नाचा निश्चित निकाल लागून एका जातीवरचा प्रवाद जर अजीबाद काढून टाकता आला तर ज्ञानकोशामार्फत तें एक मोठें कार्य होईल व निश्चयात्मक मत समाजापुढे माडता येईल म्हणून आम्ही मुद्दाम खटपट केली, आणि गोवर्धनाच्या सुदैवानें आम्ही गोवर्धनास अत्यत अनुकूल अशा निर्णयास पोंचलों असल्यामुळें आमच्या मनात आलेल्या प्रत्येक प्रश्नास व निकालात उत्तर दिले आहे.

उलटपक्षी ' दडकारण्य देशातील आर्य ब्राह्मण ' नावाच्या पत्रकात या शब्दाचा व गोवर्धन ब्राह्मणाचा काही सबध नाही असे विवेचन केलेले आडळले.

गोलक व गोवर्धन ब्राम्हण हे एकच किवा काय या प्रश्नासबधी जाहीर रीतीने चर्चा करून गोवर्धन ब्राह्मणासबधीं गोळक शब्दाचा जर अपप्रयोग होत असेल तर त्याचें निराकरण करावें व जातीची इतिहासास धरून साधार व वास्तविक माहिती ज्ञानकोशात अतर्भूत व्हावी व इतरहि ज्ञातीसबधी जेथे सशयित माहिती असेल तेथें ती निश्चित स्वरूपाची मिळावी म्हणून ज्ञानकोशमडळातील, कायद्याशी परिचित व ऐतिहासिक पद्धतीचा अभ्यास केलेले अशा गृहस्थाची निवड करून एक जातिनिर्णायक कमिटी नेमण्यात आली. त्या कमिटीत रा. यशवत रामकृष्ण दाते, बी ए. एल् एल्. बी. ( अध्यक्ष ), शकर पाडुरग पारखी, बी. ए. एल एल. बी., सर्वोत्तम बासुदव देशपाडे, बी ए. हे गृहस्थ असून रा. चिंतामण गणेश कर्वे बी. ए. यास या कमिटीचे चिटणीस नेमण्यात आले.

आम्ही जी चौकशी केली तिचा हेतु देखील जाहीरपणे स्पष्ट केला होता तथापि आम्ही शकराचार्यांचे अधिकार आमच्याकडे घेतो म्हणून आमच्यावर प्रबोधनफर्ते वगैरेंकडून टीका झालीच.

## ज्ञानकोशकारांची विनंति

ज्ञानकोश मडळाकडे अनेक जातीकडून, आमचा तुम्ही ब्राह्मण म्हणून आपल्या ग्रथात उल्लेख करा अशा तऱ्हेची पत्रे आली आहेत. त्याचप्रमाणें अमक्या जातीस ब्राह्मण म्हणून लेखू नका अशा तऱ्हेची इच्छाहि प्रदर्शित केली आहे.

कोणत्याहि जातीचें चातुर्वण्यात स्थान ठरविण्याची जबाबदारी ज्ञानकोश मडळ घ्यावयास तयार नाही. तथापि काही प्रश्न केवळ इतिहास—स्वरूपी आहेत त्याची चर्चा उघडपणे करण्याची ज्ञानकोशकाराची इच्छा आहे. एखाद्या जातीनें आपला इतिहास आमच्याकडे पाठविला तर त्यातील ऐतिहासिक भागाची उघडपणे चर्चा केल्याशिवाय गत्यतर नाही. उदाहरणार्थ कुडाळकर ब्राह्मण हा सारस्वताचा एक भेद आहे की,सारस्वताव्यतिरिक्त निराळा वर्ग आहे इत्यादि ऐतिहासिकदृष्ट्या विवेचन करण्यास हरकत नाही.

या प्रश्नावर आम्हास जें काही लिहावयाचें तें लिहिण्यापूर्वी त्या प्रश्नामध्यें ज्याचे हितसबध अडकले आहेत अशा लोकास आपलें म्हणणें सविस्तर माडण्याची व आमच्याकडे काय माहिती आली आहे ती तपासून तीस प्रत्युत्तर देण्याची संधि देणें अवश्य आहे.

प्रस्तुत हेतूच्या सिध्यर्थ ज्ञानकोशमंडळातील संपादकवर्गापैकी इतिहासशोधनाच्या तत्त्वाशी व कायद्याशी परिचित असलेल्या तीन मंडळीची (रा. रा. यशवंत रामकृष्ण दाते बी. ए. एल्. एल् बी; रा. रा. शंकर पांडुरंग पारखी एल्.एल्.बी,व रा. रा सर्वोत्तम वासुदेव देशपांडे बी. ए ) कमेटी नेमली आहे. तर ज्यास या बाबतीत कांही लिहावयाचें असेल किंवा मंडळापुढें मांडावयाचे असेल त्यानी आपलें म्हणणें या कमेटीपुढें मांडावें.

या कमेटीच्या बैठकी शनिवारी दुपारी तीन वाजल्यापासून ६ वाजेपर्यंत होतील. पहिली बैठक फेब्रुवारीच्या पहिल्या शनिवारी होईल.

या कमेटीपुढें जी माहिती येईल ती प्रसिद्धपणे स्वीकारली जाईल. व चर्चेसाठी घेतलेले प्रश्न आणि ते कोणत्या तारखेस निवतील तेहि आगाऊ प्रसिद्ध होईल. ता. १८।१।२२] [लोकमान्य २७।१।२२

श्रीधर व्यंकटेश केतकर.

## गोळकांविषयीं विचार

" सामाजिक इतिहासाविषयी वादग्रस्त प्रश्नाच्या " निर्णयासाठी त्याची चौकशी उघड करण्याचें ठरवून जे निर्णायक नेमिले, त्यांची गोळक उर्फ गोवर्धन याच्या प्रश्नाचा निर्णय करण्यासाठी पूर्वी जाहीर केल्याप्रमाणें पहिली बैठक ११ फेब्रुवारी १९२२ रोजी ३ वाजता ज्ञानकोशकार्यालयात भरली होती.

बैठकीस रा. मंडावले वकील ( मुंबई ), रा. पालये शास्त्री, रा. देवराव नाईक ( मुंबई ), रा. महाजन ( आकोला ) इत्यादि त्या ज्ञातीची अदमासे ५० मंडळी हजर होती. बैठकीस गोवर्धनब्राह्मणसभा मुंबई, पुणें, आकोला या सभांकडून प्रतिनिधी आले होते.

सुरवातीपूर्वी डॉ. केतकर यानी निर्णायक मंडळी तटस्थपणें केवळ ऐतिहासिक विचार करणार आहेत, जातीस बहिष्कृत ठेवावे किंवा नाही या प्रकारच्या प्रश्नाचा ते विचार करणार नाहीत, यासाठी ऐतिहासिक प्रश्नाशिवाय दुसरे प्रश्न कोणी उपस्थित करू नयेत असे सांगितले.

रा. सिद्धेश्वर शास्त्री चित्राव यानी पूर्वपक्ष करून त्यात असें सांगितलें की सध्या संबोधिले जाणारें गोलक शास्त्र, आचार व व्यवहार यावरून पाहता ब्राह्मण नाहीत. आपल्या म्हणण्याला त्यानी आधार दाखविले.

याला पालयेशास्त्री यानी उत्तर दिले की, गोळक हा विशिष्ट जातिवाचक शब्द नाही. महाराष्ट्रातील प्राचीन गोवर्धन प्रांतातील ब्राह्मणाना गोवर्धन ब्राह्मण असें नाव आहे, दोन हजार वर्षांपासून आब्राह्मणशुद्रात गोवर्धन पौरोहित्य करीत आले आहेत. अन्नोदकव्यवहाराभास ब्राह्मण्यास विरोधक नाही.

नतर प्रत्युत्तरादाखल कोणास बोलावयाचे असल्यास तसें करण्याची परवानगी दिली. दोघातिघानी गोवर्धनाच्या ब्राह्मण्याविषयी आपलें म्हणणे पुढें माडिलें. रा. मडावले यानी ऐतिहासिक पुरावे सादर केले व इसवी सन १७४२ पर्यंत निदान गोळक हें नाव आढळत नाही असें सागितलें.

अखेरीस पाच वाजल्यानतर निर्णायकानी ज्ञातीनें रुजू केलेले व करणार असलेले कागदपत्र पाहून विचार करण्यासाठी आज निर्णय तहकूब ठेऊन त्यासाठी २२ एप्रिल १९२२ ही तारीख नेमिली व मडळीचे आभार मानून बैठक खलास करण्यात आली

चितामण गणेश कर्वे

[ लोकमान्य ता. १६।२।२२ व लोकसग्रह ता. १८।२।२२ ]

## कृष्णातीरकर गोवर्धनांचीं कैफीयत

पुणें मिरासदार स्कूल, वेताळ पेठ

श्रीयुत महाराष्ट्र ज्ञानकोश मडळाचे सेक्रेटरी व व्यवस्थापक यास

पुणें येथील कृष्णातीरकर कुडब्राह्मण ज्ञातीकडून कृ. सा. न. वि. वि.

१ आमच्या ज्ञातीविषयी महाराष्ट्र ज्ञानकोशात अद्यापि खरी माहिती छापली गेली नाही म्हणून व माहितीची उणीव पडल्यामुळे ज्ञानकोश मडळानीं चुकीची माहिती प्रसिद्ध करू नये म्हणून आम्ही आपल्या समाजातर्फे खालील प्रमाणे माहिती सादर करीत आहोंत.

ज्ञानकोशमडळातर्फे प्रत्येक ज्ञातीच्या उत्पत्ती वगैरे सबधी खरा निर्णय मिळविता यावा या सद्धेतूने त्यानी जे 'न्यायमडळ' नेमून चिकित्सा चालविली आहे, त्या मडळामार्फत ता. ११ फेब्रु व २२ एप्रिल (१९२२) ह्या तारखा " गोळक उर्फ गोवर्धन " हे ब्राह्मण आहेत काय ? असा प्रश्न घेऊन त्याची चर्चा करण्याकरिता नेमलेल्या होत्या. सदरील तारखेस वरील ज्ञातीसबधी जो पुरावा आपणापुढें आला आहे, त्याच्या वास्तविक स्वरूपावर या आमच्या माहितीनें प्रकाश पडून आपले निर्णयाचे कामहि बरेच सुलभ होईल.

२ " गोवर्धन ब्राह्मण " म्हणून सर्वसामान्य जो समाज प्रसिद्ध आहे त्यात मुख्यत्वे दोनच ठिकाणच्या लोकाचा समावेश होतो एक कृष्णातीरकर व दुसरे गंगातीरकर कृष्णेच्या आजबाजस जे ब्राह्मण वस्ती करून राहतात ते कृष्णातीरकर ऋग्वेदी गोवर्धन ब्राह्मण होत व गोदावरीच्या आसमतात राहणाऱ्याना गगातीरकर ऋग्वेदी गोवर्धन

ब्राह्मण अशी संज्ञा आहे. कृष्णातीरकर व गंगातीरकर मिळून होणारा समाज हा एक असून त्यांचा परस्पराशी रोटीबेटी व्यवहार होत असतो. या दोन्ही समाजाची राहणी ततोतत देशस्थ ऋग्वेदी ब्राम्हणाप्रमाणें असून हे स्नानसंध्यादि नित्य कर्मे व दानप्रतिग्रहादि षट्कर्मे ब्राह्मणवत् यथाविधि करीत असतात. यांच्या श्रावण्या ( यज्ञोपवीत धारण करण्याचा वार्षिक संस्कार ) देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मणाबरोबर त्याचे बरोबरीचे नात्यानें केल्या जातात उपनयनादि संस्कार वेदोक्त पद्धतीनें ब्राह्मणाकरवी करविले जातात. त्यांत कधी कधी यांच्या शाखेचे वैदिक ब्राह्मणहि असतात. गायत्रीमंत्राची दीक्षा यांना ऋग्वेदी ब्राम्हण उपाध्यायाकडून दिली जाते. वरील रूढीविरुद्ध आजपर्यंत कोणीहि ऋग्वेदी ब्राम्हणांनी आक्षेप घेतलेला नाही. काही वितंडखोर ब्राम्हणांनी जोशीपणाच्या वृत्तीच्या कामी आपला स्वार्थ साधावा व तो गोवर्धनब्राम्हणास हीनत्व दिल्याने साधेल म्हणून काही खोडसाळपणा केलेल्याची एकदोन उदाहरणे आहेत परंतु त्यांचा निकाल कोर्टातून त्यांच्या वतीनेंच होऊन गोवर्धन ब्राम्हणास उपाध्ये पणाचा व सर्व ब्रम्हकर्माचा अधिकार आहे असे शाबीत झाले आहे. असे एक दोन अपवाद सोडले तर या ज्ञातीचा ब्राम्हण जातीशी कोणत्याहि प्रकारचा वाद व मत्सर नसून ब्राम्हणास हे आपलेच ब्राम्हण समजून पूज्यतेनें वागवितात. खुद्द ब्राम्हणाशी यांचा रोटीबेटी व्यवहार होत नाही परंतु उदकग्रहणास प्रत्यवाय नाही असे बद्दल त्यांना मिळालेल्या सनदापत्रांत स्पष्ट उल्लेख आहे. सार्वजनिक भोजनाचे प्रसंगी व लग्नकार्यादि बाबतीत ब्राम्हणाच्या येथे जाऊन हे दान–दक्षिणा घेतात व ते देतात. त्याबद्दल आजपर्यंत केव्हांच हरकत झालेली नाही. यांचा आहारा–विहार यच्चयावत ऋग्वेदी देशस्थ ब्राम्हणाप्रमाणे असून सांप्रत धर्मभ्रष्टतेच्या काळी सुद्धां अहारविहारादि बाबतींत हे शुद्ध आहेत हे विशेष आहे.

वरील समाजापैकी आम्ही माहिती देणारे कृष्णातीरकर आहोत. आमची वस्ती भोर, पुणे, नसरापूर, परळी, सातारा, कोल्हापूर धामणी, उंब्रज, मिरज, काले, धारपुडी, पेडगाव व कर्नाटक या बाजूस असून आम्हास सर्व साधारण कृष्णातीरकर कुडं गोवर्धन ब्राम्हण म्हणतात. आमची उपजीविका कुलकर्णी, जोशीपणाची वतनें व भिक्षुकी यावर मुख्यत्वेंकरून होते. आमच्यातील काही लोक शाळामास्तर किंवा इतर सरकारी नोकर आहेत. काही शेतकीवर योगक्षेम चालवितात. मु. उंब्रज ता. कऱ्हाड, जि. सातारा येथील जोशी व उपाध्येपणाचा आमचा हक्क असून ती वृत्ति आज तागायत आम्ही चालवीत आहोंत त्याकामी उंब्रज येथील सरकारी सनद व शंकराचार्यांचे आज्ञापत्र ता. २२।४।२२ रोजी आपणास समक्ष दाखविण्यात आली आहेत व त्यांची नोंद माहितीचे पुराव्यात आपण दाखल केली आहे.

३ आमचे दुसरे ज्ञातिबांधव गंगातीरकर मंडळी यांची वस्ती अहमदनगर जिल्ह्यातील आश्वी, उंबरी, पुणतांबे, येवलें, नाशिक, वऱ्हाड, बुलढाणा, अकोला, उमरावती इत्यादि ठिकाणी आहे. त्यांचा निर्वाह मुख्यत्वेंकरून उपाध्येपणा व जोशीपणा यावर होतो. या मंडळीस तिकडे धर्माधिकारी, भट अशी संज्ञा आहे. हे लोक नोकरी वगैरेवर फारसे निर्वाह करणारे नाहीत त्यांच्यापाशी उपाध्येपणा व जोशीपणा यांच्या वृत्तीसंबंधी सनदापत्रें आहेत. तीहि आपणास ता. ११।२।२२ व ता. २२।४।२२ रोजी समक्ष दाखविण्यात आलेली आहेत.

याप्रमाणें कृष्णातीरकर व गंगातीरकर मिळून आमच्या ज्ञातिबांधवांची वस्ती उपरिनिर्दिष्ट ठिकाणाखेरीज इतरत्र नाहीं.

४ आतां ता ११।२।२२ व २२।४।२२ रोजी जी मंडळी ' आम्ही गोवर्धन ब्राह्मण ' म्हणून पुरावा सांगण्याकरितां ' ज्ञानकोश कचेरीत ' आली होती यांपैकी बहुतेक कोंकण प्रांतांतील असून अन्य शाखीय होती त्यांचें वसतिस्थान ठाणा, कल्याण, भिवंडी, माहीम, बदलापूर वगैरे भागांतून आहे. त्यांचा आमचा शरीरसंबंध, रोटीबेटीव्यवहार होत नाहीं म्हणून त्यांना आम्ही आपले शाखेचे समजत नाहीं. आतां अगदीं अलीकडे चारदोन वर्षांत शहरांतील एक दोन सुधारक म्हणविणाऱ्या लोकांनी त्यांच्याशी शरीरसंबंध केल्याचें आढळतें. परंतु त्यास कांहीं व्यक्तींखेरीजकरून आमच्या समाजाची मान्यता नाहीं. विशेष नमूद करण्यासारखी गोष्ट ही कीं, ता. २२।४।२२ रोजी आपणापुढें त्या मंडळींत मिसळून जे लोक आले होते त्यांत पुढारी या नात्यानें जी मंडळी काम करीत होती त्यांना आम्ही आमच्या वतीनें मुळींच निवडलेलें नाहीं. आमच्या समाजांतील चार दोन मंडळी त्यावेळी हजर होती पण सदर मंडळींनी आम्हास न बोलण्याविषयी विनंति केल्यावरून ( कां ते माहित नाहीं ) व आपण होऊन आपणाकडे असलेल्या माहितीवरून गोंवर्धन ब्राह्मणसमाजांत कोणकोणाचा समावेश होतो हा प्रश्न काढाल असें वाटल्यावरून आतांपर्यंत आम्ही तटस्थ राहिलों व सर्व प्रकार निमुटपणें पाहिला.

५ त्यांत असें दिसून आलें कीं, कोंकणस्थ मंडळीबरोबर पुणें येथील लकडे, टापरे, वगैरे मंडळीहि मिसळलेली आहेत. सदर लकडे, टापरे यांचा शरीसंबंध कोंकणस्थांशी असेल परंतु त्यांचा रोटी व बेटी व्यवहार कृष्णातीरकरांशी नाहीं व यान्याशी शरीरसंबंध करण्यास आमचा समाज तयार नाहीं. आमची पुण्यास पूर्वी बरीच वस्ती होती. अनेक वर्षें या दोन्ही समाजाचें ( कृष्णातीरकर व लकडे, टापरे ) वास्तव्य पुण्यास असतांहि त्यांच्याशी आमचा रोटी व बेटी व्यवहार होत नाहीं याचें कारण कांहीं तरी असलेंच पाहिजे. आम्हांस त्या समाजाची कांहीच

माहिती नाही व त्यानीहि ती दाखविलेली नाही. पूर्वी सन १८९४-९५साली आमच्या ज्ञातिबाधवाची व लकडे, टापरे याच्या समाजाची ऐक्यता पुराव्यानिशी व्हावी-म्हणजे ते आमचेच आहेत अशाबद्दल पुरावा दाखल करून त्यानी निर्णय करून घ्यावा—म्हणून सभा भरविण्यात आली होती. त्यात आमच्यातर्फे प्रगल्भ विचाराचे विद्वान असे गृहस्थ होते. परतु त्याना तशा प्रकारचा पुरावा आणतां न आल्यामुळें सभा मोडण्यात आली. त्यासबधी माहिती दिलेले वर्तमानपत्राचे अक आपणा स समक्ष दाखवीत आहोंत. करिता आमच्या समाजात कृष्णातीरकर व गगातीरकर कुडगोवर्धन ब्राह्मण या नावानें सबोधिल्या जाणाऱ्या लोकात—त्यांचा ( कोंकणस्थ, लकडे, टापरे) समावेश करणें झाल्यास कागदोपत्री—म्हणजे उपाध्येपणाच्या व वेदोक्त कर्माच्या अधिकाराच्या सनदा वगैरे—पुरावा पाहून करावयास चुकू नये.

६ यजुर्वेदी कोकणस्थ गो. ब्राह्मण यानी एक काल्पनिक मध्यवर्ती मडळ नेमून ज्ञानकोशमडळाकडे पाठविल्या जाणाऱ्या सनदापत्रें वगैरे कागद त्या काल्पनिक मडळीनें निवडून दिलेल्या अर्थात कोणीही न निवडलेल्या सेक्रेटरीमार्फत यावेत व नतर आपण स्वीकारावेत अशी आपणाशी अट ठरविल्याचे समजतें तरी तसें केल्यानें आपणास खरी वस्तुस्थिति कळणार नाही व कृष्णातरिकर व गगातीरकर याच्या नावाची सनदापत्रें त्याचेचमार्फत दाखल होऊन कोंणकस्थ, यजुर्वेदी व पुणे येथील लकडे, टापरे हे गोवर्धन ब्राह्मण आहेत असें ठरविण्याचे कामी या पुराव्याचा उपयोग करण्याचा त्याचा हेतु दिसतो तो सफल होऊ देऊ नये. कारण त्यापासून मागेंपुढें आमच्या सुरळीत व्यवहारात अडचणी येण्याचा सभव ओह हें आपणास थोड्याशा विचाराती कळून येईल. त्याच्या शाखेच्या उपाध्येपणाच्या सनदा किवा आज्ञापत्रे त्याना निराळी दाखल करण्यास सागावें व नतर योग्य तो निर्णय ज्ञान-कोशात करावा.

येणेंप्रमाणें वस्तुस्थितीच्या खऱ्या निदर्शनाकरिता ही माहिती कृष्णातीरकर कुंडगोवर्धन ब्राह्मण याच्यातर्फे देण्यात आली आहे. कोणाच्या भिडेस्तव ही गाळण्यात येऊ नये अशी विनति आहे. आपणापुढे जी सनदापत्रें आतापर्यंत दाखल केली गेली आहेत ती फक्त आमच्यातर्फे व गगातीरकराची आहेत हें विशेष लक्षात घ्यावें.

आमच्या उत्पत्तीविषयी शास्त्रीय विचार, आमचे आचार विचार नित्यनैमि-त्तिक कर्माचें आमचे सस्कार व कालस्थित्यनुरूप आम्हांस पावन करून घेण्याची आवश्यकता याबद्दल योग्य अशा निर्णयाच स्वरूप कसे असावे अशासबधी आमचे

मत आम्ही सोबत निराळेंच देत आहोंत तें वाचून व सर्व पुरावा लक्षात घेऊन ही सर्व हकीकत विस्तृत रूपानें ज्ञानकोशात छापावी व त्याखाली ज्ञानकोशमडळाचा न्यायबुद्धिपुरस्सर विचार करून ठरविलेला निर्णय छापावा अशी विनयपूर्वक सूचना आहे, कळावें ता. १।५।२२.

सूचना—यासबधी पत्रव्यवहार करणे झाल्यास तो खालील पत्त्यावर करावा.

"चिटणीस, कृष्णातीरकर कार्यकारी मडळ.मिरासदार स्कूल,वेताळ पेठ पुणें."

१ शकर अमृत खडकतकर.
१ दत्तात्रय पाडुरग जोशी.
१ रामचद्र गोपाळ ऋषी.
१ अनत शकर नाचणे बी. ए.
१ सदाशिव नारायण परलेकर.
१ गोविंद बाळकृष्ण मिरासदार.

मिरासदार-स्कूल वेताळ पेठ.

कुडगोवर्धन ब्राह्मणास हल्ली 'ब्राह्मण' म्हणणे कसें योग्य झालें आहे तत्सबधी बुद्धिवाद व या जातीस गैरसमजुतीने लोक 'गोळक' समजतात, हें कसें चुकीचे आहे हें खाली लिहिलेल्या विचाराच्यायोगें लक्षात येईल

मिताक्षरी स्मृतिः—"यो यज्जातीयाद्यजातीयामुत्पन्नः स तज्जातीय एव। यथा गौर्गवि गौः। अश्वादश्वायाश्वः तस्माद् ब्राह्मण्या ब्राह्मणोत्पन्नो ब्राह्मणः। द्विजोत्पन्नयोः कुडगोलकयोरुपनयनसध्यावदनादिच परपरागत ग्राह्य ॥ १ ॥" या स्मृतीवरून असा बोध होतो की, जो ज्या जातीत उत्पन्न झाला असेल त्यास त्याच जातीत गणावा व ब्राह्मणब्राह्मणीच पोटी उत्पन्न झालेला ब्राम्हणच होय असें प्रतिपादिलें आहे.

यावरून उघडच लक्षात येईल की, आम्हास गायत्रीमत्रोपदेश, स्नानसंध्यादि कर्म, मौजीबधनादि सस्कार व वेदोक्त कर्म करण्याचा अधिकार आहेच व त्याप्रमाणें आजपर्यंत सर्व व्यवहार ऋग्वेदी ब्राह्मणाकरवी अगर आमचे ब्राम्हणाकरवी करीत आहोंत व आमचा प्रत्येक ज्ञातिबाधव स्नानसध्यादि ब्रम्हकर्म नित्य करीत आहे, अन्य जातीचें पाणीहि घेत नाही. याना उपाध्येपणाच्या सनदा आहेत भटभिक्षुकीवर याचा निर्वाह आहे. ब्राह्मणगृहींहि याना जोशीपणाच्या हक्काचे उत्पन्न व दान-दक्षिणा मिळते यावरून याना 'ब्राह्मण' म्हणण्यास कोणत्याहि प्रकारची हरकत नाही असें विचाराती कळून येईल.

"अमृते जारजःकुड. मृते भर्तरि गोलकः।" असें स्मृतीत म्हटले असून त्यात विधवेच्या पोटी उत्पन्न होणाऱ्यास 'गोळक' ही सज्ञा दिलेली आहे. सुवासिनी ब्राह्मणस्त्रीस ब्राह्मणापासून जारकर्माचे योगे झालेल्या सततीस 'कुड'

एवढेंच नाव दिलेले आहे व हे कुडब्राह्मण जातीचे ब्राह्मणाचे वंशज आहेत हें समजण्याकरिता त्यास पुढें ब्राह्मण नाव लावणें योग्य झालें आहे. या न्यायानें ज्ञानकोशात कुडब्राह्मणास कुडगोळक म्हणण्याची पद्धति चुकीनें व्यवहारात रूढ झालेली आहे हें दाखल होणें अवश्य आहे ही चुकी ब्राह्मण व इतर समाजाकडून करण्यात येते याचें कारण त्याचें या ज्ञातीसंबंधी असणारें औदासिन्य व हलगर्जीपणा होय असें दिसून येईल. यावेळी ब्राह्मणानी व जगद्गुरु शंकराचार्य यानी हेंहि लक्षात बाळगलें पाहिजे की, अशा तऱ्हेची उत्पत्ति करण्यात मूळ कारण हे ब्राह्मणच असल्यामुळें तेच दोषी आहेत हें ते विसरतात याच्या ह्या दोषाचा परिणाम अशा प्रकारच्या झालेल्या वंशास अनेक प्रकारें लाछनास्पद व अपमानकारक झालेला आहे याचा बोजा त्याच्यावर आहे. तो त्यानी उतरून या जातीस कैक वर्षांनंतर तरी मुक्त करावयास पाहिजे तरच ते मानवज्ञातीतील श्रेष्ठ ज्ञातीत मोडण्यास पात्र आहेत असें आम्ही समजू.

' अमृते जारजः कुण्डः ' या स्मृतीप्रमाणे कित्येक शतकापूर्वी अशा तऱ्हेची उत्पत्ति एके वेळीं झाली असेल परंतु त्यानंतर वारंवार अशाच अनाचारापासून उत्पन्न झालेल्या संततीस आपणामध्यें मिसळू न देता ही ज्ञाती कायम झाली असल्यामुळें इतक्या शतकानंतरहि ती जारउत्पत्तीची ठरल हे म्हणणें बुद्धिवंतास पटणें शक्य नाही. आमच्यामतें आज कित्येक शतकें आम्हास शास्त्रोक्त विवाहपद्धतीनें बद्ध होऊन त्यापासून निर्माण झालेली संतति म्हणून आम्ही अस्तित्वात आलेलों आहों व ब्राह्मणाप्रमाणेंच आम्हास आईबापें आहेत त्यामुळे आम्ही जारकर्माची प्रजा नाही हें प्रत्येकास कबूल करावें लागेल. ब्राह्मण समाजात आज कित्येक शतकापासून व हल्लीहि त्याच्यात जारकर्मापासून संतति झालेली नाही अगर होत नाही असें म्हणणारा कोणता ब्राह्मण छाती ठोकून पुढें येईल ? अशा तऱ्हेच्या संततीच्या आवृत्त्या ब्राह्मण समाजात अनेक निघालेल्या आहेत व असतील, त्या संततीचा समावेश ब्राह्मण लोक कोणत्या समाजात करतात व ती दाखवितील काय ? जर आमच्या समाजात त्याचा समावेश होत नाही व त्याची जातहि निराळी आढळून येत नाही तर अशी प्रजा युक्तीनें त्याच समाजात मोडत असली पाहिजे, अगर ती निराळ्या शूद्र जातीत ( समाजात ) तरी दाखल झाली असली पाहिजे हें उघड आहे.

जर अशा प्रजेची हल्ली निराळी ज्ञाति बनत नाही तर पूर्वी कोणे काळी एकाद्या ब्राह्मण-ब्राह्मणीच्या चुकीमुळें अशी प्रजा उत्पन्न झाली असल्यास ती प्रजा जर

पुढें आपल्या आचरणानें उत्तम कुलात गणण्यास पात्र होऊन पृथक राहिली असेल तर इतक्य वर्षानीहि तिचे हीन ज्ञातित्व व हीन नाव जावयास नको काय? या ज्ञातीची अधिक सुधारणा न होण्यास कारण ब्राह्मणाचें औदासिन्यच होय, असें गृहीत धरावयास नको काय?

हल्ली सुधारणेचा काल आहे. केक ब्राह्मण आपल्या ब्राह्मणत्वाच्या आचार विचारास व परपरेस सोडून वागत असताहि ब्राह्मणवर्णातच मोडतात याची जाणीव ब्राह्मणास आहे काय?

हल्ली ब्राह्मण–ब्राह्मणी पुनर्विवाह करितात व त्यापासून त्याना सतति होते त्या सततीस काय नाव देणार व त्याचा समावेश आमच्यात तर केव्हाच होत नाही तर त्याची जात बनली आहे काय?

जर अशा पुनर्विवाहित सततीपासन ज्ञाति बनली नाही तर कुड ब्राह्मण ही ज्ञाति सभवते कशी?

अर्थात अशा तऱ्हेची जात कायम असणें ज्याअर्थी शक्य नाही त्या अर्थी ही कुडब्राह्मण अगर गोळक ही नावाची जाति होत नाही असें सिद्ध होतें

अर्थात् अशा प्रकारच्या व्यक्तिवाचक सततीस काही अल्पकाळ ती दुसऱ्या ज्ञातीत समावेश पावेपर्यंत वरील नावानें सबोधणें योग्य आहे असें दिसून येईल.

हा विचार लक्षात घेऊन ज्ञानकोशमडळानें ही समाजात होणारी मोठी चूक दुरुस्त करण्याकरिता शकराचार्य वगैरेस लिहून व ब्राम्हण लोकास सदर दुरुस्ती करून अशा तऱ्हेच्या चुका ते यापुढें न करतील अशा प्रकारचा इशारा वर्तमान-पत्रामध्यें त्या लोकास द्यावा व ज्ञानकोशातहि अशा प्रकारचा न्याय नमूद करून ठेवावा.

" सप्त पिढ्यानतर कोणीहि हीनवश असला तरी तो पूर्वीच्या आपल्या श्रेष्ठ ज्ञातीत—मूळ ज्ञातीत—येऊ शकतो "

या स्मृतीच्या आधाराप्रमाणे आता आमच्या हजार—पाचशे पिढ्या झाल्या आहेत तेव्हा इतक्या पिढ्यानतरहि आम्ही या हीन नावानेंच पाचारिलें जावें हें न्यायदृष्ट्या अशास्त्र व जनदृष्ट्या निद्य कृत्य आहे असें सिद्ध होतें.

समाजास सद्गुरुस्थानी असणारे जे जगद्गुरु श्री शकराचार्य ते या कामी औदासिन्य दाखवितात यावरून त्याच्या डोळ्यावरहि अद्याप अज्ञानाचे आवरण असल्याचें स्पष्ट होत आहे व त्यामुळें आम्हास मात्र अपमान सहन करावा लागत आहे. आम्ही छातीठोकपणानें सागतों की, आम्ही जारकर्मापासून झालेलों नसून आमचे वाडवडीलहि तशा प्रकारची प्रजा नाही म्हणून आम्ही आता कुडगोवर्धन ब्राह्मण म्हणवून घेण्यास तयार नाही. आम्ही शुद्ध 'ब्राह्मण' आहोंत म्हणून ज्ञानकोशात आम्हास असा खुलासा पाहिजे की, " हल्ली चुकीने ज्या लोकास कुड गोलक असें लोक समजतात, ते कुड गोळक नसून ते अज्ञानामुळे तसें समजतात.

हे ऋग्वेदी ब्राह्मण आहेत असें समजावें " व यांच्याशी अन्नोदक व बेटीव्यवहार करण्यास हरकत नाही. पण ब्राह्मण समाजानें या गोष्टीचा निर्णय करणें आतां जरूर झालें आहे.

आता आम्ही आपणांस ' गोवर्धन ब्राह्मण समजतों याचें कारण आम्ही ब्राह्मणवर्णीय लोक असून पूर्वी आमचा मुख्य व्यवहार गोवर्धन ( गाईचें पालन पोषण ) करणें हाच होता, व सर्व ब्राह्मणाच्या गाईहि रक्षण करणें आमचें काम होतें व तें पूर्वी थोड्याशा हीन दोषामुळेच आमच्या पूर्वजाकडे सोंपविलें होतें हेंच होय व नाशिक प्रातात आमच्या वशजापैकी काहीनी गाईच्या मोठ्या कळपाचें सरक्षण केलें म्हणून त्या प्रातासहि 'गोवर्धन प्रात' म्हणण्यात येत होतें हें होय. हें नमूद करून ठेवणें. या कारणास्तवच आम्हास 'गोवर्धन ब्राम्हण'असें समजतात.या माहितीच्या अभावी काही लोक अज्ञानपणानें आपणास भलत्याच नावानें सबोधित असतील तर ती त्याची चुकी होय.

हल्लीच्या सुधारणेच्या काळात पळशे, देवरुखे,सवाशे, हे पूर्वी ब्राम्हण न समजले जाणारे लोक हल्ली ब्राम्हण समजले जातात तेव्हा तोच नियम आम्हासहि लागू करण्यास काय हरकत आहे ? मूळ ब्राम्हणाची उत्पत्ति आमच्यापासून झाली व ती सशास्त्र झालेली आहे व तेच आम्ही ब्राम्हण आहोंत अशा अर्थाचा पुरावा कोणी ब्राम्हण आणू शकेल काय ?

चित्पावन ब्राह्मण या नावावरून चितेपासून पावन केलेले ब्राम्हण म्हणून ते मळचे ब्राम्हण नाहीत असे सिद्ध होत नाही काय ?

जगास आदर्शभूत व श्रुतिस्मृतीस आधारभूत मानलेले व ईश्वराचे अश मानले गेलेले जे व्यास हे पराशर ऋषीच्या योगें कोळणीचे पोटी झालेली सतति हे ब्राह्मणाच्या गुरुस्थानी मानले जात नाहीत काय ? भारतादि ग्रथ वाचले असता त्यात असा स्पष्ट उल्लेख आहे की, पुष्कळ क्षात्रिय राजानी आपल्या कन्या ब्राम्हण ऋषीस देऊन त्यापासून झालेली सतति ब्राम्हणच गणली आहे. या सर्व गोष्टीचा विचार आपल्या डोक्यात यावा म्हणून लिहिलें आहे याचा राग नसावा. हा निर्णय जगद्गुरु श्रीशकराचार्य याच्या हस्ते करण्यास आपल्यासारख्या वजनदार मडळीचाच उपयोग होईल असे आम्हास वाटल्यावरून आम्हास ठेवावयाचे प्रश्न आपल्यापुढें ठेविले आहेत. तुमच्यामतें हे प्रश्न अस्थानी आहेत व या गोष्टीचा विचार करण्याइतका अधिकारहि तुम्हास नाही असे वाटेल हें आम्हास कबूल आहे तरी पण आपल्या सारख्या वजनदार मडळींनी मनात आणल्यास आपण काही तरी कार्य करू शकाल असें आम्हास वाटते.

ही सोबत जोडलेली कैफीयत आपणास विचार करण्याचें कामी मदत होईल म्हणून मळ कैफीयतीबरोबर जोडण्यात आली आहे.

---

# इतर ज्ञाती व संप्रदाय

महाराष्ट्रीय ज्ञानकोशात चित्पावन, देशस्थ व कऱ्हाडे ब्राह्मणावर लेख का नाहीत. देवरुखे गोवर्धन इत्यादि ज्ञातीवर लेख आले. या तीन जातींवर लेख लिहिण्याचें मुद्दाम वगळलें काय अशी पृच्छा काही मडळीकडून करण्यात आली आहे. महाराष्ट्रीय सारस्वतावर लेख नाही व दाक्षिणात्य गौडापैकी फक्त कुडाळ देशकरावर काय तो लेख आला आहे. ही पृच्छा करणारी मडळी केवळ या लेख वगळलेल्या ज्ञातीतील नसून इतर ज्ञातीतील आहेत तर या प्रश्नासबधाने उत्तर देणे जरूर आहे.

याचें मुख्य कारण असें झालें. कोकणस्थ, देशस्थ व कऱ्हाडे या तीनहि ज्ञातीतील मडळी आमच्या ऑफिसात काम करीत असल्याचें लोकास ठाऊक असल्यामुळें व या तीन ज्ञातींच्या ज्ञातिविशिष्ट सस्था नसल्यामुळे या तीनहि ज्ञातीतील लोकानी लेख लिहून पाठविण्याची तसदी घेतली नसावी. कोकणस्थाच्या जातीसबधाचा लेख प्रसिद्ध करण्याचा काळ आला तेव्हा तो लेख तयार नव्हता. तेव्हा सपादकानी चित्पावन शब्दाखाली लेख देण्याचें ठरविलें. चित्पावन शब्द जेथें येईल तेथपर्यंत ग्रथ छापून झाला तरी लेख तयार नव्हता.तेव्हा ब्राह्मण या सदराखाली किंवा "महाराष्ट्रीय ब्राह्मण" या सदराखाली लेख घालू असे योजिलें. पण तोहि प्रसग आला आणि तेव्हाहि लेख तयार नव्हता.व ज्ञानकोशाची पानें वाढू देऊ नयेत म्हणून फारसे जास्त लेख तयार करू नयेत, जे लेख तयार आहेत त्यासच सक्षेप द्यावा ही वृत्ति सपादकांना अवश्य झाली. व लहानसा लेख लिहून मोकळे होण्याची इच्छा मात्र सपादकाना नव्हती. या लेखाना भरपूर पृष्ठें द्यावीत अशी इच्छा होती आणि त्यामुळें त्या लेखाना सकल्पित महाराष्ट्र विभागात स्थान देण्याचे ठरविलें. सारस्वत ब्राह्मणावर लेख लिहिण्याचा प्रसग आला तेव्हाहि दाक्षिणात्य सारस्वत स्थलसंकोचामुळें वगळले गेलें आणि त्याना महाराष्ट्र विभागात स्थान देण्याचें ठरविलें. उत्तर कोंकणातील देशस्थ माध्यदिनाना ज्ञानकोशात स्वतत्र स्थान न मिळण्याचें कारण झालें तें येणेंप्रमाणें: या वर्गासबधाने वाद उपस्थित झाला होता. आणि यासबधी त्या ज्ञातीनें माहितीहि पाठविली होती. कै. प्रो. आचार्य, डॉ. पुरदरे, रा. केशवराव पाध्ये, यासारख्या जबाबदार पुढाऱ्याच्या सह्याहि होत्या. त्या माहितीवर जर कोणास आक्षेप घ्यावयाचा असेल तर तो घ्यावा असें आम्ही जाहीरपणे आव्हानहि केलें होतें. या ज्ञातीला देशस्थ माध्यदिनात लेखू नये असें म्हणणाऱ्या मडळीस आपला पुरावा पुढें माडण्यासाठी जितकी जास्त सवलत देता येईल तितकी द्यावी असे आम्हास उत्तरकोंकणच्या माध्यदिनापैकी रा. ब. जोशी, केशवराव पाध्ये, कै. आचार्य, डॉ. दाडेकर, इत्यादि मडळीनी मुद्दाम कळविलें होते. पण त्या माहितीवर कोणीहि पुराव्यासह आक्षेप न घेतल्यामुळे याचा इतिहास द्यावयाचा झाल्यास तो इतर देशस्थ माध्यदिनाच्या इतिहासाचीच पुरवणी म्हणून द्यावा म्हणजे स्वतंत्रपणे देण्याचें कारण नाही असे आम्ही ठरविले, तर देशस्थ ब्राह्मणाचा इतिहास जसा महाराष्ट्र

विभागात घालण्याच्या अपक्षेने वगळला गेला त्याबरोबरच उत्तरकोकणस्थ माध्यंदिनाचाहि वगळला गेला त्याचा इतिहास गाळण्याचें कारण त्याच्याविषयी विरोधबुद्धि होती असें नाही. त्याचा जो काही स्वतत्र इतिहास आहे तो देशस्थ—यजुर्वेदी ब्राह्मणाचें विवेचन करताना त्याचाच भाग म्हणून येईल.

देवरुखे आणि गोवर्धन या दोन ज्ञातीशिवाय तिसरी विरुद्ध लेखन करणारी ज्ञाति म्हटली म्हणजे सारस्वताची होय. याच्याविषयी माहिती ज्ञानकोशात आलीच नाही आणि कुडाळदेशकर ब्राह्मणावर जो लेख रा. बावेंडकर यानी पाठविला त्या लेखाविरुद्ध सारस्वत मडळीत बराच आक्षेप उत्पन्न झाला. जर एखाद्या ज्ञातीला आपल्यासबधानेच लिहावयास सागितलें तरी त्यामुळे कसे प्रसग उत्पन्न होतात हें दिसून येतें. ज्ञातीविषयी लेख लिहिताना ज्या त्या ज्ञातीला आपल्याविषयी लिहू दिल्यानें विरोध टळेल अशी अपेक्षा केल्यास तीहि फसतें असें दिसून येतें, कायस्थ प्रभूच्या ज्ञातीकडून आलेला लेख आम्ही दिलेल्या मुद्यावर लिहून आल्यामुळें जसाचे तसाच छापला पण पाठारे प्रभूची तशी गोष्ट नाही त्याच्यामध्यें कचोळे म्हणून जी जात आहे तिचा अतर्भाव रा. नायक यानी पाठारे प्रभूमध्येंच केल्यामुळें त्या ज्ञातीच्या पत्रातून सतापलेली बरीच टीका प्रसिद्ध झाली. तिची हकीकत विद्यासेवकात पूर्वी ( वर्ष ३ अक ११।१२ ) ) प्रसिद्ध झालीच आहे. ज्ञानकोशाची माहिती जसजशी इतरत्र होऊ लागली आहे तसतसा ज्ञानकोशातील लेखावर आक्षेप देखील इतर लोक घेऊ लागले आहेत. अहीर ,गोलाल जातीचे लोक आता अभीर हे यादव नव्हत असें जें मत ज्ञानकोशात प्रतिपादन केलें आहे त्यालाच आक्षेप घेत आहेत. त्याच्या पाटना येथील परिषदेंत मराठी ज्ञानकोशाचा निषेध केला आहे.

गुजराती जैन सस्थाच्या ज्ञानकोशाविरुद्ध सभा झाल्या पण त्याच्यामध्यें आणि ज्ञानकोशमडळामध्यें आतां स्नेहाचा सबध उत्पन्न झाला आहे. जेव्हा जैन धर्मासबधानें लेख पुरवावेत म्हणुन महाराष्ट्रीय ज्ञानकोशाच्या सपादकानी खटपट केली तेव्हा त्यानी तिच्याविषयी सहानुभुतीनें मदत केली नाही. तथापि आता मदत चागली मिळेल अशी अपेक्षा आहे. काही जैन साधुनी ( उदाहरणार्थ दर्शनविजयजीनी ) ज्ञानकोशातील जैनविषयक सर्व लेख तपासुन कोठें मतभेद झाला आहे किंवा त्याच्यामतें चूक असेल, तें दाखवून देण्याची तयारी करीत आहेत. गुजराथेंत वल्लभपथी देखील मडळी ज्ञानकोशावर नाखूष झाली आहेत. आणि त्याच्या सभा भरत आहेत. निरानिराळ्या ज्ञातीचा गहजब बहुतकरून ज्या कारणामुळें होतो तो असत्य प्रसिद्ध केल्यामुळें होत नसून सत्य प्रसिद्ध केल्यामुळेंच होत असतो असेंच पुष्कळदा आढळून येते.

---